# विक्रीस तयार.

रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई कृत

## ऐतिहासिक पुस्तकें.



| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | मुसलमानी रियासत | .... | किं. रु. | ४—०—० |
| २ | मराठी रियासत (पूर्वार्ध) | .... | ,, | ३—८—० |
| ३ | सदर मध्यविभाग १ | .... | ,, | २—१२—० |
| ४ | सदर मध्यविभाग २ | .... | ,, | ३—०—० |
| ५ | ब्रिटीश रियासत (पूर्वार्ध) नवी आवृत्ति छापत आहे. | | | |
| ६ | शालोपयोगी भारतवर्ष | .... | ,, | १—०—० |

☞ बाहेरगांवच्या ग्राहकांस पोष्ट, प्याकिंग, व्ही. पी. खर्च वेगळा पडेल. पुस्तकें सर्व प्रसिद्ध बुकसेलरांकडे आणि बडोदें येथें रावपुऱ्यांत 'नरहरि पुस्तकालयांत' विकत मिळतील. सर्व पत्रव्यवहार खालील पत्यावर करावा.

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंटस इत्यादि, ठाकुरद्वार, मुंबई.

श्रीसयाजी साहित्यमाला-पुष्प ६६ वें

[ इतिहास-गुच्छ ].

---

# हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास

# मराठी रियासत

## मध्य-विभाग २

[ स. १७५०-१७६१ ],

छत्रपति शाहू, पेशवा बाळाजी बाजीराव.

लेखक

गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., बडोदें.

---

मुद्रक व प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी.

---

' इंदुप्रकाश ' छा०, गिरगांवरोड,-मुंबई.

---

सन १९२१.

---

किंमत तीन रुपये.

# जाहिरात.

आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें श्रीमंत महाराजा साहेब सर सयाजीराव गायकवाड, सेना-खासखेल, समशेर-बहादूर, जी. सी. एस. आय्., जी. सी. आय्. ई., ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी-साहित्यमालेंत" विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

"हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास-मराठी रियासत-मध्यविभाग २" हें स्वतंत्र पुस्तक असून तें उक्त मालेंतील "इतिहास-गुच्छांत" साहसष्टावें पुष्प म्हणून रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए. यांचेकडून तयार करवून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

विद्याधिकारी कचेरी, बडोदें. ता. २५-८-१९२१

ज पु जोषीपुरा, भा. म.

आ. मे. मसानी.
विद्याधिकारी, बडोदें.

# प्रस्तावना.

मराठी रियासतीच्या मध्य विभागांत शाहूछत्रपतीची कारकीर्द मुख्य असून तींत स. १७०७ पासून १७६१ पर्यंतचा विषय येतो. पैकी स. १७४० पर्यंतचा पहिल्या दोन पेशव्यांचा भाग या वर्षारंभीं बाहेर आला. त्या पुढचा नानासाहेब पेशव्याचा भाग स. १७४० पासून १७६१ पर्यंतचा या पुस्तकांत प्रसिद्ध होत आहे. मराठ्यांचा इतिहास बनावाचे स्वरूपांत असल्यामुळें, आजपावेतों बाहेर आलेले कागदपत्र व चर्चा जमेस धरून, त्यांच्या अनुरोधानें या काळांतील घडामोडींचे तपशीलवार वृत्तांत, निरनिराळीं प्रकरणें पाडून, या पुस्तकांत घेतले आहेत. एका पुस्तकास चार पांचशें पानांहून ज्यास्त पृष्ठें सोयीचीं नसल्यामुळें, उत्तर-हिंदुस्थानांतील कारभाराची हकीकत म्हणजे मुख्यत: पानिपत प्रकरण यांत येऊं शकलें नाहीं. अर्थात् स. १७५०–६१ पर्यंतचा उत्तरेंतील कारभार व कित्येक ऐतिहासिक घराण्यांच्या हकीकती एवढ्यांचा आणखी एक भाग लवकरच प्रसिद्ध होईल. आतां स. १७६१ पासून मराठ-शाहीच्या अखेरीचा उत्तरभाग शिल्लक राहतो, त्याचें काम चालू आहे. एवंच मराठी रियासतीचे

(१) पूर्वार्ध स. १७०७ पावेतों; (२) मध्यविभाग १, १७०७–१७४०; (३) मध्यविभाग २, १७४०–६१; (४) मध्यविभाग ३, पानिपत-प्रकरण, १७५०–६१, (५) उत्तर विभाग १७६१–अखेर, असे एकंदर पांच भाग होतील. प्रस्तुत वरच्यांपैकीं हा तिसरा भाग वाचकांचे हातीं देण्यांत येत आहे. एकंदर कामाचें स्वरूप पूर्वीच्या भागांत दर्शविल्याप्रमाणेंच आहे.

शाहूछत्रपतीचा मृत्यु हा प्रसंग मराठशाहीच्या कारभारांत अनेक कारणांनीं क्रान्तिकारक असल्यामुळें तत्संबंधीं व पेशव्यांच्या एकंदर राज्य-धोरणासंबंधीं नानाप्रकारचे विपर्यास प्रचलित आहेत, त्यांतील ऐतिहासिक

सत्य व खरें मर्म स्पष्टपणें कळावें म्हणून, त्या प्रसंगाचे पूर्वोत्तर भाग व त्याचे उपलब्ध कागदपत्र महत्त्वाचे वाटल्यावरून मुद्दाम विस्तारानें घेतले आहेत. निजामशाहीचे व्यवहार किंवा पेशवे ताराबाईचा लढा वगैरे प्रकरणांतील कित्येक तपशील पाल्हाळिक व कंटाळवाणे वाटण्याचाही संभव आहे. वास्तविक या अज्ञात व अनभ्यस्त काळाचा संकलित इतिहास अद्यापि तयार व्हावयाचा असून, पेशवे, निजाम, फ्रेंच, इंग्रज, म्हैसूरकर अशा अनेक सत्ताधीशांचा संबंध येणारे जे भाग आहेत त्यांत दरएक पक्षाचे उपलब्ध तपशील मराठी वाचकांस एकत्र मिळावे, आणि तत्संबंधीं बहुमोल ऐतिहासिक कागद नुसते साधनग्रंथांत अप्रसिद्ध न राहतां, ते त्यांच्या नजरेस सहजवार यावे, असा उद्देश ठेविला आहे.

ह्या पुस्तकांत नानासाहेब पेशव्याच्या गुणदोषांचे उल्लेख ठिकठिकाणीं आले आहेत, ते केवळ त्या त्या प्रसंगापुरते समजावयाचे आहेत त्याच्या समुचित कर्तृत्वाचा अंदाज योग्य अभिप्रायानिशीं पानपतप्रकरणाचे अखेरीस देण्यांत येईल; त्याचे मृत्यूचे व कौटुंबिक तपशीलही त्याच ठिकाणीं येतील.

अनेक विद्वान् गृहस्थांनीं पत्रद्वारा साहित्य पाठवून,सूचना व टीका करून, आणि नाना प्रकारें प्रोत्साहन देऊन मला जें साह्य केले, त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. राष्ट्रीय इतिहासाचें हें अवघड काम अनेकांच्या साह्यानेंच सिद्धीस जाणारें आहे. एकट्याचे हातून तें केव्हांही निर्दोष होणें शक्य नाहीं. वाचकांना यांत जे दोष दिसतील ते त्यांनीं कृपा करून मला अवश्य कळवावे. अशा प्रकारें या कामास यथाशक्ति हातभार लावण्याची पोषक बुद्धि वाचकवर्ग बाळगितील तरच तें निर्दोष होत जाईल.

बडोद्याच्या शाळाखात्यानें या पुस्तकासही उदार आश्रय दिला असून, त्याबद्दल अधिकाऱ्यांचे अभार मानावे तितके थोडेच आहेत.

मुद्रक व प्रकाशक शेट दामोदर सावळाराम यंदे यांनीं मनापासून साह्य करून पुस्तक लवकर छापून काढिले व रा. रा. विनायक सदाशिव वाकसकर यांनींही त्या कामीं उत्साहपूर्वक मेहनत केली, त्याबद्दल उभयतांचे आभार मानणें जरूर आहे. माझ्या रियासतीचीं सर्व पुस्तकें आतां रा. रा. यंदे यांजकडेस मिळतील.

बडोदें ता. २५-८-२१ गो. स. सरदेसाई.

# अनुक्रमणिका.

# शुद्धिपत्र.



| अशुद्ध | शुद्ध |
|---|---|
| पृ. १७९ ओळ ७ खालून, विरुबाईच्या .................. | सगुणाबाईच्या |
| पृ. २४५ ओळ ८ चे शेवटीं म. रि. पृ. ७२४ पाहिजे. | |
| पृ. २४९ ओळ २ खालून, अमात्य ...................... | प्रतिनिधि. |
| पृ. २७५ ओळ ४, १७६१.......................... | १७५१. |
| पृ. २९८ ओळ ३ खालून, येईल .......................... | येईना. |
| पृ. ३०१ ओळ ६ खालून बळवंत .......................... | यसवंत. |
| पृ. ३०५ ओळ १८ बाजीरावाची .......................... | बाजीची |
| पृ. ३७४ व ३७५ ले. ४८३ व ४८४ खंड ३ चे समजावे. | |
| पृ. ३९५ ओळ १२ स्वारीच्यापुढे ‘ कर्नाटकांत ’ वाचावें. | |
| पृ. ३९७ ओळ १४, सन १७३० .......................... | १७६० |
| पृ. ४४९ ओळ १२ देवसुख.............................. | देवरुख. |

श्री.

# मराठी रियासत

## मध्यविभाग

१७४०-१७६१.

## प्रकरण पंधरावें.

### नवीन पेशव्याचा उपक्रम.

१ नानासाहेबाची पेशवाईवर नेमणूक.
२ रोजनिशांवरून निघणारा मतलब.
३ एकवीस वर्षांच्या कारभाराचें सामान्य स्वरूप.
४ आरंभींचें शिक्षण व तयारी.

१. नानासाहेबाची[1] पेशवाईवर नेमणूक (२५ जून स. १७४०).— ता. २६ एप्रिल सन १७४० रोजीं बाजीराव पेशवा रावेरनजीक नर्मदा-कांठीं मृत्यु पावला. त्या वेळीं त्याचा वडील मुलगा बाळाजी व बंधु चिमाजी-आपा आणि महादाजीपंत पुरंदरे, हे कुलाब्यास मानाजी आंगरे याचे साह्यास गेलेले असून, तेथे त्यांस बाजीरावाचे मृत्यूची खबर मे महिन्याचे आरंभीं कळली. पुढे तेथेच क्रिया वगैरे आटोपून, त्यांनीं सुनकाच्या दिवसातच आंगऱ्याचें प्रकरण मिटविलें. सफर महिना मुक्काम कुलाब्यास होता. १५ मे ला सफर महिना संपला; आणि पुढें कुलाबा सोडून परत

१ इतिहासांत नानासाहेब, भाऊसाहेब, दादासाहेब अशी प्रसिद्ध झालेलीं टोपणनांवें दाखल करण्यापेक्षा त्या त्या व्यक्तीची मूळची खरी नावें देणें प्रशस्त होय, आणि याच प्रकाराचा अवलंब यापूर्वी करण्यात आला आहे; परंतु बाळाजी या नावाचे दोन पेशवे असून, त्यांची भिन्नता नेहमीं ध्यानात राहण्यासाठीं बाळाजी बाजीरावाचें विशेष प्रसिद्ध नांव नानासाहेब हें मुद्दाम स्वीकारिलें आहे.

निघाले, ते सोमवार ता. २६ मे रोजीं रात्रीं पुण्यास दाखल झाले. ता. २८ मे रोजीं पुण्याच्या देशमुख देशपांड्यांनीं नानासाहेबास दुखवटा केला. इतक्यांत बाजीरावाचें लष्कर वऱ्हाडांतून परत आलें, त्याजबरोबर नानासाहेबाची मातुश्री काशीबाई स्वारींत होती, ती ता. ३ जून रोजीं पुण्यास येऊन पोंचली. त्याच सुमारास साताऱ्याहून शाहूकडून नारोराम मंत्री व जिवाजी खंडेराव चिटणीस हे दोघे नानासाहेबास साताऱ्यास नेण्याकरितां मुद्दाम पुण्यास आले. त्यांस० नानासाहेब व चिमाजी ता. ५ जून रोजीं पुणें सोडून निघाले, ते ता. १३ जून रोजीं साताऱ्यास पोंचले. त्यापुढे बाराव्या दिवशीं म्हणजे २५ जून रोजीं बुधवारीं आषाढ शु॥ १२ स सकाळीं दहा वाजतां नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें सातारा येथे मिळालीं. त्याची खबर मातुश्री राधाबाईस पुण्यास दुसरेच दिवशीं आली, तेव्हां तेथे नौबद सुरू होऊन तोफांचे आवाज झाले. हलकारा आला, त्यास चांदीचें कडें व तिवट बक्षीस दिलें.

नानासाहेबाच्या कारभाराचें रहस्य व त्याची कर्तबगारी यांचा यथायोग्य अंदाज करण्यासाठीं, त्याचें पहिलें आयुष्य कोठें व कसें गेलें, हें ठोकळ मानानें पाहिलें पाहिजे. नानासाहेबाचा जन्म डिसेंबर १२ सन १७२१चा आहे. त्याचें

२ बाळाजी बाजीरावाचा जन्म छ २८ सफर शके मार्गशीर्ष वद्य १३ सह १४ मृ॥ सातें ना॥ नाणेमावळ येथे घटी ४१ पळें ५२ ज्येष्ठा नक्षत्र, प्रथम चरणीं झाला. ( कुंडली रा. खं. २ पृ. ४६ वर आहे. )




| रवि | चंद्र | मंगल | बुध | गुरु |
|---|---|---|---|---|
| ८ | ७ | ० | ७ | ७ |
| ६ | ११ | १५ | २२ | ६ |
| ११ | २७ | ५२ | १४ | २ |
| **शुक्र** | **शनि** | **राहु** | **केतु** | **लग्न** |
| ७ | ७ | ८ | २ | ४ |
| ९ | २१ | २२ | २२ | २० |
| १३ | ५ | ५० | ५० | ४५ |

प्रथमचें आयुष्य बहुतेक चिमाजीआपा बरोबर सातान्यास व लहानमोठ्या स्वाऱ्यांत गेलें. वयाचीं आठ वर्षे पुरीं होताच म्हणजे ता. १० जानेवारी सन १७३० रोजीं त्याचें गोपिकाबाईशीं लग्न जालें. त्यानंतर नऊ वर्षांनीं ह्या बाईस ऋतु प्राप्त झाला. ही बातमी १८ जानेवारी स. १७४० त नानासाहेबास कळली; म्हणजे त्या वेळीं तो कोठें तरी स्वारींत होता. लग्नानंतर दहा वर्षांनीं ऋतुप्राप्ति झाली, यावरून लग्नांत तिचें वय पांचसहा वर्षांचें असावें. पुढें गोपिकाबाई बहुधा स्वारींत वगैरे शक्य तितकी नवऱ्याबरोबर जात असे. नानासाहेबाचें प्रथमचें आयुष्य बहुतेक सातारा येथें शाहूजवळ गेलें. सन १७३६ पासून पुढें तो हळूहळू चिमाजीआपाबरोबर बाहेर जाऊं लागला. सन १७३७ पासून दोन वर्षे तो शाहूबरोबर मिरजेचे स्वारींत होता. अर्थात् वसईच्या मोहिमेत तो नव्हता. बाजीरावाबरोबर तो कधींच स्वारींत गेलेला नाहीं, यास कारण मस्तानी असावी ! बाजीरावाच्या मृत्यूपूर्वी थोडे दिवस रघुनाथरावाची मुंज व सदाशिवरावाचें लग्न हे समारंभ फेब्रुवारी १७४० त पुण्यास झाले, त्यास शाहू छत्रपति भाळजीच्या आग्रहावरूनच मुद्दाम पुण्यास आला होता. म्हणजे पेशव्याच्या कुटुंबावर व विशेषतः नानासाहेबावर शाहूचा लोभ केवढा होता, हे यावरून दिसून येतें. शाहू छत्रपति पुण्यास आल्याचा हा एकच प्रसंग होय. बाजीराव त्या वेळीं स्वारींत असून वरील समारंभास हजर नव्हता. नानासाहेबास पेशवाई मिळाल्यावर सन १७४० चे ऑक्टोबरांत चिमाजीआपाची प्रकृति विशेष बिघडून ता. १७ डिसेंबर रोजीं तो मरण पावला. सारांश सन १७४० हे वयाचें एकुणिसावें वर्ष नानासाहेबाच्या आयुष्यात मोठें क्रान्तिकारक समजलें पाहिजे. आठ महिन्यांच्या अवधींत घरांतले दोन पराक्रमी पुरुष नाहींसे झाले; आणि पेशवाई पद मिळून मराठशाहीच्या राज्यकारभाराचें ओझें त्याजवर येऊन पडलें. पेशवाईचीं वस्त्रें त्यास २५ जून रोजीं मिळालीं, त्यानंतर तीन महिने पावेतो त्याचा मुक्काम साताऱ्यासच होता.

पुढें सातारा सोडून निघाला तो ११ आक्टोबरास पुण्यास आला; व पुढील जुलै मास पावेतों साताऱ्यास गेला नाहीं.

नानासाहेबास पेशवाई मिळाली त्या सुमारास कोल्हापुरचा संभाजी शाहूचे भेटीस साताऱ्यास आला होता. या भेटीची थोडी हकीकत का. सं. प. या. ले. ४२९ च्या शेवटच्या कलमांत असून, याच प्रसंगीं, शाहूच्या पश्चात् संभाजीनें गादीवर बसावे, असा बारा कलमांचा गुप्त करार संभाजी व नानासाहेब यांचा झाला, तोही वरील पुस्तकाच्या ले. ४२८ त दाखल आहे. २ जून १७४० ला 'संभाजी राजे जेजुरीस आले,' [ ना. सा. रो. ले. १९३ ], आणि सोमवार ता. ३० मार्च स. १७४१ रोजीं 'महाराज रा. संभाजी राजे आज्ञा घेऊन कोल्हापुरीं आपल्या स्थळास गेले.' ( शा. म. रो. ले. १७८ ). इहिदे आर्बैन रौद्री नाम संवत्सरे म्हणजे जून १७४० च्या पुढचे महिने, आणि नानासाहेब साताऱ्यास होता असे महिने जुलई ते सप्टेंबर. करारातील कलमांच्या झोकावरून तो ठराव नानासाहेबास पेशवाई प्राप्त झाल्यानतरच झाला असला पाहिजे असें दिसतें. कारण नानासाहेब पेशवा नसता तर संभाजीनें असा करार बहुधा केला नसता. कराराचा मतलब कोल्हापुर–सातारा गादी एक करण्याचा होता. नानासाहेबाच्या पेशवेगिरीचें पहिलें मोठें कारस्थान म्हणजे हा करार होय. दुहीच्या योगानें राज्याचें होणारें नुकसान नानासाहेबास कळून चुकलें असून, बाजीरावाच्या पराक्रमास यश न येण्याचें तें एक मुख्य कारण होतें. ही गोष्ट नानासाहेब व चिमाजीआपा यानीं ताडून तिचा परिहार करण्याचा हा उपाय, अधिकार हातीं येतांच त्यानीं तात्काळ स्वीकारला. संभाजी शाहूस भेटण्यासाठीं साताऱ्यास आला. प्रतिनिधीनें नानासाहेबाची बाजू सावरून धरिली; आणि नानासाहेबानें संभाजीशीं हा गुप्त करार केला. तो शाहूच्या परोक्ष झाला असला पाहिजे; कारण त्यास या कराराची खबर कळती तर नानासाहेबावर लगेच त्याची इतराजी झाली असती. संभाजीनें आपल्या

पश्चात् सातारच्या गादीवर बसणें शाहूस कधींच पसंत नव्हतें, आणि बाहेरून कितीही गोडी दिसली तरी भाऊबंदकीचा अंतर्यामींचा फार दिवसांचा वैरभाव, शाहूच्या मनांतून साफ नाहीसा होणें शक्य नव्हतें. मात्र दोन राज्यांचें एक राज्य करण्याची नानासाहेबाची कल्पना राष्ट्र-हिताची व मुत्सद्देगिरीची दिसते. शाहूला संतान नव्हते. राज्याची वृद्धि होत होती तरी नानाप्रकारच्या अडचणीही होत्या. शाहूच्या हयाती-पर्यंत मराठी राज्याचें गाडे कसेंबसें चालेल; परंतु पुढें काय ? हा प्रश्न धूर्त मुत्सद्यांच्या दृष्टीपुढें डोकावत होता. अशा स्थितींत शाहूच्या पश्चात् संभाजीस सातारची गादी देऊन राज्यव्यवस्था मजबूत करावी अशी कल्पना निघाली, आणि त्याप्रमाणें स. १७४० च्या भेटींत नानासाहेबानें संभाजीशीं त्याजबद्दलची वाटाघाट करून ले. ४२८ चा कागद बाळाजी व चिमाजीआपांनीं संभाजीस लिहून दिला. त्यांतील मतलब, ‘ सातारचें राज्य स्वामीचें, आणि एकछत्री शिक्का महाराजांचा ( संभाजीचा ) चालावा. शाहू महाराजांचा जीवात्मा आहे, तों बाह्यात्कारीं आम्ही त्यांचे सेवक, परंतु अंतर्यामीं स्वामीचे, शाहू महाराज यांनीं कैलासवास केल्यावर दोन्ही राज्ये स्वामींचीं आणि आम्ही सेवक स्वामींचे. स्वामीच्या आज्ञे-प्रमाणें वर्तणूक करूं, अशी शपथ दिली होती. त्याप्रमाणें दोन्ही राज्यें एक करून एकछत्री स्वामींचा शिक्का चालावा; आणि आम्हीं शाहू महा-राज यांचे कारकिर्दीप्रमाणें सेवा करून असावें, हें प्रमाण. यासी अंतर करणार नाहीं. अशी विनंति सेवकांनीं शाहूमहाराज असतें समयीं किल्ले सातारच्या मुकामीं केली होती. ’ शाहूच्या मृत्यूपूर्वी नऊ वर्षे पेशव्यांनीं हा ठराव संभाजीशीं केला होता; आणि शाहूच्या मृत्यूनंतर तो पुनः पेशव्यानें ताजा करून दिला. पुढें रामराजाची स्थापना होऊन हें कारस्थान संपलें, तेव्हां हा तह पाळण्याची पेशव्यांस जरूर राहिली नाहीं, हें उघड आहे; परंतु स. १७४० च्या संभाजीच्या भेटींत हा महत्त्वाचा उपक्रम पेशव्यांनीं सुरू केला होता; आणि त्या वेळीं त्यांस

राज्याच्या हिताचा उत्तम मार्ग असा तोच वाटला, असें यावरून निष्पन्न होतें. सुरळीत राज्यव्यवस्थेस विरोध करणारीं जितकीं प्रकरणें मिटवितां येतील तितकीं मिटवावीं, अशी नानासाहेबाची सामान्य पद्धत असून, तदनुसार त्यानें संभाजी व जिजाबाई यांजबरोबर सख्य राखिलें होतें; आणि पुढेंही हा तह मोडल्याबद्दल संभाजीनें पेशव्यास दोष दिलेला नाहीं. यावरून 'बाह्यात्कारीं त्यांचे सेवक' हें कपटवाक्य लिहून देण्यांत पेशव्यानें शाहूशीं राजद्रोह केला, असा वाद कित्येकांनीं माजविला आहे, त्यांत अर्थ नाहीं. या तहानें शाहूचें कांहीं एक नुकसान नव्हतें; आणि वास्तविक मरणसमयीं शाहूनें रामराजाऐवजीं संभाजीसच साताऱ्यास आणण्याची व्यवस्था केली असती, तर ती राज्याच्या दृष्टीनें ज्यास्त फायदेशीर झाली असती. या गोष्टींचा विचार पुढें यथास्थळीं येणारच आहे. प्रस्तुत हें प्रकरण सांगण्याचें प्रयोजन इतकेंच कीं, अठरा वर्षांच्या नानासाहेबानें पेशवाई प्राप्त होतांच एवढें मोठें कारस्थान अंगावर घेतलें, आणि बापाच्या मृत्यूबद्दल शोक करीत न बसतां, जरूर तो राज्याचा उद्योग झपाट्यानें पुढें चालविला.

नानासाहेबास पेशवाईपद न देतां तें बाबूजी नाईक बारामतीकरास द्यावें, अशी खटपट बाजीरावाच्या मृत्यूनंतर रघूजी भोसल्यानें केली. स. १७४० त रघूजी कर्नाटकचे स्वारींत असतां तिकडेच बाजीरावाच्या मृत्यूची खबर त्यास समजली. त्याबरोबर स्वारीचें काम अर्धेंच टाकून तो लगेच पेशवाईच्या खटपटीसाठीं उतावळीनें साताऱ्यास आला. बाबूजी नाईक पैसेवाला होता; आणि त्याच्या कर्जाची फेड बाजीरावाकडून वेळेवर न झाल्यामुळे, आप्तसंबंध असतांही, त्याचें व नानासाहेबाचें वांकडें आलें होतें. रघूजी भोसल्याचें व पेशव्याचें सूत कधींच नव्हतें; आणि बाजीरावाच्या घराण्यांतून पेशवाईपद निघेल तर आपल्या पक्षास पुष्टि येईल, आणि कदाचित् तेणेंकरून पुढेंमागें आपल्या मुलास साताऱ्याची गादी मिळण्यास मदत होईल, अशी

रघूजीची भावना असावी. कांहीं असलें तरी ह्या त्याच्या खटपटीस यश आलें नाहीं, आणि फारसा अवधिही मिळाला नाहीं. डफ म्हणतो, बाळाजीस पेशवाईचीं वस्त्रें स. १७४० च्या ऑगस्टांत मिळालीं. तें खरें असतें तर त्या खटपटीस दोन तीन महिने तरी अवकाश मिळाला असें म्हणतां आलें असतें; पण शाहूनें २५ जूनलाच म्हणजे बाजीरावाच्या मृत्यूनंतर बरोबर दोन महिन्यांनीं बाळाजीस वस्त्रें दिलीं. [ ना. रो. १. १३३ ]. बाळाजीस साताऱ्यास आणण्यासाठीं एक शेणवई नारोराम मंत्री व एक प्रभु जिवाजी खंडो ह्या आपल्या विश्वासांतील इसमांस शाहूनें पुण्यास पाठविलें, तें त्यास पेशवाई देण्याचा निश्चय करूनच शाहूनें पाठविलें असलें पाहिजे. साताऱ्यास आल्यावर नानासाहेबास पेशवाई मिळेपावेतों बाराच दिवस गेले. ह्या बारा दिवसांत थोडीबहुत खटपट झाली असेल, परंतु डफनें त्याचें अवडंबर माजविलें आहे, तितकें महत्त्व त्या प्रश्नास त्या वेळीं आलें नसावें. प्रतिनिधि रघूजीस अनुकूल नव्हता, आणि नानासाहेबानें त्यास अगोदरच सर्वस्वी आपलासा करून घेतला होता, हें का. सं. प. या. ले. ४२९ वरून सिद्ध होतें. वास्तविक नानासाहेबाचा गोड व विचारी स्वभाव आणि कर्तबगारी यांजविषयीं तत्कालीन एकूणएक प्रमुख व्यक्तींचें एकमत होतें. रघुजीसारख्या एखाद्या उपद्व्यापी इसमाची गोष्ट सोडली तर ब्राह्मण व ब्राह्मणेतर, सर्व सरदार व मुत्सद्दी, नानासाहेबास अनुकूल होते; आणि वाढत्या राज्याचें ओझें छत्रपतीच्या उतारवयांत आंगावर घेण्यास तत्कालीन मंडळींत कोणी लायक असेल, तर तो हा तरुण व होतकरू नानासाहेब होय, अशी सर्वांची खात्री होती. शाहूची तर त्याजवर बालंबाल मर्जी होती. बापानें व आजानें विलक्षण करामत करून मराठशाहीच्या उद्योगास विशिष्ट दिशा लाविली होती. ते उद्योग तडीस नेण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणाचेंही अंगीं नाहीं, हें समजूनच त्यास पेशवाई देण्यांत शाहूनें फारसे आढेवेढे घेतलेले दिसत नाहींत. नेहमींच्या ओघानेंच हा प्रकार सुलभ रीतीनें पार पडला. बाजीरावास पेशवाई

मिळतांना व पुनः या प्रसंगीं, निष्कारण वाद उपस्थित करून, मित्यांची ढोबळ चूक करण्यांत 'डफ'च्या मनांतील कुत्सित बुद्धि मात्र व्यक्त होते. सामान्यतः दरएक प्रसंगाची मिति प्रथम नक्की करून मग त्याचें वर्णन करावयाचें, हा जो इतिहास लिहिण्याचा सर्वमान्य मार्ग तो 'डफ'नें यथायोग्य स्वीकारिलेला दिसत नाहीं.

शाहू छत्रपतीचा स्वभाव व कर्तबगारी यांचा विचार पुढें स्वतंत्र कलमांत करावयाचा आहे. नानासाहेबास पेशवाई पद देण्यांत त्यानें मोठी चूक केली, आणि तेणेंकरून त्यानें आपल्या वंशजांचे हातपाय कायमचे बांधून घेतले, असा शाहूवर कित्येकांचा आक्षेप आहे. उलट पक्षीं काळ व परिस्थिति पाहून शक्य तितकी चांगलीच व्यवस्था शाहूनें करून ठेविली, असें दुसऱ्या पक्षाचें प्रतिपादन आहे. शाहूच्या अंगीं कांहीं कांहीं विशिष्ट गुणांची कमतरता असली, तरी त्यास मनुष्याची पारख होती; किंबहुना, प्रत्येकाची योग्यता ओळखून, त्याजकडून योग्य ती कामगिरी घेऊन राज्याचा परिपोष करणें, हेंच काम शाहूनें चांगलें केलें, असें म्हणतां येईल. महाराष्ट्रीयांच्या अंगीं अठराव्या शतकाच्या ऱ्हास-काळांत जितका म्हणून कर्तृत्वसमुच्चय होता, तितक्याचा शाहूनें उपयोग करून दाखविला. यापेक्षां ज्यास्त करामत करून मराठशाहीचें स्वातंत्र्य त्यानें चिरंतन करून ठेविलें नाहीं, याजबद्दल एकट्या शाहूस किंवा अमुक एका विशिष्ट व्यक्तीस जबाबदार धरतां येत नाहीं. त्याज-बद्दल सर्व राष्ट्र जबाबदार आहे. नानासाहेबासारख्या तरुणाच्या हातांत राज्यसूत्रें देण्यांत शाहूनें चांगलीच योजकता दाखविली, असें म्हणावें लागतें. राज्यकारभार अंगावर घेऊन तो सुरळीतपणें चाल-विण्यास तत्कालीन मंडळींत दुसरा इसम तितका लायक नव्हता, हें परिणामावरूनही सहज दिसून येतें. बारामतीकर बाबूजी नायकांत नानासाहेबाची कर्तबगारी निःसंशय नव्हती. प्रतिनिधींना तर आपले स्वतःचे व्यवहार सुद्धां सांभाळण्याची ताकद नव्हती. रघूजी भोसले किंवा

इतर सरदार व्यक्तिशः कितीही शूर व कर्तृत्ववान असले तरी पेशवेगिरीचें काम अंगावर घेण्यास ते स्वतःच आपणांस लायक समजत नव्हते. नाहीं तर बाबूजी नायकास पेशवेगिरी देण्याऐवजीं ती आपणांसच द्यावी अशी मागणी रघूजीनें केली असती. शिवाय वयोवृद्धत्वांत कितीही शहाणपण असले तरी राज्यकारभारांतील अनेक प्रसंगांत तडकाफडकीनें कामें करण्याचें सामर्थ्य तारुण्यांतच असतें. जगाच्या इतिहासांत ज्यांनीं म्हणून विशेष कर्तृत्व दाखविलें आहे, ते बहुधा तरुणच होते; आणि अशा तरुण पुरुषाच्या हातांत शाहूनें राज्यकारभाराचीं सूत्रें दिलीं, म्हणूनच मराठशाहीचें आयुष्य पन्नास पाऊणशें वर्षें तरी वाढलें. नाहीं तर १७५७ तील प्लशीबरोबर मराठशाहीचीही पानिपतच्या पूर्वीच प्लाशी झाली असती. इंग्रजांचे तत्कालीन लेख वाचले आणि त्याचे कावे मनांत आणिले, म्हणजे मद्रास किंवा बंगालप्रमाणें १७५७ च्याच सुमारास साताऱ्यासही इंग्रजशाही झाली नाहीं, याच श्रेय मुख्य राज्यचालकांसच दिलें पाहिजे. महाराष्ट्रांत दुसरी कोणती व्यक्ति त्या वेळीं जास्त कर्तृत्ववान होती, हें पेशव्यांच्या आक्षेपकांनींच दाखविलें पाहिजे.

बाकी नानासाहेबास विरोध करणारे पुष्कळ लोक असल्यामुळें त्याच्या अडचणी वाढून तेणेकरून राज्याचें नुकसान होईल, हें सुद्धां शाहूच्या इतके दुसरा कोणी जाणत नव्हता. गोविंदराव चिटणिसाची म्हणून शाहू छत्रपतीची एक बखर भारतवर्षाच्या दुसऱ्या भागात छापलेली आहे, तींत नानासाहेबास पेशवाई देण्याचे वेळची हकीकत आहे, ती शब्दशः खरी नसली तरी वस्तुतः खरी दिसते. ती हकीकत अशीः—( पृष्ठ७ ८ ).

'बाजीराव बल्लाळ पेशवे वैशाख शु॥ १३ स कैलासवासी झाले. महाराजांला फार वाईट वाटलें. तीन दिवस चोघडा बंद होता. कचेरी नाहीं. उदास मर्जी राहिली. नंतर बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासा० यांस पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. मोठा समारंभ झाला. संपूर्ण दरखदार व सरदार लहान थोर यांस वस्त्रें सरकारांतून दिलीं. पेशव्यांचे तैनातीस होते त्यांस

महाराजांनीं सांगितलें कीं, बाजीराव लहान वय होऊन आपले उमेदींत दहा पांच सरकारच्या कामगिऱ्या यश संपादून केल्या. सरकारांत द्रव्यही मिळवून आणून दिल्हें. प्रतारणा ठेविली नाहीं. बाळाजीपंत लहान हुशार आहे. सर्व यथास्थित चालेल. परंतु सर्वांस माझें एक मागणें आहे, तें देतो म्हणून कबूल कराल तर बोलतों, म्हणून सर्वांस विचारिलें. ते समयीं विनंति केली कीं, महाराजांस मागावयाजोगी वस्तु आम्हांजवळ काय आहे, आणि न देऊं तर आमचें जन्म व्यर्थ; आज्ञा होईल त्याप्रमाणें शरीरसुद्धां देण्यास राजी आहों. आज्ञा मात्र झाली पाहिजे. चाकरींत अंतर होणार नाहीं. असें ऐकल्यावर महाराजांनीं उत्तर केलें, आतां तुमचे म्हटल्यावर बोलतों, देतों होय म्हणून उत्तर केलें. ते समयीं महाराज सांगूं लागले कीं, बाळाजीपंत लहान आहे, मसलत उभी करील, जाईल, हूडपणा करील, पत घेतली असें होऊं न देतां, याजला सांभाळून, मसलतीस एकदील होऊन, याचा लौकिक होईल असें तुम्ही करून दाखवा, हें मागणें आहे. म्हणता सर्वांनीं मुजरा करून, महाराजाचें लक्ष यांचे ठिकाणीं आणि आम्हीं हरामखोरी करूं तरी ईश्वर आम्हांस महाराजांचे घरीं अन्न न देवो, असें बोलून पायावर शपथ–हात ठेवून बोलले. महाराज संतोषी झाले, निरोप दिल्हा.'

नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें ता. २५ जून १७४० रोजीं मिळालीं, त्यांची यादी उपलब्ध आहे. [ शा. म. रो. ले. ११२; ना. सा. रो. पु. २–१३३; रा. खं. ६ पृ. ३५, पुरंदरे रोजनिशी ]. शाहूनें बाळाजीस दिलेल्या वस्त्रांची किमत रुपये २३०, चिमाजीस दिलेल्यांची रुपये २०० व याशिवाय प्रत्येकास मोत्यांचा तुरा एक ( किंमत २०० रु. असावी ), व निमचा आणि कट्यार साधी इतके जिन्नस होते. विरूबाईनेंही उभयतांस आणखी निराळीं वस्त्रें दिलीं, त्यांची किं. नानासा०स रु. ११० व आपास रुपये १०० अशी होती. त्याच प्रसंगीं महादाजी अंबाजी पुरंदरे यास पेशव्यांची मुतालकी करार करून देण्यांत आली, [ शा. म. रो.

ले. ११३ ]. मुतालिक म्हणजे, धन्याचे ऐवजीं महाराजांजवळ राहून काम करणारा कारभारी. नानासा०चे कारभारी निरनिराळ्या वेळीं निरनिराळे होते. शाहूच्या हयातीपर्यंत मुतालिकास साताऱ्यास राहवें लागत होतें. पुढे रामराजाचे कारकीर्दीत छत्रपतीचा दाब नाहींसा झाल्यावर मुतालिकाचेंही प्रयोजन राहिलें नाहीं, फक्त कारभाऱ्याची जरूर राहिली. नानासाहेबाचे कारभारी येणेंप्रमाणें झाले, (का. सं. प. या. ले. ४४०):—

स १७४०-५० महादाजी पुरंदरे, १७५०-५३ रामचंद्र बाबा व सदाशिवराव; १७५०-६० सदाशिवराव; १७६०-६१ नीलकंठ म. पुरंदरे. पेशवाईचीं वस्त्रे दिल्यावर शाहूने नवीन पेशव्यास मुकासे गांव एकंदर ३० निरनिराळ्या ठिकाणीं नेमून दिले. त्यांची यादी शा. म. रो. ले. ११४ वर आहे. हे गांव निरनिराळ्या सरदारांच्या ताब्यांतले होते. सबब ते पेशव्यांकडे बिनतक्रार चालविण्याबद्दल शाहूनें रघूजी भोसले, फत्तेसिंग भोसले व दुसरे कित्येक सरदार यांस त्याच समयीं ताकीदपत्रें पाठविलीं.

पेशवाईचीं वस्त्रे देतांना शाहूनें बाळाजीस आज्ञा केली कीं, 'बाजीरावांनीं थोरले बाळाजीपंत यांचे मार्गें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठमोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें पारिपत्य करून बादशाही स्थापावी, म्हणोन रवाना केले. तेथे आयुष्य थोडें झालें. त्यांस त्यांचे पुत्र तुम्ही, पातशाही रक्षून हिंदुस्थान सर्व आपलें करावें, ऐसा बेत त्यांहीं केला तो सिद्धीस तुम्हीं न्यावा. अटकेपार घोडे चालवावे, ऐशी आज्ञा करून पुण्यास जावयास निरोप दिल्हा, [ शा. म. च. पृ. ७७-७८ ]. बाजीरावास जी अडचण आरंभीं पडली तीच नानासा०सही पडली. वीस वर्षांच्या तरुण मुलानें मोठमोठ्या वृद्ध व अनुभवी मंडळीला आपल्या ताब्यांत ठेवावयाचें होतें. पेशवा कितीही हुशार असला तरी, हा एवढासा पोर आम्हांस काय शिकवणार, अशी सामान्यतः प्रत्येक प्रमुख इसमाची समजूत होणें, हा मनुष्यस्वभाव आहे, आणि तसाच थोडासा प्रकार नानासाहेबासंबंधानें, प्रतिनिधि, फत्तेसिंग भोसले, दमाजी गाय-

कऱ्हाड, रघूजी भोसले, बाबूजीनाईक वगैरे कित्येक मंडळींचा झाला. या मंडळीस कह्यांत ठेवणें नानास०स कांहीं काळपावेतों बरेंच जड गेलें. स. १७८४ त पिट्ट इंग्लंडचा मुख्य प्रधान झाला, त्या वेळीं त्याचेंही वय अगदीं लहान २३ वर्षांचें होतें; परंतु सतत वीस वर्षे प्रधानकी चालवून त्यानें नेपोलियनचे विरुद्ध इंग्लंडची बाजू उत्कृष्ट संभाळिली, ही तुलना याठिकाणीं सहज मनात येते.

स. १७२० त बाजीरावास पेशवाईचा कारभार सांगतांना व पुढें वीस वर्षांनीं नानासाहेबास तें काम देतांना शाहूचे विचार पुष्कळ अंशीं भिन्न असावे. दोन्ही प्रसंग वेगळ्या स्वरूपाचे होते. पूर्वी शाहू उमेदींत होता, तर आतां उतार वयांत होता. बाजीरावासंबंधानें शाहू नेहमीं साशंक असे, तसा तो नानासाहेबासंबंधाने नव्हता. नानासाहेबास तो केवळ पुत्र समजे. पेशवाई देताना बाजीरावास शाहूनें जी कामगिरी सांगितली होती, ती त्यानें बरीच तडीस नेऊन राज्याची वृद्धि केली. तेव्हां त्याही-पेक्षां कांहीं तरी ज्यास्त करामत नानासाहेब करील, अशी शाहूची अपेक्षा होती व ती वावगी नव्हती.

‘ नंतर वऱ्हाडप्रांत हिंदुस्थान पाहून यावें, असा विचार करून महाराजांची आज्ञा घेऊन गेले. खंडण्या घेतल्या. हिंदुस्थानात जाऊन पोंचतात तो, गोविंदपंत बुंदेले सामोरे आले आणि द्रव्यही दिलें. लोकास हुशारी आली. कुच दरकुच कोटें राजेरजवाडे यांनीं मेजवानीस ठेवून घेतलें तरी राहणें. पूर्वी बाजीरावाची जरब होती. कामदार तेच वागवणार, फौजी लोक सर्व हुशार, कांहीं आयास पडला नाहीं. स्वारी करून उज्जनीस आले. ’ ( भा. व.,-शा. म. ब. पृ. ७६ ). सारांश, बाजीरावानें केलेल्या उद्योगाची तड पोंचविण्यास नानासाहेबाची किती जरूर होती, आणि शाहूनें ही योजना दूरवर विचार करून कां केली, याचा उलगडा वरीलसारख्या उल्लेखांवरून होऊं लागतो.

**२. रोजनिशांवरून निघणारा मतलब.**—चिमाजीआपा, महादोबा पुरंदरे वगैरेंच्या खटपटीनें नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, परंतु हा पहिला समारंभ उरकल्याबरोबर हजारों तऱ्हेच्या अडचणी नानासाहेबापुढें उभ्या राहिल्या. पहिली मोठी अडचण म्हणजे पैशाची. बाजीराव तर कर्जानें गांजून त्यांतच शेवटीं मरण पावला. त्याचें देणें सुमारें चौदा लाखांचें होतें. नानासाहेबाची रोजनिशी, भाग २ ले. २५४ यांत स. १७४० पासून १७६१ पावेतों पेशव्यांच्या कर्जाचे आंकडे व सावकारांची नावनिशी दिलेली आहे, त्यांत १७४० चे आंकडे आहेत ते बाजीरावाच्या कर्जाचे समजले पाहिजेत. त्याची बेरीज सुमारें साडे-चवदा लाख होते; आणि एकंदर सावकार तीस असामी होते. सर्वांत ज्यास्ती कर्ज रघुनाथभट पटवर्धनाचें तीन लक्ष व ब्रम्हेंद्रस्वामीचें एक लक्ष पांच हजार होते. बाबूजी नाइकाच्या नांवासमोर छत्तीस हजारांचा आंकडा आहे. या कर्जास व्याजाचा दर दरमहा दरशेकडा एक रुपया-पासून अडीच रुपयेपर्यंत लाविलेला आहे. बाबूजी नाइकास पेशवाई न मिळाल्यामुळे त्याने कर्जाबद्दल जोराचा तगादा चालविला. यामुळें पेश-व्यास बहुत संकट प्राप्त झाले, त्या संकटांतून महादाजी पुरंदऱ्यानें पेशव्याची मुक्तता केली. (रा. पे. श. पृ. ९२). अर्थात् प्रथम नाना-साहेब पाठीमागचे एकेक व्यवहार संपवून पैसा वसूल करण्याच्या उद्योगास लागला त्याच्या अमदानींत पुढें जे जे कांहीं ठराव, तह झाले त्यांत बहुधा रोख पैसा देण्याचें कलम आहे. ' स. १७४१ चे मार्च महिन्यांत त्रिचनापल्ली मराठ्यांचे हातीं लागून चंदासाहेबास कैद करून त्यांनीं साताऱ्यास आणिलें, तेव्हा मुरारराव घोरपड्यास त्रिचनापल्लीस ठेवून त्याने दरसाल वीस हजार रुपये पेशव्यास देत जावे, असा ठराव झाला. तसेंच नानासाहेबानें महाराजास आपली गरिबी दाखवून,फिरंगी लोकांकडील साष्टी, वसई वगैरे मुलूख सर केलेला होता, त्याची सनद करून घेतली; आणि गुजराथ खेरीज करून नर्मदेच्या उत्तरेकडील मुलखाची खंडणी जी याव-

याची त्याचाही वसूल पेशव्यानेंच करावा, अशी सनद महाराजांकडून घेतली.'* गायकवाडाचें मन बिघडण्यास हें एक आणखी कारण झालें असावें.

दक्षिणेकडील व उत्तरेकडील द्रव्यनद्यांचे प्रवाहांची धार मध्यें न जिरतां महाराष्ट्रांत सतत आणून सोडावयाची, हा उद्देश नानासाहेबाच्या आरंभींच्या कारभारात मुख्यतः दृष्टीस पडतो. नानासाहेबाच्या रोजनिशा व दुसऱ्या भागाच्या शेवटीं दिलेले त्याच्या स्वारीचे मुक्काम, हे नीट वाचल्यावर, त्याच्या राज्यकारभाराचे रहस्य बरेच मनात उतरते. बाजीरावानें केलेल्या व्यवहाराची तड पोंचविणें, आणि मुलखाची व वसुलाची व्यवस्था लावून देणें, एवढेच दोन उद्देश आरंभीं नानासाहेबाच्या मनात होते. यांतूनच तिसरा उद्देश हिंदुस्थानभर हिंदुपदपातशाही स्थापन करावयाची हा उपस्थित झाला. यापूर्वी मराठे सरदारांनी हिंदुस्थानच्या दक्षिणोत्तर व पूर्वपश्चिम बहुतेक सर्व भागात संचार केलेला होता; परंतु त्या उद्योगास व्यवस्थित कारभाराचें स्वरूप आलें नव्हतें. तें स्वरूप आणून हिंदुपदपातशाहीचा शिवाजीचा हेतु पार पाडावयाचा, असा नानासाहेबाचा उपक्रम होता. एका प्रांताची व्यवस्था लावताना आणि त्या प्रांताच्या सरहद्दीचा बंदोबस्त करतांना त्यापलीकडील प्रांताशीं नानासाहेबाचा संबंध जडत गेला, तेणेकरून नवीन शत्रुमित्र उत्पन्न झाले. बारकाईनें पाहिलें असतां, पुढे इंग्रजांच्या राज्याची वृद्धिही याच धोरणानें झालेली आहे. प्रयाग, काशी, बंगाल, बहार इत्यादि दूरदूरचे मुलूख हस्तगत करण्याचा उद्योग नानासाहेबानें चालू केला, यावरून हिंदुपदपातशाहीची संस्थापना करण्याचा हेतु नानासाहेबाच्या ठिकाणीं स्पष्ट दिसतो, तितका बाजीरावांत दिसत नाहीं.

---

* पे. श. राजवाडे खंड २ पृ. ९२. या पुस्तकातील काहीं कांहीं मजकूर ग्रँट डफचें निव्वळ भाषांतर आहे.

रोजनिशीवरून उघड दिसतें कीं, आरंभीं कांहीं वर्षे नानासाहेब सारखा हिंडत होता. चार दोन दिवसांपेक्षां त्याचा ज्यास्त मुक्काम सहसा एके ठिकाणीं झालेला दिसत नाहीं. लग्न, कार्य, जन्म, मृत्यु इत्यादि प्रसंगांची आडकाठी मनांत न आणतां तो सारखा अहोरात्र राज्याच्या कामांत निमग्न असे. हल्लींच्या शांततेच्या काळांत त्या वेळच्या उद्योगाची कल्पना यथायोग्य होऊं शकणार नाहीं. रोज नवीन काम, नवीन स्वारी, नवीन उपक्रम व नवीन अडचणी आणि त्यांचें निरसन करण्याचे उपाय, अशा कष्टमय राष्ट्रीय दंगलींत लहानापासून थोरापर्यंत प्रत्येकाचें आयुष्य त्या वेळीं झिजत होतें. उदयोन्मुख राष्ट्राची भावना अशाच प्रकारची असून ती नानासाहेबाच्या रोजनिशीवरून व्यक्त होते.

स्वारीचे मुक्काम पाहिले म्हणजे, पुणें, नाशिक, नगर, कोंकण इत्यादि भागांत नानासाहेबाचा संचार एकसारखा चालू असलेला दिसतो. हा प्रदेश म्हणजे पेशव्याच्या खास अमलाखालीं व देखरेखेखालीं होता. दूरदूरच्या प्रांतांत जिकडे सरदार वावरत तिकडे पेशव्याचें पाहणें फारसें नसे; परंतु पुण्याच्या कक्षेतील ह्या स्वकीय प्रदेशांतच पेशव्याचें कौशल्य विशेष दिसून येत होते. वसूल वेळच्या वेळीं करणें, तंटे तोडणें, फौजेंत चांगल्या लोकांची भरती करणें, देवस्थानें वगैरे लोकोपयोगी कामें तडीस नेणें, या गोष्टीत अहोरात्र मन घालून पेशवा आपला उद्योग करीत असे. सारांश, त्यास फुरसत अशी फारशी मिळतच नसे.

नानासा०ची रोजनिशी १-१० येथें दोन सरदारांस पटणे ( बहार ) प्रांतीं रवाना करून तेथें त्यांस सरंजाम, खेरीज बाबती, व सरदेशमुखी ता. १६-११-१७४३ रोजीं नानासाहेबानें पुण्यांत असतां नेमून दिल्या, त्यांत "रेवा दक्षिणतीरास स्वराज्य, रेवा उत्तरतीर जहागीर व मोकासा; प्रयाग व पटणे प्रांतीं जहागीर व मोकासा; तसेंच भागीरथीपार उत्तर तीरीं जबरदस्ती पोंहोचेल तेथवर मुलूख सोडवणें,—जहागीर व मोकासा. बरप्रमाणें सरंजाम दिल्हा असे. कुलबाब कुलकानू आकार होईल त्यापैकीं

दरसदे रुपये ३५, बाबती सरदेशमुखीचा ऐवज, २ पोतदारी, एकूण सदतीस रुपये काढून, हुजुरून कमाविसदार पाठविले आहेत, त्यांजवळ पावती करणें. वरकड ऐवज राहिला, तो फौजेवरी गणती घेऊन, गणतीबरहुकूम दामाशाहीनें वांटून घेत जाणें. '' अशा प्रकारचे कागद पुष्कळ आहेत, त्यांवरून वरील उद्देशाची भावना स्पष्ट होते. सर्व सरदारांचे उद्योगास मध्यवर्ती नियंत्रण लावून सुयंत्रित राज्यकारभाराचा पाया नानासा० नें अशा रीतीनें घातलेला आहे. यास ज्या सरदारांनीं किंवा कारभाऱ्यांनीं विरोध दाखविला, त्यांस काबूत आणण्यास पेशव्यानें कमी केले नाहीं. सदाशिवराव, रघुनाथराव, पुरंदरे, अंताजी माणकेश्वर वगैरे मंडळीशीं नानासा० चे खटके उडाले, त्याचें बीज नानासाहेबाच्या या प्रयत्नांत आहे.

३. **एकवीस वर्षांच्या कारभाराचें सामान्य स्वरूप.**—ता. २५ जून १७४० पासून २३ जून १७६१ पर्यंत बरोबर एकवीस वर्षे नानासाहेबाने पेशवाईचा कारभार केला. त्या कारभाराचे मुख्य दोन भाग पडतात. पहिला ९ वर्षांचा डिसेंबर १७४९त शाहूच्या मृत्यूपर्यंतचा; आणि दुसरा शाहूच्या मृत्यूपासून अखेरपर्यंत १२ वर्षांचा. या दोन भागाचें स्थूल स्वरूप अगदीं भिन्न आहे. पहिल्या नऊ वर्षांत नानासाहेब केवळ शाहूचा हस्तक होता, पुढील बारा वर्षांत नावानें पेशवा पण राज्यकारभारांत तो संपूर्ण मुखत्यार होता. पैकीं सन १७५०–५१ ५२ ही पहिलीं तीन सालें रामराजाची परीक्षा करण्यांत गेलीं; आणि त्याच्या अंगीं कर्तृत्व नाहीं, अशी खात्री होतांच राज्यकारभाराचें जोखीम स्वतःच आपल्या अकलेनें चालविण्याचा निश्चय करून तदनुसार नऊ वर्षे पावेतों नानासाहेबानें राज्याचा उद्योग अश्रान्त केला. शाहू जिवंत असेंपर्यंत सालोसाल साताऱ्यास जाऊन आपल्या कामाचा झाडा देणें, सरदाराचीं कारस्थानें व मर्जी सांभाळणें, आणि विरुद्ध पक्षाच्या खटपटींवर नजर ठेवणें, हीं कामें नानासाहेबास करावीं लागत. या पहिल्या भागांतील नानासाहेबाच्या स्वाऱ्या एकंदर खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१ सुरंज भेलशाची—२३ नोव्हेंबर १७४०—७ जुलई १७४१. जानेवारींत एदलाबादेस निजामाची भेट, मे महिन्यांत धवलपुर येथें सवाई जयसिंगाची व जून महिन्यांत ग्वालेरीस शिंदेहोळकरांची भेट. परत आल्यावर बाबूजी नायकास पुण्यांतून घालवून दिलें.

२ माळवा, प्रयाग, बंगालची—१८ डिसेंबर १७४१–३० जुलई १७४३. माळव्याच्या सनदांची प्राप्ति, रघूजी व अलिवर्दीखान यांचे तह.

३ भेलशाची—२० नोव्हेंबर १७४४–१ऑगस्ट १७४५. या स्वारीचे अखेरीस राणोजी शिंद्याचा मृत्यु, १९–७–१७४५. (खं.२पृ १०२).

४ कर्नाटकची पहिली स्वारी—सदाशिवराव व सखाराम बापू यांची, ५ डिसेंबर १७४६ —एप्रिल १७४७.

५ नेवाईची स्वारी (जयपुर हद्दींत)—१० डिसेंबर १७४७–९ जुलई १७४८ पावेतों. मार्चांत नासिरजंग व रामदासपंत यांच्याशीं लढाई, व आसुंबरीचा तह. ६ मे माधवसिंगाची भेट उज्जेन येथें. २१ मे निजामुल्मुल्कचा मृत्यु बऱ्हाणपुर येथें.

६ साताऱ्यास मुक्काम, छत्रपतीचे निधनप्रसंगीं—२१ ऑगस्ट १७४९–२१ मे १७५०. शिंदे होळकर सुद्धां फौजबंद बरोबर होते.

उत्तर भागांतील कारभार निराळ्या स्वरूपाचा असल्यामुळें त्यांतील स्वाऱ्यांची हकीकत पुढे स्वतंत्रतेनें सांगण्यांत येईल.[1]

---

१ नानासाहेबाच्या स्वाऱ्यांचे व हालचालींचे काल कागदपत्रांवरून बरोबर ठरवितां येतात. रा. राजवाड्यांनीं पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत त्याच्या व सरदाराच्या हालचालीचे तक्ते स. १७५० पासून ६१ पर्यंतचे दिले असून, शिवाय त्याच्या रोजनिशीच्या दुसऱ्या भागाचे शेवटीं बाजीरावाचे व नानासाहेबाचे मुक्काम तारीखवार दिलेले आहेत. रा. खं. ६ चे आरंभीं पुरंदऱ्यांची रोजनिशी छापली आहे, तिचा तर अनेक व्यवहारांचें रहस्य कळण्यास फारच उपयोग होतो. मात्र त्या शेवटच्या दोन साधनांत स १७४३–४८ पावेतों पांच सहा वर्षांचा खंड आहे, तो इतर साधनांनीं भरून काढला पाहिजे. त्या कारकिर्दीच्या तीन शकावल्या उपलब्ध असून, शिवाय का. सं. प. या ले. ४९२ व ३३२ त्यांत कांहीं प्रसंगाचे काल व उल्लेख आहेत. या सर्वांचा उपयोग या हकीकती रचतांना केला आहे.

युद्धकलेसंबंधानें नानासाहेबाचा प्रकार बाजीरावाहून अगदीं निराळा होता. बाजीराव स्वतःफौजेच्या हालचाली व युद्धप्रसंग करी, तसा प्रकार नानासाहेबानें कधीं केला नाहीं. तो केवळ मुत्सद्दी होता. बाजीराव एकदां एका उद्योगाचे पाठीस लागला, म्हणजे त्याचे इतर ठिकाणचे मुत्सद्दी व्यवहार बहुतेक बंदच पडत; परंतु नानासाहेबाचा प्रकार वेगळा होता. 'सरदारीनें काम करावें, जातीनिशीं जायां होऊं नये,' हें त्याचें धोरण अनेक पत्रांत व्यक्त झालें आहे. नानासाहेब स्वतः जरी स्वारींत गेला तरी तो जातीनें युद्धप्रसंग करीत नसे. मागें तळावर राहून तो सर्वांवर मुत्सद्देगिरीची देखरेख ठेवी. तह वगैरे ठरविणें, खंडण्या घेणें, हिशेब तोडणें, हे प्रकार तो स्वतः करी. त्याचा जनानखाना बहुधा बरोबर असे. स्वारींत जनानखाना नेण्याचा प्रकार त्यानेंच मुख्यतः घातला; आणि तोच प्रकार पुढें वाढत जाऊन पानपतावर विशेष जाचक झाला. नानासाहेब उत्कृष्ट कलमबहाद्दर होता. त्याचे उलट बाजीराव तलवारबहाद्दर असून नानासाहेबाइतका तो लिहिण्यांत व हिशेबांत परिपूर्ण नव्हता. नानासाहेबाचा पत्रव्यवहार व इतर कागदपत्रांचा प्रचंड संचय उपलब्ध आहे, तसा बाजीरावाचा नाहीं. युद्धाचें फल तहांत असतें, या तत्त्वाचा पूर्ण फायदा जसा नानासाहेब घेई, तसा पूर्वी कोणीं घेतलेला दिसत नाहीं. शिवाय नानासाहेब कोठेंही असला तरी सब ठिकाणचे व्यवहार तो स्वतः उलगडी. श्रीरंगपट्टणास राहून दिल्लीचा कारभार करी, किंवा बुंदेलखंडांतून कर्नाटकच्या कारभाराची उस्तवारी ठेवी. शिवाजी जाधवास लिहिलेलीं नानासाहेबाचीं स्वदस्तुरचीं कित्येक पत्रं उपलब्ध झालीं, तीं पाहतां नानासाहेब बांका कारकून व गणसागित लेखक होता; स्वहस्तानें हजारों कागद खरडून तो सर्वांवर आपली छाप बसवी आणि कामाचा पार आणीत असे. या दृष्टीनें नानासाहेबाच्या राज्यकारभारास जें महत्त्व आहे तें वास्तविक त्याच्या स्वाऱ्यांस नाहीं. पहिल्या नऊ वर्षांच्या या कारभारांत नानासाहेबाच्या उद्योगाचे दोन विशिष्ट भाग निदर्शनास येतात. बाजीरावाचा वीस

वर्षांचा उद्योग सर्व विसकळीत होता, कोणत्याही एका प्रकरणाची पूर्ण तड लागली नव्हती. सबब झालेला प्रकार ध्यानात घेऊन शक्य त्या रीतीने एक एका प्रकरणाची तड लाविण्यांत नानासाहेबाचीं आरंभींचीं ३।४ वर्षे गेलीं. बाजीरावाच्या छत्रीची वगैरे व्यवस्था लावणें, [ना. सा. रो. ले. १३४, १३५, १३८] वसईकडील नवीन प्रदेश ताब्यांत आला, त्याची स्थीरस्थावर करून, त्या प्रकरणांत ज्यांनीं ज्यानीं उद्योग केले त्यांचा यथायोग्य परामर्ष घेणें, आणि मागचे हिशेब पुरे करून वसईकडील नवीन प्रदेशाची आबादानी धर्मस्थापना, व राज्यव्यवस्था यांची तड लावणें, हें अगदीं पहिलें काम नानासाहेबास करावें लागलें. हें काम इतर कामांबरोबर पहिलीं तीन चार वर्षे व पुढेही प्रसंगोपात्त चालूच होतें. मुसलमानी धर्माप्रमाणें काजीपणाच्या वतनाची व्यवस्थाही नानासाहेबानें लाविलेली आहे. (ना० रा० पु. १ ले. २, ४, ५, ९, ११, १२; रा. खं. ३ ले. १३९, ५५४ इत्यादि, आणि खं. ६ ले. १८४) बाजीरावाच्या मृत्यूनें उत्तरहिंदुस्थानांत एकदम थोडी बहुत चळवळ उडाली. आतां पुढे मराठ्यांचे उद्योग कसे चालणार, त्याचें नियमन करण्याचें सामर्थ्य कोणांत आहे, दुसरा एखादा नवीनच पेशवा होऊन मराठ्यांच्या कारभारास निराळीच दिशा लागते कीं काय, अशी बरीच चलबिचल बाजीराव मेल्याबरोबर बाहेर उडाली; व पुढील कारस्थानांकरितां अनेक सरदार आपापलीं कामें तशींच सोडून साताऱ्यास जमा होऊं लागले. त्या सर्वांची स्थिरस्थावर करून बाजीरावाचे उद्योग तडीस पोंचविणें, बाजीराव मरण पावल्यानें कारभारांत कांहीं एक बदल न होतां, उलट बाजीरावाहून जास्त वस्ताद असा इसम मराठ्यांच्या कारभारावर आरूढ झाला आहे, अशी लोकांची खात्री पटविणें, हें अगदीं पहिल्याप्रथमचें नानासाहेबाच्या उपक्रमाचें प्रधान अंग होतें. त्यामुळें स. १७४०-४१, स. १७४२-४३, व स. १७४४-४५ अशा लागोपाठ तीन मोठ्या स्वाऱ्या नानासाहेबानें केल्या, आणि शत्रुमित्रावर आपली छाप सर्वत्र

बसविली. या पहिल्या तीन स्वाऱ्यांतले त्याचे मुक्काम रोजनिशींत व शकावलींत दिलेले पाहिले म्हणजे त्याच्या तडफेचें आश्चर्य वाटतें, आणि त्याच्या हिंमतीच्या उद्योगासंबंधानें कौतुक उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. दररोज त्याचा प्रवास व उद्योग चालू असलेला दिसतो. तसाच कामानिमित्त चार दोन दिवस मुक्काम झाला तर झाला, नाहीं तर सारखा फिरत राहून माहिती मिळवीत व व्यवस्था लावीत, तीनचार वर्षे तो अव्याहत फिरतीवर होता. सन १७४१ च्या जुलईंत बाबूजी नाइकास त्यानें पुण्यांतून घालवून दिलें, तेव्हांपासून पुढें कैक वर्षे त्यानें नायकाचा पिच्छा सोडिला नाहीं. नायकाचे अंगीं कर्तृत्व नव्हते, आणि ‘ द्रव्येण सर्वे वशाः ’ या न्यायानें पैशाच्या जोरावर आपण पराक्रम करूं शकूं, अशी त्याची खोटी समजूत होती तो भित्रा, पण खटपटी होता, आणि अंतस्थ खटपटीनें नानासाहेबाचे पाय मागें ओढण्यास कमी करणारा नव्हता. नानासाहेबाशीं उघड सामना करण्याची त्यास छाती नव्हती; आणि लवकरच तो त्याजपुढें नम्र झाला. तरी संधि येताच तो पेशव्याच्या विरुद्ध पक्षांत सामील होत असे. नायकाचें हें एक उदाहरण केवळ मासल्यासारखें आहे; परंतु अशीं लहान मोठ्या माणसाचीं शेकडो प्रकरणें नानासाहेबास तडीस लावावीं लागलीं. रामचंद्रबाबा शेणवई, महादोबा पुरंदरे, यमाजी शिवदेव, रघूजी व दमाजी, सचिव वगैरे अनेक गृहस्थ एकमेकांच्या चुरशीनें अगर अकलेच्या घमेंडीनें नानासाहेबाशीं विरोध करीत; तेव्हा प्रसंग पडेल त्याप्रमाणे वागून उद्भवलेलें प्रकरण मिटविणें नानासाहेबास भाग पडे. स्वभावतः नानासाहेबाचा कल तडजोडीचा होता. होतां होई तों एकदम तटकन् कोणास तोडावयाचें नाहीं, सलोख्यानें कार्यभाग साधेल तर मुद्दाम उघड वैर किंवा तीव्रपणा धारण करावयाचा नाहीं; अशी त्याची स्वाभाविक प्रवृत्ति होती. वेळेवर पडतें घेण्यास तो लाजत नसे, आणि नेहमीं विचारपूर्वक शांत वृत्तीनें राहून हळूहळू भिन्न स्वभावाच्या व्यक्तींना व शत्रुमित्रांना त्यानें आपल्या कबजांत आणिलें. बापूजी नाईक तर अखेरीस नानासाहेबाचे भजनीं होता.

पहिल्या नऊ वर्षांतील कारभाराची एक दिशा येथवर दाखविली. परंतु त्याची दुसरी एक बाजू तितकीच महत्त्वाची होती. छत्रपतीची मर्जी कायम राखणें हें त्याचें दुसरें मुख्य काम होतें. कारण नानाप्रकारच्या चहाड्या करून नानासाहेबास छत्रपतीच्या मर्जीतून कमी करण्याचे अनेकांचे प्रयत्न एकसारखे चालूच होते. या प्रकारावर नजर ठेवून भावी घडामोडींत त्यास आपला शह कायम ठेवावयाचा होता. शाहूंचें वार्धक्य वाढत होतें. त्यास मूल होण्याची आशा नव्हती, दोघी राण्यांचा झगडा होता. अशा स्थितींत निरनिराळे मुत्सद्दी व सरदार आपआपला मतलब साधण्यासाठीं टपलेले होते. या अडचणी टाळण्यासाठींच संभाजीशीं गुप्त तह करून शक्य तेवढी पुढची तर्तूद अंतःस्थपणें नानासाहेबानें करून ठेविली होती, परंतु ती अमलांत येण्यास अनेक विघ्नें होतीं. सर्व हालचाली डोळ्यात तेल घालून तो पाहत होता; आणि शाहूच्या पश्चात् जो प्रकार घडला त्यावरून परिस्थितीला कबजांत ठेवून राज्यकारभार हाकण्याची जी हातोटी नानासाहेबानें व्यक्त केली, तीच त्याच्या मुत्सद्देगिरीची साक्ष होय.

ज्याप्रमाणें नानासाहेब लहानपणीं स्वतः साताऱ्यास राहून राज्यकारभारातील घडामोडींचें व कारस्थानांचें निरीक्षण करीत होता, त्याचप्रमाणें सदाशिवराव, रघुनाथराव व जनार्दनपंत यांनीही साताऱ्यास जाऊन येऊन राहण्याचा प्रघात नानासाहेबाचे विचारानें ठेविला. तेणेंकरून राजधानींतील कारस्थानांची कच्ची बातमी नानासाहेबास मिळे; आणि आपल्या कुटुंबांतील कोणींना कोणी सदैव छत्रपतीपाशीं आहे, असें सर्वांच्या दृष्टोत्पत्तीस येई. अशा प्रकारें सदाशिवराव व रघुनाथराव दोघेही लवकरच जबाबदारीनें व्यवहार उलगडण्यांत व हाताखालच्या लोकांस धाकात ठेवण्यांत थोडेबहुत कुशल झाले. स. १७४६ त वयाच्या सोळाव्या वर्षी सदाशिवरावानें पहिली स्वतंत्र स्वारी कर्नाटकांत केली. तदुत्तर स्वतः नानासाहेबानें स्वारींत जाण्याचा प्रघात हळू हळू सोडून दिला. शाहूच्या मृत्यूनंतर जरी तो स्वतः कित्येक वेळां कर्नाटकांत गेला, तरी उत्तरेंत

रघुनाथराव व दक्षिणेंत सदाशिवराव अशी डाव्या उजव्या हाताप्रमाणें दोघांच्या कार्यक्षेत्राची योजना करून नानासाहेबानें एकंदर मध्यवर्ती कारभार स्वतःचे हातांत ठेवून चालविला.

स. १७४६ पासून पुढें तीन चार वर्षें सर्वच मुत्सद्यांचें लक्ष शाहूच्या उतार वयामुळें भावी व्यवस्थेकडे लागलें. ता. १४ डिसेंबर १७४९ रोजीं शाहूछत्रपति मरण पावला; आणि ४ जानेवारी १७५० रोजीं रामराजा गादीवर आला. तेव्हांपासून स. १७६१ च्या २३ जून रोजीं पेशवा नानासाहेब मरण पावला, तों पावेतों जो बारा वर्षांचा काळ गेला, त्याचें स्वरूप सर्वथा भिन्न असून तें पुढें यथास्थलीं दर्शविण्यांत येईल.

४. आरंभींचें शिक्षण व तयारी—लहानपणीं चुलता चिमाजीआपा, व कारभारी अंबाजी पुरंदरे यांचीच दीक्षा नानासाहेबास सर्वथैव होती. बाजीरावाजवळ तो फारसा कधीं नव्हताच. त्याचा बहुतेक काळ शाहूमहाराजांपाशीं साताऱ्यास चिटणीस, प्रतिनिधि वगैरे दरबारी मंडळींच्या सहवासांत गेला. लिहितां वाचतां येऊन थोडेंबहुत समजूं लागतांच अंबाजीपंत पुरंदरे त्याच्याच हातून सर्व कामें घेऊं लागला. अंबाजीपंताचा मुलगा महादोबा व पुतण्या नाना पुरंदरे हेही नानासाहेबास सर्व गोष्टी समजावून देत. पेशवे व पुरंदरे या दोन घराण्यांचा ऋणानुबंध अत्यंत जिव्हाळ्याचा होता. सदाशिवरावानें महिपत त्रिंबक ऊर्फ बजाबा पुरंदरे यास लिहिलेलें खालील पत्र तत्कालीन शिक्षणाचें निदर्शक आहे. 'तुम्हांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरी वरचेवर सविस्तर वर्तमान लिहीत जाणें. आम्ही मजल दरमजल नर्मदापार झालों. पुढेंही दरकूच जात असों. घोड्यावर बसणें व लिहिणें पढणें चांगलें करणें. तीर्थरूप बोलावतील तेव्हां पुण्यास जात जाणें. फार खेळत न जाणें. घरीं अवई मायेनें रागें भरणार नाहीं. लाडके व्हाल तें कामाचें नाहीं. चांगलें लिहिणें, पढणें, घोड्यावर बसणें करणें. छ २ रमजान हे आशीर्वाद. [ का. सं. प. या. १७१ ]. पानपतचे मोहिमेस जातांना

ता. १९ एप्रील स. १७६० रोजीं हें पत्र लिहिलेलें आहे. मोडी बालबोध वाचन, हिशेब, संस्कृत पढणें, घोड्यावर बसणें, हे त्या वेळच्या शिक्षणाचे मुख्य विषय होते, असें यावरून दिसतें.

बाहेरच्या व्यवहारांत जसे पुरंदरे, तशी घरच्या व्यवहारांत नाना-साहेबाची आजी राधाबाई. हिंची दीक्षा व जरब मोठी सक्त होती. पेशवे स्वारींत असल्यावर पुण्यांतील बहुतेक कारभार ही बाई मोठ्या हुशारीनें चालवी. मुलांचें संगोपन व शिक्षण, देवतार्चन व तत्संबंधीं कृत्यें, ब्राह्मणभोजनें, दानें, लग्नकार्यें इत्यादि नानाप्रकारच व्यवहार राधाबाई पाहत असून तिच्या आज्ञेबाहेर कुटुंबांतील स्त्रीपुरुष कोणीही वागत नसत. पर्वतीसारख्या मंदिरांचीं कामें, बक्षिसें, इत्यादि बाबतींतही तिचाच विचार मंडळी घेत. सदाशिवराव, रघुनाथराव व जनोबा या मुलांना लहान-पणची शिक्षा या बाईची होती. बाजीराव व मस्तानी यांचा प्रकार पाहून नानासाहेबास पुढें कांहीं छंद लागू नये, म्हणून त्याजबरोबर गोपिकाबाईस स्वारींत पाठविण्याचा प्रघात बहुधा राधाबाईनेंच पाडिला असावा. कारण स्वारींत बायका बरोबर नेण्याचा हा रिवाज नानासाहेबाचे वेळेसच वाढला.

तत्कालीन गृहशिक्षणाचा यथायोग्य अंदाज करतां येईल असें दुसरें एक महत्त्वाचें पत्र नानासाहेबानें ता. ९ जुलई १७४२ त रघुनाथरावास लिहिलेलें आहे तें येणेंप्रमाणें. त्या वेळीं रघुनाथराव आठ वर्षांचा म्हणजे सदाशिवरावाहून बरोबर चार वर्षांनीं लहान होता. जनार्दनपंत त्याच्याहून वर्ष सवा वर्षांनें लहान. "चिरंजीव राजश्री रघुनाथ यासी प्रति बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद, उपरी, विशेष. येथून जाते समयीं जें सुचलें तें तुम्हांस सांगितलें आहे, त्याचें स्मरण निरंतर मनांत असूं देत जाणें. रघुवंश, विदुरनीति, चाणाक्य, व जें तुम्हांस येत असेल, त्याची नेमपूर्वक चिंतनिका करून, थोडेंबहुत शास्त्री यांजवळ नित्य म्हणत जाणें. विराटपर्वापासून पुढें भारत रिकामपणीं वाचीत जाणें. केवळ घोडीं फेरावयाचे छंदास न लागणें. वजनी, कैली, बेरीज, बराबर करावयाचा सराव बहुत करणें.

चिरंजीव भाऊची मर्जी बहुतप्रकारें रक्षण करीत जाणें. जे आज्ञा करतील तेंच काम करावें. बहुत करून भाऊबरोबरच जेवीत जाणें. घोडीं वेगळीं बांधीत न जाणें. क्षुद्र मनुष्यांशीं सहवास कोणे प्रकारेंही न करणें. मातुश्री बाई ( राधाबाई ), ताई ( काशीताई ), अनुबाई यांसी एका दों दिवशीं अर्धघटकाभर जाऊन बसत जाणें. शरीरप्रकृत नीट नाहीं. यास्तव औषध कांहीं नेमेंकरून घेत जाणें. भाऊसमागमें घोडीं फेरावयास जात जाणें. सातारियास जर जावयाची आज्ञा केली तर चिमणगिरि गंगाधर-भटास, भाऊ जवळ विनंति करून, बरोबर दिल्हेतर घेऊन जाणें. सातारियास गेलियावर दोहीं बाईकडे विना बोलविल्यावांचून, अथवा गोविंदराव यांनीं आपणहून सांगितल्यांचून, न जाणें. कालानुरूप, वयास उचित, योग्य वेष करीत असावें. देवपूजा थोडी परंतु एकांतीं, न बोलतां करीत जाणें. इतकेंही नेमेंकरून करावें, आणि गर्व न करावा. निरंतर साधनवृत्तीनें वडिलांची आज्ञा प्रसन्नतेनें मानावी. सावध वर्तावें. सर्व जें मनेंकरून समजेल तें समजावें. वडिलांची मर्जी उत्तम असलिया पुसावें. शिष्यधर्में असलिया फार उपयोग आहे [–always desirous to learn ]. चिरंजीव जनार्दन बहुत कामही करून पढतात. ते हरएक गोष्टींत अधिक जाहल्यास तुम्ही त्यांस मान्य पुरुष कसे व्हाल ! विशेष काय लिहिणें. येथील वर्तमान तर उदेपुराजवळ पंचविसा दिवसांत पावलों. श्रीकृपेनें मेहेनत करून दिल्लीचे सुमारें जात आहों. जसें पुढील वर्तमान होत जाईल, तैसी योजना होईल. हे आशीर्वाद [ राजवाडे खं. १ पृ. ९६ ]. या पत्रावरून नानासाहेब, सदाशिवराव व रघुनाथराव यांच्या स्वभावाचा बराच अंदाज करितां येतो. नानासाहेबाच्या या पत्रांतील सूचना पुष्कळ अंशीं सहेतुक दिसतात. रघुनाथराव लहानपणींच छांदिष्ट, वडील माणसांचे सल्ल्यानें न वागणारा, विशेष अध्ययन वगैरे न करितां एकटाच कोठें तरी घोडे फिरवीत क्षुद्र माणसांच्या संगतींत राहणारा; व जेवणासही पंक्तीस न येणारा, असा असून, परमारें शाहूच्या राण्यांस

वगैरे भेटून खटपटी करणारा असावा. त्यास ताळ्यावर आणण्याविषयीं नानासाहेबांस मोठी चिंता वाटत असावी. भाऊचें तर तो मुळींच ऐकत नसे. भाऊची लहानपणची हुशारी राघोबाहून अगदीं वेगळ्या तऱ्हेची होती. बारा वर्षांचे वयांतच भाऊवर मोठमोठीं कामें सोंपून नानासाहेब निर्धास्त असे. 'पोराचें लक्षण पाळण्यांत,' या न्यायानें पेशवाईतील या तीन प्रसिद्ध पुरुषांचे पुढील आयुःक्रम कसे बनणार हें या पत्रांतील मजकुरावरून अजमावतां येतें. चांगलें घोड्यावर बसतां येणें या पलीकडे राघोबाच्या अंगीं दुसरा कोणताही गुण उत्पन्न झाला नाहीं; आणि या घोड्यावरील चपळाईचा उपयोग त्यानें अखेरपर्यंत भरपूर केलाही. बारा वर्षांचे वयांत सदाशिवराव तर मोठी हुशारी दाखवीतच होता, परंतु रघुनाथरावाचा धाकटा भाऊ जनार्दनपंत हा अल्पवयांत सुलक्षणी होता. रघुनाथाच्या हातून पुढें चांगली कामगिरी होईल कीं नाहीं, याबद्दल नानासाहेबास लहानपणींच धास्ती वाटत असावी, असें पत्रांत दिसते.

कुटुंबावर घरांतील कर्त्या स्त्रियांचा दाब, महाभारतापैकीं युद्धप्रकरणीं भागाचें अध्ययन, गोविंदराव चिटणिसाशीं पेशव्यांचा घरोबा, या बाबतींत ही वरील पत्रांत ओघानें नमूद झालेल्या गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत. पेशव्यांच्या राज्यपराक्रमाचा बराचसा भाग वरील योग्य गृहशिक्षणानें त्या त्या पुरुषांच्या अंगी उद्भवला, असें वाटल्याशिवाय राहत नाहींत, अशी गृहशिक्षा त्या वेळच्या इतर घराण्यांत कितीशी होती, याचा विचार ज्याचा त्याने करावा. आठ नऊ वर्षांच्या वयांत मुलांचें अध्ययन त्या वेळीं किती होत असे, याचीही कल्पना वरील पत्रावरून करितां येते.

तथापि पुस्तकी विद्येपेक्षां प्रत्यक्ष अनुभवावर त्या वेळच्या शिक्षणाची मुख्य भिस्त होती. अशा प्रत्यक्ष व्यवहारांत वावरून नानासाहेबाची लायकी उत्पन्न झाली. बाजीरावाच्या मृत्यूनंतर थोडक्याच अवधींत शाहूचें मन त्यानें सर्वस्वी आपल्यावर बसवून घेतलें. शाहू त्याला केवळ आपल्या पुत्राप्रमाणें मानूं लागला. [ का. सं. प. या. ४२९ ]. दहा

अकरा वर्षांच्या वयापासून तो राज्याच्या कामांत लक्ष घालूं लागला. त्याचें अगदीं आरंभाचें पत्र उपलब्ध आहे ( ६-५५ ) त्याची तारीख मार्च २० स. १७३१ ही आहे, म्हणजे त्या वेळीं त्याचें वय १० वर्षांचें होतें. लहानपणापासून मुलांस नानाप्रकारच्या कामांत अनुभव देण्याचा प्रघात पेशवाईंत जारी होता. सदाशिवराव, रघुनाथराव, जनार्दनपंत, विश्वासराव, माधवराव इत्यादि मुलांनीं बारा चौदा वयाचे असतां स्वारींत जाणें, जबाबदारीनें पत्रांचे जबाब लिहिणें, पंचायती तोडणें इत्यादि कामें केलेलीं दिसतात. अंबाजी पुरंदऱ्याचा अनुभव व इभ्रत महाराष्ट्रांत मोठी असून शाहूजवळ त्याचें वजन चांगलें होतें. बाजीरावाचा किंवा चिमाजीचा वरचढपणा शाहूस दुःसह होऊं लागला; म्हणजे अंबाजीचे मार्फत चार गोष्टी सांगून शाहू त्यांस मार्गावर आणीत असे. बाजीरावाच्या स्वाऱ्यांची व उद्योगाची माहिती, नानासाहेबास चांगली होती. एकंदरींत त्या वेळच्या मानानें त्याचें शिक्षण योग्य व परिपूर्ण झालेलें होतें. यामुळेंच त्याची कारकीर्दही विशेष वाखाणण्यासारखी झाली. संस्कृत भाषा यास चांगली समजत होती, असें दिसतें. गोपिकाबाईनें सवाई माधवरावास केलेला उपदेश ( का. सं. प. या. ४५२ ) व माधवराव अनंत वेदांती याची शिकवण ( ६-४३६ ) इत्यादि कागदांवरून त्या वेळच्या ब्राह्मणांच्या अंतर्बाह्य शिक्षणाची अटकळ करतां येते. विशेषतः पेशव्यांचे घराण्यांतील शिक्षणाची दक्षता हल्लींच्या काळांतही फारशी आढळून येत नाहीं. रामायणमहाभारतांतले निवडक भाग, विदुरनीति, भगवद्गीता, स्तोत्रपाठ, शिवाय कथापुराणें या गोष्टींचा अभ्यास नानासा॰नें चांगला केलेला होता.

पण नानासाहेबाचा सर्वांत मोठा गुण म्हणजे राज्याच्या हिशेबाचें परिपूर्ण ज्ञान हा होय. प्रांतोप्रांतींचे हिशेब मागवून पैशाची देवघेव व्यवस्थित ठेवण्यांत नानासाहेब फार कुशल होता, आणि सदाशिवराव तर या कामांत नानासाहेबाहूनही वरचढ होता. या दोघांस हिशेबाचें

शिक्षण बहुधा रामचंद्रबाबाकडून मिळालें असावें. अशा शिक्षणाला मिष्ठ, शांत व अष्टपैलू स्वभावाची जोड मिळाल्यामुळें लहानमोठ्यांवर नानासाहेबाची छाप लौकर बसली.

गृहशिक्षण व बाहेरचा अनुभव यासंबंधानें पेशव्यांच्या घराण्याची दक्षता इतर घराण्यांत त्या वेळीसुद्धां फारच थोडी दिसून येत होती. सखारामबापू, नानाफडणीस, हरिपंत फडके, परशुरामभाऊ पटवर्धन इत्यादि उत्तरकालीन पुरुष पेशव्यांच्याच तालमेंत तयार झालेले होते. प्रतिनिधि सचिव, वगैर देशस्थ मंडळींत किंवा दाभाडे आंगरे, पवार, शिंदे, होळकर इत्यादि मराठेमंडळींत पेशव्यांची शिक्षा पाळली जात नव्हती. बुद्धिमत्ता, उद्योग, शिस्त, नियमितणा इत्यादि गुण कोंकणांतील लोकांत हल्लीं दिसतात, त्याप्रमाणेंच त्या वेळींही असून कुटुंबांतील चालक बाया पुरुष या गुणांचे संगोपन काळजीपूर्वक करीत असत. तितका प्रकार मराठ्यांचा किंवा देशस्थ ब्राम्हणांचा नव्हता; मात्र कित्येक बाया गृहशिक्षेंत मोठ्या नामांकित झाल्या. दीपाबाई, जिजाबाई, येसूबाई, इत्यादि बायांच्या दक्षतेमुळेंच भोसल्यांच्या घराण्यांत मालोजीपासून शाहूपर्यंत पांच पिढ्या कर्तृत्ववान निघाल्या. मराठे सरदारांस कामापुरतें लिहितां वाचतां येत असे; परंतु एकंदरींत कारकुनीपेशाचें काम ते हलकें समजत, आणि त्यासाठीं कोणी तरी कुशल लेखक आपल्या पदरीं बाळगीत. परंतु पुष्कळदां या कारभाऱ्यांचा डोईजडपणा धन्यास दुःसह होत असे. जयाप्पा शिंदे व रामचंद्र बाबा, होळकर व चंद्रचूड, फत्तेसिंग भोसले, व आपाजीराम गाडगीळ, याचा बेबनाव असल्याचें प्रसिद्ध आहे. उलट पक्षीं नागपूरकर भोसले व कोल्हटकर या दोन घराण्यांचा सेव्यसेवकभाव पुष्कळ काळपर्यंत निर्वेध चालला. परंतु कित्येक मराठ्यांच्या किंवा अष्टप्रधानांच्या घराण्यांत एखाद दुसऱ्या पिढींतच पराक्रम संपुष्टात आल्यामुळें त्यांचा ऱ्हास झाला. अंगांत लायकी असलेलीं घराणीं टिकलीं, आणि नालायकी असलेलीं लयास गेलीं. तात्पर्यार्थ असा कीं, शिंदेहोळकरांसारखे अप्रसिद्ध पुरुषा-

संधि मिळतांच उदयास आले. उलट पक्षीं बहुतेक अष्टप्रधान संधि असूनही मागें पडले. राज्य हें करील त्याचें आहे, हा प्रकार सर्वांसच लागू पडतो; आणि तो नानासाहेबाच्या उद्योगांत बराचसा व्यक्त होतो. १९ साव्या वर्षी राज्याची जोखीम त्याचे अंगावर आली, तत्पूर्वी व त्यानंतर त्याचा उद्योग मरेपर्यंत अव्याहत चालला होता. या दृष्टीनें ज्यास्त विवेचनासाठीं हे सूचक विचार येथें मुद्दाम दर्शविले आहेत.

---

## प्रकरण सोळावें.

### नानासाहेबाच्या उत्तरेकडील स्वाऱ्या.

१७४०-१७४८.

१ सुरंजभेलशाची ( नोव्हेंबर १७४०-जुलई ४१ ).
२ एदलाबादेस निजामाची भेट ( जानेवारी १७४१ ).
३ जयसिंगाची भेट ( ११ मे १७४१ ).
४ हिंदुस्थानांतील दुसरी मोठी स्वारी, रघूजी भोसल्याशीं बेबनाव. } ( डिसेंबर १७४१- जून १७४३ ).
५ पेशवा व रघूजी यांचा युद्धप्रसंग ( स. १७४२-४३ ).
६ ओर्छाचा पाडाव, झांशीची स्थापना ( १७४२ ).
७ माळव्याच्या सुभेदारीची प्राप्ति.
८ तीन वर्षांच्या उद्योगाचा फलितार्थ.
९ भेलशाची स्वारी व बुंदेलखंडची व्यवस्था (स १७४४-४५)
१० जयपुरच्या गादीचा झगडा व शिंदेहोळकरांचा बेबनाव.

१. सुरंजभेलशाची स्वारी, ( २३ नोव्हेंबर १७४०,-७ जुलई १७४१ ).-स. १७३८ त बाजीरावानें उत्तर हिंदुस्थानांत केलेल्या उद्योगाची सफलता अद्यापि झाली नव्हती. नादीरशहाच्या स्वारीनें बादशहाची

त्रेधा उडाली, आणि निजाम दिल्लीस बसून मराठ्यांचे राज्यवृद्धीस अडथळा आणूं लागला. तेव्हां निजामाच्या मार्फत पुढील उद्योग चालीस लावणें, आणि पुढें माळवा बुंदेलखंडांत जाऊन जयसिंग वगैरे मंडळीच्या मार्फत दिल्लीचें कारस्थान पुरें करणें, हीं पेशव्यास दोन कामें मुख्यतः करावयाचीं होतीं. नानासाहेब कधीं उत्तरेंत गेलेला नव्हता. तिकडील देश व व्यवस्था कशी आहे, आपले सरदार कोण कोठें आहेत, त्यांची लायकी काय आहे, कोणकोणत्या परराज्यांशीं आपले संबंध जडलेले आहेत, या गोष्टी प्रत्यक्ष जाऊन पाहव्या, स्वत: तिकडील स्थितीचा व राजकारणांचा अनुभव घ्यावा, बाजीरावाच्या अकालीं मृत्यूनें लोकांत झालेली चलबिचल दूर करून, बाजीरावाचा मुलगा मराठ्यांचा कारभार करण्यास किती लायक आहे, याची खात्री लोकांत पटवावी याकरितां, साताऱ्यास एकंदर गोष्टींची छत्रपतीशीं वाटाघाट करून नानासाहेबानें ही पहिली स्वारी उत्तर हिंदुस्थानांत केली. बाजीरावास करार केलेली माळव्याची सुभेदारी त्यास प्रथम पदरांत पाडून घ्यावयाची होती.

स. १७४० च्या आरंभीं बाजीराव व चिमाजीआपा उत्तरेच्या स्वारीस गेलेले पाहतांच, संभाजी आंगऱ्यानें एकाएकी मानाजीवर चाल केली. ही बातमी नानासाहेबास पुण्यास कळतांच त्यानें स्वतः लगेच मानाजीस मदत पाठविली. इतक्यांत चिमाजी स्वारींतून परत आला, त्यानें नानासाहेबासच प्रथम कुलाब्यास ताबडतोब रवाना केलें; आणि मागाहून थोड्या वेळानें आपणही तिकडे गेला. यावरून बापाच्या मृत्युप्रसंगीं नानासाहेब स्वतःच्या जबाबदारीवर राज्याचीं कामें करूं लागला होता, हें निर्विवाद आहे. साताऱ्यास सर्व व्यवहारांची व्यवस्था लावून तो बाहेरच्या उद्योगास निघाला. इतक्यांत चिमाजीची प्रकृति विशेष बिघडली. ता. ३१ ऑक्टोबर १७४० रोजीं भांवडे येथून चिमाजी पुण्यास परत आला आणि तो आसन्नमरण असतांच नानासाहेब स्वारींत गेला. मागें १७ डिसेंबर रोजीं चिमाजी पुण्यास मरण पावला. तरी नानासाहेबाचे उद्योगांत खळ

पडला नाहीं. यावरून त्याचें धैर्य व कर्तव्यनिष्ठा हे गुण तेव्हांपासूनच निदर्शनास येतात. ता. १४ जानेवारी १७४१ च्या पत्रांत तो ब्रह्मेंद्रस्वामीस लिहितो. 'ती. आपांनीं कैलासवास केला, हें वर्तमान स्वामींनीं ऐकलेंच असेल. मोठा घातच झाला ती. राव यांनीं कैलासवास केल्यास आठ महिने न झाले तों श्रीनें हा प्रसंग घडविला. होणार बलवंत श्रीइच्छेस उपाय काय! चरण-रजावरील महाराजांची कृपा आहेच, त्या कृपेमुळें कल्याणच होईल. नबाब निजामुल्मुल्क याचा व नासरजंगाचा कलह निर्माण झाला होता, त्यास आह्मी साहित्य निजामुल्मुल्क याचें केलें. यावरून नासरजंग फकीर झाले. तदुत्तर निजामाची भेट झाली. बहुमान आदर फारच केला. सर्व प्रताप स्वामींचे कृपेचा आहे. स्वामीवांचून आम्हांस दैवत नाहीं. कळावें.' [ का. स. प. या. ले. ४९ ]. या पत्रांत पुढील राज्यकारभाराची उमेद व्यक्त होते. ता. ७ जानेवारीपासून १३ जानेवारीपावेतों एदलाबाद[1] येथें निजामाची भेट घेऊन त्यानें पुष्कळ कार्यें निर्वाहांत आणिली.

सातारयास असतांच उत्तरेकडील कारस्थानें समजून घेण्याकरितां नाना-साहेबानें महादेवभट हिंगणे दिल्लीचा वकील यास तावडतोब दक्षिणेंत बोलाविलें, त्याप्रमाणें ता. २० ऑगष्ट रोजीं हिंगणे घाईनेंच नाशकास आला, (६-१४६), आणि पुढें पुण्यास त्याची व पेशव्याची भेट झाली. बाजीरावाच्या मृत्यूनंतर शिंदेहोळकरही दक्षिणेंत आले असून, त्याज-बरोबर रामचंद्र मल्हार होता. (६. पु. रो. पृ. २८, ४७) शिंद्याचा मुक्काम स. १७३९ पासूनच इकडे होता. ७ जुलई १७४० रोजीं पिलाजी जाधव बुंदेलखंडच्या स्वारींतून पुण्यास आला. बाजीरावानें आबजी कवडे यास अंतर्वेदींत पुढे पाठविलें होतें, तोही बहुधा परत आला म्हणजे बाजीराव मरण पावताच पुढें काय भानगडी होतात, त्याजवर नजर ठेवण्या-करितां ही सर्व मंडळी दक्षिणेंत जमली. शिंदे होळकराचा व पिलाजी जाधवाचा ओढा पेशव्याकडे होता. रघुजीचें कारस्थान सिद्धीस जाऊन

1 हैद्राबादचे राज्यांत ईशान्य दिशेस वऱ्हाडचे आग्नेयीस.

बाबूजी नायकास पेशवेगिरी मिळती तर, दुहीचा मोठाच प्रसंग राज्यांत उत्पन्न झाला असता, असें यावरून वाटतें. पेशवाईपद मिळून एका धास्तींतून नानासाहेब मोकळा होतांच, सरदारांच्या विचारानें व छत्रपतीच्या हुकुमानें त्यानें पुढील उद्योग हातीं घेतला. प्रत्यक्ष वाटाघाट काय झाली, तें समजण्यास मार्ग नाहीं. मुख्यतः बाजीरावाचा हिंदुपद पादशाहीचा उद्योग तडीस न्यावा, असा सर्वांचा विचार ठरला, असें पुढील उपक्रमावरून दिसतें.

'निजामानें बहुतसा उपद्व्याप मांडून बाजीरावास माळव्याचा सुभा देण्याची कबूली फेटाळून, उलट बादशहाकरवीं अजीमुल्लाखानास माळव्याची सुभेदारी सांगून, वस्त्रें देऊन रवाना केलें. त्याजबरोबर १५ हजार जय्यत फौज होती. ही बातमी महादेवभट हिंगण्यानें होळकरास ६ जुलई १७४० च्या पत्रांत कळविली (६-१४५), त्यास मल्हाररावानें खालील सणसणीत जबाब पाठविला. 'प्रस्तुत अजीमुल्लाखान येणार, त्यास माळवाप्रातीं आपली छावणी असती तरी या दिवसांत ते इकडे यावयाचें नाव न घेते; तथापि आम्ही देशास आलों म्हणून काय झालें! याउपरी सेनेसहवर्तमान त्या प्रातास सत्वरींच येऊं. अविंधास बरे वजेने नतीजा पाठविला जाईल; कोणी लवाडी करतील तेही आपल्या गुणेंच फजिती पावतील, चिंता काय आहे! श्री नानास्वामीस पेशवाईचीं वस्त्रें आषाढ शु. १२ स झालीं. सत्वरच पुण्यास येतील.' (६-१४५). बाजीरावाच्या मृत्यूनंतर निजामानें कसे खेळ आरंभिले, आणि बाबूजी नाइकास पेशवेगिरी मिळाली तर बाजीरावाचा उद्योग कसा निष्फळ झाला असता, ह्याची यावरून कल्पना होते. नाइकास उत्तरहिंदुस्थानची माहिती नव्हती, त्याच्या मार्फत उत्तरेकडील कारभारांत मुखत्यारी मिळवावी, एवढाच रघूजीचा उद्देश होता. म्हणजे पेशवे व शिंदेहोळकर यांचा नकशा मोडून आपलें वर्चस्व मराठशाहींत असावें, असा रघूजीचा घाट असून, बाजीरावास पेशवाई मिळवांना

प्रतिनिधीनें त्यास अडथळा केला, त्याचीच ही एकप्रकारें पुनरावृत्ति होती. मात्र शाहूच्या योजकतेनें दोनही प्रसंग पेशव्याच्या बाजूनें निभावले. उत्तरेंतील सरदारांचे अभिप्राय समजून घेऊन, मराठशाहीची वृद्धि करण्याचा उत्तम उपाय म्हणजे नानासाहेबास पेशवाई देणें हाच होय, अशा विचारानें शाहूनें ही नेमणूक करून, राज्यकारभारांत क्रान्ति होऊं दिली नाहीं. उत्तरेंत स्वाऱ्या करून सर्व जम बसविण्याचें प्रोत्साहन शाहूनेंच नानासाहेबास दिलें असले पाहिजे. म्हणूनच, नानासाहेबास पेशवाई मिळाली, आतां निजामास तेव्हांच नरम करूं, असें वरील पत्रांत होळकर उमेदीनें लिहितो.

दक्षिणेंत निजामाचा मुलगा नासिरजंग यानें बापावर उठून बंडाळी चालविली, तेव्हां दिल्लींत वडील मुलगा गाजीउद्दीन यास बादशहाकडून अमीरुल्उमराव पद देववून निजामानें दिल्लींत ठेविलें; आणि स. १७४० च्या अखेरीपूर्वी निजाम स्वतः दक्षिणेंत आला. नासिरजंगाचा पाडाव त्यास करावयाचा असल्यामुळे मराठ्यांशीं गोडीनें वागण्याचा त्याचा घाट होता. उलट पक्षीं निजामास खूष ठेवून त्याचे मार्फत माळव्याची सुभेदारी कायम करून घ्यावी, असा पेशव्याचा घाट होता. या एकमेकांच्या हेतूंचीं घाटाघाट वाताऱ्यास होऊन पेशवा उत्तरेच्या स्वारीस निघाला.

**२ एदलाबादची भेट,** (जानेवारी ता. ७-१३ स. १७४१).– पिलाजी जाधव यास निजामाकडे पुढें पाठवून पेशव्याच्या भेटीची व एकंदर बोलाचालाची व्यवस्था आगाऊ करण्यांत आली होती. मुख्य मागण्या एका अर्जाच्या रूपानें बादशहाकडे पाठविण्यांत आल्या, त्या पुढें स. १७४३ त सनदांच्या रूपानें कायम झाल्या; आणि तूर्त पंधरा लाख रुपये पेशव्यास मिळाले, (डफ्). सुभेगिरी मात्र या वेळीं मिळाली नाहीं. शिष्टाई करण्याकरितां पिलाजी जाधव पुढें गेला. निजामानें स्पष्ट जबाब दिला नाहीं. त्यानें असें कळविलें कीं 'माळव्याची सुभेदारी बादशहानें आम्हांस दिली आहे; परंतु पेशवे आमच्या हुकमतींत वागतील तर

आम्ही त्यांस माळव्याची नायबी देऊं [ रा. श. पु. ९० ]. सवालजबाब झाल्यावर पेशव्यानें वऱ्हाडांत जाऊन पूर्णानदीचे काठीं एदलाबाद येथें निजामाची भेट घेतली. उभयतांच्या अनेक भेटी व मेजवान्या वगैरे झाल्या. परंतु माळव्याच्या सुभेदारीचा मुख्य मुद्दा उलगडला नाहीं. मात्र पंधरा लाख पावेतों पैशाची प्राप्ति होऊन तितक्यापुरतें पेशव्याचें ओझें हलकें झालें. निजामाची भेट झाल्यावर पेशवा पुढें माळव्यात गेला. इकडून आनंदराव सुमंत यास शाहूनें २७ मार्च १७४१ रोजीं निजामाकडे रवाना केलें. हा सुमंत सर्वस्वी पेशव्याचे तंत्राने वागत नसल्यामुळे, दुसरी कांहीं बोलाचाली शाहूकडून निजामाकडे चालली असावी असें दिसते. पेशव्याने मात्र निजामाचा डाव चांगलाच ओळखिला. लष्करी जोर दाखविल्याशिवाय निजाम काय किंवा बादशहा काय, गोड गोष्टींनीं पूर्वींचे करार पुरे करुन देणार नाहीत, अशी पक्की गांठ त्यानें आपल्या मनाशीं बांधिली, आणि तोच उद्योग पुढील वर्ष दोन वर्षांत त्यानें नेटाने चालविला.

निजामाची भेट आटोपल्यावर नानासाहेब माळव्यांत उतरला, त्या पूर्वींच म्हणजे ५ जानेवारीस किल्ले धार मल्हारराव होळकरानें काबीज केल्याचे वर्तमान आलें. २७ जानेवारीस नेमाडपैकीं बांडें (?) फत्ते झाल्याचें वर्तमान त्रिंबक हरि सुभेदाराकडून आलें. दोन महिने लढाई चालवून देवरीचें (?) ठाणें ८ मार्च रोजीं आवजी कवड्यानें हस्तगत केलें. यावरुन माळव्याची सुभेगिरी न दिल्याबद्दल भरपूर वचपा बादशाही मुलखावर काढण्याचा पेशव्यानें उद्योग आरंभिला, असें दिसतें.

**३. जयसिंगाची भेट, ( ११ मे स. १७४१ ).**—बाजीरावानें सवाई जयसिंगाशीं चांगलेंच संधान ठेवून हिंगण्याचे मार्फत दिल्लीचीं कारस्थानें निकडीनें चालविलीं होतीं. बाजीराव व जयसिंग ह्यांचा स्नेह असल्यामुळें निजामासही मराठ्यांचे विरुद्ध वागण्याची छाती होत नसे. जोधपुर व उदेपुर या राज्यांवर चौथाईचा अंमल मराठ्यांनीं यापूर्वींच सुरू

केला होता. जयसिंगाशीं स्नेह असल्यामुळें त्याच्या वाटेस ते गेले नाहींत. ह्या कामगिऱ्या मल्हारराव होळकर करीत असे. स. १७४१ च्या ता. १६ फेब्रुवारीस पेशवा हिंगण्यास लिहितो, ' तुम्हांस येथून निरोप दिल्यानंतर जाऊन पोंचण्यास दिवसगत बहुत लागली. बरें, जालें तें जालें. सवाईनें तुम्हांस मल्हाररावांकडे रवाना केलें असेल. नसलें केलें तर उत्तम झालें. मल्हाररावांस लिहिलें तैसें लिहून पाठविलें आहे. ते उपद्रव करणार नाहींत. तुम्हीं उत्तम प्रकारें सवाईशीं बोलून सत्वर कार्य होय ऐसें करणें. दिवस गेले. चालढकलीवर घालून चार दिवस गेले म्हणजे आगोठ समीप आली. लांबणीवर गोष्ट पडते. आम्हांस तों सर्व प्रकारें सवाईजींचा भरंवसा. कर्जावेगळें आम्हांस त्यांनीं करावें. पातशहापासोन जें साधेल तें साधून आम्हांस द्यावें. आपणापासून उत्तम प्रकारें रयात करावी, हें त्याचे वडीलपणास ये समयीं विहित आहे. बहुमानावरच मजकूर असला तर तसेंच लिहून पाठविणें. ( ६–१४६, १५१ ). यावरून जयसिंगासही पेशाबद्दल होळकरानें निकड लाविली होती; आणि नानासाहेबानें ह्या स्वारींत जोराची पद्धति सर्वत्रच स्वीकारिली होती हें उघड होतें. नंतर ता. ११ मे १७४१ रोजीं धवलपुर येथें जयसिंग व नानासाहेब यांची भेट झाली. त्यांत एकमेकांनीं एकमेकांस साह्य करावें, सहा महिन्यांचे आंत जयसिंगानें माळव्याची सनद बादशहाकडून मिळवून द्यावी, अशा कित्येक औपचारिक गोष्टींपलीकडे ज्यास्त कांहीं निष्पन्न झालें नाहीं. [ रा. श. पृ. ९१ ]. मुख्य गोष्ट सवाईजींनीं जें राजकारण केलें, तें सिद्धीस न्यावें, उभयपक्षीं स्नेह करून द्यावा, [ ६–१५२ ] अशींच केवळ बोलणीं झालीं. एकंदरीत फलितार्थ न होतां जून महिन्यांत ग्वाल्हेरीस शिंदेहोळकरांच्या भेटी घेऊन नानासाहेब परत आला. निदान बापूजी नाइकाची फेड करण्या पुरता द्रव्यसंग्रह नानानें स्वारींतून आणला असला पाहिजे. कारण परत येतांच जुलाई महिन्यांत बापूजीस पेशव्यानें

पुण्यांतून घालवून दिलें, असा शकावलींत उल्लेख आहे.[1] नायकांस पुण्यांत वाडा बांधून देऊन त्यांचें वास्तव्य पेशव्यांनींच तेथें केलें होतें. नानाला हें नेहमींचें शुक्लकाष्ठ पुण्यांत आपल्या शेजारीं नको होतें. तो नानाप्रकारच्या खटपटी करी, म्हणून त्यास पेशव्यानें कायमचाच पुण्यांतून काढून दिला. अर्थात् तो लगेच उघडपणें पेशव्याच्या विरुद्ध पक्षांत सामील झाला; आणि पुढील सालांत दमाजी गायकवाड व रघुजी भोसले यांच्या कच्छपीं राहून त्यांजबरोबर त्यानें माळव्यावर स्वारी केली, आणि या स्वारींतील कर्तबगारीबद्दल त्यास शाहूनें बारामतीस नवीन जहागीर दिली. या जहागिरींत स. १७४१ सालीं वाडा बांधून नाईक बारामतीस राहूं लागला. तेणेंकरून पुण्यांत त्याचें महत्त्व राहिलें नाहीं.

सिरोंजभेलशाची स्वारी आटोपून आल्यावर नानासाहेब १५ जुलई ते २९ सेप्टेंबर पावेतों दोन तीन महिने जाऊन साताऱ्यास राहिला. त्या वेळीं गोपिकाबाई व सदाशिवराव हीं बरोबर होतीं. यापूर्वींही सदाशिवराव, रघुनाथराव, व जनोबा हे तिघे मुलगे महिना दोन महिन्यांनीं वारंवार साताऱ्यास जाऊन छत्रपतींस भेटून संधान राखूं लागले होते. ही सर्व राधाबाईची योजना होती; आणि साताऱ्यास पेशव्याचे पश्चात् काय काय कारस्थानें होत, त्यांची खडानखडा माहिती पुण्यास येत असे. वरील स्वारींत दुसरा कांहीं विशेष फायदा झाला नसला तरी पैशाची प्राप्ति नानासाहेबास बरीच झाली. तेणेंकरून मागील कर्ज फेडून पुढील उद्योग नेटानें चालविण्यास त्यास सामर्थ्य आलें. शिंदे, होळकर वगैरे मंडळीस

१. स्वाऱ्यांच्या व इतर हकीगती देतांना बहुधा सर्व लहानमोठ्या विधानांस कांहीं तरी आधार आहे. तीन शकावल्या, पुरंदऱ्यांची रोजनिशी (खंड ६), शाहूची व नानासाहेबाच्या रोजनिशा, का. सं. प. या. तील मित्या व बखरींतील उल्लेख वगैरे एकत्र गोठवून या हकीगती तयार केलेल्या आहेत. सर्वच आधार दाखविणें शक्य नाहीं. अभ्यासकांच्या सोयींसाठीं जरूर तितके आधार ठिकठिकाणीं दाखविले आहेत.

हातांत घेतलेल्या कामास जोर आला; आणि बाजीरावाच्या मृत्यूनें मराठ्यांची बाजू खचली नाहीं, अशी लोकांची खात्री झाली. या खात्री-मुळेच निजामानें पुढील पांच सात वर्षांच्या आपल्या हयातींत मराठ्यांशीं तीव्र विरोध धारण केला नाहीं.

**४. उत्तर हिंदुस्थानांत दुसरी मोठी स्वारी, रघूजी भोसल्याशीं बेबनाव.**—( डिसेंबर स. १७४१–जून १७४३ ) पहिल्या स्वारींतील काय काय गोष्टी पेशव्यानें शाहूस सांगितल्या व पुढचे कोणते बेत त्यानें ठरविले हें समजण्यास मार्ग नाहीं. पुढील घडलेल्या प्रकारांवरूनच ह्या बेतांचें अनुमान केलें पाहिजे. पाठीमागें लष्करी जोर असल्याशिवाय तिकडचे राज्यव्यवहार उलगडणें शक्य नाहीं, यासाठीं स्वकीय व परकीय बंडखोरास जोरानें दाबून आपले उद्योग सिद्धीस नेले पाहिजेत, अशी खातरी नानासाहेबाची झाली; आणि ती गोष्ट करण्यास त्यानें शाहूची संमति मिळविली. या बेताची शिंदेहोळकर, हिंगणे व गोविंदपंत बुंदेले यांच्याशीं वाटाघाट करून नानासाहेबानें पुढील तजवीज योजिली. विशेषतः माळव्याच्या पलीकडे बुंदेलखंड व भगेलखंड या प्रांतांत आपला पाया मजबूत केल्याशिवाय दिल्लीस शह बसणारा नव्हता एक उद्योग हातीं घेतल्यावर त्यास अडचणी येऊन कार्यक्षेत्र कसें वाढत जातें, ही गोष्ट यावरून निदर्शनास येते. प्रयाग, काशी, अंतर्वेद, रजपुताना व बंगालबिहार इतक्या क्षेत्रावर नजर पुरविण्यास बुंदेलखंडचा पाया मजबूत करणे अवश्य झालें; आणि हाच पुढील स्वारीचा मुख्य उद्देश होता. गढा, मंडळा, ओर्छा, झांशी, दमो, सागर, ललितपूर एवढ्या भागांत नानासाहेबानें जाऊन तळ दिला. येथून बुंदेले राजांस नरम करून बादशहाकडून माळवा प्रांत घ्यावयाचा, हा पेशव्याचा मुख्य उद्देश होता. या उद्योगांत नानासाहेबास रघूजी भोसले हा नवीन प्रतिस्पर्धी उत्पन्न झाला. पेशवाईची व्यवस्था रघूजीच्या मनाप्रमाणें न झाल्यामुळें पूर्वीच्या रागानें पेशव्यास अडविण्याची तयारी रघूजीनें केली. अर्थात् मुख्य

उद्योगाबरोबर रघूजीला नरम करणे ओघास आलें. उत्तरेस प्रयाग व पूर्वेस बंगाल इत्यादि भागांत रघूजीचा संचार होऊन इतर सरदारांशीं त्याचे खटके उडूं लागत. दुसरा एक उद्देश या स्वारींत पेशव्याचा असा होता कीं, काशी, प्रयाग, गया वगैरे हिंदूंचीं पवित्र स्थळें बादशहाचे हातून सोडवून आपल्या कबजांत घ्यावीं, असा स. १७३७ तच बादशहाशीं करार झाला होता, त्याप्रमाणें तीं स्थळें सोडविण्याचें काम नानासाहेबास करावयाचें होतें; आणि त्यासाठीं मुत्सद्देगिरीच्या पाठीमागें लष्करी जोर त्यानें भरपूर ठेविला. या स्वारींत तो दीड वर्ष बाहेर होता. शिंदेहोळकरांशिवाय पिलाजी जाधव, महादोबा पुरंदरे, बापूजी भीवराव रेठरेकर, पटवर्धन वगैरे कित्येक त्याचे जिव्हाळ्याचे इसम बरोबर होते. प्रथम गोपिकाबाई बरोबर होती. परंतु खानदेशांत आल्यावर तिला दोन तीन महिने गेलेले दिसतांच सदाशिवरावाबरोबर तिला परत पाठवून दिलें. ती पुढे जुलईत प्रसूत होऊन मुलगा झाला, तो विश्वासराव होय. आतां प्रथम रघूजीचा उपक्रम सांगूं.

स. १७३७-३८ सालीं माळव्यांत जाऊन बाजीरावानें निजामावर मोठी स्वारी केली, तेव्हां झाडून साऱ्या मराठे सरदारांस त्याचे साह्यास जाण्याविषयीं शाहूनें हुकूम काढिले होते. हुकमाप्रमाणें यशवंतराव दाभाडे व रघूजी भोसले हे गेले नाहींत. उलट रघूजीनें वऱ्हाडांतून अलाहबादपर्यंत स्वतंत्र स्वारी करून पुष्कळ लूट आणिली. या त्याच्या उद्दामपणाबद्दल त्यास शासन करण्याचा विचार शाहूशीं ठरवून, बाजीराव स. १७३९ त त्याजवर चालून जाणार होता. इतक्यांत नादीरशहा आल्याची गडबड उडून तो दक्षिणेवर येतो अशीही बातमी आल्यामुळें, त्या तयारीस बाजीराव लागला, आणि रघूजीच्या पारिपत्याचें काम तसेंच राहून पुढें लवकरच बाजीराव मरण पावला

रघूजी भोसले जोरदार असून मूळपासूनच मराठमंडळाशीं फटकून राहत असे. वसुलाचा पैसा तर सहसा पाठवीतच नसे. ‘ तुम्हांस

ऐवजाविषयीं वरचेवर आज्ञापत्रें पाठविलीं असतां, तुम्हीं निकाल करून पाठविला नाहीं. डोळेझांकी करून दिवस घालविल्यानें परिणाम लागतो असें नाहीं. यास्तव हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी सालगुदस्त व सालमजकूरचे ऐवजाचा निर्वाह करून सितापीनें पाठविणें. ही गोष्ट तुम्हापासून होत नाहीं तर स्वामी विचार करणें तो करितील, मग तुम्हांस विचार भारी पडेल. हें जाणून वर्तणूक करणें.' (शा. म. रो. १६४, ता. १२. १. १७३५ व ले. १६६–१६७). 'तुम्हांस दर्शनास येणें म्हणून दोन चार आज्ञापत्रें सादर केलीं असतां यावयाचा विचार केला नाहीं, यावरून अपूर्व वाटतें. हुजूर यावया अनमान करितां हे गोष्टी कार्याची नाहीं. तुम्हांस कित्येक प्रयोजन प्रसंगाची आज्ञा कर्तव्य आहे. तरी जे क्षणीं पत्र पावेल, ते क्षणीं स्वार होऊन टाकोटाक स्वामिसंनिध येणें.' (सदर ले. १६५ ता. १२. ९. १७३५). यावरून प्रत्यक्ष शाहु महाराजांसही रघूजी किती जुमानीत होता हें उघड दिसतें. मराठमंडळांत फूट पाडण्यांत जी मंडळी अग्रेसर होती, त्यांत रघूजी भोसले पहिला समजला पाहिजे. याचेंच अनुकरण उत्तर पेशवाईत दुसऱ्या कित्येक सरदारांनीं केलें. आंगरेही बहुधा पेशव्यांचे विरुद्धच असत. परंतु त्यांचे घरांत फूट असल्यामुळें, फुटीचा फायदा घेऊन व शेवटीं इंग्रजांची सुद्धां मदत घेऊन पेशव्यानें आंगऱ्यांस दाबांत ठेविलें. तशी रघूजीच्या घरांत त्या वेळीं फूट नव्हती. तो स्वत: कर्तृत्ववान व फौजबंद होता. कर्नाटकांत व बंगाल्यांत स्वाऱ्या करून त्यानें जवळ द्रव्यसंचय चांगला केला. कोन्हेरराम व भास्करराम व शाहूनें त्याजकडे नेमून दिलेली अनेक मंडळी चांगली हुशार होती. शिवाय त्याचा प्रदेश वऱ्हाड नागपुर प्रांत मध्यवर्ती महाराष्ट्रापासून एका बाजूस होता. त्यामुळें रघूजीस जेरीस आणणें पेशव्यास अवघड गेलें. बाबूजी नाईक, गायकवाड, प्रतिनिधि व ताराबाई अशीं कित्येक माणसें पेशव्याचे विरुद्ध असत, त्यांजशीं रघूजीचें नेहमीं संधान असे. शाहूच्या राणीचें त्यास पाठबळ होतें. अशा संधानामुळें

शाहूलाही रघूजीविरुद्ध कांहीं करितां आलें नाहीं. अर्थात् शाहूच्या हयातींत रघूजीचा बंदोबस्त पेशव्याचे हातून झाला नाहीं. राज्याची जोखीम अंगावर असल्यावर असा बंडखोरपणा चालूं देणें राज्यचालकास शक्य नसतें. बंडखोरास शासन करून ताळ्यावर आणिलें पाहिजे, अथवा कारभार सोडला पाहिजे, हें चतुर व तडफ असणाऱ्या राज्यकर्त्यांचें धोरण बाजीराव जाणत होता, तसें नानासाहेबही जाणत होता; आणि त्याच धोरणाचा अवलंब करून व शाहूस बाजूस ठेवून, परभारें रघूजीचा बंदोबस्त करण्याचा निश्चय पेशव्यानें आपल्या मनाशीं केला. बाळाजीस पेशवाई न मिळावी, अशी उघड खटपट रघूजीनें केली, हें नानासाहेब विसरणारा नव्हता. उघड मैदानांत रघूजीस केव्हां तरी गांठून फौजेच्या जोरावर त्यास वठणीस आणल्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. सन १७४१ च्या अखेरीस नानासाहेबानें उत्तर हिंदुस्थानांत दुसरी जंगी स्वारी केली, त्या वेळीं त्यानें आपली तयारीही तशाच बेतानें केली होती, मात्र आपल्या उद्देशाचा मागमूस त्यानें फारसा बाहेर लागूं दिला नाहीं. जसा प्रसंग बनेल तशी तोड काढण्याचा त्याचा संकल्प असावा.

स. १७३५ पासून पुढील दोन तीन वर्षांत वऱ्हाड गोंडवण वगैरे प्रांतांत आपला जम बसून रघूजीनें नागपुरास आपलें वास्तव्य केलें. 'रघूजीबोवा शिपाई दोस्त, एक पैसा जवळ न ठेवितां तमाम फौजेस खर्चास देऊन, फौजेस रजावंतीनें ठेवीत होते. अडचणीचे प्रसंगास कोणीही शब्द टाकिल्यास माघारे घेत नव्हते. कुच मुक्काम कोणासच कळवूं नये. हरवक्त म्हणत असावें, राम करील तें खरें. जवामर्दी जातीनें करावी. ऐषआराम बिलकूल नाहीं. घोड्यावरच भाकर खावी. याप्रमाणें चालधारणा ठेवून होते.' (ना. भो. ब. पृ. ३८). कर्नाटकची स्वारी यशस्वी करून ता. २६ मार्च १७४१ रोजीं त्रिचनापल्लीस चंदासाहेबास कैद करून घेऊन रघूजी स. १७४१ चे जून महिन्यांत साताऱ्यास आला. ता. २७ जून रोजीं शाहूची व त्याची भेट झाली. (पुरं. रो.

पृ. ४४ ). झालेलें वर्तमान त्यानें छत्रपतीस निवेदन केलें, तेव्हां राजश्रींनीं बहुत खुषी मानून सेनासाहेबांस बहुमान वस्त्रें देऊन गौरव केला.' ( सदर पृ. ४० ). तेथून परत नागपुरास आल्यावर साल अखेर त्यानें भास्कररामाची रवानगी बंगाल्यावर केली.

रघूजीनें नानासाहेबास अडविण्याचा उपक्रम सुरू केला, तेव्हां उभयंच्या स्वारीपूर्वी बाजीराव–दाभाड्यांची जशी चुरस वाढली तशाच प्रकारचा विरोध या वेळीं नानासाहेब व रघूजी यांजमध्यें सुरू झाला. दोन पक्ष निकरावर येऊन राजकारण बिघडूं लागत, तेव्हां त्यांस ताळ्यावर आणण्याचा शाहूचा मार्ग ठरलेला होता. दोघांसही परभारें झुंजावयास लावून एकाचा पाडाव झाल्यावर मग शिष्टाचाराच्या गोष्टी सांगून त्यांची समजूत काढणें. हीच पद्धत प्रस्तुत प्रसंगीं शाहूनें स्वीकारिली. रघूजीला वऱ्हाडांत रवाना केलें, त्याचे अगोदरच शाहूनें पेशव्यासही उत्तरेच्या स्वारीस पाठविलें होतें. 'तुम्हीं प्रथम स्वारीस जातां, बहुत सावधतेनें, बहुत दूरवर, मोठे मसलतीस न गुंततां, स्वारी करून परत लौकर यावें. यावरून पुण्यास निघून जाऊन फौजेस नालबंदी, एकसाली, आगाऊ तयारी दरबेजमीस देऊन, पुढें रोजमुरे, आठवडे व दुमाही ऐसे बांधून, सरदार व एकांडे व शिलेदार व सरंजामी यास घोडे माणूस व पोटगी पुरावयाजोगे, ऐसें करून, दरमहाचे दरमहा पावावे ऐसें करून देऊन, गारद व पायदळ व तोफखाना, फौज व सरंजामी लोक, याप्रमाणें तयारी करून सुमुहूर्तें हिंदुस्थान प्रांतीं स्वारीस निघाले. बरोबर शिंदेहोळकर व पवार व पिलाजी जाधव ऐसे सरदार फौजेसुद्धां घेतले. कारभारी महादाजी अंबाजी पुरंदरे घेतले. खानदेश बऱ्हाणपुराहून माळवे प्रांतीं जाऊन सर्व संस्थानींयांच्या खंडण्या घेतल्या, आणि छावणी करून एक वर्ष राहिले.' [ ६–१५५, १५६, शा. म. ब. पृ. ७८ ].

या स्वारींत पेशव्याचा व रघूजीचा संबंध कसा आला त्याचे आणि उभयतांमधील व्यवहारांचे न्यायान्याय निर्विवाद ठरविण्याजोगे आधार

उपलब्ध नाहींत. मिळालेल्या कागदांवरून शक्य तेवढी जुळवणी केली असून तींत दोष असणें शक्य आहे. प्रथमतः या दोघांचे मुक्काम कोठें कसे झाले ते दाखवितों.

१ दिसेंबर स. १७४१ रोजीं पुणें सोडून नानासाहेब ता. १८ रोजीं लोहगांवांस आला. त्यापुढील १७४२ चे मुक्काम.

जानेवारी–खानदेश

फेब्रुवारी–नेमाड, माळवा

मार्च एप्रिल–गढा मंडळा

मे ऑगस्ट दमो, सागर, ललितपुर वगैरे बुंदेलखंडांतील प्रदेश.

उन्हाळयांत दमाजी गायकवाड व बाबूजी नाईक यांची रघूजीच्या चिथवणीवरून माळव्यावर स्वारी

सप्टेंबर ऑक्टोबर–खेचीवाडा, अहीरवाडा, भेदार परगणे खुटवाद.

(ना. सा. रो. २ पृ. २४२)

या ठिकाणीं १९. १०. १०४२ रोजीं भोसले व पेशवे यांची लढाई

भोसल्याच्या हालचाली.

जानेवारी फेब्रुवारी–भास्करपंताची बंगाल्यावर चाल, बरद्वान पावेतों.

मार्च एप्रिल–खटवा.

पावसाळा जुलै ते ऑगस्ट–खटवा येथें, तेथून हुगळी, मेदिनीपुर, बालासोर व राजमहाल हे प्रांत काबीज.

सप्टेंबर–(दसरा ता. २८ रोजीं) नवरात्रांत अलिवर्दीचा हल्ला व भास्करपंताची वाताहत,

ऑक्टोबर–रघूजीकडून मदत जाण्यापूर्वीच पंताचें नागपुरास प्रत्यागमन नंतर माळव्यांत पेशव्याची व भोसल्यांची लढाई.

स. १७४३

जानेवारी–यमुनाकांठ प्रयाग.

फेब्रुवारी–काशी गया (२४ मार्च)

मार्च–मूर्शिदाबाद, खरगपुर, वीरभूम.

एप्रिल, मे–अलिवर्दीची भेट, मार्च ३१ ते एप्रिल ८ पावेतों.

गयेस जातांना रघूजी नानासाहेबाबरोबर होता, असा उल्लेख आहे.

(रा. श. खं. २ पृ. ९८)

जुलई भोसले साताऱ्यास.

छोटानागपुर प्रांतांतून पुनरपि गया व मिर्झापुर.
जून–पुणें व सातारा.

३१ ऑगस्ट–९ सप्टेंबर पावेतों पेशवा व रघूजी यांचा समेट शाहूनें साताऱ्यास करून दिला.[1]

नेमाड माळव्यांत उतरल्यावर नानासाहेबानें प्रथम गढामंडळाकडे कूच केलें, आणि मार्च एप्रिलांत तीं ठिकाणें काबीज केलीं. तीं हल्लीं जबलपुर जिल्ह्यांत आहेत. नर्मदा नदी पूर्वेकडून पश्चिमेकडे वहात येत असतां मंडळाजवळ एकदम मोठें वांकण घेऊन उत्तरेस गढापर्यंत सुमारें ४० मैल वहात जाऊन तेथून पुनः पश्चिमवाहिनी होते. सबब हीं दोन नाक्याचीं मजबूत स्थलें, बहुधा रघूजी भोसल्यावर नजर ठेवण्याकरितां पेशव्यानें घेतलीं. नंतर पश्चिमेस वळून नानासाहेब अहिरवाडा, खेचीवाडा, बुंदेलखंड या भागांत आपला जम बसवीत ओर्छा ऊ० वोडसें हें मध्यम स्थल धरून तेथें वर्षअखेर राहिला. पर्जन्यकाळीं बाहेर छावणी केल्याचा मराठ्यांचा हा पहिलाच प्रसंग होय. याच कारणास्तव बिनमोसमेवर पेश-व्यानें स्वारी केल्याबद्दल डफचें विधान आहे. नानासाहेबानें लढवय्या नसतां हा प्रकार केला, याचें लोकांस आश्चर्य वाटलें असावें. उन्हाळ्यांत बाबूजी नायकास घेऊन दमाजीनें गुजराथेंतून माळव्यावर स्वारी केली, तिचा उद्देश रघूजीच्या डावास मदत करण्याचा होता. पेशवा उत्तरेंत येतांच त्यास पायबंद देण्याचा रघूजीचा घाट असून, पश्चिमेकडून गायक-वाडानें व पूर्वेकडून आपण स्वतः पेशव्यास अडवावें, असा बेत होता; परंतु तो साधला नाहीं. पूर्वेच्या बाजूस पेशवे व भोसले यांचें कार्यक्षेत्र निश्चित झालेलें नव्हतें. नागपुर–जबलपुर पासून प्रयागपर्यंतच्या रेषेच्या पूर्वेस पेशव्यानें पाऊल ठेवूं नये, तो भाग आपलें कार्यक्षेत्र होय, अशी रघूजीची समजूत होती; आणि छत्रपतीकडून त्या प्रदेशाच्या सनदाही

---

१. स. १७४३ पासून १७४९ पावेतोंच्या हालचालींसंबंधानें पुरंदरे रोजनिशींत (खं. ६) व नाना सा. रो पु. २ यांत एक मोठा खंड आहे. एकच खंड दोनही ठिकाणीं कां पडावा!!

त्यास मिळाल्या होत्या. उलट पक्षीं हा त्याचा हेतु हाणून पाडण्याचाच पेशव्याचा उद्देश असल्यामुळें त्यानें मुद्दाम पुढील वर्षी काशी, गया, मूर्शिदाबाद पावेतों स्वारी करून आपला शह बंगाल्यांत सुद्धां बसविला.

नानासाहेबाची माळव्यांतील मजबुती पाहून गायकवाडानें विशेष लढाईचा प्रसंग न आणितां मागें पाय घेतला. बहुधा मल्हारराव होळकरानेंच त्यास रेटून मागें घालविलें असावें. या समयीं धारचा यशवंतराव पवार नानासाहेबास शरण आला. त्रिंबकराव दाभाडयास मदत केल्यापासून, पवाराकडे धारचा अधिकार नव्हता स. १७४१ च्या जानेवारींत होळकरानें पेशव्याचे हुकुमानें धार काबीज केलें, तेव्हां पेशव्याच्या हुकमतींत चालण्याचें पत्करून पवारानें स. १७४२ च्या पावसाळ्यांत नानासाहेबाची भेट घेतली. तेव्हां पेशव्यानें त्यास आपल्या तर्फेनें धारेस कायम करून गुजराथेंतून गायकवाडानें पुनः माळव्यावर येऊं नये, अशा बंदोबस्त केला; कारण गुजराथ व माळवा याचे दरम्यान वाटेवर धार आहे. अशा सामोपचाराच्या मुत्सद्देगिरीनें या तरुण पेशव्यानें आपली छाप हळूहळू चहूंकडे बसविली.

५ पेशवा व रघूजी यांचा युद्ध प्रसंग, (स. १७४१-४३).— स. १७४१ च्या अखेरीस नानासाहेबानें जी मोठी स्वारी हातीं घेतली, त्याच वेळीं रघूजी भोसल्यानेंही आपली सर्व तजवीज जोरानें केली. भास्करपंत नागपुरास तयारीनें होताच. तितक्यांत स. १७४१ च्या पावसाळ्यात कर्नाटक स्वारीचा झाडा शाहूस देऊन रघूजी नागपुरास आला; आणि इकडे मीरहबीबनें मूर्शिदाबादेहून मदत मागितल्यावरून रघूजीनें भास्करपंतास बंगाल्यांत पाठविलें. तो प्रकार पुढें बंगालच्या स्वाऱ्यांत सांगण्यांत येईल. स. १७४२ चे जानेवारीपासून सेप्टेंबर अखेर भास्करपंत बंगाल्यांत होता. दसऱ्याचे सुमारास अलिवर्दीखानानें भास्करपंताचा मोड केल्यावर तो परत आला; आणि लगेच ऑक्टोबर महिन्यांत रघूजीनें पेशव्यावर चाल केली. ही गोष्ट निकरावर येण्याचें आणखी एक कारण बादशहाकडून झालें तें असें.

भास्करपंतानें मुर्शिदाबादेवर चाल केली, त्याच सुमारास बादशहाचे अंमलदार वसुलीसाठीं अलिवर्दीकडे आले; तेव्हां अलिवर्दीनें त्यांस आपली सर्व हकीकत कळवून, मराठ्यांचा पाडाव करण्यासाठीं बादशहाची मदत निकडीनें मागितली. ताबडतोब मदत न आल्यास बंगाल प्रांत हातचा गेला म्हणून समजा, असेंही त्यानें बजाविलें. पेशव्याचें व रघूजीचें वैमनस्य आहे, हें जाणून अलिवर्दीनें पेशव्याकडेही मदत मागितली; आणि त्याच्या खर्चासाठीं म्हणून कांहीं रक्कम पाठवून दिली. परंतु ती रक्कम अयोध्येच्या वजिरानें मध्येंच लांबविली असें दिसतें. बादशहानें बंगालची स्थिति ओळखून अलिवर्दीचे मदतीस जाण्याचा हुकूम अयोध्येच्या सफदरजंगास पाठविला; आणि भोसल्याचा बंदोबस्त करण्याबद्दल पेशव्यासही कळविलें; त्याची खात्री पटविण्याकरितां म्हणून अजीमाबाद ऊर्फ पाटणा येथील चौथाईची रक्कम पेशव्यास देण्याचा हुकूम अलिवर्दीवर पाठविला; आणि माळव्याच्या सुभेगिरीची सनदही ताबडतोब पाठविण्याचें कबूल केलें. हीं कारस्थानें बाळाजीनें निरनिराळ्या वकिलांमार्फत जाग्यावर बसून सिद्ध केलीं. त्याची दृष्टि चहूंकडे सारखी फिरत होती. परभारें मदतीची मागणी आली ही गोष्ट त्याच्या पथ्यावर पडली. इतक्यांत भास्करपंत पराभव पावून परत आल्यावर रघूजीनें पेशव्यावर चाल केली. अथवा रघूजी नजीक आलेला पाहून त्याजवर 'पेशव्यानें दुसऱ्या आडमार्गानें येऊन पाठलाग करून साबान महिन्यांत पहिली लढाई कसबाजावळ येथें दिली. नंतर छ ३० साबान रोजीं (ता. १९ ऑक्टोबर १७४२) भडाले परगणा खटाव येथें लढाई झाली त्यांत पेशव्यानें रघुजीचा अगदीं मोड केला.[१] नंतर रघूजीनें पेशव्या-

१. जावळ व भडाले यांचा तपास लागला नाहीं. मुक्कामाचे यादींत १० साबान रोजीं नानासाहेबाचा मुक्काम मेदार परगणा सुटवाद येथें आहे. (नो. रो. २ पृ २४२). भदोर, भद्दोरा, भद्दरवा म्हणून ग्वाल्हेरच्या हद्दींत ठिकाण आहे, तेंच हें बहुधा असावें.

कडे वकील पाठवून बोलणें कळविलें कीं, तुह्मी राज्यरीतीप्रमाणें जी वर्तणूक करितां ती फार उपयोगी आहे, असें मला कळतें. अशी मनाची निर्मळता दाखविल्यावर देशव्यांनींही बंगालप्रांत रघूजीकडे ठेवणें बरोबर आहे, असें मनांत आणून रघूजीशीं सल्ला करून भेटून त्यास आपले बरोबर नेलें ( रा. श. पृ. ९४ )[1]

या लढाई संबंधानें शा. म. ब. पृ. ७८ वर उल्लेख आहे तो असा. 'रघूजी भोसले यांनीं कटक जगंनाथ घेऊन पुढें हिंदुस्थान अयोध्येपर्यंत स्वारी करितात, खंडण्या घेतात, हें पाहून हिंदुस्थानप्रांत आपणाकडे स्वारीस महाराजांनीं नेमून दिला आहे, ह्मणून त्या प्रांतीं पेशवे निघून गेले. भोसल्यांचें ह्मणणें कीं ' तुह्मांस जेथपर्यंत साधेल, घ्याल तें तुह्मीं घ्यावें, आह्मांस जेथपर्यंत साधेल तें आह्मी घेऊं. ऐशीं बोलणी पडलीं; उभयतांही त्या प्रांतें चालोन गेले. त्यांत कटकट वाढली, लढाई जाली. ते समान होऊन उभयतां सरोन राहिले. आपसांत कळह करणें नीट नव्हे, उभयतांनीं महाराजांस लिहावें, तेथून आज्ञा होईल त्याप्रमाणें चालावें, ऐसें ठरोन पत्रें लिहिलीं. त्यावरून महाराजांनीं लिहिलें जे, तुम्हीं आपणांतच कलह वाढविला ही गोष्ट चांगली केली नाहीं. उभयतही हुजूर यावें. उभयताचीं बोलणीं ऐकून घेऊन, प्रांत व हद्द नेमून देऊं त्याप्रमाणें हद्दीनें खंडण्या घेत जाव्या. यावरून प्रधानपंत निघोन आले.' हा एकंदर प्रकरणाचा गोषवारा तपशिलानें तंतोतंत नसला तरी वस्तुतः बराच बिनचूक दिसतो. पेशवा सर्व राज्यकारभाराचा मुख्य, त्याच्या आज्ञेत सर्व सरदारांनीं चालावें, स्वतंत्रतेनें वागूं नये, हा जो बाजीराव-दाभाडयांच्या तंट्याचा मुद्दा, तोच याही प्रसंगीं होता. नानासाहेबानें आपल्या सामर्थ्याची थोडकी चुणूक दाखवून पुढें सामोपचारानें प्रकरण

---

१. रा. राजवाडयांच्या शकावलींतील पुष्कळभाग मार्मिक व उपयुक्त आहेत तर कित्येक भाग केवळ ग्रँट डफच्या विधानांचे तर्जुमे आहेत. ही हकीकत तर्जुमा दिसते.

मिटतें घेऊन, रघूजीशीं समेट केला. यांत त्याची मुत्सद्देगिरी बाजीरावाहून बरचढ दिसते. तथापि स.१७४३ त ही धुसपूस मिटली नव्हती. रघूजी पेशव्याबरोबर गयेपर्यंत गेला, असा उल्लेख आहे. कदाचित् पेशव्याचा पाठलाग करीत त्याचे मागोमाग गेला. पेशव्यानें अलिवर्दीचा पक्ष घेतला असून भोसले तर उघडपणें अलिवर्दीवर उठला होता, ( रा. श. पृ. ९८ ). स. १७४३ च्या आरंभींच बुंदेलखंड सोडून पेशवा प्रयागवरून काशीगया वगैरे क्षेत्रें करीत मार्चांत खालीं बंगाल्यांत उतरला. लोकांच्या पिकांस धक्का लागूं नये, म्हणून त्यानें मोठाले हमरस्ते मुद्दाम टाळिले. बंगाल्याच्या लोकांस पेशव्याच्या या स्वारीनें मोठीच धास्ती पडली. ता ३१ मार्च रोजीं पेशव्यानें अलिवर्दीखानाची भेट घेऊन पूर्वीचा सर्व पैका चुकता करण्याविषयीं तगादा लाविला. वास्तविक रघूजीचा बंदोबस्त करण्यासाठींच पेशवा या वेळीं अलिवर्दीकडे आला होता; परंतु तो येण्यापूर्वींच भास्करपंतास खानानें मागें फिरविलें असल्यामुळें, त्यास पेशव्याच्या मदतीची आतां जरूर नव्हती. इतक्यांत रघूजी व भास्करपंत यांनीं पुनः कांहीं तरी नेट खानास लावला असावा; कारण ( छोटानागपुर प्रांतांत ? ) पचायत अथवा पचोट येथें पेशव्यानें भोसल्याचा पुनरपि समाचार घेतल्याचा उल्लेख ग्रंट् डफ करतो. पेशवा रामचंद्रबावास लिहितो, ' श्रीकृपें बंगालियास जाणें होऊन रकारनामकास हतवीर्य केलें. सर्वांवर दबाव विशिष्ट पडला; कां कीं हे म्हणतील तदनुरूप करतील. महाबतजंगापासून व सार्वभौपासून चार टके प्राप्त होणें ते जाहलेच. रकारपूर्वकांनीं बंगाल प्रांतें जाऊन छावणी केली. आपली शक्ति सामर्थ्य दाखविणें ते त्या लोकांस दाखविलें. आमच्या फौजेनें जावें, त्यास प्रतीकार करावा, हे सार्वभौमाची वासना आहे. ' ( रा. ब. पारसनीसकडून ).

असे प्रकार होऊन एक प्रकरणाचा निकाल लागण्यापूर्वींच साताऱ्यास छत्रपतीची प्रकृति बिघडल्याचें वर्तमान पेशव्याकडे आलें, तेव्हां मे महिन्यांत परत फिरून काशीच्या मार्गानें प्रयागवरून पेशवा बुंदेलखंडांतून

माळव्यांत आला; आणि तेथील सुभेगिरीच्या सनदांची व्यवस्था बाई-बाईनें लावून स. १७४३ जून महिन्यांत पुण्यास येऊन साताऱ्यास गेला. तेथें शाहूची प्रकृति बरी झालेली त्यास आढळली. शाहूस या आपसांतील तंट्याचा सर्व प्रकार समजल्यावर त्यानें रघूजीस तावडतोब आपल्या भेटीस साताऱ्यास बोलाविलें. त्या संबंधानें रघूजी कोन्हेररामास साताऱ्यास लिहितो. ' आम्ही बंगालियाहून नागपुरास आलियावरोबर सविस्तर वर्तमान लेहून पत्रें रवाना केलीं आहेत. त्यावर तुमचें पत्र व महाराजांचीं आज्ञापत्रें सादर जालीं. तेथें आज्ञा कीं दर्शनास येणें. त्यास आम्ही सत्वमर्यीच स्वार व्हावयाचा विचार केला होता; परंतु भास्करराव यांस बंगाल्यांत ठेविलें होतें, त्यांचा मार्ग लक्षीत होतों. प्रस्तुत फौजेसहवर्तमान, ज्या मार्गें पेशव्यांची फौज आली, त्याच मार्गें एकदों मजलींचें अंतरें आले. त्यांची फौज माळव्यांतून आलियावर मशारनिल्हे मजल दरमजल शिवनीछापरियावरून आम्हांपाशीं आले. भेटी जाल्या. याउपरी गुंता नाहीं. मजल दरमजल स्वामीचे सेवेसीं येऊन पोचतों. १७ जुलई स. १७४३. [ ३-२१७ ]. यावरून पेशव्याच्या हालचालीवर नजर ठेवीत भोसले त्याचे मागोमाग बंगाल्यांतून आले.

रघूजी व नानासाहेब यांच्या ह्या स्वारीसंबंधानें कांहीं मजेदार हकीकत खालील पत्रांत आहे.

' नानासाहेब फौजेसुद्धां प्रयागकाशीगयेस गेले. रघूजी भोसले आले, असें वर्तमान येतांच, पहाटचें कूच होऊन श्रीविष्णुपदावर पिंडदान करून पूर्वेस कुंडावर तीन कोस मुक्कामास गेले. तेथें मुक्काम दहापर्यंत जाले. अलाबिरदीशीं राजकारण होतें. त्यांनीं कराराप्रमाणें पंचवीस लक्ष रुपये दिले. भोसलेकडील बोलणें पिलाजी जाधव याचे मार्फतीचें होतें. सहा हजार फौज सुद्धां रघूजी भोसले यांणीं भास्करपंतास मकसुदाबादेस अलाबिरदीवर रवाना केलें. तेव्हां श्रीमंतांनीं पिळाजी जाधवास आज्ञा केली कीं, अलाबिरदीवर फौज भोसलेनीं पाठविली, तरी आम्हांस चालून आले

लागेल, अल्लाबिरदीची कुमक करूं, याप्रमाणें त्यांनीं त्यांस लिहिलें. परंतु भोसले ऐकेनांत. जवळ भोसले आले ऐसें वर्तमान येतांच श्रीमंत चालून गेले. गयेपासून अजमासें चार पांच गांवांवर भोसलेस गांठिलें. तोंड देऊन उभा राहिला नाहीं. पळून रघूजी गेला. फौज पाठीस लागली. हत्ती घोडे सलतनत कांहींशीं लुटून आणिली. नंतर लष्कर मागती श्रीकाशी क्षेत्रानजीक दक्षिणतीरास मुक्काम चालमजलीचा करून धरणे पेरणेचे घाटानें लष्कर माघारें आलें. श्रीमंत महाराजांजवळ मराठे लोकांनीं नानाप्रकारें, 'ब्राह्मण माजले, भोसलेस लुटलें, म्हणाले. महाराजांनीं दोन दिवस ऐकोन उत्तर केलें. माझे ब्राह्मणांनीं लाथा मारिल्या तरी पुरवेल, परंतु त्यांची सावली लागत नाहीं. मद्यप्राशन करून दौलत बुडविले.[1] म्हणोन उत्तर महाराजांनीं केलें.' [ ऐ. ले. सं. भा. ८ ले. ३२९२ ]. स. १७४० त रघूजीनें डुमार कडून दारूच्या बाटल्या घेऊन स्वारीचे काम बिघडविलें, हा प्रकार शाहूच्या कानावर गेल्यावरून त्याने वरील उद्गार काढले असावे.

साताऱ्यास आल्यावर समेटाचे बोलण्यास पेशव्यानें फारसें ओढून आणले नाहीं. प्रतिनिधीचा कारभारी यमाजी शिवदेव पेशव्याचे विरुद्ध वागत असून, दमाजी गायकवाडही गुजराथेकडून साताऱ्याकडे येत होता. अशा स्थितींत ता. ३१ ऑगस्ट पासून ता. ९ सप्टेंबर पावेतों शाहूनें उभयतांची हद्द ठरवून करार लिहून घेतले ते भा. व. पु. १ लें प. या. ले ४६–४८ वर दाखल आहेत.

१ पेशव्यांनीं पूर्वी संपादिलेला मोकासा व जहागिरी; कोंकण व माळवा प्रांताचा कारभार; आगरा, प्रयाग व अजमीर प्रांताची खंडणी, पाटणाप्रांतांतील तीन तालुके, कर्नाटकाच्या जमेपैकीं वीस हजारांचे वर रघूजीच्या हद्दींत पेशव्यास दिलेले इनाम गांव, इतक्या बाबती पेशव्याच्या समजाव्या, त्यास इतरांनीं हरकत करूं नये.

---

१. छापतांना चुकी होऊन बुडवाल असा शब्द पडला आहे, परंतु मुळांत बुडविले शब्द आहे, असें रा. खरे कळवितात.

२ लखनौ, बहार व पैनबंगाल, तसेंच वऱ्हाडपासून कटकपर्यंतचा प्रदेश एवढ्या भागांतील खंडणीचे वगैरे सर्व हक्क रघूजीनें घ्यावे, त्यास पेशव्यानें किंवा इतरांनीं हरकत करूं नये.

याप्रमाणें हद्दीनें राहून, कोणी कोणाशीं खटला करूं नये. त्या प्रांतीं सरकारांत पेशकशी घेण्याचे सुद्धां ठराव करून दिले; आणि उभयतांचें सख्य करून एकमेकांस मेजवान्या करविल्या; उभयतांनीं विकल्प ठेवूं नये, ऐसे पायांवर हात ठेवून घेतले; सरकारांत उभयतांनीं मेजवान्या केल्या; ठरावाचे ऐवज दिले; आणि महाराजांनीं उभयतांस मेजवानी बहुमान देऊन निरोप दिला. ( शा म. ब. पृ. ७९ )

६ ओर्च्छाचा पाडाव, झांशीची स्थापना, ( स. १७४२ ).— माळवा व बुंदेलखंड हे दोन प्रांत दिल्लीच्या हमरस्त्यावर आहेत. हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेची हांव मराठे सरदारांनीं आरंभापासून धारण केली होती, या गोष्टीचा मुख्य पुरावा म्हणजे ह्या दोन प्रांतांचें स्वामित्व काबीज करण्याकडे मराठेसरदारांनीं व विशेषत: बाजीराव पेशव्यानें प्रथम लक्ष दिलें; किंबहुना, बाजीरावच्या एकंदर राज्यकारभाराचें हें सारच होय, असें म्हटलें तरी चालेल. शिंदेहोळकरांनीं माळव्यांत उद्योग चालू केल्यावर पुढें लवकरच संधि येतांच बाजीराव स्वत: बुंदेलखंडांत उतरला; आणि सन १७३४ त त्यानें छत्रसालापासून कांहीं प्रांत मिळवून तेथें मराठ्यांची सत्ता कायमपणें स्थापिली. ‘ बाजीरावाचे वेळेस छत्रसाल राजाशीं बुंदेलखंडचे राज्यापैकीं एक विभाग ठराव जाहाला होता; परंतु प्रत्यक्ष विभाग झाला नाहीं. तेथून कोणी सरदार येऊन सालीना सहा लक्षप्रमाणें पांचसातवर्षांची खंडणी वसूल करीत असे. याप्रमाणें वहिवाट चालली असतां संवत् १७९९ चे सालीं ( स. १७४२ ) नानासाहेब पेशव्याचे अंमलांत खंडणी वसूल होण्याकरितां मल्हार कृष्ण व राणोजी शिंदे असे उभयतां सरदार आले. झांशीस मुक्काम झाला. राजा बुंदेले ओर्च्छे-

कर यांनीं छापा घालून उभयतांचीं[1] डोकीं कापून नेलीं; फौज माघारी परत गेली; हें वर्तमान पुण्यास जाहीर झाल्यावर तेथून नारोशंकर राजे-बहादर यांची रवानगी फौजे सुद्धां झाली. झांशीस येण्याचे अगोदर स. १८०० त ओर्च्छांस येऊन कांहीं लढाई नमूद जाहली. राजे ओर्च्छेकर यांस कैद करून ओर्च्छांत गाढवाचा हल फिरवून खोडून टाकिलें. त्या दिवसापासून ओर्च्छा उजाड जाहलें. परंतु पुनः त्यांनीं आबाद केलें. राजास शृंखळाबंधन करून किल्ल्याचे बुरजावर कैद करून ठेविलें. सर्वत्र श्रीमंतांचा अंमल झाला; परंतु बदअंमली राहिली. नंतर राजाशीं एक विभाग पूर्वी ठरला त्यांत झांशीची जागा मराठ्यांस आली. डोकीं कापणी बद्दल मल्हार कृष्ण यांस बरुवासागर, खेरीज राणोजी शिंदे यांस ओर्च्छांचे राज्यांतून देवविलीं गेलीं. नारोशंकरानीं बखुबी बंदोबस्त ठेविला. संवत् १८१३ ( सन् १७५६ ) सालीं नारोशंकर देशीं रवाना झाले. नंतर महादाजीपंत अख्त्यारसुभा होऊन आले. त्यांनीं खंडेरावापाशीं तलाव बांधिला आहे. ते संवत् १८१७ ( सन् १७६० ) पावेतों राहिले. तेही दक्षिणेस गेले. संवत् १८१८ चे सालीं बाबुराव कान्हेर सुभा होऊन आले, ते संवत् १८२२ पावेतों राहिले; परंतु राजेबहादरांचे पेक्षां कमी दस्त राहिला. १८२३ चे सालीं विश्वासराव लक्ष्मण आले, ते संवत् १८२६ कार्तिकमास राहिले. त्यांचे वेळेस बिलकुल बदअंमली जाहली. मुलूख बेचिराख जाहला. नंतर रघुनाथराव हरि जुन्नर सुभ्याचे कामावर होते, मोठे शूर, पराक्रमी, तरवारबहादर, यशस्वी नारो शंकराप्रमाणें, त्यांस बोलावणें होऊन झांशी सुभ्याचीं वस्त्रें होऊन रवाना जाहले. संवत् १८२७ चे सालांत [ सन १७७० ] सुभेदार फौजसुद्धां येऊन नारोशंकराप्रमाणें राजा ओर्च्छांचें पारिपत्य करून कैद करून झांशीचे किल्ल्याचे बुरुजांत ठेविलें. ते दिवसापासून ओर्च्छा उजाड जाहलें, ते अद्याप पावेतों

१ राणोजीचें डोकें कापून नेलें नाहीं, दुसरा कोणी सरदार असेल.

आहे. सं. १८५२ चे सालीं शिवराम हरीचे नांवें सुभ्याची मंजुरी आण-वून सुभेदारांनीं जलसमाध घेतली. [ भा. व. पुस्तक १ लें झांशीच्या सुभ्याची माहिती. पृ. ६–७; Holcomb's, History of Zanshi ]

झांशीच्या सुभ्याची ही थोडक्यांत हकीकत आहे. स. १७४२ त नारोशंकरास नानासाहेबानें ओर्च्छांवर पाठवून तें शहर जिंकिलें. वास्त-विक स. १७४२–४३ च्या पेशव्याच्या स्वारीचें केंद्रस्थान ओर्च्छा हेंच असून तेथें त्याचा मुक्काम वर्षसहा महिने होता. मराठ्यांच्या कागदांत हें नांव वोडसा असें लिहिलेलें आहे. ओर्च्छा शहर नारो शंकरानें धुळीस मिळविल्यावर, तेथील राजानें दक्षिणेस ५० मैलांवर तेहरी येथें नवीन राजधानी केली, तें राज्य अद्यापि चाललें आहे. मराठ्यांनीं आपलें ठाणें झांशीस ठेविलें.

ज्या जागेवर हल्लीं झांशीचा किल्ला आहे, त्या ठिकाणीं पूर्वीं बळवंतनगर नांवाचें लहान गांव होतें. तेथें ओर्च्छाचा राजा वीरसिंहदेव यानें एक किल्ला बांधिला. नारोशंकर बुंदेलखंडांत आला, त्यानें हा किल्ला ताब्यांत घेऊन तेथें आपलें वास्तव्य केलें, आणि किल्ल्यास लागून नवीन शहर त्यानेंच वसविलें तें हल्लींचें झांशी शहर होय. नारोशंकरानें ओर्च्छाच्या लोकांकडून जबरीनें झांशी शहरांत वस्ती करविली; आणि दक्षिणेंतूनही पुष्कळ नवीन कुटुंबें आणून झांशीची वसाहत केली. गंगायमुनांच्या मधील सुपीक दुआबांत जाण्याचा हमरस्ता झांशीवरून असल्यामुळें थोड्याच अवधींत झांशीचा व्यापार वाढून तें शहर फार सधन झालें. नानासाहे-बानें हिंदुस्थानांतील म्हणजे मुख्यतः दुआबांतील द्रव्यौघ दक्षिणेंत वळवि-ण्याचा जो विचार केला, त्यासाठीं त्यानें दीड वर्ष पावेतों मोठी स्वारी उत्तरेंत देऊन मुख्य वास्तव्य ओर्च्छासच केलें. बापाचा संकल्प तडीस नेण्यास मुलानें किती तडफ दाखविली, तें यावरून कळून येतें. मात्र बुंदे-ल्यांशीं झगडतांना काय प्रयास पडले, त्याची प्रतीति खालील पत्रावरून येते.

ओर्च्छेकर बुंदेल्यांनीं मराठ्यांस कसा त्रास दिला; आणि मल्हार कृष्ण वगैरे कित्येक मंडळीस कसें कापून काढिलें, याची खालील हकीकत महादाजी गोविंद हिंगण्यानें दिल्लीहून आपल्या मुलास दक्षिणेंत लिहिली आहे. हें पत्र ता. १६ एप्रिल १७४४ चें आहे. ' इतके दिवस तों रघोजीच्या भेटीकरितां, व गयेहून स्वार जाल्यावर ( म्ह. स. १७४३ च्या उन्हाळ्यांत ) कितीका शहरीं शहरींच्या जागा मारिल्या; व खंडण्या घेतल्या. कितीका भल्या माणसांनीं कबिले सुद्धां जोहार केले. वेगळिया गढींशीं झुंज केलें. यास्तव जनामध्यें विरुद्धताच भासली, ( म्हणजे बादशहाचे नोकर होऊनः पुनः पेशव्याची फौज बादशाहीवर उठते हा विरोध). सार्वभौमासही लोकांनीं नानाप्रकारें विरुद्धच जाणविलें. इतक्यांत समाचार आला कीं, महाबतजंगाशीं व श्रीमंत स्वामींशीं भेटी झाल्या. स्नेह शपथपूर्वक झाला. श्रीमंतांहीं खजिन्याचीही ताकीद केली; व रकारनामकाचे ( रघूजी भोसल्याचे ? ) पारिपत्यासही सिद्धता केली आहे. ऐसें वर्तमान आल्यावर पातशहास व वजिरास कांहींक भरोंसा आला आहे कीं, बाळाजीराव एकनिष्ठ आहेत, रघूजीस तंबी करतील. जे कोणी अन्य विचार भासवीत होते, ते फजित पावले. ईश्वरइच्छेनें रकारनामकाचें पारिपत्य जालें असेल, इतकेंच वर्तमान आलें.'

' चिरंजीव दामोदरजींनीं चांदोरीचें वर्तमान लिहिलें तें पत्र व जिनस तुम्हापाशीं पाठविलें आहे. ओर्च्छेकरानें मल्हार कृष्णास दगा करून मारिलें. नागो महादेव व अंताजी कृष्ण वगैरे दहा पांच ब्राह्मण व शें सवाशें माणूस बारगीर पोरगे व चाकर, नफर, कूल कापून काढिले. मालमत्ता लुटली. झांशीस वेढा घातला आहे. पर्वतावर खोंडो दत्ताजी आहे. तो तोफा सोडितो, परंतु बाहेरून कुमक पोंचत नाहीं. गोविंदराव सखोजीच्या पत्रांत परिच्छिन्न लिहिलें आहे कीं, मल्हारपंताचा पुत्र व बांवई दोनही मुलें ओर्च्छांतच होतीं, त्यांस जिवें मारिलें. कोणाही राजानें असा घात व दगा श्रीमंतांचे लोकांशीं केला

नव्हता, ऐसा ओर्छेकरानें केला. एक झांशीच्या पर्वतामुळें इतकें झालें. त्याचें पारिपत्य करणार श्रीमंत समर्थ आहेत. हें वर्तमान मातुःश्रीस कळूं दिघलें नाहीं. मल्हार कृष्ण, अर्थे प्राणें लेकरांबाळांसहित स्वामीकार्यावर मारला गेला.' [ रा. खंड ६ ले. $\frac{१६१}{१}$ पृ. २७५ ].

७. बादशहाकडून माळव्याचे सुभ्यावर पेशव्याची नेमणूक.— लष्करी जोर पाठीमागें असल्याशिवाय माळव्याची सुभेदारी, केवळ जयसिंगाच्या किंवा निजामुल्मुल्कच्या मध्यस्थीनें मिळणें शक्य नाहीं, ती हिसकावूनच घेतली पाहिजे, अशी नानासाहेबानें मनाशीं गांठ बांधून स. १७४२–४३ त उत्तरेंत आल्याबरोबर सरदारांच्या मार्फत बुंदेलखंड, माळवा व बंगालपावेतोंच्या प्रदेशांत जिकडे तिकडे त्यानें जो धुमाकूळ उठवून दिला, तेणेंकरून पेशव्याची समजूत काढणें बादशहास अपरिहार्य झालें. एकंदर बादशाही मुलखावर मराठ्यांस चौथाईचा हक्क देण्याचें बादशहानें वचन दिलें; आणि पेशव्यासाठीं एक भला मोठा मौल्यवान पोषाख पाठवून दिला. लेखी सनद मात्र महंमदशहाच्या कारकीर्दीत मिळाली नाहीं, ती पुढें १७५० त मिळाली. तोंपावेतों थोड्या बहुत रोख रकमाच पेशव्याकडे पाठविण्याचा क्रम बादशहानें ठेविला होता. पेशवा–भोसल्यांचें भांडण कोणत्या थरास जातें, तें बादशहा पहात होता; आणि त्यांत पेशव्यास हार खावी लागली असती तर बादशहाचाही तितका जोर वाढला असता. परंतु सन १७४३ च्या उन्हाळ्यांत भोसल्याचा पराजय होऊन उत्तरहिंदुस्थानांत थेट पूर्वपश्चिमपावेतों पेशव्याची छाप चांगलीच बसलेली पाहून ज्यास्त चालढकल करण्याची बादशहाची सोय राहिली नाहीं. तेव्हां त्यानें माळव्याच्या सुभेदारीची सनद पेशव्यास दिली; मात्र परकीयास सुभेदारी दिली असा अपवाद आपणांवर येईल, तो टाळण्यासाठीं बादशहाचे समजुतीखातर शहाजादा अहंमद याच्या नांवानें सुभेदारी करून पेशव्यास त्याचा दुय्यम म्हणून नेमावें, अशी शक्कल जयसिंग व निजाम यानीं काढिली, आणि नाहीं होय करतां,

शेवटी मिळालें तेवढेंच पुष्कळ, अशा तडजोडीच्या भावानें पेशव्यानें तो प्रकार कबूल केला. तदनुसार बादशहानें सनदा आपल्या सहीशिक्यानिशीं दिल्लीहून जुलई ता. ४ रोजीं रवाना केल्या, त्या साताऱ्यास स. १७४३ च्या ऑगस्ट ता. २० रोजीं दाखल झाल्या. सनदांत बाळाजी बरोबर चिमाजीचें नांव घातलें आहे, यावरून त्या चिमाजीअप्पा हयात असताच तयार झाल्या होत्या, त्या तशाच पाठीमागून पुऱ्या करून स. १७४३ त पाठविण्यांत आल्या. या सनदांचें स्वरूप नेहमींच असें असतें कीं, ज्यास सनद द्यावयाची त्यानें इतक्या इतक्या बाबतींबद्दल बादशहाकडे अर्ज करावयाचा, आणि बादशहानें मेहेरबानी करून त्या मागण्या मंजूर करावयाच्या. सनदांचा मतलब माल्कमनें दिला आहे, तो असाः—

१ मराठ्यांनीं माळवाप्रांत सोडून दुसऱ्या प्रांतांवर स्वाऱ्या करूं नयेत.

२ इतर प्रांतांत मराठे सरदार गेल्यास त्यांचा बंदोबस्त पेशव्यांनीं करावा.

३ पेशव्यानी पांचशें स्वारानिशीं आपला एक सरदार बादशहाचे चाकरीस ठेवावा.

४ बादशहानें हल्लीं दिलेल्या ऐवजाबाहेर पुनः ज्यास्त मागणी पेशव्यानें करूं नये.

५ बादशहास जरूर लागेल तेव्हां चार हजार मराठी फौज त्याचे मदतीस पेशव्यांनीं पाठवावी. ज्यास्त फौज घेतल्यास त्याचा खर्च बादशाहींतून मिळावा.

६ बादशहांनीं दिलेलीं इनामें, जहागिरी, धर्मादाय वगैरे पेशव्यांनीं बरोबस्त मुनासब चालविले पाहिजेत.

७ जमीनदार लोकांकडून कर वगैरे घेणें ते ठरलेल्या शिरस्त्याबाहेर घेऊं नयेत.

या शर्तींवर पेशव्यास माळव्याची नायब सुभेदारी देण्यांत येत आहे.

या करारास राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार व पिलाजी जाधव यांनीं जामीनदार म्हणून ता. २१ एप्रिल १७४३ रोजीं कबुलायत लिहून दिली कीं, बाळाजीरावानें करार न पाळिल्यास आम्ही त्याची नोकरी सोडून देऊं. ही कबुलायत लिहून गेल्यावर मग बादशहानें सनदा तयार करून पाठवून दिल्या. एका चोरास जामीन दुसरा चोर अशा प्रकारची वरील जामीनकीची थट्टा डफनें उडविली आहे, तिचें विवेचन करण्याचें प्रयोजन नाहीं.

८. तीन वर्षांच्या कारभाराचा फलितार्थ.—वरील विवेचनावरून या तीन वर्षांच्या कारभारांत पेशव्यानें केवढी तडफ दाखविली, आणि किती भानगडीचीं प्रकरणें तडजोडीच्या युक्तीनें विल्हेस लाविलीं, याची कल्पना होईल. तूर्त आलें तेवढें पदरांत पाडून पुढें सवडीनुसार जास्त मिळविण्याची सोय त्यानें करून ठेविली. बादशहा, निजाम, रजपूत राजे, बुंदेले वगैरे परकीय सत्ताधीशांवर युक्तीच्या वाटेनें आपला शह पेशव्यानें बसविला, इतकेंच नाहीं, तर प्रतिनिधि, रघूजी, दमाजी वगैरे स्वकीय विरोधकांवर त्यानें आपली छाप एवढी बसविली, कीं प्रत्यक्ष शाहूस सुद्धां राज्याचा गाडा चालविण्यास या तरुण पेशव्याइतका दुसरा लायक इसम कोणी दिसेनासा झाला. हळू हळू दरबारांतील लहान थोर पुरुष पेशव्याच्या तंत्रानें वागूं लागले. बाजीरावाचें कर्ज फेडून पुढें खर्चास लागणारा पैसा घरांत येऊं लागला, यामुळें पुढील सहा वर्षांत शाहूच्या वार्धक्यानें दरबारांत भावी व्यवस्थेबद्दल जे घोटाळे उपस्थित झाले, त्यांचें निरसन करून सर्व कारभार आपले कबजांत घेण्याचें सामर्थ्य पेशव्यास आलें. मात्र पहिल्या दोन तीन स्वाऱ्यांतील तडफ व उत्साह शाहूच्या पश्चात् पेशव्यानें कायम ठेविला नाहीं.

राजकीय उलाढाली करतांना धार्मिक बाबतींतही नानासाहेबानें विशिष्ट उपक्रम सुरू केला. बाजीरावानें ह्यांत लक्ष घातलें नव्हतें. आपण प्रदेश लुटण्याकरितां आलों नसून आपलीं तीर्थस्थळें मुसलमानांचे हातून सोडविणें,

हें आम्ही आपलें कर्तव्य समजतों, अशा प्रकारचा प्रयाग काशीकडील लोकांचा समज करण्याचा विशेष उद्योग या वेळीं नानासाहेबानें केला. यांत त्याचें राज्यकौशल्य दिसून येतें. दरएक तीर्थाचे ठिकाणीं त्यानें सर्व विधी यथासांग केले; तेथील देवब्राह्मणांची पूजा व संभावना केली. त्यांच्या तक्रारी ऐकून घेतल्या; आणि स्वतःविषयीं एकप्रकारचा पूज्यभाव लोकांचे ठिकाणीं उत्पन्न केला. प्रयाग, काशी वगैरे पवित्र ठिकाणें अयोध्येच्या नबाबाचे हातांतून सोडवून आपल्या कबजांत घ्यावीं, अशी नानासाची मोठी इच्छा होती, आणि अनेक पत्रांत ती त्यानें वारंवार आपल्या सरदारांस कळविली आहे. नानासाहेब फौजेसह काशीकडे आला, तेव्हां अयोध्येचा नबाब सफ्तरजंग यानें काशींतील ब्राह्मणांस दहशत घातली कीं, तुम्ही आपले ब्राह्मण राजास परत फिरवा, नाहीं तर तुम्हां सर्वांस बाटवून मुसलमान करूं. त्यावरून नारायण दीक्षितास पुढें करून काशीकर ब्राह्मण नानासाहेबाकडे अर्ज करण्याकरितां आले. तेव्हां 'ब्राह्मणांस माझ्यामुळें त्रास होत असेल, तर मी काशीस येत नाहीं, मात्र मला गंगास्नान घडावें' हें ऐकून ब्राह्मणांनीं नानास एकटयासच आपल्या मेळयांत घेऊन स्नान घालून परत पाठविलें. नंतर पेशवा परभारें फौज घेऊन परत गयेस गेला, अशी आख्यायिका वर्णिलेली आहे, तींत काय तथ्य असेल तें असो.

नानासाहेबाची धार्मिक प्रवृत्ति बाजीरावाहून विशेष बळवत् होती. बाजीराव केवळ शिपाई गडी. सर्व बाजूंचीं संधानें त्यास साधत नसत. पण नानासाहेब धूर्त होता; ब्रह्मेन्द्रस्वामी, हिंगणे, पाटणकर, दीक्षित इत्यादिकांकडे गौरवांचीं पत्रें पाठवून परभारें आपला बोज व कीर्ति वाढावी, अशी त्याची पद्धत होती. पेशवाईपद मिळाल्यावर त्यानें नारायण दीक्षित यास २९ सप्टेंबर १७४० चें पत्र लिहिलें, त्यांत खालील मजकूर आहे, (का. सं. प. या. ले. ११).

'स्वामीचे आशीर्वादाचा सर्व आमचा विचार आहे, दुसरें दैवत आम्ही जाणत नाहीं. संसर्गदोषाचा परिहार करावा, याविषयीं

आज्ञा, तर अवश्य स्वामीचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. [ संसर्ग दोष कसचा ? मस्तानीचा तर नव्हे ! ] कोणी मंत्रशास्त्री भेटतील, आणि अनुष्ठान करा म्हणतील, तर ते गोष्ट न करणें. कोणाचा मंत्र न घेणें, शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीजप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जाणें, म्हणून लिहिलें, तर आज्ञेप्रमाणें करीत जाऊं. स्वधर्में करून आचरण करणें, कोणी दुराचरण असतील त्यांस शासन करणें, म्हणून लिहिलें त्याप्रमाणेंच वर्तणूक करूं. बालकांचें कल्याण इच्छावें हें मातापितरांस सांगावें लागतें, असें नाहीं. पुढेंही आम्ही लेकरें स्वामींचीं आज्ञेंत; आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कामाच्या ठायीं लागून दिवसेंदिवस यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच, यांत संशय नाहीं. स्वामिकडे खर्चास रवाना करवितों, त्या ऐवजाचा अंगीकार करावा, माघारा सर्वथा पाठवूं नये. तेथूनच ब्राम्हण योजून रामेश्वरास अकरा कावडी रवाना कराव्या. त्यास पैका पडेल तो पाठवून देऊं. राज्यप्राप्तीकरितां पूर्वी अठ्ठावीस लक्ष दूर्वा वाहिल्या आहेत. बाकी बहात्तर लक्ष राहिल्या, त्या वासुदेव दीक्षित वाहतील. स्वामींची कृपा पाहिजे. ही विज्ञापना. '

यानंतर २४ डिसेंबर १७४१ रोजीं लिहिलेलें नारायण दीक्षितांचें पत्र नानासाहेबास आलें ( का. सं. प. या. ले. २६ ) त्यांतील मजकूर:—

' तुमच्याविषयीं आपण जे ईश्वराची प्रार्थना करावयाची ते करीतच आहों. तुम्ही म्हणाल लोभामुळें करतां तर ईश्वर जाणे. कै. बाळाजीपंतां-पासून आमचें त्यांचें चालत आलें. त्यापेक्षां तुमच्या तीर्थरूपांची निष्ठा आमचे स्थळीं असे. तीर्थरूपांसारखें आम्हांस मानीत असत. त्यापेक्षां तुमचें नांव उत्कृष्ट व्हावें, ऐसा ईश्वरें आम्हांस दृष्टांत दिला आहे. तुम्ही कारभाराविषयीं अत्यंत सावध राहणें. कोणे गोष्टीची चिंता न करणें. तुमच्या पित्यापेक्षां तुम्हांवर ममता आधिक आहे. ईश्वराजवळ प्रार्थना करितों जे यांचें उत्कृष्ट चालो. आणखी काय लिहावें ! येथें वैशाखमासीं पंचप-क्वान्नांचें लक्षभोजन करावयाचा प्रारंभ करून मग कार्तिकमासायर्पंत

वांचलों तर एकवेळ त्या प्रांतास शिंदयास गोदास्नान करून, उत्तम ब्रह्मभोजन गोदातीरीं करून सर्वांच्या भेटी घेऊन यावें, असा मानस आहे, हे आशीर्वाद.’

नानासाहेबाच्या कारकीर्दींत उत्तरोत्तर मराठ्यांची सद्दी जोरांत येत चालली, तसतसा ब्राह्मणभोजनें देवतार्चनें वगैरे बाबतींतही, वरच्या पत्रांत वर्णिल्याप्रमाणें, हळू हळू उत येत गेला, हें उत्तरोत्तर व्यक्त होत जाईल. रामाजी नारायण कोल्हटकराचाही बाणा वरच्यासारखाच साधुवृत्तीचा असतां त्याचे मुलगे कोन्हेर व भास्करराम, हे पेशव्याचे सर्वस्वी उलट राहून रघूजीस सामील राहिले, हें एक आश्चर्य होय.

खं. ६ ले. १५४-१६४ चे कागद कर्णाटक स्वारीतील उद्योगावर प्रकाश पाडणारे असून ले. १६० विशेष महत्त्वाचा आहे. नानासाहेबाचा रसिक व रंगेल स्वभाव, त्याची उमेद, व माहिती मिळविण्याची हौस, या गोष्टी त्यांत व्यक्त होत असून, शिवाय नानासाहेबानेंच हें पत्र बनविलें असेल तर त्यावरून त्याच्या विद्वत्तेचाही अंदाज होतो. तें पत्र येणेंप्रमाणें:—

चि. रा. नाना ( पुरंदरे ) प्रति बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक आशीर्वाद उपरी. या प्रांतीं प्राचीन हिंदु राजे सर्व संस्कृतप्रवीण, वेश्यामद्यादिकांचा अति अनादर. सातां पिढ्याचे श्रीमत्. सातां नृत्यगीतवाद्यत्पत्तिप्रवीण. स्वजातीय अनेक स्त्रिया प्रवीण त्यांसी रत; किंचित् जितेंद्रियही आहेत. नर्माची रीत; देवब्राह्मणांची विशेष मर्यादा व शोभा; जिचे अवलोकनमात्रें अधर्मिष्ठास धर्मरति उत्पन्न होणार. गाणार कम्पतम स्वर, वर्ण्यावर्ण्यादिक शास्त्रप्रमाणरीतीनें गाणार; वेदशास्त्र किंचित् जाणतात; त्यांत जे मुख्य ते तों पाहिलेच नाहींत; जे मुख्य ते निरापेक्ष; सर्वार्थसमृद्धि; त्यांचे शिष्यवर्ग अनेक; प्रयत्नें आणून विद्यादृष्टीनें पाहतां अतिश्रेष्ठ स्वदेशज; स्थूलदृष्टीनें पाहतां मात्र अरमणीय; बाग, फुलें, कमळें इत्यादि शोभा जे महाप्रयत्नें लहानशी करावी त्याची तों गणना नाहीं. त्यांचें तेज पाहतांना असें वाटतें कीं, यांची प्रार्थना करून स्वदेशास न्यावें.

परंतु ते विदेशभूमि आणून, प्रार्थना केली असतां नयेत. इकडील नद्या अमृतोपम, बहुत जनास स्वजलप्रदानें समृद्धिवंत करितात; व पांथांस आनंद व राज्यास द्रव्यवृद्धि करितात. ज्यांचे सहचारें वोळ्याची उपमाही आमच्या राक्षसस्वभाव नद्यांस नये. उत्तर प्रांतांतील सर्व मनुष्य शुभ्र, त्यांत एक रामचंद्र व कृष्णजी श्याम त्यांचें वर्णन करितात. देशीं एक ईश्वर भ्रमयुक्त झाले, इकडील सर्वही नीलांबुदसंभ्रम; परंतु धर्मरूपें पाहतां जे हंसोपम; सर्वही मर्यादशील; आयापेक्षां व्यय थोडा; अधर्मापेक्षां धर्म फार; शैव–मध्व–लिंगधर्ते सर्वही स्वमताभिमानित. शौर्यधर्माविषयीं, नायमाराव्यतिरिक्त, सर्वही युक्तियोद्धे. हें सर्व तुम्हांसहवर्तमान पाहवें. उचित असतां अनेक शोभा टाकून, एक स्वल्पशोभा अंगीकारून गेलां, हें उत्तम न केलें! पुढें तरी स्वकीयागमनेंकरून या प्रांताचें अवलोकन करणें उचित असे. तुम्हांसहवर्तमान इकडे येणें झालिया, उर्वरित शृंगारसाधनें प्रयत्नपूर्वक पाहण्यांत येईल. राज्यकार्य प्रसंग विचार करितां भगीरथसमान कैलासवासीयांनीं उत्तरेहून दक्षण पावेतों सुवर्णनदीप्रवाह चोवीस वर्षें वाहविला. त्यांचे आशीर्वादें अलीकडेही निरंतर वर्धमान वाहत असतां, देशाधिकारी सेनामुख्य व अकृत्रिमास पूर्ण त्या नदीनें संतुष्ट केलें. एक तृष्णा मात्र त्या सुवर्णवोघानें वर्धमान केली. दक्षण देशांतून सुवर्णनदी मागें (स. १७२५–२६) रघूजी फत्तेसिंग बावांनीं आणिली, परंतु जागां जागा जिरली. मध्यें बहुत दिवस दक्षिण नदी न वाहिली. श्रीइच्छेनें या वर्षींही कालानुरूप द्रव्यनदी उत्तमच या सैन्यांत आहे, परंतु पुण्याकडे जातां रुक्ष देश फार आहे, याजमुळें सर्व जिरून जाईल. एकदां उत्तरेकडील सुवर्णनदी व दक्षिणेची नदी दोहींचा संगम सागरकूपसमान पुणें या स्थळीं, मध्यें न जिरतां, पूर्युक्त योग घडणें, तेव्हां ऋणोद्धार श्रमसार्थक इहलोक परलोकीं उत्तम होईल. भागीरथी सागरासाठीं उत्पन्न, परंतु विश्वातें उद्धार करिते; तशी या काळीं हे उत्तरदक्षणनदी वाहते, बहुत जनांस उपकारक होते. सर्वही नद्या जलौघें समुद्रास जातात,

एक कावेरी मात्र बहुत लोकांनीं आपले उपयोगास आणिली. तशी हे द्रव्यनदी मुख्य कार्य थोडें, व गौणजनकार्य मात्र बहुत करते. हा न्याय अन्याय, हा विचार साक्षी दृष्टिवंत असतील त्यांनीं विचारून पुण्यांतील रुक्षता दूर होय, व मध्यें कार्याकारण जिरे ऐसें करणें, हें योग्य असे. बहुत काय लिहिणें ? हे आशीर्वाद. ”

उत्तर व दक्षण हिंदुस्थान याठिकाणीं स्वाऱ्या करून महाराष्ट्राचें दैन्य भरून काढणें व कर्ज वारणें, हे हेतु नानासाहेबानें वर दाखविले आहेत. बाजीरावासारखा नानासाहेब पेशाच्या अडचणींत राहिला नाहीं. उत्तर-हिंदुस्थानांतील बादशाही आदब व मिजास पाहून मराठ्यांचा दांडगेपणा नानासाहेबाचे नजरेंत आला; आणि थोडी बहुत शृंगाररसाचीही त्यास गोडी लागली. लेखांक १७० त ( खं. ६ ). नानासाहेबानें हिंगण्या-कडून ‘ दोन पोरी, खुबसुरत दहा दहा वर्षांच्या, हिंदु, शुद्ध, जरूर खरेदी करून पाठवाव्या, ’ म्हणून ११ जून १७४३ त आज्ञा केली. स. १७५५ तील एका पत्रांत खालील मजकूर आहे. ‘ श्रीमंत स्वामीची फर्मास दिल्लीहून आणिली. चार हजार रुपये खर्च केले. पांच पोरी उत्तम आणविली. त्यांत दोन तीन जे स्वामीचे खुशीस येईल ते देऊं. तलास बहुत केला. ’ ( खं. ३ ले. १५६ ). यावरून नानासाहेबास शृंगाररसाची गोडी लागून राज्यसूत्रें सर्वस्वी हातीं आल्यावर हा नाद त्याचा बराच वाढत गेला असावा, असें म्हणतां येतें. या बाबतींत नानासाहेबाविषयीं गोपिकाबाईचे मनांत बहुधा मत्सर वाटत असावा, अशी अटकळ होते. बाजीराव-मस्तानीचा प्रकार सर्वांच्या मनांत ताजा होता, तसा प्रकार नानासाहेबाचा होऊं नये; म्हणून आरंभापासून राधाबाई वगैरे वडील माणसें स्वारींत बायको बरोबर नेण्याचा नानासाहेबास आग्रह करीत असावीं. कदाचित् आपलें वर्तन निर्दोष दिसावें; म्हणून अथवा आपल्या स्त्रैणत्वाचा बभ्रा होऊं नये म्हणून, नानासाहेब आपण होऊन आपल्या तरुण बायकोस बरोबर घेत असावा. स्वारींत बायका नेण्याचा प्रघात

अशा रीतीनें रूढ झाला. दीड वर्षांच्या या स्वारींतील एक सामाजिक परिणाम, एवढ्याच पुरता या गोष्टीचा येथें उल्लेख केला आहे. बाकी अशा रीतीनें सालोसाल महाराष्ट्रांतील हजारों लोक उत्तरेंत संचार करूं लागल्यामुळें आचारविचारांत व राहणींत उत्तरेचे प्रकार महाराष्ट्रांत शिरून सामाजिक बाबतींत इकडे मोठेच फरक पडत गेले, आणि खुद्द पेशवाही क्षीण झाली, हें पुढें योग्य स्थलीं सांगण्यांत येईल.

९. भेलशाची स्वारी बुंदेलखंडची व्यवस्था, (१७४४–४५):— सन १७४४ त नानासाहेबानें बाहेर मोठी स्वारी केली नाहीं. पुण्याचे आसपास व कोंकण आणि सातारा एवढ्या टापूंत त्याचें लक्ष होतें. ता. २० नोव्हेंबर १७४४ पासून १ ऑगस्ट १७४५ पावेतों उत्तर हिंदुस्थानांत त्यानें स्वारी केली, त्यास भेलशाची स्वारी म्हणतात. तारीख २२ मार्च रोजीं भेलसा हस्तगत झालें; आणि भोपाळचा फैजमहंमदखान याजबरोबर पिलाजी जाधवानें तह केला. त्याचे मुलखापैकीं निमे वांटणीचे सबंध महाल भेलसेपैकीं तालुके १५॥ पेशव्यांस मिळाले[1] [ भा. व. शकावलि पृ. २० ]. भेलशाच्या या स्वारीसंबंधानें खालील उल्लेख दामोदर महादेव हिंगण्याचे पत्रांत आहे. हें पत्र २३ जून स. १७४५ त भेलशाच्या लष्करांतून लिहिलेलें आहे [ रा. खं ६ ले. १७४ ]. ' आम्ही पादशाही लष्करातून सार्वभौमापासून रुकसत जाहलों. रुकसतीचे समयीं श्रीमंतांस हत्ती, घोडा, खिलत, जवाहीर व फर्मान इनायत केला; व आम्हांस हत्ती, खिलत व मोत्यांचा चौकडा देऊन रुकसत केलें. तेथून दिल्लीस येऊन ती. बापूची आज्ञा घेऊन लष्करांत आलों. श्रीमंतांची बुंदेलखंडांत भेट झाली. पादशाही इनायत घेऊन बहुत खूष जाहले. तदनंतर बुंदेल्यांची मामलत करून देशाकडे कूच केलें. मजल दरमजल देशास येतात. आम्हीही समागमें देशास येतों. ती. बापू पादशाहापाशीं

१. या तहाची नक्कल रा. भालेराव ग्वाल्हेरचे यांजकडून पाहण्यास मिळाली त्यांत तहाची तारीख २।३।१७४५ आहे.

आहेत. पादशहाची व सर्व अमीरांची कृपा विशेष आहे. येथेंही श्रीमंतांची व सरदारांची कृपा बहुत आहे.' या पलीकडे या भेलशाच्या स्वारीची हकीगत उपलब्ध नाहीं. मात्र या स्वारींत नानासाहेबानें माळव्यांत नवीन प्रदेश पुष्कळ हस्तगत केला; आणि तेथील वसुलाची वगैरे व्यवस्था लावून दिली. परगण्यांचीं नांवें व ते कोणत्या सरदारांच्या ताब्यांत दिले, त्याची नांवनिशी ना. रो. ११८ [ ता. २७-१-१७४५ ], ले. २० व २१ [ २४-३-१७४५ ], ले. २२ [ ता. २१-६-१७४५ ] यांत दिलेली आहे, ती माळव्यांतील व्यवस्था समजण्याचे उपयोगीं पडेल. तसेंच यारमहंमद रोहिल्याबरोबर तह सदर ले. २०२ ( ता. ३१-१-१७४१ ), दतियाची व्यवस्था ले. २०३ ( ता. १८-१-१७४१ ), चंदेरीची व्यवस्था ले. २०४ ( ता. २-४-१७४५ ), राजे सभासिंगाबरोबर करार ले. २०५ (ता.२१-६-१७४५) इत्यादि व्यवहार माळवासंबंधींच असून ते नानासाहेबानें पूर्वीच्या एक दोन स्वाऱ्यांत उलगडले, असें त्या मित्यांवरून दिसते. स. १७४४ च्या फेब्रुवारींत पेशव्यांचा वकील महादेवभट हिंगणें दिल्लींत मारला गेला, हें पुढें त्या घराण्याचे हकीकतींत सांगण्यांत येईल. ता. १ ऑगस्ट स. १७४५ रोजीं भेलशाच्या स्वारीहून पुण्यास येऊन लगेच नानासाहेब साताऱ्यास गेला. याच संधीस म्हणजे १९ जुलई सन १७४५ रोजीं सुजालपुर जवळ राणोजी शिंदे वारला, आणि त्याचा कारभार वडील मुलगा जयाप्पा शिंदे पाहूं लागला. राणोजीची बायको मीनाबाई श्रीगोंद्यास होती, तिच्याकडे व मुलांस पेशव्यांनीं दुखवटा पाठविला. राणोजी वारला त्या जागेस पुढें राणोगंज हें नांव देण्यांत आलें.

स. १७४६-४७ या सालीं साताऱ्यास फिरून ज्यास्त भानगडी सुरू झाल्या; आणि या दोनही सालांत नानासाहेबानें दूरच्या प्रदेशांत स्वारी केली नाहीं. हीं दोन वर्षें फुकट गेल्याबद्दल त्यानें विषाद दर्शविला आहे.

स. १७४६ त दक्षिणेंत असतांच नानासाहेबानें बुंदेलखंडांतील अनेक प्रांतांची व प्रश्नांची व्यवस्था ठरवून दिली. त्या व्यवस्थेसंबंधानें खालील लेखांक महत्त्वाचे आहेत.

| का. सं. प. या. पैकीं. | ना. सा. रो. पु. १ पैकीं. |
|---|---|
| ले ९१ ता. १०-४-१७४६. | ले. २०६ ता. ५-१०-१७४६. |
| ले. ६१ ता. ७-६-१७४६. | ले. २७ ता. १५-१२-१७४६. |
| ले. ७४ ता. ८-६-१७४६. | ले. २८ ता. २-१-१७४७. |
| ले. ६२ ता. १७-७-१७४६. | ले. २०७ ता. २०-१-१७४७. |
| ले. ९७ ता. २२-१०-१७४६. | ले. २०८ ता. ३०-४-१७४८. |
| ले. ५१ ता. २४-१०-१७४६. | |
| ल. ९५ ता. २८-१०-१७४६. | |

'राजे अर्जुनसिंग धंधेरे यांचे वडील लेक बुंदेल्यांस मिळोन यांच कनिष्ठ पुत्राशीं झुंज केलें. दोन तीन महिने लढाई झाली. नाइलाज देखोन यांचे कनिष्ठ पुत्रांनीं जोहार करून आपण लढून मेला. मग बुंदेल्यांचा आसरा यांचे वडील पुत्रांनीं घेतला. भेलशाचे स्वारीस [स. १७४५ ] अर्जुनसिंगाचे ज्येष्ठ पुत्रांनीं भेटीस येऊन नजर कबूल करावयाचें राजकारण लाविलें; परंतु अर्जुनसिंगास त्यांनीं भेट दिली नाहीं. आतां ते भेटीचा पैगाम तुम्हांशीं करतील, तर तुम्हीं कबूल न करणें. अर्जुनसिंगाचे हातून येऊन भेटतील, जागा खालीं करून यांचे हवालीं करतील, तरी भेट घेणें. अर्जुनसिंग आमचे पदरचे, यांची स्थापना करूं, ऐसें आमचें वचन गुंतलें आहे. याचा ज्येष्ठ लेक फंद-फितुराची गोष्ट सांगेल त्याजवरी सर्वथा न जाणें, ( का. सं. प. या. ९५ ) अशी ही बुंदेल्यांची मूळ भानगड होती.

'राजे अर्जुनसिंग हे बंगालयाचे सालीं हुजूर आले, त्या तागायत हुजूरच आहेत. हे हुजूर आले म्हणून त्यांची जागा त्यांचे पश्चात् राजे समासिंग यांनीं घेतली. तेथें त्यांचा कुंवर कामास आला. त्यास

हुजूर आले होते कीं, पुढें कांहीं राज्य आपल्या जिमें करून द्यावें, श्रमसाहस करावें, कृपा संपादून घ्यावी, हे उमेद एकीकडेच राहून, त्यांची जागा होती ती जाऊन रहावयास स्थळ नाहीं, ऐसें जालें. ते तों एकनिष्ठा धरून बसले आहेत. ऐशास आमचे विचारें ऐसें आहे, जे, यांणीं आपल्या बऱ्याकारणें कष्ट धरिला, चार वर्षें जालीं, यांची दाद न लागे. येविशीं यंदां सभासिंग याजकडील तह सरकारचा होणें, तो जाहल्यावर सदरहूप्रमाणें याची जागा यास द्यावयाचा करार करून त्याचे जिमें करावी. जास्ती उपसर्ग लागों न द्यावा. याउपरी यांचें काम लांबणीवर न घालणें.' असें पत्र वर ले. ९९ चें नानासाहेबानें शिंदेहोळकरांस लिहिलें. पत्र जयाजी शिंद्याचे नांवचें असल्यामुळें राणोजीच्या मृत्यूचा काळ जुलई १७४५ दिला आहे, तो बरोबर आहे. याच सुमारास शिंदेहोळकरांनीं बुंदेलखंडांतील जैतपुरचें मजबूद ठाणें काबीज केल्याचें वर्तमान शिंदेहोळकरांकडून आल्यावर त्यांस नानासा. नें वरील ले. ६९ चें पत्र लिहिलें. ' बुंदेल्यांनीं जैतपुरास तोफा, जेजाला, बर्कंदाज, दारूगोळा वगैरे सामान विपुल ठेविलें होतें. रेवणींतून हमेशा झुंजत. आपलेकडील हजार माणूस मेले, चार हजार जखमी जाले. तथापि सुरुंगांनीं भिताड पडलें, तेणेंकरून अजीच किल्ला फत्ते केला, म्हणोन विस्तारें लिहिलें तें श्रवण होऊन संतोष जाहला. जैतपुर बांकी जागा. बाजे सरदारांनीं व लोकांनीं श्रमसाहस करून फत्ते केली. शाबास तुमची व शाबास लोकांची. मोठी गोष्ट जाहली. तुम्हांसारखे उमदेसरदार हुरेस पडल्यावर जैतपुरची कथा काय ! याहूनही बिकट जागा हस्तगत कराल. याउपरी तिकडील कर्तव्य मनसुबा उल्लेख पुरःसर लिहीत जाणें.' शिंदे होळकरादि सरदारांकडून यथायोग्य कामें घेऊन राज्याची वृद्धि ना. सा. कशी करीत होता, हें या पत्रावरून दिसून येतें. पुढें बुंदेल्याशीं तह होऊन जैतपुर जगतराज बुंदेल्याचे स्वाधीन करण्यांत आलें; आणि तेथील महालांची वांटणी व व्यवस्था गोविंद बल्लाळ व लक्ष्मण शंकर यांजमध्यें नानासा

हेबानें करून दिली [ रोज. १-२७ व २८ ] बुंदेले राजांनी कथा लढाईचा मारा केला; आणि शिंदेहोळकरांनीं त्यांस कसें वठणीस आणलें, याचें वर्णन वरील ले. ७४ त आहे, तें वाचण्यालायक आहे. बुंदेल्यांशीं करावयाचा तह नानासाहेबानें रामचंद्रबाबास लिहून पाठविला; परंतु तो तह बुंदेल्यांनीं मान्य केला, की त्यांचा पुढें झुजण्याचाच विचार आहे, याचा खुलासा नानासाहेबानें सातान्याहून ता. १७ जुलईस विचारला [ का. सं. प. या. ६२ ]. बुंदेलखंडचें हें प्रकरण साताऱ्यास राहूनच नाना उलगडीत होता. यासंबंधाचीं नानासाहेबाचीं बरीं-चशीं पत्रें रामचंद्रबाबास लिहिलेलीं रा. ब. पारसनिस याचे संग्रहीं आहेत.

दातिया येथील बुंदेल्यांनीं असाच वारंवार त्रास दिला असतां त्यांस फौजेच्या जोरावर नरम आणण्याविषयीं नानासाहेबानें रामचंद्र बाबास ता. २२ आक्टोबर १७४६ रोजीं मोठें मुत्सद्दीपोरणाचें पत्र लिहिलें, [का. स प. या. ले. ९७], तें वाचून हिंदुस्थानांतील इग्रजांच्या राजनीतीची आठवण होते; आणि नानासाहेबाची पद्धत मराठ्यांस जिंकणाऱ्या गव्हर्नर-जनरल लॉर्ड वेल्स्लीच्या पद्धतीसारखीच त्वरेची व जोरदार होती, असें वाटूं लागलें. अर्जुनसिंगाची पुनः त्याचे जागीं स्थापना करण्यासंबंधानें नानासाहेबानें वर शिंदेहोळकरांस लिहिलें, त्याप्रमाणें तजवीज न झाल्यामुळे, मुद्दाम अमृतराव शंकर यास नानासाहेबानें अर्जुनसिंगाचे बरोबर देऊन, रामचंद्रबाबास २४ ऑक्टोबरचें पत्र लिहिलें. [ का. सं प. या. ले ५१ ]. ' हे सांगतील तदनुरूप जुने जाग्यावर स्थापना करून सर्वप्रकारें चालवणे. सारांश, आम्ही बंगाल्यास गेलों, ते सालीं बुंदेल्यांनीं याजपासून जागा घेतली, ती यांची यांचे हवाली करणें, जाणिजे '. बुंदेल्यांचे प्रकरणाचा उल्लेख पुढें वारंवार येणार आहे.

१०. जयपुरच्या गादीचा झगडा, व शिंदेहोळकरांचा बेबनाव (स. १७४७ ४८) —स. १७४३ त जयपूरचा राजा सवाई जयसिंग मरण पावला. त्यास मुलगे दोन, वडील ईश्वरसिंग व धाकटा माधवसिंग.

माधवसिंग मेवाडच्या राजकन्येच्या पोटीं झालेला असल्यामुळें, पूर्वीच्या ठरावानुसार त्याचाच हक्क राज्यावर होता; परंतु जयसिंग असतांनाच मेवाडच्या राण्यानें आपल्या राज्यांतील रामपुरा परगणा माधवसिंगास देऊन, या जहागिरीच्या बदल्यांत त्यानें मेवाडच्या राज्यांत नोकरी करावी, अशी व्यवस्था जयसिंगाचे विद्यमानेंच करून ठेविली होती. या व्यवस्थे-प्रमाणें ईश्वरसिंगास जयपुरची गादी मिळाली; आणि माधवसिंग मेवाडांत जगात्सिंगाजवळ राहिला. तीन वर्षें ईश्वरसिंगानें राज्य केल्यावर मेवाडच्या जगात्सिंगानें माधवसिंगाचा पक्ष घेऊन ईश्वरसिंगाशीं युद्ध सुरू केलें. तेव्हां जयापा शिंदे व मल्हारराव होळकर माळव्यांत होते, त्यांस ईश्वर-सिंगानें आपल्या मदतीस बोलाविलें. त्यांनीं पेशव्याशीं वाटाघाट करून पैशाच्या आशेनें ही कामगिरी अंगावर घेतली. ‘ सवाई जयसिंग कैलासवासी झाल्यावर, राणोजीनीं पातशहास पैगाम केला जे, क्रोड रुपये आम्ही देतों. माधोसिंगास राज्य होय, त्यावरून पातशहानीं कबूल करून उमदे लोकांस मसलत पुसली, सर्वांस पसंत पडली. इतक्यांत पंतप्रधानांहीं ईश्वरसिंगासच राज्य द्यावें, म्हणोन तजवीज लिहिली, त्यावरून पातशहांनीं मंजूर केलें. [ ६-२५७ ]. या संबंधानें जया-प्पाचा कारभारी रामचंद्रबाबा यास पेशवा लिहितो, ‘ राणाजीकडील वकील येथें आले आहेत, माधोसिंगाचा मजकूर बोलतात, त्यांत मुख्यार्थ हाच कीं, ईश्वरसिंगानें माधोसिंगास चोवीस लक्षांचे जागा द्यावयाचे करार केले, त्यावर सरदारांनीं कारभार बिघडून दिल्यामुळें माधोसिंगाचें काम खराब झालें. दोघेही सवाईजींचे पुत्र. ईश्वरसिंगांनीं राज्य करावें; आणि माधोसिंग नालायक आहे असें नाहीं. परंतु ईश्वरसिंगांनीं चोवीस लक्षांची जागा देण्याचा करार केला, ती द्यावी, आम्ही स्वामींस ( पेशव्यांस ) नजर करणें ती करूं, म्हणोन राणाजीचे वकील बोलतात. तर या गोष्टीचा विचार तुमचे मतें काय तो लिहून पाठविणें. आमच्या विचारें ईश्वर-सिंगांनीं करारप्रमाणें माधोसिंगास जागा द्यावी, आणि माधोसिंगापासून

चार, पंधरा, बक्की याहून विशेष, जेथवर साधेल, तेथवर साधावी. यांत तुमचा पोख्त विचार लिहून पाठविणें. ईश्वरसिंगानें चोविसांची जहागीर कबूल केली होती, परंतु तुम्हीं त्वरेनें जाऊन ईश्वरसिंगाचें मनोभीष्ट सिद्धीस नेलें; आणि माधोसिंगास तीन लाखांवर समजाविला, तर ही गोष्ट निरंतर चिंताकारीच आहे. सांप्रत राणाजीचे वकील पंधरा लाखांची नजर कबूल करितात, तर कराराप्रमाणें ईश्वरसिंगास सांगून चोविसांची जागा देववावी. यांत दोनही साधतात. छ ६ रबिलावल.' संदर्भावरून हें पत्र ७. ३. १७४७ चें दिसतें. [रा. ब. पारसनीस संग्रह]. यावरून शिंदे होळकरांनीं प्रथम ईश्वरसिंगाचा पक्ष घेऊन माधवसिंगाचा पराभव केला; आणि त्यास केवळ तीन लक्षांवर समजाविलें. त्यानंतर जगतसिंगानें पेशव्यांकडे वकील पाठवून, आपणास त्याची मदत मागितली; आणि पैशाच्या लोभास्तव ईश्वरसिंगाचा पक्ष सोडून माधवसिंगास मदत करावी, असें पेशवा सरदारांस सुचवीत आहे.

रामचंद्रबाबा शिंद्याजवळ असून त्या बाजूचा कारभार, पेशवा, बाबाच्या विचारेंच उलगडीत होता. शिंदे होळकरानीं प्रथम ईश्वरसिंगास साह्य करून राजमहाल येथें माधवसिंग व राणा जगतसिंग यांचा पराभव केला, [स. १७४७ चा आरंभ ]. या लढाईत कोटा व बुंदी येथील राजे माधवसिंगाचे बाजूनें लढले. तेव्हां या दोनें राजांची खोड मोडण्याकरितां ईश्वरसिंगानें जयापाची फौज मदतीस आणून कोट्यास वेढा घातला. कोट्याचा जालीमसिंग मोठ्या निकरानें लढला. या प्रसंगीं जयापाचा एक हात गोळी लागून जायां झाला. तथापि त्याच्या फौजेपुढें जालीमसिंगाचा निभाव लागला नाहीं. त्यानें जयापास मोठा दंड देऊन वाटेस लाविलें. सारांश, जिकडून पैसा मिळेल, तिकडेस बिनादिकत मदत करण्याचा प्रघात शिंदेहोळकरांनीं व पेशव्यानें सुरू केला, यामुळें पूर्वीचा रजपूतराज्यांचा प्रेमभाव उत्तरोत्तर बिघडत चालला.

जयापानें बुंदीकोट्यांतून भली मोठी रकम पैदा केली, तेव्हां होळकराचे तोंडास पाणी सुटलें. इतक्यांत 'पासष्ट लक्ष रुपये देतों, तुमची मदत आम्हांस द्या,' असें माधवसिंगानें कळवितांच ती गोष्ट होळकरानें मान्य करून ईश्वरसिंगावर चाल केली. हा प्रकार रामचंद्रबाबास बिलकूल आवडला नाहीं. तो पेशव्यास लिहितो. 'माधवसिंगाचें राजकारण लटकें, त्यांत जीव नाहीं, पैका प्राप्त होणें नाहीं. स्वामींनीं ईश्वरसिंगाचा अभिमान धरिला ऐसें लोकांत जालें, त्यास आतां हे गोष्ट विरुद्ध आहे. आम्ही चाकर लोक, आज्ञांकित असों.' असें रामचंद्रबाबा पेशव्यास लिहून लिहीत असतां, होळकराचे शिरजोरपणापुढें पेशव्यास मान वांकवावी लागे. वरील पत्रास पेशव्यांचें उत्तर. 'राणाजींनीं मोगलाई अमिरांकडे राजकारण करून मल्हारजीकडे प्रेश केला, एतद्विषयीं मल्हारबांनीं आम्हांस बहुतांप्रकारें लिहिलें कीं, राजकारण खरेंखुरें आहे. उभयतांची समजावीस होऊन कलह तुटतो. स्वामींस पैका मिळतो, म्हणून कित्येक आग्रहपुरःसर लिहिलें आहे. मल्हारबास या गोष्टीचा पुर्ता अभिमान आहे तुम्हांस (म्हणजे पर्यायानें जयाप्पास) कोणे गोष्टीचा अभिमान आहे, ऐसें नाहीं. तुम्ही सेवा निष्ठायुक्त करीत आलेत. ज्यांत खावंदाची मर्जी, हित व नक्ष तेंच केलें. तन्मुळेंच सर्वही उत्तम प्रकारें दिसोन स्वामिसेवा घडत गेली. सांप्रत मल्हारबा अभिमानी, तुम्ही ईश्वरसिंगाचाच पक्ष धरिल्यास, तुमची त्यांची ऐक्यता चालणार नाहीं. ते द्वैत दाखवितील. आजपर्यंतचा ऐक्य-भाव विथर दिसेल. हिंदुस्थानांत दुर्लौकिक होऊन कार्यनाश होऊं शकतो; उमदे उमदे मनसुब्यास अंतर पडून, कित्येक फितवे अंग्रेज लोकांस बोटें घालावयास जागा होणार, ऐसें चित्तांत येतें. त्यास तुम्ही येविशीं दुराग्रह न करतां, फूट न दिसतां, मल्हारबाचा मनोदय रक्षून, संपादिल्या यशाची अभिवृद्धि होय तें करणें. आमच्या विचारें तुम्ही उभयतां ऐक्यरूप मनसुबा करीत आलां, तदनुरूपच

विस्तार लिहिण्यास कारण हेंच कीं, दुराग्रह मल्हाररावाचा, नाहीं करीत म्हटल्यानें वाईट मानतील. तुम्हांपासून जावयाचा आग्रह धरितील. दुसरें, पंधरा लाख राणाजी देणार असें असतां, दुराग्रह केलिया उत्तम दिसत नाहीं. यास्तव ज्याप्रकारें लौकिक फटकळ, ग्रहकलहाचा न होतां, कार्य करणें. [बहुधा मार्च १७४७, चें. रा. ब. पारसनिस संग्रह, अप्रकाशित.] यावरून मल्हाररावाचा स्वभाव फूट पाडण्याकडे असून त्यामुळें पुढें कामें कशीं बिघडत गेलीं हें दिसून येईल.

स. १७४७ त रजपुतांच्या या भानगडी व शिंदेहोळकरांच्या रदबदली इतक्या बिकट झाल्या कीं, खुद्द पेशव्याला हिंदुस्थानांत जावें लागलें. ही त्याची तिकडे चवथी व शेवटची स्वारी होय. जयपुरचे राज्यांत नेवाई प्रांतांत पेशव्याचा मुक्काम झाल्यामुळें हीस नेवाईची स्वारी म्हणतात. ता. १०-१२-१७४७ रोजीं पेशवा पुण्याहून निघाला तो ता. ९-७-१७४८ रोजीं परत आला. एप्रिल महिन्यांत पेशव्याची व माधवसिंगाची भेट झाली. माधवसिंगाचा पक्ष पेशव्यानें उचललेला पाहून ईश्वरसिंगानें तडजोड केली, आणि त्यास नेवाईसुद्धां चार महाल देण्याचें कबूल केलें. 'बाबत नजर माधोसिंह सवाई जयसिंहाचे कनिष्ठ पुत्र यास ईश्वर-सिंहाकडून चार महाल देविले. भाऊपणाचा हिस्सा द्यावयाचा करार केला. नजर करार रु. दहा लाख. सदरहू रुपयांची निशा मल्हारजी होळकरांनीं करून ३० एप्रिल १७४८ चें पत्र लेहून दिल्हें. दुसरे दिवशीं ईश्वरसिंहा-कडून ३ लाख रुपये पेशवेसरकाराकरितां व २५ हजार महादाजी अंबाजी पुरंदरे यांजकरितां नजर म्हणून घेण्याचा करार केला.' [ना. रो. भा. १—ले. २०८ ]. परंतु पेशव्यानें केलेला वरील ठराव ईश्वरसिंगानें पाळला नाहीं, तेव्हां होळकरानें त्यास नरम केलें; व करार पुरा करून घेतला. ( १०. ८. १७४८, खं. ६-१९०, १९१, ५८१ ). 'राजे ईश्वरसिंग यांणीं लटकी रदबदल दोन महिने लावून आपल्या फौजा तमाम मेळवून युद्धप्रसंग करावा, ऐसा त्यांचा विचार देखोन, रा. गंगाधरपंत

( चंद्रचूड ) यांजबरोबर फौज देऊन फागईच्या मुक्कामींहून जैपुरास रवाना केलें. आषाढ व॥ २ स शहराभोंवताल्या वाड्या होत्या त्या जाळून, फौजेनें दोन कोस अलीकडे येऊन मुक्काम केला. त्याजवर राजे ईश्वरसिंग चालून आले. चार घटका युद्ध जालें. आपल्या कडील × × × कामास आला; आणखी चांगलें माणूस त्याजकडील शें दीडशें ठार जालें; दोन तीनशें जखमी जालें. माघारे परतून जैपुराशेजारीं नेऊन घातले. त्या उपरी राजे ईश्वरसिंग तमाम फौजेसुद्धां बाहेर निघाले आम्हीही तयार होऊन गेलों. चार घटका युद्ध झालें. त्यांनीं संकट जाणून रा. केशवदास सलुखाबद्दल आम्हाकडे पाठविला. बुंदी सोडून देतों, माधोसिंगाचे चारही परगणे निखालस खालीं करून देतों, ऐसा करार कबूल केला ' होळकराच्या जबरदस्तीनें ईश्वरसिंगास उत्तरोत्तर इतका जाच होऊं लागला कीं, ' जिणें असह्य होऊन ईश्वरसिंगें विष भक्षिलें. मेले. राज्य माधोसिंगास दिलें. ' ( १२-१-१७५१,—खं. ३-१६३ ). माधवसिंगाचा पक्षपाती मेवाडचा जगत्‌सिंगही पुढें स. १७५२ त मरण पावला; नंतर त्याचा मुलगा प्रतापसिंह यानें स. १७५५ पावेतों व प्रतापसिंहाचा मुलगा राजसिंह यानें १७६२ पावेतों उदेपुरास राज्य केलें. मेवाडच्या राज्यांतून सालोसाल मराठ्यांस खंडणी मिळत होती. त्या राज्याचा रामपुरा परगणा माधवसिंगास मिळाला होता, तो त्यानें होळकरास मदतीसाठीं लावून दिला, तो अद्यापि होळकरांकडे आहे.

रजपुतांच्या ह्या भानगडींत मराठ्यांनीं वर सांगितलेली धरसोड केल्यामुळें, त्यांचा तिकडे दुर्लौकिक झाला. पैशाच्या लोभानें वचनें मोडून पाहिजे त्या पक्षास मराठे मिळतात, हा प्रकार रजपुतांस आवडला नाहीं; आणि पूर्वी मराठ्यांबद्दल त्यांचा आदर होता, तो लयास गेला. जयाप्पा शिंद्यास ही धरसोड बिलकूल पसंत नव्हती. परंतु या खटपटींत रामचंद्रबाबा, होळकरास मिळाफी आले, अशी जयाप्पाची समजूत होऊन, पुढें त्यानें हट्ट धरून पेशव्याचे मार्फत रामचंद्रबाबास आपल्या कारभारांतून काढून टाकिलें. या सर्व परिणामांचा संबंध पुढें पानिपत प्रकरणी येणार आहे.

शाहू छत्रपतीला कर्ज झालें होतें, तें पेशव्याचे हातून फिटेना. त्याच्या फेडीसाठीं शाहूनें त्यास तगादा लाविला. तेव्हां नानासाहेब रामचंद्रबाबास वारंवार पैशाबद्दल लिहीत असे. अर्थात् द्रव्यप्राप्तीचीं लचांडें उपस्थित झालीं असतां तीं वायां जाऊं द्यावयाचीं नाहींत, असा शिंदेहोळकरांचा उपक्रम हिंदुस्थानांत चालू झाला; आणि याच उपक्रमांत त्या दोघां सरदारांचें सडकून वांकडें येऊन त्याचा कळस पुढें पानपतावर झाला. पेशव्याला या गैर प्रकाराबद्दल अत्यंत रुखरुख वाटत होती; आणि त्यासंबंधाचें खालील पत्र पेशव्यानें रामचंद्रबाबास लिहिलेलें फार महत्त्वाचें आहे. 'तुमचा व मल्हारजी होळकराचा परस्पर पेंच वाढला आहे, म्हणोन वर्तमान बहुतां मुखें ऐकिलें जातें. ऐशास आपले घरांत सरदारांत काडीमात्र द्वैतभाव नसावा, हा उत्तम पक्ष आहे. तथापि घर आहे तेथें बोलीचाली आहेच, परंतु परस्पर रुष्टता कोणी बाळगीत नव्हते. सर्वही एकचित्तें करून ज्यांत धन्याचें हित व नक्ष तोच मनसुबा करीत गेले. श्रीकृपें व वडिलांचे पुण्येंकरून जें ज्यांणीं चित्तांत आणिलें तें सिद्धीतें पावत गेलें. यशावह कर्मे तुम्हींच संपादिलीं. नक्ष लौकिक म्हणावा तसा लोकोत्तर जाला. पुढेंही तुम्ही स्वामिसेवेस चुकतां असा अर्थ नाहीं. सर्व प्रकारें या दौलतीचे तुम्ही स्तंभच आहां. उचित मनसुबा असेल तो करितां, व करालच, संदेह नाहीं. परंतु घरांत घरभेद सर्वस्वी नसावा. यामागें तुमचें सांगणें मल्हारबांनीं केलें, त्यांचा मनोभाव तुम्हीं सिद्धीस नेला. म्हणोनच उत्तम शोभा जाहली. एकतत्त्वी फौज. एकदील. कोणाचाही बुद्धिभेद चालला नाहीं. प्रस्तुत तुमची परस्पर रुष्टता याकरितां, या राज्यांत काय, मोंगलाईत काय, उभयतां उभयतांचे घरीं मन मानेल तैसा चर्चा करितात. आमचें कोणास सुख आहे ऐसें नाहीं. परंतु वडिलांचे तपोबलें आमची फौज भारी, सरदार एकदील, मर्द, कर्ते, अस्मानही कडाडलें तरी आपल्या मर्दानगीस, हिंमतीस अंतर करणार नाहींत; व केलें [illegible]

खा इंदुरासच राहून राणाजीच्या भेटीस जाणार, तुम्ही देशास येणार म्हणोन तरवतां ऐकतों. तर ते तिकडे राहिले, तुम्ही एकटे इकडे आल्यास लोकांत कसें दिसेल ! उमदे लोक चर्चा करितात, आमच्या सरदारींत फूट पडावी, आपली कारीगारी चालावी हें इच्छितात, तेंच घडूं सकेल. रघूजी भोसले व बाबूजी नाईक औरंगाबादेस जाऊन नबाब आसफजाची भेट घेतली. आम्हांकडील विपरीतार्थाच्या गोष्टी सांगतात. नबाब करूं तो सकत नाहीं; परंतु त्यांचे मनोरंजकेसाठीं अनुमोदन देतात, गोड बोलतात. रा. स्वामींस कर्ज झालें आहे, तें परिहार झालें पाहिजे, याज करितां मन माने तो पैका मागतात. त्यांच्या सांगितल्याप्रमाणें आमचे वस्तू कबूल करवत नाहीं. यास्तव परम विमनस्कतेच्या गोष्टी घरांत बाहेर बोलतात. येणेंकरूनही लोकांस सुखावह वाटोन, मन माने त्या चर्चा करितात. नबाबआसफजाचा विचार दगाबाजीचा, एकास पळ म्हणावें, एकास पाठीस लाग म्हणावें. हा त्याचा विचार तुम्ही जाणतच आहां. त्यास कांहीं चमत्कार दाखवावा, विचारावरी आणावें येविशींचा विचार करावा. दुसरें राजश्रींच्या कर्जाच्या विचारास तुम्ही असलें पाहिजे. तुम्हांस येविशीं वारंवार लिहिलें, परंतु अद्याप येणें जालें नाहीं. भेटी होऊन विचार करून आश्विनकार्तिकांत मनसुबा कर्तव्य तो करावा. सारांश, तुम्हीं उभयतांनीं यावें, घरचे बाहेरचे मनसुबे उचित दिसतील तेसे तुम्हां सर्वांच्या विचारें करावे, असा विचार आहे. तरी मल्हारबांस उत्तम प्रकारें सांगून त्यांस घेऊन येणें. ते इकडे न यावयाचे इरप्रकारें पर्याय लावतील; तथापि बहुतां प्रकारें प्रसन्न करून खामखा घेऊन यावेंच यावें. उभयतां एक जागां जालियावर त्यांच्या चित्तांतील कलुषता दूर करून पूर्ववत् प्रमाणें तुम्ही ते वर्तो. दरम्यान विकृतभाव नव्हे, ऐसाच विचार देवाच्या दयेंकरून होईल, चिंता नाहीं. मुख्य गोष्ट, आमच्या सरदारांत परस्पर फूट व्हावी, आमचा पक्ष हलका दिसावा, (पुढील एक बंद गहाळ). दुसरा पेंच राजश्री आम्हांपासून पंधरा वीस

( लाख ) कर्जाऊ इच्छितात, ते प्राप्त न होत, याजमुळें कष्टी. थोरले वाड्यांतील पेंच निरंतर वृद्धीसच पावत आहे. मानाजी आंगऱ्याचा किल्ला खापरगड घेतला, यामुळें धाकटे वाड्यांतील कृपा होती तीही इतराज. इतकेही पेंच, घरकलह नसतील तर, श्रीकृपेनें उलगडूं शकतों. सबब हरप्रकारें मल्हारबांस समजावून स्वकार्यसाधनेशाठीं घेऊन यावें. घरीं दोन वर्षे फौज बसली. कर्ज नवें दहा पंधरा झालें. यंदां स्वारीस जावयास योग्यता, राजश्रींनीं निरोप दिला याजमुळें, झाली. सत्वर सर्वांनीं एक जागां होऊन तमाम डोल पाडावे. हे अर्थ तुम्हांस लिहिणें लागतात ऐसें नाहीं. सर्व तुम्ही करून म्हातारे जालां. सारांश, बाहेर वाईट न दिसे, घरकलहामुळें दौलतेची उचित कार्यास अटकाव न पडे ती योजना जेणेंकरून होय, तें सत्वर करून त्यांस समजावून घेऊन यावें. तुम्हीही निखालस जन्माचे सोबती आहांत. विस्तारें काय लिहिणें हे विनंति. तुम्हीं मल्हारबाच्या चित्तांतील किल्मिष दूर करून त्यांस घेऊन अतित्वरेनें यावें.'

हें विस्तृत व अप्रकाशित पत्र रा. ब. पारसनीस यांचे संग्रहांतील आहे. यावरून रामचंद्रबाबावर पेशव्याची केवढी भिस्त होती, गृहकलहांपासून राज्याचे नुकसान किती होतें, नानासाहेबाच्या अडचणी कशा होत्या, आणि दूरवर शांत वृत्ति ठेवून तो आपली निभावणूक कशी करीत होता, हें दिसून येतें. सर्वच पत्र स्वयंस्फूर्तीनें लिहिलेलें आहे. शाहूच्या कर्जाची भानगड स. १७४७ च्या आरंभाची असून, त्या सालच्या १२ एप्रिलास शाहूनें बाळाजीस बाहेर जाण्यास निरोप दिला, त्यापूर्वी दोन वर्षे बाळाजी घरच्या पेचांत अडकून पडलेला होता. स. १७४७ च्या पावसाळ्यांतलें हें वरचें पत्र असावें. कारण आश्विन कार्तिकांत बाहेर जाण्याची तयारी त्यानें सुचविली आहे. त्याप्रमाणें पेशवा पुढें नेवाईच्या स्वारीस गेला. शिंदेहोळकरांचें वैमनस्य ही नानासाहेबाच्या कारभारांतली एक विशिष्ट आपत्ति होती. तिची जाणीव असूनही निरसन मात्र त्यास करतां आलें नाहीं; म्हणून त्याचे कारभाराचा शेवट कसा विपरीत झाला, हें पुढें पानपत प्रकरणीं दिसून येईल.

# प्रकरण सतरावें.

## कर्नाटकांतील स्वाऱ्या.

१ कर्नाटकचा पूर्ववृत्तान्त. २ कर्नाटकची दुसरी स्वारी, व चंदासाहेबाची कैद. (जानेवारी १७४०–मे १७४१), ३ कर्नाटकची तिसरी स्वारी, बाबूजी नायकाची खटपट, ( १७४६ डिसेंबर–मे १७४७ ).

**१ कर्नाटकचा पूर्ववृत्तान्त.**—कर्नाटक शब्दाची व्याप्ति आणि सतराव्या व अठराव्या शतकांतील निरनिराळ्या सत्ताधीशांचे त्या प्रांतांतील हितसंबंध यांचें स्पष्ट व खुलासेवार विवेचन रा. खरे यांनीं ऐ. ले. सं. च्या द्वितीय भागांत केलें आहे, तितकी सुव्यवस्थित हकीकत दुसऱ्या कोठेंही उपलब्ध नाहीं; सबब तिचाच कारणापुरता अनुवाद या ठिकाणीं करणें जरूर आहे. शिवाय रा. खरे यांनीं मेहेनत करून केलेलें विवेचन नुसतें साधनग्रंथांत राहणें योग्य नसून मराठ्यांच्या सामान्य इतिहासांत तें अंतर्भूत झालें पाहिजे.

कर्नाटक म्हणजे कन्नड किंवा कानडी भाषेच्या व्याप्तीचा प्रदेश. सामान्यतः कृष्णा नदीच्या दक्षिणेस या प्रदेशाची सुरवात होते. हिंदुस्थानच्या द्विपकल्पांत पूर्वेस व पश्चिमेस पर्वतांच्या रांगा असून पश्चिमेच्या रांगेस सह्याद्रि म्हणतात, तसें पूर्वेकडील रांगेस 'बालेघाट' म्हणत. बालेघाटाच्याखालील पूर्वसमुद्राकडील पट्टीस पाईनघाट अशी संज्ञा होती. मद्रास इलाख्यांत चार भाषा चालतात. उत्तरेस तेलंगी भाषेच्या प्रदेशास तेलंगण, दक्षिणेस तामील भाषेच्या प्रदेशास द्रविड देश, आणि पश्चिमेस घाटाखालील प्रदेशास मलबार अशा संज्ञा आहेत. हे तीन प्रदेश सोडून मधला भाग तो कर्नाटक. अर्थात बेळगांव, धारवाड, विजापूर आणि

हैदराबाद पैकीं गुलबर्गा हे जिल्हेही कर्नाटकचेच भाग होत. प्राचीन काळीं दक्षिण हिंदुस्थानांत प्रबळ हिंदु राज्यें चालू होतीं, त्या वेळीं जमाबंदीच्या कामावर ठिकठिकाणीं अंमलदार नेमण्यांत आले, ते, तीं राज्यें नष्ट झाल्यावरही आपलीं वंशपरंपरागत वतनें सांभाळून राहिले, आणि त्यास पाळेगार म्हणजे संस्थानिक ही संज्ञा प्राप्त झाली. या पाळेगारांपैकींच कांहींना देसाई असें म्हणण्याचा प्रघात पडला. महाराष्ट्रांतही असे देसाई अगर देशमुख होतेच, परंतु शिवाजीचें राज्य स्थापन झाल्यापासून या देशमुखांची सत्ता नष्ट होत गेली. कर्नाटकांतील पाळेगार व देसाई यांजबरोबर मराठ्यांचे वारंवार झगडे झाले; परंतु त्यांचा समूळ उच्छेद पुढें हैदर व टिपू यांनीं केला. महाराष्ट्रांनच औरंगजेबास जबरदस्त आडकाठी झाल्यामुळें, मुसलमानांची सत्ता आखिल कर्नाटकावर कधींच स्थापली गेली नाहीं. हे पाळेगारच बहुतेक प्रदेशावर अंमल गाजवीत, आणि तसाच कोणी शत्रु चालून आला तर तेवढ्या वेळेपुरते ते त्यास शरण जाऊन खंडणी वगैरे देत. आपसांतही त्यांचे झगडे बहुधा एकसारखे चालत.

शहाजी व त्याचा मुलगा शिवाजी यानीं कर्नाटकांत मराठ्यांची सत्ता प्रथम स्थापन केली. त्यांनीं जुन्या किल्ल्यांचा उद्धार करून कित्येक नवीन बांधिले. औरंगजेबानें कांहीं भागांवर आपली सत्ता बसविली. दक्षिणेंत मोगलांच्या सत्तेखालील प्रदेशाचे सहा सुभे पुष्कळ दिवसांपासून पाडलेले होते, ते खानदेश, वऱ्हाड, औरंगाबाद, बेदर, हैदराबाद किंवा गोवळकोंडें, व विजापुर हे होत. पैकीं शेवटच्या दोन सुभ्यांचा विस्तार फार मोठा होता, कारण मोगलांनीं कर्नाटकांत जितका प्रदेश जिंकिला, तितक्या सगळ्याचा समावेश हैदराबाद व विजापुर या दोन सुभ्यांत ते करीत गेले; आणि एकास हैदराबाद कर्नाटक व दुसऱ्यास विजापुर कर्नाटक अशीं नांवें त्यांनीं दिलीं. निजामुल्मुल्कनें स्वतंत्र पंथ काढिला, तेव्हां या सहा सुभ्यांचें राज्य त्याच्या ताब्यांत गेलें. सुभ्यांचे हाताखालीं मुल्की व फौजदारी कामाकरितां बादशहानें ठिकठिकाणीं आपले अधिकारी नेमि-

झेले होते, तेच पुढें बलाढ्य होऊन आपणांस नबाब म्हणवूं लागले. कर्नाटकांत असे पांच नबाब अठराव्या शतकांत विशेष सामर्थ्यवान होते, ते अर्काट, शिरें, कडपें, कर्नूळ व सावनूर या ठिकाणचे होतें. अर्काटच्या नबाबांचें राज्य कर्नाटक बालेघांटावर होतें, विजापुरच्या राजांकडून शहाजीस कर्नाटकांत जाहागीर होती, तिचा समावेश शिऱ्याचे हद्दींत होत होता. शिरें, होसकोटें, कोलार, बाळापुर व बंगळूर हे पांच परगणे शहाजीच्या जहागिरीचे होते. सावनूरच्या नबाबाचें राज्य बरेंच विस्तृत असून, त्याचा अंमल बहुतेक कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील टापूवर होता. याशिवाय आणखी कित्येक लहान मोठीं संस्थानें कर्नाटकांत बहुधा स्वतंत्रसारखींच होतीं, तीं म्हैसूर बिदनूर, चित्रदुर्ग, हरपनहळ्ळी, अनागोंदी व रायदुर्ग हीं होत. पैकीं कर्नाटकाच्या दक्षिणार्धांत म्हैसूरचें राज्य असून बाकीचीं उत्तरार्धांत होतीं. त्यांत बिदनूर हें पश्चिम घाटाच्या सरहद्दीवर बरेंच मोठें संस्थान होतें. घांटाच्या खालीं सोंधें संस्थान होते, त्याचाही थोडा बहुत अंमल घांटावर होता. निजाम स्वतंत्र झाला, तेव्हां तंजावरचें संस्थान व घोरपड्यांनीं स्थापिलेलें गुत्तीचें संस्थान हीं दोन मराठ्यांचीं संस्थानें कर्नाटकांत होतीं. गुत्तीकराच्याच ताब्यांत गजेंद्रगड व सोंडूर हे किल्ले होते. गुत्तीचा मुरारराव हा फार पराक्रमी असून, पंनास वर्षें पावेतों, कर्नाटकांतील निरनिराळ्या अंमलदारांस त्याची दहशत असे. सारांश, पेशवाईच्या वेळेस मुसलमान, मराठी व कानडी—अशा तीन निरनिराळ्या सत्ताधीशांचें कर्नाटकांत प्राबल्य असून, त्या सर्वांचे आपआपसांत झगडे सुरू होते.

सय्यदांच्या वेळेस स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी या तीन बाबतींच्या सनदा मराठ्यांस मिळाल्या, त्यांत कर्नाटकांतील प्रदेशाचा अंतर्भाव बादशहानें स्वराज्यांत केला नाहीं, त्यामुळें तंजावरचें राज्य इतर संस्थानाप्रमाणें मोगलांच्या जहागीरदारांत गणलें जाऊं लागलें; याचा अर्थ इतर संस्थानांप्रमाणें तंजावरच्या राज्यांतूनही चौथाई सरदेशमुखी वसूल करण्याचा

हक्क सातारकर छत्रपतींस प्राप्त झाला. मोगलाई सहा सुभ्यांचा वसूल त्या वेळीं कागदावर अठरा कोटि रुपये दाखविला जात असे; आणि त्याजवर चौथाई सरदेशमुखीचा ऐवज दरसाल सुमारें सहा कोटी रुपये होतो. परंतु हें सर्व उत्पन्न नांवाचें होतें. मराठ्यांनीं जबरदस्तीनें मिळेल तेवढें घ्यावें, आणि मोगलांनीं राखवेल तितकें राखावें, अशांतलाच हा सर्व प्रकार होता. मात्र या हक्कांच्या वसुलीकरितां मराठ्यांस सर्व दिशांस संचार करण्याची संधि मिळाली. यामुळें चमत्कार असा झाला कीं, कित्येक दूरदूरचे प्रदेश मराठ्यांच्या ताब्यांत येऊन, पुण्याच्या नजीकचे कांहीं प्रदेश कबजांत येण्यास फार काल लागला. त्रिचनापल्ली स. १७४१ त मराठ्यांनीं घेतली, तर त्रिंबकचा किल्ला स. १७५२ त घेतला. स. १७५८ त त्यांचा अंमल लाहोरांत बसला, तर अहंमदनगर हातीं येण्यास स. १७५९ साल लागलें. कर्नाटकांत मराठ्यांनीं पहिली स्वारी स १७२६ त केली, त्याची हकीकत मागें बाजीरावाचे भागांत आली आहे. त्यापुढें शाहूच्या हयातींत कर्नाटकच्या दोन स्वाऱ्या झाल्या. कर्नाटकची दुसरी स्वारी स. १७४० चा आरंभ--१७४१ च्या मे पावेतो. तिसरी स्वारी स. १७४६ डिसेंबर-१७४७ मे. हीच सदाशिवभाऊची पहिली स्वारी. पानपतचें संकट मराठ्यांवर आलें नसतें, तर हैदराचा उदय झाला नसता, आणि त्यांच्या भावी इतिहासास निराळेंच रूप प्राप्त झालें असतें. वास्तविक कर्नाटकांतला कार्यभाग वरील दोन स्वाऱ्यांनीं संपला नाहीं या सर्वांत पहिली म्हणजे स. १७४० ची स्वारी महत्त्वाची असून त्याची तपशीलवार हकीकत ब्रि रि. पृ. ४७१ वर दिलेली आहे, ती संदर्भासाठीं येथें ध्यानांत ठेविली पाहिजे स. १७४० चे आरंभीं बाजीराव नासिरजंगावर चालून गेला, त्याच वेळीं फत्तेसिंग व रघूजी भोसले, प्रतिनिधि वगैरे सरदार कर्नाटकांत शिरले. या स्वारींत गुत्तीकर मुरारराव घोरपडे आपल्या सर्व फौजेसह मदतीस आला होता. तो सेनापतिपद मागत होता, परंतु तें त्यास न देतां तुंगभद्रेचे कांहीं परगणे देऊन शाहूनें त्यास वश केलें.

कर्नाटकांतील राज्यव्यवस्थेचे घोटाळे नीट समजून घेतल्याशिवाय या स्वारीचें रहस्य कळत नाहीं. मोगल बादशाहीच्या या पडत्या काळांत प्रांतिक अंमलदार स्वातंत्र्य धारण करूं लागले. अर्काट येथें नबाब दोस्त-अली कारभार करीत असून त्याचा जावई चंदासाहेब हा हुशार व खटपटी असून फ्रेंचांच्या मदतीनें प्रबळ होऊं लागला होता. त्यानें त्रिचनापल्लीचें राज्य जिंकून तेथें आपलें वास्तव्य फार मजबुतीनें केलें, (स. १७३६), आणि तंजावरचें राज्य जिंकून तेंही घशांत टाकण्याचा उपक्रम सुरू केला. तंजावरचें मराठी राज्य व्यंकोजीच्या वेळेपासून स्वतंत्र असून त्याचा सातारकर छत्रपतीशीं स्नेहभाव असे. तंजावरास स. १७४० त राजा प्रतापसिंह गादीवर बसला. त्यापूर्वीच्या तेथील भानगडी इतिहाससंग्रहांतील 'तंजावरचें राजघराणें' या सदराखालीं पहावयास मिळतील. चंदासाहेब आपणास निर्मूल करणार, असें पाहून प्रतापसिंहानें शाहूमहाराजांकडे मदतीची विनवणी केली; आणि हें एक कारण ही स्वारी हातीं घेण्यास विशेष झालें. तंजावरच्या गादीबद्दल महाराष्ट्रांत अत्यंत आदर होता, आणि शाहूला तर आपल्या या घराण्याबद्दल अतिशय कळकळ वाटत होती. अर्थात् निजाम, सीदी, बंगश इत्यादिकांचा पाडाव करण्यांत शाहूनें जो निग्रह दाखविला, त्याहून किती तरी जास्त उत्कंठा कर्नाटकांतील वडिलार्जित उद्योग शाबूद राखण्याबद्दल शाहूला वाटत होती. त्याचे सरदार सर्वत्र विजय संपादूं लागले, तेव्हां तंजावरच्या कामासंबंधानें ही त्याची चिंता दुणावली. सन १७३७ पासून कर्नाटकावर स्वारी करण्याचा शाहूचा व मराठमंडळाचा विचार चालू होता. प्रथम बाजीरावाचीच नेमणूक या कामावर शाहूनें केली होती. परंतु वसईचें प्रकरण व नादीरशहाची दिल्लीवर स्वारी, या दोन कारणांनीं मराठ्यांस कर्नाटकांत येण्यास फावलें नाहीं. नाहीं तर बाळाजीविश्वनाथानें मिळविलेल्या सनदांचा अंमल यापूर्वीच मराठ्यांनीं केला असता. कारण दक्षिणच्या सहा सुभ्यांत कर्नाटकचा अंतर्भाव होता, हें वर सांगितलें आहे. स. १७४० त सुद्धां बाजीराव स्वतः कर्नाटकावर

येऊं शकला असता; परंतु दक्षिणच्या बाजूस आपण लक्ष घालावयाचें नाहीं, असा त्याचा नियम असून, प्रतिनिधि, रघूजी भोसले वगैरे सरदारांशीं जुटीनें वागण्याकडे त्याचा कल नव्हता. अर्थात् कर्नाटकच्या ह्या स्वारीची सर्व भिस्त रघूजी भोसले व मुरारराव घोरपडे यांजवर होती.

शाहूमहाराजानें मिरजेवर स्वारी केली, त्याच वेळेस कर्नाटकच्या या स्वारीचा उद्भव झाला. त्याचा हुकूम रघूजी भोसले यास झाला कीं, 'चंदावरास फत्तेसिंग राजे भोसले यांची रवानगी आहे, त्यासमागमें हमराद होऊन फौज सुद्धां जाऊन सरकारचे भाऊबंद आहेत, त्यांजला चंदासाहेबाचा उपद्रव होऊन परागंदा झाले, याजकरितां शत्रूचें पारिपत्य घडावें.' सरकारची आज्ञा शिरसा वंद्य करून चंदावरास जाण्याकरितां वऱ्हाडास आले, ते वेळेस देवगड प्रांतीं येऊन रघूजीनें फौजेचा बंदोबस्त तुळजोराम याजकडेस नेमिला. हा तुळजोराम यमाजी शिवदेवाच्या कुटुंबापैकीं असून शाहूनें रघूजी जवळ नेमिलेला होता. वऱ्हाडांतील बंदोबस्त करून रघूजी स्वतः नांदेडास मुक्काम करून हैदराबादचे जिल्ह्यांतून चालले. याप्रमाणें फसली सन ११५१ चे सालीं [ स. १७४१ ] त चंदावरास फत्तेसिंग राजे भोसले यांजला सामील झाले. [ ना. भो. ब. पृ. ३९ ]. यावरून या स्वारीची व्यवस्था प्रथम फत्तेसिंगाकडे असून, रघूजीची नेमणूक मागाहून झाली असें होतें.

**२ कर्नाटकची दुसरी स्वारी, ( जानेवारी १७४० मे-१७४१ ), चंदासाहेब कैद:**—रघूजी आज्ञेप्रमाणें तावडतोब आला नाहीं. खालील खरमरीत पत्र त्यास शाहूनें लिहिलेलें आहे. 'कर्नाटक प्रांतीं व हिंदुस्थानांत शत्रूनें कर्कशा आरंभिला, त्याचा बंदोबस्त पंतप्रधान यांनीं हिंदुस्थानांत करविलाच. कर्नाटकांत तुम्ही बराबर मातबर फौज घेऊन सामील व्हावें म्हणून लिहिलें होतें. त्याचें उत्तर आपल्या प्रांतांतील बंदोबस्तास गुंतल्या आहेत, म्हणून तपशिलें लिहिलें, तें कळलें. ऐशास, तुम्ही मातबर सरदार तपशिलें काळज

लिहितां ! काय म्हणावें ! स्वामीचे हातपाय तुम्हीं, आजपर्यंत तुम्हींच राज्य राखिलें, व पुढेंही तुम्हांवरीच भिस्त. चिरंजिवांनीं ( फत्तेसिंहबावा ) तरी जाऊन लढाईस सुरुवात केली. तुम्हीं मातबर सरदार-सत्वर जाऊन कामें करावीं.' ( रा. खं. ६ ले. १४९ )[१]

स. १७४० च्या एप्रिल महिन्यांत मराठ्यांची ही जंगी फौज अर्काट प्रांतांत येऊन दाखल झाली. कडाप्पा व अर्काट या जिल्ह्यांच्या दरम्यान दमलचेरीचा घांट आहे तेथे मराठ्यांस अडवून धरण्याकरितां नबाब दोस्त-अली आपल्या फौजेनिशीं चालून गेला. प्रथम मराठ्यांनीं सामोपचारानें बोलणीं केलीं, परंतु नबाबकडून त्यांचीं उडवाउडवीचीं उत्तरें आलेलीं पाहून, मराठ्यांच्या दहा हजार स्वारांनीं ता. ९ मे १७४० रोजीं आड-मार्गानें येऊन नबाबाच्या फौजेस वळसा घातला. तेव्हां पुढें उभयतांचा हल्लकल्लोळ सामना होऊन मराठ्यांनीं उत्कृष्ट कगट केली. उभय पक्षांच्या बंदुका व तोफा यांचा सणसणाट चालला. अखेरीस युद्धांत खुद्द नबाब दोस्त-अली, त्याचा धाकटा मुलगा हसनअल्ली आणि कित्येक नामांकित सरदार पतन पावले, आणि दिवाण मीरआसद यास मराठ्यांनीं कैद करून नेतलें, तेणें करून नबाबाच्या फौजेची दाणादाण होऊन, मराठ्यांना मोठाच जय मिळाला. ही दमलचेरीची लढाई ता. २० मे स. १७४० रोजीं झाली.

नबाबाच्या या पराभवानें कर्नाटकांत निरनिराळे मनोरथ बांधणाऱ्या कैक व्यक्तींचे डोळे साफ उघडले. मराठ्यांच्या शौर्याची छाप एकदम इकडेतिकडे बसली. मराठे आतां सर्व हिंदुस्थान पादाक्रांत केल्याशिवाय राहत नाहींत, असें लोकांस वाटूं लागलें. नबाबाचा मुलगा सफदरअली बापाच्या मदतीस त्वरेनें येत होता, तो हें पराभवाचें वर्तमान ऐकून स्वसंरक्षणासाठीं वेलोरच्या किल्ल्यांत गेला. चंदासाहेबाच्या मनांत कपट अस-

१ या पत्राचा काळ पौष शके १६६२ दिलेला आहे, त्याजविषयीं शंका येते.
२ पारसनीस इ. सं. तंजावरचें घराणें

त्यामुळें तोही नबाबाच्या मदतीस न येतां त्रिचनापल्लीस राहिला. मात्र त्यानें व सफ्‌दरअलीनें मयत नबाबाचें कुटुंब, उभयतांची बायकामुलें व एकंदर जडजवाहीर मराठयांच्या हातांत पडूं नये म्हणून पांदिचेरीस फ्रेंचांचे आश्रयास पाठवून दिलें, ( २५ मे ). तेथील गव्हर्नर डुमास यानें थोडा वेळ विचार करून त्यांस आश्रय दिला. कारण त्यासही मराठ्यांची भीतिच होती. इकडे मराठ्यांनीं नबाबाची राजधानी अर्काट काबीज केली, पण नबाबाची सर्व संपत्ति पांदिचेरीस गेल्यामुळें त्यांची निराशा झाली. त्यानंतर रघूजीनें डुमास यास धाक दाखविणारें पत्र लिहिलें, तें पत्र व त्यास डुमासनें दिलेला बाणेदार जबाब पाहण्यालायक आहेत. ( ब्रि. रि. पु. ४७३–४७६ ). डुमासनें रघूजीस कांहीं दारूच्या बाटल्या नजर पाठविल्या, त्या रघूजीच्या बायकोस इतक्या आवडल्या कीं, त्यानें आणखी बाटल्यांची मागणी केली, आणि त्या मिळतांच रघूजींचा वैरभाव विरघळून त्यास पुढें लवकरच तडजोडीचें स्वरूप प्राप्त झालें. ही हकीकत बहुधा शाहूला कळली असावी; म्हणूनच दारूच्या पायीं राज्य बुडविलें असे उद्गार पुढें एकदां शाहूनें काढलेले आहेत.[1]

स. १७४० च्या या मे महिन्यांत बाजीरावाच्या अकालीं मृत्यूची बातमी हिंदुस्थानभर पसरली. अर्थात् स्वारीचें काम तसेंच टाकून पेशवाईवर कोणाची स्थापना करावयाची त्या खटपटीसाठीं आपल्या फौजेचा तळ बंगलोर नजीक शिवगांव येथें ठेवून रघूजी लगबगीनें साताऱ्यास आला. तेथें त्याची खटपट सिद्धीस न जातां नानासा०स पेशवाईचीं वस्त्रें जून महिन्यांत मिळालीं आणि रघूजी लगेच, म्हणजे बहुधा जुलईत, बाबूजीनाईक यास बरोबर घेऊन परत कर्नाटकांत गेला. तिकडे आतां पुष्कळ भानगडी उपस्थित झाल्या. चंदासाहेब कर्नाटकची नबाबगिरी मिळवूं पहात होता, त्यास दोस्त अली मेल्यामुळें एक प्रकारचें समाधानच वाटलें. अर्थात् सफ्‌दरअलीस नबाबगिरी मिळविण्यास मराठ्यांचीं आर्जवें करावीं

1 ऐ. ले. सं. ८ पृ. ४४३५ पहा.

लागली. हें बोलणें दिवाण मीरआसद याच्या मार्फत चालू झालें. वाटाघाट होऊन मीरआसद यास रघूजीनें बंधमुक्त केलें, आणि सफ्दरअलीशीं गुप्त तह केला. या तहांत त्रिचनापल्ली काबीज करून चंदाखानास पकडावें; सफ्दरअलीच्या शत्रूंचें मराठ्यांनीं निर्मूलन करावें आणि याबद्दल एक कोट रुपये नबाबानें मराठ्यांस हप्त्याहप्त्यांनीं द्यावे, असा ठराव होता. हा तह केल्यानें तंजावरचे राजास मदत करण्याची मराठ्यांस सोय झाली. हा तह ता. १६ नोव्हेंबर १७४० रोजीं झाला. [ इ. सं.— तंजावर प्रकरण. ]

या गुप्त तहाची बातमी चंदासाहेबाच्या द्वारें फ्रेंच गव्हर्नर डुमास यास कळली, तेव्हां त्यानें मराठ्यांशीं लढण्याची जंगी तयारी केली. कवाइती फौज तयार करण्याचा हिंदुस्थानात हा पहिला प्रसंग होय. इकडे मराठ्यांनीं ही अंगावर घेतलेली जबाबदारी पूर्ण करण्याकरितां कडेकोट इलाज चालू केले. त्यांनीं तिकडच्या राजांचें व पाळेगारांचें साह्य मिळविलें. तंजावरचा राजा प्रतापसिंह याचीच या कामीं मुख्य मदत होती. प्रतापसिंहाचे वकील तिमाजी रंगनाथ व गंगापा यांनीं या संबंधानें रघूजीशीं तह केला तो इ. सं. त दिला आहे. पंधरा लक्ष रुपये नजर द्यावे; त्रिचनापल्ली घ्यावी, चंदाखानास काढावा.' ता. ६ जिल्काद [ जानेवारी १६, १७४१ ]. शाहूमहाराजाचे मनांत तंजावरचे राज्याचें तिकडे स्वास्थ्य करून द्यावयाचें फार दिवस होतें. परंतु दुसऱ्या अनेक प्रकरणांमुळें हा वेळ पावेतों त्यास तशी सवड झाली नाहीं, ती आतां या वेळीं झाली.

या तहानें तंजावरचें सैन्य मराठ्यांच्या मदतीस येऊन सर्व संयुक्त सैन्यानें डिसेंबर महिन्यांत त्रिचनापल्लीस वेढा दिला. हें प्राचीन ठिकाण चंदासाहेबाच्या हातांत राहूं नये; म्हणून सर्व हिंदु वीरानीं मोठ्या वीरश्रीस चढून त्या वेळीं निकराचें युद्ध केलें. चंदासाहेब किल्ल्यातून मोठ्या हिंमतीनें

---

१. ३ लक्ष राजश्रींस, २ लक्ष मातुश्रींस, २ लक्ष उभयतां सरदार, ८ लक्ष फौजेचे खर्चास.

लढत होता. परंतु त्याजवळची सामुग्री संपत आल्यामुळें, फार दिवस टक्कर देणें त्यास अशक्य वाटूं लागलें; आणि किल्ला स्वाधीन करण्या-विषयीं त्यानें मराठ्यांशीं बोलणें चालू केलें. चंदासाहेबानें आपला भाऊ बडासाहेब यास मदुरेहून निर्वाणीच्या वेळीं आपल्या मदतीस बोलाविलें. त्याप्रमाणें बडासाहेब मदतीस येत असतां त्यास मराठ्यांनीं युद्धांत गांठून ठार मारिलें, आणि त्याची फौज कापून काढिली. तेव्हां निरुपाय होऊन ता. २६ मार्च स. १७४१ रोजीं चंदासाहेबानें किल्ला मराठ्यांचे स्वाधीन केला, तो कर्णाजी शिंदे यानें काबीज केला. [रा. य. पृ ९९]. चंदासा०चीं बायकामुलें पांदिचिरींत होतीं फक्त वडील मुलगा व तो स्वतः रघूजीचे हातांत सांपडला. दोघांच्या सुटकेबद्दल आठ लक्ष रुपये त्यानें देऊं केलें. परंतु रघूजीनें तें कबूल न करितां मुलासह त्यास कैद करून मोठ्या बंदोबस्तानें साताऱ्यास रवाना केलें. तेथें सात वर्षें ते दोघे मराठ्यांच्या कैदेंत होते.

'जागजागीं खंडण्या घेऊन चंदासाहेबाच्या फौजेशीं लढाया मातबर घेण्यांत आल्या. आपलेकडील फत्ते होऊन चंदासाहेबास धरून कैद केलें. फौजेंत लूटही मनस्वी आली. चांगली जागा हस्तगत करून राजश्रीचे भाऊबंद परागंदा झाले होते, ते आपले स्वस्थळास स्थापित केले. दोन वर्षें स्वारीस लागलीं.' साताऱ्यास राजदर्शनास आले. चंदासाहेबास हुजूर पोंचवून झालें वर्तमान राजश्रींस निवेदन केलें. भाऊबंद स्थळास कायम केले हें ऐकून बहुत खुषी मानून सेनासाहेबास बहुमानवस्त्रें देऊन गौरव केला. साताऱ्याहून वऱ्हाडांत येते वेळेस राजश्रींनीं सरदेशमुखीची व मोकाशाची, गोंडवण झाडी तहत कटकची, माफी करून दिली.' [ना. भो. व. पृ. ३९–४१].

या पराक्रमानें मराठ्यांच्या शौर्याची कीर्ति देशभर होऊन त्यांचा दरा-राही सर्वत्र चांगला बसला. वेढ्याच्या प्रसंगीं मुख्य मेहनत मुराररावाचीच असल्यामुळें रघूजीनें त्यासच त्रिचनापल्लीचा सुभेदार नेमून तेथील सर्व व्यवस्था त्याच्या ताब्यांत दिली. आपल्या शेजारचा प्रबळ शत्रु चंदासाहेब

याप्रमाणें रसातळास मिळालेला पाहून तंजावरच्या प्रतापसिंहास मोठा संतोष झाला, आणि त्यानें सर्व मराठा सरदारांस चांगलीं बक्षिसें दिलीं. चंदासाहेब दूर झाल्यानें प्रतापसिंहास आपल्या राज्यांत विशेष स्वस्थता मिळूं लागली रघूजी भोसल्याचें युद्धकौशल्य व मुत्सद्दी शहाणपण हे गुण या स्वारींत चांगले निदर्शनास येऊन, त्यामुळें शाहूचें मन त्याजवर प्रसन्न झालें; आणि मराठमंडळांत त्याची योग्यता विशेष वाढली. ता. २७ जून स. १७४१ रोजीं रघूजी व फत्तेसिंग भोसले कर्नाटकच्या स्वारींतून परत साताऱ्यास आले ( पुं. रोज. पृ ४४ रा. खं. ६ ). त्यानंतर थोडक्याच दिवसांनीं नानासा. पेशवेही उत्तरेच्या स्वारींतून साताऱ्यास परत आला.

नादीरशहाच्या स्वारीनें उपस्थित झालेल्या आयाताची निरवानिरव झाल्यावर निजाम दक्षिणेत येण्यास मोकळा झाला. येण्यापूर्वी त्यानें आपला वडील मुलगा गाजीउद्दीन याजकडे मीरबक्षीचें म्हणजे सेनापतीचें काम देवविलें, त्यामुळें बादशाहींतून इतःपर त्यास दक्षिणेंत त्रास होण्याचा संभव राहिला नाहीं. नासिरजंगानें बंडावा केल्याचें ऐकून स. १७४१ च्या आरंभींच निजाम दक्षिणेत आल्याचें मागें सांगितलें आहे. त्या सालच्या जानेवारींत नानासाहेबाची व निजामाची भेट एदलाबाद येथें झाली. या भेटी होत असतांच रघूजी भोसले व मुरारराव घोरपडे त्रिचनापल्लीस वेढा घालून बसले होते. पुढे त्रिचनापल्ली मराठ्यांच्या हस्तगत झाली, तंजावरच्या राज्याची स्थिरस्थावर होऊन कर्नाटकांत मराठ्यांचा जम बसला, आणि महत्त्वाकांक्षी चंदासाहेबास साताऱ्याच्या किल्ल्यांत बंदीवास प्राप्त झाला, या गोष्टींनीं निजामाच्या मनास मोठी उद्विग्नता प्राप्त झाली; आणि मराठे या प्रकारें निर्वैर झालेले पाहून त्यास भास्ती वाटूं लागली. त्यानें आपल्या मुलाचा बंडावा लवकरच मोडला ( जुलई १७४१ ). रघूजी व पेशवा यांजमध्यें बेबनाव वाढविण्याचेही त्यानें प्रयत्न केले, परंतु पुढील एक दोन वर्षांत नानासाहेबाची हिंदुस्थानांत भरभराट होऊन भोसल्याचें व त्याचें सख्य शाहूनें करून दिलें,

येणेंकरून शाहूच्या ऐश्वर्याचा कळस होऊन मराठयांचा वचक सर्वत्र बसला. सबब प्रथम कर्नाटक प्रांत जिंकून तेथील मराठयांची सत्ता उठाविण्याचा उद्योग निजामानें आरंभिला. कर्नाटकचा प्रदेश औरंगजेबानें जिंकिलेला असून तो दक्षिणच्या सहा सुभ्याखालीं मोडतो, या सबबीवर निजामानें अर्कॉटच्या नबाबापासून खंडणीची मागणी केली. ही खंडणी दोस्त अलीच्या वेळेपासून दिलेली नव्हती; आणि नबाब आपणास निजामाचे अंकित समजत नसल्यामुळें त्यास खंडणी देण्याची चुकवाचुकव करीत असत. उलट खंडणी देण्याच्या निमित्तानें सफ्दरअलीनें लोकांपासून पुष्कळ पैसा जमविला होता, त्या कारणानें अप्रिय झालेल्या सफ्दरअलीचा मूर्तजाअलीनें खून केला [ आक्टोबर १७४२ ], आणि आपणच अर्कॉटच्या नबाबाचें पद स्वीकारिलें. या बंडाळीचा फायदा घेऊन निजामानें मोठी फौज बरोबर घेऊन कर्नाटकावर स्वारी केली. स. १७४३ च्या जानेवारींत तो गोवळकोंडयाहून निघाला, आणि मार्च महिन्यांत अर्कॉटला पोंचला. ही प्रचंड स्वारी आल्याबरोबर सर्व बंडखोर जागच्याजागीं बसले. अर्कॉट येथें अन्वरुद्दीन यास बंदोबस्तास ठेवून निजाम त्रिचनापल्लीवर आला; आणि तें ठिकाण त्यानें आपल्या स्वाधीन करण्याविषयीं मुरारराव कळविलें. मुराररावानें निजामाशीं लढण्याचा प्रसंग आणिला नाहीं. गुत्तीचें राज्य निजामानें मुरारावाकडे कायम केलें, आणि बरीच मोठी रक्कम भरून त्यानें मुरारावाकडून त्रिचनापल्ली घेऊन त्यास परत गुत्तीस पाठविलें. याप्रमाणें तमाम कर्नाटकची नवीन व्यवस्था करून निजाम परत गोवळकोंड्यास आला. त्याच्या मुलीचा मुलगा हिदायत मोहदीनखान ऊ. मुज्फरजंग याजला कर्नाटक बाळाघाटचा कारभार आणि अदोनी येथें जहागीर देऊन त्यास विजापुरास ठेवून दिलें.

त्रिचनापल्ली हातची जाऊन निजामानें तिकडे आपला शह बसविला याजबद्दल शाहूस व मराठे सरदारांस मोठें वाईट वाटलें. परंतु त्याजबद्दल त्यांच्या हातून एकदम कांहीं बंदोबस्त होणें शक्य नव्हतें. स. १७४१ त

पेशवा हिंदुस्थानांत, व रघूजी भोसले बंगाल्यांत गुंतले होते. तथापि शाहूनें कर्नाटकच्या बंदोबस्ताचे दुसरे इलाज चालविले. त्यानें बाबराव पाटणकरास २ मे १७४३ रोजीं लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे. ' महाराजांची आज्ञा घेऊन स्वार जाहलों, ते, रा. हिंदुराव घोरपडे ममलकतमदार यांची भेट घेतली, पुढें त्रिचनापल्लीकडे जाण्याचा विचार आहे म्हणून लिहिलें, ऐशास, नबाब निजामुल्लुक्क त्रिचनापल्लीस जाऊन बैसला आहे, तेथील उपराळयास जावयाची आज्ञा घोरपडे यांस केली आहे. ते फौजेसहवर्तमान जातील. त्यां समागमें तुम्ही फौजेसह जाणें. ' [ शा. म. रो. ७३ ]. यावरून मुराराव घोरपड्यास पुनः त्रिचनापल्लीवर जाण्याची आज्ञा शाहूनें लगेच केली असें दिसतें. पण पेशवे व रघूजी भोसले या दोघांच्याच अंगीं अशा मोठ्या कामगिरीवर जाण्याची ताकद होती; आणि ते दोघे बाहेर गुंतले असल्यामुळें जाग्यावर फत्तेसिंग भोसले व बाबूजी नाइकासारखी पराक्रमहीन परंतु द्रव्यलोभी मंडळी एवढीच कायती होती; त्यांच्या हातून स्वतंत्र कामगिरी तडीस जाणें शक्य नव्हतें. मुराराव घोरपडे पराक्रमी होता, परंतु छत्रपतींकडून स्वतंत्र फौज आल्याशिवाय स्वतःच्या हिंमतीवर मोठें साहस अंगावर घेण्याचा त्याचा कधींच इरादा नव्हता. तो आपणास मराठमंडळापैकीं समजत नसे, परंतु चंद्रसेन जाधवाप्रमाणें छत्रपतीशीं त्याचा वैरभावही नव्हता. आपला स्वतंत्र पंथ कायम ठेवून परभारें होणाऱ्या फायद्यासाठीं एखादी नवीन कामगिरी तो अंगावर घेई इतकेंच. तशी त्याची भावना नसती तर निजामाशीं मुकाट्यानें सलोखा ठेवून त्रिचनापल्ली सोडून तो आलाच नसता. तंजावरची व अर्काटच्या नबाबाची मदत घेऊन निजामाशीं लढणें त्यास शक्य होतें; परंतु एवढा खटाटोप करून शेवटीं लभ्यांश कांहीं विशेष नाहीं, अशी स्थिति होण्यावेळां, सावधगिरीनें आपला बचाव व स्वार्थ साधण्याचाच मुराररावाचा नेहमींचा परिपाठ असे; व अखेरपर्यंत तो त्यानें पाळला.

फत्तेसिंग भोसल्यासंबंधानें एका लेखकानें मोठे मार्मिक उद्गार काढिले आहेत. तो म्हणतो ' फत्तेसिंगबाबांस घरीं राहिल्यानें काय सुख नाहीं, तें बाहेर निघोन हैराण व्हावें '' अर्थात् स. १७४३ च्या उन्हाळ्यांत त्रिचनापल्लीसंबंधानें शाहूचा जीव तिळतिळ तुटत असतांही, त्याचा उपाय त्याचे हातून घडला नाहीं. इतक्यांत त्याच मे महिन्यांत शाहूची प्रकृति अतिशय बिघडली; आणि महाराज आतां या दुखण्यांतून निभावत नाहींत, अशी लोकांस काळजी पडली. त्यासाठीं पेशवा बाळाजी हिंदुस्थानांतलें काम हातचें टाकून धावत साताऱ्यास आला. १० मे पासून २० जून पर्यंत शाहूची प्रकृति हैराण होती. पुढें तो बरा झाला तों पेशवा रघूजीचें वितुष्ट विकोपास गेलेलें त्यास आढळलें, त्याची तडजोड करण्यांत दोन तीन महिने गेले, आणि अशा रीतीनें कर्नाटकच्या मोहिमेचें काम मागें पडत गेलें.

३. कर्नाटकची तिसरी स्वारी, बाबूजीनायकाची खटपट, ( १७४६ डिसेंबर-मे १७४७ ).—ही गोष्ट मागें पडण्यास कांहीं अंशी बाबूजी नाइकाची खटपट कारण झाली. नानासाहेबानें त्यास पुण्यांतून काढून लावल्यापासून तो मनांत जळफळत फत्तेसिंग व रघूजी यांच्या कच्छपीं असे; आणि शाहूच्या राण्यांच्या वगैरे मार्फत आंतून खटपटी करी. स. १७४१ च्या कर्नाटक स्वारींत रघूजी भोसल्याबरोबर तो असल्यानें, त्या वेळीं जी द्रव्याची अपरिमित प्राप्ति सरदारांस झाली, त्याच्या योगानें नायकाचे तोंडास पाणी सुटलें. रघूजीच्या वगैरे शिफारसीनें त्यानें शाहूपासून बारामतीस नवीन जहागीर मिळवून तेथें नवीन वाडे बांधून आपल्या कुटुंबाचें वास्तव्य केलें; आणि एव्हांपासून कर्नाटकचा सुभा आपल्या नांवानें करून घेण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. या उद्योगास पेशव्याचें पाठबळ नव्हतें, उलट विरोधच होता. नुसत्या सावकारीचा उद्योग नाइक करता तर त्यांत पेशव्यास वैषम्य नव्हतें, परंतु पेशव्याचे विरुद्ध शाहूच्या दरबारीं चाललेल्या खटपटींत तो सामील असे. ही

गोष्ट पेशव्यानें दुर्लक्ष करण्यासारखी नव्हती. ज्यानें राज्याचें जोखीम अंगावर घेतलें, त्यास विरुद्ध पक्षाचा पाडाव व स्वपक्षाचें पोषण करणें ओघानेंच प्राप्त होतें. या कारणास्तव नायकाची खटपट विफळ करण्याचा पेशव्याचा उद्योग असून, नायकास कर्नाटकांत राहूं दिलें तर रघूजीचें पारडें जड होऊन राज्याची जोखीम सांभाळणें आपणास तितकें अवघड जाईल, असा नानासाहेबास पेंच होता. उलट पक्षीं सावकारीपलीकडे ज्यास्त उद्योग राज्यांत करून दाखवावयाची हाव नायकास असून, कर्नाटकाशिवाय इतर क्षेत्र त्यास सोयीचें व सुलभ नव्हतें, म्हणून कर्नाटकचा सुभा मिळविण्याची नायकाची खटपट; आणि हा उपक्रम हाणून पाडण्याची पेशव्यांची खटपट, अशा दोन खटपटी दोन चार वर्षे साताऱ्यास जोरानें चालू झाल्या. अर्थात् केवळ व्यक्तींच्या न्यायान्यायाच्या दृष्टीनें या भानगडींकडे न पाहतां, दोनही पक्षांच्या हेतूंकडे लक्ष ठेवून राज्याची सोय पाहिली पाहिजे. अनेक पक्ष व अनेक भानगडी यांजमुळें कर्नाटकचा हा प्रश्न शाहूच्या हयातींत पेशव्याचे हातून सुटला नाहीं. पुढें साताऱ्च्या भानगडींतून मोकळे झाल्यावर स. १७५३ त पेशव्यानीं कर्नाटकची कामगिरी अंगावर घेतली आणि लागोपाठ तिकडे अनेक स्वाऱ्या करून सर्व प्रदेशावर आपला शह बसविला. मात्र पानपतावरील अरिष्टामुळें कर्नाटकांतील हा उद्योग फुकट जाऊन, हैदरअलीस पुढें येण्यास वाव सांपडला.

कर्नाटकासंबंधानें पेशवे व नाइक यांजमधील प्रस्तुतच्या तंट्यावर प्रकाश पाडणारे कागद थोडेच आहेत ते येणेंप्रमाणें:—

का. सं. प. या. ले.

६८ ता. ६-५-१७४७. ७७ ता. २१-२-१७४७.

७८ ता. २२-२-१७४७. ७९ ता. २-६-१७४५.

८१ ता. २९-८-१७४६. रा. खंड ३ ले. २११ ऑगस्ट १७४६ नंतर लवकरच.

हे कागद कालानुक्रमानेंच वाचले पाहिजेत. ले. ७९ हा नानासाहेब स्वारींत असतां त्यास सदाशिवरावानें लिहिलेलें पत्र आहे.[1] नानासाहेब स. १७४५ त भेलशाचे स्वारींत होता. त्यानंतर दोन तीन वर्षे त्यानें स्वारी केलेली नाहीं. या पत्रांत सदाशिवराव लिहितो, 'बाबूजी नाइकास रा. स्वामींनीं कर्नाटकचा मामला मुकासा सांगून गौरव केला. आबाजी नाईक स्वामीच्या दर्शनास गेले होते, त्यांस ५ जमादिलावलीं [ २६ मे १७४५ ] बहुमान देऊन आबूराव किताब देऊन निरोप दिल्हा.' यासंबंधानें शा. म. चे बखरींतील हकीकत विस्तृत व विश्वसनीय दिसते ती अशी. 'येसाजी व कुसाजी भोसले हे सरकारचे लेकावळे यांस शिरोळ वगैरे सुभा सांगितला; आणि पुढें बाबूजी नाईक याजकडे कर्नाटक सुभा, त्यांत त्रिचनापल्ली व श्रीरंगपट्टण हुजूर ठेविलें ते खेरीजकरून, आदवानी वगैरे सारे महाल कर्नाटकचे, त्यांत निंमे बाबूजीनाईक, व येसाजी कुसाजी भोसले निंमेंत, शिबंदी ( महाल मजकूर ) खर्च, व निंमे सरकार रसद, मोकासा बाबती, स्वराज्य अमल,-त्याचे सात लक्ष रुपये रसद घेऊन भोसले यांचे कारभारी यांनीं व तुम्हीं [ नायकांनीं ] एक विचारें चालावें, ऐसें करून रवाना केले.' हा ठराव वर सांगितल्याप्रमाणें स. १७४५ चे मे महिन्यांत झाला. 'कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील मुलखाच्या चौथ सरदेशमुखीची मामलत या ठरावानें बाबूजीस मिळाली, तो मुलूख सावनूरकर नबाब अब्दूल मजीदखान याच्या ताब्यांत होता. त्या प्रांतीं कित्तूर, नवळगुंद, शिरहट्टी, हावनूर व डंबळ येथील देसाई फार प्रबळ होते. ते देसाई व सावनूरकर नबाब बाबूजी नाइकाचा अंमल बसूं

---

टीपः—१ या पत्राची ता. रा. आठल्ये यांनीं ३०-४-१७४८ ठरविली आहे. या वेळीं ही नानासाहेब स्वारींत होता ही गोष्ट खरी, परंतु ले. ७७ त नाईक स्वामीचा निरोप घेऊन गेले, असें विधान असल्यामुळें ले. ७९ त्याचे पूर्वींचाच असला पाहिजे. तारखेच्या फेरफारामुळें मतलबांत किंवा विवेचनांत तफावत पडत नाहीं.

देईनात. उभयपक्षीं झगडाझगड चालू होती, तींत बाबूजी नाईक फौजेच्या खर्चाखालीं अगदीं जेरीस आला. [ खरे–ऐ. ले. सं. पृ. ६४९]. ' बाबूजी नाईक कर्नाटक प्रांतीं गेले. तेथें संस्थानिकांशीं कटकट वाढून लढाई पडली. शिबंदी ठेवणें आली. लढाईत मोड झाला, लुटले गेले. शिबंदीचा पेंच अंगावर आला. त्यांचीं धरणीं बसलीं. त्याजबरोबर निघोन सातारां आले, आणि महाराजांस विनंति केली जे, शिबंदी व कर्जाचा पेंच आला, यांत अबरू व आण रहात नाहीं. यास्तव सरकारांतून पांच सात लक्ष रुपये देऊन पेंच वारावा. तेव्हां महाराजांनीं आज्ञा केली जे, ' तुम्ही करणें सरकार आज्ञेनें करावें. लेहून आज्ञा न्यावी. ज्या संस्थानिकांनीं फिसाद केली, त्यांचें पारिपत्य करण्यास येथून फौज सरदार रवाना केले असते. तुम्हीं फौज व शिबंदी हुकमाखेरीज कां वाढविली; आणि संस्थानिकांनीं महाराजांचे सुभ्यास मोडलें हा बदनक्ष कां करून घेतला ! जाली ती गोष्ट बरी जाली. दुसरा सुभा नेमून त्याजपासोन तोड करवितां येईल.' तेव्हां सुभ्याची घालमेल होते या वीरश्रीस चढून आग्रह करून, महाराजांनीं पेंच वारावा बोलूं लागले; आणि अविचारें सोमल खाउन विषप्रलय केला. महाराजांस प्रातःकाळीं समजलें. आपला हात लावून दूध पाठविलें, दूध पाजलें, त्यानें सोमल उतरला. नंतर महाराज जाऊन बहुत विवेक सांगितला, आणि गवगवा जाला, त्याचा बंदोबस्त करविला. कर्नाटक सुभा यशवंतराव पोतनिसाकडे सांगून रसदभरणा वगैरे करून नाइकाच्या पेंचाच्याही तोडी काढविल्या.' [ शा. म. च. पृ. ८२ ]. हा प्रकार बहुधा स.१७४५-४६ चा आहे. ता. १७-११-१७४६ रोजीं पेशवा रामचंद्रबाबास लिहितो. ' दर्शनास बाबूजी नाईक आले. भेटी जहाली. संभाजी महाराजांचे सोंधे, बिदनूर इ. तालुक्यांस उपद्रव न द्यावा, येविशीं नाइकांनीं संभाजी महाराजांचे गळ्यावर हात ठेविला. संभाजी महाराज पांच सहा महिने अडके होते. स्वामींनीं आम्हांस जामीन व्हावयास आज्ञा केली. आम्ही जहालों. नाइकांनीं येथील सावकार आठ

रोज पाहिलें. उपरांतिक स्वामींच्या दारीं बैसोन उपोषणें करितात. धाकटी-बाई रदबदल करितात. उपास केल्यामुळें राजश्री स्वामी सक्रोध जहाले. मारनिल्हेची अब्रू राहिली नाहीं. त्यांचे मध्यस्थास वारंवार शिरपाव होत गेला; व अद्यापि होतात. राजश्रींची मर्जी फारच कूट आहे. नाईक प्राक्तनवान साहसी आहेत, ईश्वरें काय परिणाम नेमिला असेल नकळे.' [पारसनीस–स.] अशींच आणखी या वेळचीं कांहीं पत्रें उपलब्ध आहेत.

नाईक परत आल्यावर पुढें कर्नाटकाची व्यवस्था काय करावयाची हा विचार चालला, तेव्हां त्यांत पेशव्यांस विशेष लक्ष घालावें लागलें, आणि सन १७४६ च्या अखेरीस भाऊसाहेबास कर्नाटकांत रवाना करण्यांत आलें. स. १७४६ च्या पावसाळ्यांत साताऱ्यास या प्रश्नाच्या भानगडी चालल्या त्यांचें वर्णन का. सं. प. या. ले. ८२ त आहे. नाईक कच खाऊन परत आल्यामुळें कर्नाटकांत कोणास पाठवावें, याचा विचार चालला. फत्तेसिंग भोसले, रघूजी भोसले व बाबूजी नाईक वगैरेंस कर्नाटकांत पेशव्यांनीं लक्ष घालूं नये, असें वाटत होतें; आणि हा विरुद्ध पक्ष वरचढ होऊं देणें पेशव्यांस इष्ट नव्हतें. नायकानें सकवारबाईजवळून कर्ज घेतलेलें होतें, तें उगविण्यासाठीं नायकासच कर्नाटकांत पाठवावें, असा तिचा आग्रह होता. रघूजी धाकटेबाईचे म्ह० सगुणाबाईचे पक्षींचा, अशा खटपटींत पेशव्यांस आपला कार्यभाग करावयाचा होता. या निरनिराळ्या पक्षांची मीमांसा पेशव्यांचे वकिलानें ले. ८२ त केली आहे. 'फत्तेसिंग-बावांचा कारभार आहे तो आपण जाणतांच. त्यांचें सर्व साहित्य आपण केलें पाहिजे. आपण साहित्य कां करावें, त्यांची त्यास दरकार आहे कीं नाहीं, असें आपण म्हणाल तर, त्यांस घरीं राहिल्यानें काय सुख नाहीं, तें बाहेर निघोन हैराण व्हावें! फत्तेसिंगबावांनीं आपला अवलंब केल्यास तीन वर्षें झालीं, परंतु फलादेश उत्कर्षेकरून जाला नाहीं, हें त्यांचें टेपर आपल्यावर आहे. सबब यांस बाहेर काढिल्यानें त्यांचें टेपर दूर होऊन त्यांत आपलाही कार्यभाग आहे. रघूजी संबंधानें पाहिलें तर, स्वामीचा

भाव आबाजी नायकास पुढें करून रघूजीस आंत घालावा, असा आहे. हा घडल्यास, फत्तेसिंगबाबासही आंत घालण्याचा उद्योग आपण अवश्य केला पाहिजे. कारण आबाजी नाईक रघूजीचेच स्वाधीन, सबब कर्नाटक त्याचे घरास जाऊं देणे उचित नाहीं. यास्तव जरूर पाय धरून ओढावें. थोरले बाईंचें व महाराजांचें असें दोघांचें कर्ज नाईकाकडे, तो ऐवज आपण (पेशव्यांनीं) द्यावा, म्हणजे आम्ही नाइकास घेऊन कर्नाटकांत जातों, असें फत्तेसिंगबाबा म्हणतील.' अशा भानगडी स. १७४६ च्या पावसाळ्यांत चाललेल्या होत्या नाईक एकदां कर्नाटकांत जाऊन परत आला होता. त्याजला शाहूचा व सकवारबाईचा तगादा कर्जाबद्दल होता. तेव्हां पेशव्यांनीं नाइकास मुद्दाम खराब केलें असें म्हणतां येत नाहीं. फक्त नाइकास हातांशीं धरून रघूजीनें वरचढ होऊं नये, इतकाच पेशव्याचा उद्योग होता. 'कर्नाटकचे मामलियाचा अद्याप एकही निर्णय झाला नाहीं. त्यास हा काळ यत्नास अंतर जालें नाहीं. पुढें यत्नांत राहून कार्य करून घेत असों.' असें कोन्हेरराम याच वेळेच्या सुमारास म्ह० आगस्ट स. १७४६ त रघूजी भोसल्यास लिहितो. [ खं. ३ ले. २११ ]. म्हणजे रघूजीनें वऱ्हाडांत राहून सातान्यास ही खटपट चालविली होती. 'ही कमाविशी सदाशिवराव भाऊच्या नावें करून देऊन तूं हिजवरचा आपला हक्क सोड, म्हणजे आम्ही सर्व यथास्थित बंदोबस्त करूं,' असें पेशव्यांनीं नाइकास पुष्कळ वेळां सांगून पाहिलें, पण तो तें म्हणणें ऐकेना! शेवटीं अधिक उपेक्षा करावी, तर उत्तर कर्नाटक अगदींच हातांतून जाईल, असें समजून पेशव्यानें ता. ५ डिसेंबर स. १७४६ रोजीं सदाशिवरावास कर्नाटकांत रवाना केलें. सदाशिवरावाचें वय या वेळीं सतरा वर्षांचें असून त्याची ही पहिलीच स्वारी, म्हणून सल्लामसलत देण्याकरितां महादाजीपंत पुरंदरे व त्याचे पदरचा हुशार कारकून सखारामबापू बोकील यास पेशव्यानें सदाशिवरावाच्या बरोबर दिलें.

पेशव्यानें पिलाजी जाधवास लिहिलेली १८ पत्रे बडोद्यांतील त्यांचे वंशजाकडून उपलब्ध झालीं असून तीं ऑक्टोबर १७४६ पासून एप्रिल १७४७च्या दरम्यानचीं आहेत. त्यांतील कित्येकांत कर्नाटकच्या प्रकरणाचे उल्लेख आहेत. ता. १ डिसेंबर १७४६ रोजीं नानासा. पिलाजी जाधवास लिहितो. 'रा. संभाजीमहाराजांचा तालुका सोंधें व बिकनूर व सावनूर बंकापुर वगैरे हीं संस्थानें स्वामीनें आमच्या स्वाधीन केलीं, तिकडे रा. बाबूजी नाईक यांणीं तालुक्यांत न जावें, ऐसा करार केला आहे. त्यास सदहू तालुक्यांचा पैका आला पाहिजे. विनाफौज ते लोक सुप्रयुक्तीनें पैका देतील न देतील, हा अर्थ तुम्हांस न कळेसा नाहीं. यास्तव तिकडे फौज गेली पाहिजे. दुसरें, सावताशीं फिरंग्यानीं कलह मांडला आहे. सावतांचीं दोन तीन ठाणीं फिरंग्यानें घेतलीं. सावंत पहिल्यापासून पदरचे. त्यांणीं चाकरी केली त्याचें साहित्य करावें जरूर आहे. यास्तव फौज रवाना करावयाची तजवीज केली आहे. चिरंजीव राजश्री सदोबा यास निरोप देऊन त्या प्राते रवाना करावा ऐसा विचार केला. दोचौ रोजात राजश्री स्वामींचा निरोप होईल. चिरंजीव कधीं स्वारीस गेले नाहींत. यास्तव तुम्हांस जावें लागेल. तुम्हांविना दुसरे कोणीं जावें! तुम्ही यांजबराबर असलिया आम्हीं निश्चित् असों. फौजेसह तुम्हीं व यांणीं नरसिंसरस्वती या जागा जावें. दोचहूं संस्थानचा निर्गम करून घेणें तो घ्यावा तिकडे सावतावर फिरंगियानें हाट केली; तरी तिकडे दोन हजार फौज, पाठविणें तिकडे पाठवून, त्यांचेंही साहित्य करावें. साराश, तुम्हांबरोबर पथकें आहेत, तीं वसईस पाठवावीं; तुम्ही आपले समस्थ पथकानिशीं सिद्ध असणें. चिरंजिवांस रा. स्वामींचा निरोप होतांच तुम्हांस लेहून पाठवूं ते समयीं तुम्हीं स्वार होऊन अतिसत्वर येणें. जाणिजे. छ २८ जिल्काद सु॰ सबां आर्बैनमया व आलफ.' यावरून नाइकाचा तंटा थोडा बहुत मिटवून नानासाहेबानें सदाशिवरावास कर्नाटकांत पाठविण्याची शाहूची परवानगी मिळविली होती. शाहूस पेंच फार होते; आणि निरनिराळ्या

पत्रांमध्यें त्याच्या मनाचा निश्चय होत नव्हता. याच वेळेस सांवतास मदत करण्यासाठीं फिरंग्यांवर स्वारी करण्याचा बेत ठरला, त्याचा उल्लेख वरील पत्रांत असून, शा. म. रो. अं. ७४–७५ यांतही आहे. संभाजी-शाहूचा तह घडवून आणणाऱ्या बाबाजी प्रभूचा मुलगा रामचंद्र प्रभु यास त्या बाजूचा सुभा सांगून पाठविण्यांत आलें होतें. त्याचा पुढें निर्गम काय झाला तें कळण्यास साधन नाहीं.

वरील पत्र लिहिल्यानंतर ता. ५ डिसेंबर रोजीं सदाशिवराव कर्नाटकचे स्वारीस निघून गेला. त्यानंतर ता. ९ डिसेंबर रोजीं पिलाजी आधवास नानासाहेबानें पत्र लिहिलें त्यांत 'दरबारचा विचार तर नाईक अद्यापि उपास करीत आहेत. परंतु कांहीं निकाल जाहला नाहीं. पुढें काय होईल पाहवें,' असा मजकूर आहे. त्याच तारखेच्या पुरवणी-पत्रांत 'रेडी'च्या हल्ल्याचें वर्णन करून नानासाहेब लिहितो, फिरंगियांस ओढा बसवावयासाठीं चिरंजीव भाऊस बाहेर काढिलें; आपणास पूर्वी लिहिलें होतें कीं, आपणास भाऊसमागमें जावें लागेल. परंतु आपण येसमयीं वसईस असलें पाहिजे. तुम्हांसारखे सलाबतीचे सरदार असलियानें गनिम येऊं पावणार नाहीं. तुम्हीं वसईस जाऊन शंकराजीपंतास सांगून बंदोवस्त लढाईचा करावा. आरमाराची मिळकत थोडी व खर्च फार आहे, यास्तव आरमार जवळच ठेवावें, म्हणजे आरनाळयांत लोक उत्तम राहतील. सारांश, तुम्ही सर्व घावदाव मनांत आणून बंदोबस्त करविणें.' यावरून कोंकणांतही लढाई या वेळीं चालू होती जव्हार-करांसंबंधानेंही जाधवांकडील पत्रांत मजकूर आहे. अर्थात् कोंकणची स्वस्थता चिमाजीच्या वेळेपासून आतांपर्यंत झाली नव्हती; आणि पोर्तुगीझ लोक त्रास देतच होते, हें उघड आहे.

यानंतर ता. २४ मार्च १७४७ रोजीं नानासाहेबानें पिलाजीस पत्र लिहिलें, आणि त्यास तावडतोब आपल्या भेटीस बोलाविलें. 'दरबारच्या कारभाराचे कित्येक पेंचपाच आहेत व नबाबाकडील वर्तमान आलें आहे

त्याचा विचार केला पाहिजे. खामखा तुम्ही यावयाचें करणें, येथें येऊन भेटून जाणें. सांप्रत नाइकाची भेट जाली. पुढें नबाब सावनूर बिदनूरचे रोखें जाणार, सहजांत भाऊवर शह पडणार, नाईकही समागमें आहेत, यापैचाचा प्रतीकार जरूर केला पाहिजे. विना तुम्ही आलिया वांचून होत नाहीं. भाऊ नवे स्वारीस गेले, त्यामध्यें लौकिक एक प्रकारें आइ-लिया उत्तम नाहीं. दरबारी किरकोळ नफ्याचे इच्छेनें थोरले बाडियांतून क्रोधबुद्धि केली आहे. कित्येक अर्थ पत्रीं लिहितां येत नाहींत. तुमची वाट पहात बसलों आहे. विशेष काय लिहिणें, ' या वेळचे पेंच व भानगडी व नानासाहेबाच्या विवंचना व पिलाजीची भेट या गोष्टी खुलासेवार समजण्यास साधन नाहीं याबद्दल खेद वाटतो.

नायकाचे भानगडींचा निकाल बरेच वर्षे झाला नाहीं. नानासाहेब साताऱ्यास राहून त्यास विरोध करीत होता. त्यानें ता. २१ फेब्रुवारी १७४७ रोजीं खालील पत्र रामचंद्रबाबास लिहिलें आहे. ' बाबूजी नाईक यांनीं कर्नाटक प्रांतीं न जावें. गेले तरी धुडावून काढावे, याजकरितां चिरंजिवांची रवानगी कर्नाटक प्रांतीं केली. प्रस्तुत नाईक यांणीं राजश्री स्वामींस दोन लाख रुपये रोख द्यावे ऐसें केलें होतें, ते रोख निशा केली. बाकी राहिले ऐवजाचे हस्ते करून याद रा. येसाजी भोसले यांजपाशीं दिल्ही; व बेदनूरचा साडेतीन लक्षांचा कतवा होता, तो मानिल्हेजवळ देऊन निरोप घेऊन गेले. पुढें नबाबास भेटून नबाब म्हणतील तें द्यावें, आणि तेवढ्यावरी ठाकूरकी वाढवून कर्नाटक प्रांतीं जावें ऐसें आहे. नबाबाचा विचार पाहतां दोहीं दगडीवर हात आहेत. नाइकाची प्रतीक्षा करीत आहेत; व आमची फौज सोंधेबिदनूर प्रांतें गेली आहे, त्यांसही पैका न मिळावा याही उद्योगांत आहेत. श्री-इच्छेनें इतक्याही गोष्टीचें निराकरण होऊन उत्तमच होईल. कांहीं फिकीर आहे ऐसें नाहीं. मनसब्याचे मजकूर किरकोळ फार आहेत, पत्रीं काय ल्याहावे, श्रीकृपेनें दर्शनोत्तर कळवीन.' याचे दुसरेच दिवशीं पुनः

खालील पत्र नानासाहेबानें रामचंद्रबाबास लिहिलें. 'चिरंजीव भाऊ निरोप घेऊन गेल्यावर कित्तूर ठाणें नारायणराव घोरपड्याचें गेलें होतें, तें घेऊन दिलें. पुढें मजल दर मजल सोंधियाचे लगत्यांत गेले आहेत. सावनूरकरांचा तह रद्द होणें तो होत आहे. सोंधेकरी यांची रदबदल लागली आहे. बिदनुरास वकील गेले आहेत. फिरंगियांवरी दबाव असे. जयराम सावंत येऊन भेटले आहेत. तेही आपले साहित्याच्या गोष्टी बोलतात कीं रेडी वगैरे फिरंगियानें घेतले आहेत त्यांस तंबी पोहोंचावून द्यावी, आपली स्थापना करावी. फिरंगी आपली बोली बोलतात कीं सावंत आम्ही समजोन घेऊं, तुम्ही त्याचा पक्ष न धरावा. या प्रकारचें वर्तमान आहे. पहातां अर्थी फिरंगी बेइमान त्यांचें पारिपत्य करावें, तरी ये समयीं बनत नाहीं. दोनही अलग अलग राखिले आहेत. कांहीं सावनूरचा दार मदार करणें तो करून घेऊन, सोंधेकरांची ही मामलियत चुकवून बिदनूरकरांकडे जावें, तेथील मामलियत विल्हेस लावून खबरदार होऊन राखावें. सारे पठाण एकवट करावे. नाईक आले तरी त्यांस धुडावून द्यावें. ऐसा विचार असे.' या पत्रांवरून नानासा॰ची व्यग्रता व निरनिराळया ठिकाणीं चाललेल्या मोहिमा यांची कल्पना होते.

यानंतर आणखी एक पत्र ता. ६ मे १७४७ चें नानासा. नें रामचंद्रबाबास लिहिलें त्यांत सदाशिवरावानें काय काय कामें केलीं हें सांगितल्यावर तो म्हणतो, 'नाईक नासरजंगाचे आश्रयानें ते प्रांतीं छावणी करून बिदनूर प्रांतीं उत्पात करणार व करतील. सांप्रत बरसाद जवळ आला, पुढें काय होतें पहावें.' [ का. सं. प. या. ६८ ].

सदाशिवरावाची कर्नाटकात रवानगी झाल्यावर कृष्णापार होऊन प्रथमच जानेवारी महिन्यांत त्यानें आजरे येथें लढाई मारिली. त्यानंतर तुंगभद्रेपर्यंत स्वारी करून सावनूरकर नबाब व देसाई व पुंडपाळेगार यांस पादाक्रान्त केलें; आणि त्या नबाबापासून पाछापुर, कित्तूर, परसगड, गोकाक, धारवाड, बागलकोट, बदामी, नवलगुंद, हुबळ, अनीगिरि,

तोरगळ, हुल्याळ, हरिहर, बसवापट्टण वगैरे एकंदर छत्तीस परगणे काबीज केले. म्हणजे या प्रांतांवरचा वारसा नबाबानें लेखीं सोडून दिला इतकेंच; सर्व प्रांत मराठ्यांचे ताब्यांत कायमपणें येण्यास त्यास आणखी कैक स्वाऱ्या कराव्या लागल्या. येणें प्रमाणें शिवाजीच्या वेळच्या स्वराज्याचा बराच भाग पुनरपि मराठ्यांचे स्वराज्यांत आला.' (ऐ. ले. सं.) मार्च महिन्यांत मायनहळ्ळी ऊर्फ महादेवपुर येथें लढाई झाली. नंतर ३० मार्च रोजीं (भा. व. श.) मुरारराव घोरपडयाची व सदाशिवरावाची भेट झाली, परंतु घोरपडे स्वारींत सामील झाल्याचें दिसत नाहीं. बहादुरभिंडा घेऊन सदाशिवराव मार्चांत परत फिरला. या वेळीं नानासाहेब साताऱ्यास होता आणि शाहूची त्याजवर इतराजी होऊन कांहीं दिवस त्याचें प्रधानपद सुद्धां काढून घेण्यांत आलें होतें. शेवटीं ता. १३ एप्रिल स. १७४७ रोजीं निरोपाचीं वस्त्रें घेऊन बाळाजी साताऱ्याहून निघाला तो तेथून पंढरपुरास जाऊन ता. ९ मे ला जेजुरीस आला, तेथें सदाशिवराव कर्नाटकांतून आलेला त्यास भेटला; आणि नंतर उभयतां पुण्यास आले. पेशवा लिहितो, 'कर्नाटकचा मनसुबा गुदस्तां केला. परंतु तिकडे जाऊन गवत मात्र भक्षावें, प्राप्ति थोडी, खर्च फार,' (रा. ब. पारसनीस संग्रह). कांहीं काळानें मागून नाईकही परत आला असावा. त्याच्या हातून विशेष कांहीं निष्पन्न झाल्याचें दिसून येत नाहीं.

कर्नाटकसंबंधी नाईकपेशव्यांचा तंटा एवढ्यानेंच मिटला नाहीं. शाहूच्या मृत्यूनंतरही तो कैक वर्षे चालू होता. शेवटीं नानासाहेबानें स्वतःच्या मुखत्यारीनें कर्नाटकांत वारंवार मोठमोठ्या फौजा पाठवून तिकडील बंदोबस्त केला. कर्नाटकच्या या स्वाऱ्यांचें प्रचंड स्वरूप लक्षांत आणतां नाइकाचा तिकडे निभाव मुळींच लागला नसता, अशी सहज खात्री झाल्याशिवाय राहत नाहीं.

वर दिलेल्या एकंदर पत्रांवरून नाईक व नानासाहेब यांच्या मधील तंट्याची बरीच अटकळ करितां येते. राज्यांतील चार प्रमुख सरदार निर

निरनिराळ्या दिवाणांनी ओढाताण करूं लागल्यावर, तत्काळ निश्चयानें हुकूम करणारा जो अंमलदार आपल्याचें मनोबळ शाहूच्या ठिकाणीं मूळचेंच फारसें नव्हतें. म्हणूनच बाजीराव व दाभाडे, रघूजी व नानासाहेब, यांच्या प्रकारचे विकोपास जाऊन एकाच धन्याच्या फौजांस आपसांत लढण्याचे प्रसंग आले. नाईक व नानासाहेब यांचें प्रकरण तरी याच स्वरूपाचें होतें. निक्षून हुकूम करून या तंट्याचा निकाल शाहूस करतां आला असता. तसें न केल्या-मुळें कैक वर्षें अव्यवस्था माजून राहिली. तशांत जी काय तडजोडीची शक्ति शाहूंत होती, ती आतां वयोमानानें लोपून गेली होती. 'आमची सत्ता गेली,' हे त्याचे स्वतःचे उद्गार सर्वथैव खरे होते. शिवाय नाना-साहेबानें धन्याचें अवसान ओळखून, परिस्थितिरूप अश्वावर आरोहण करून, त्याजला आपल्या कबजांत ठेवण्याचा निश्चय केला होता. अशाच स्थितींत बहुधा शाहूची परवानगी नसतांही नानासा॰नें सदाशिवरावास कर्नाटकांत रवाना केलें; आणि तिकडे अल्पावधींत आपला शह बसविला. पैशा-चीही बरीच प्राप्ति त्यास या उद्योगांत झाली असली पाहिजे. सदाशिव-रावास पहिला बहुमोल अनुभव मिळून त्याचें कर्तृत्व झळकूं लागलें, आणि पुढील कारभारांत नानासा.स त्याचें उत्कृष्ट पाठबळ मिळालें. नाइकास म्हणून पाडण्याचा प्रश्न व्यक्तीचा नसून राज्याचा होता. नाईक निजा-मास वगैरे मिळून राज्याचे शत्रूस घरांत आणीत होता. दरबारांत बज-बज पुरी माजली होती, तेव्हां न्यायान्यायाची परवा बाजूस ठेवून, अंगा-वरील राज्याचें जोखीम पार पाडण्याकरितां नायकाचा पाडाव करणें नाना-सा॰स अपरिहार्य झालें. बाकीचे सर्व सरदार केवळ आपापल्या मतलबा-पुरते झटत; एकंदर राज्याचें कल्याण कसें साधेल, याचा विचार त्यांस नव्हे. नानासाहेबास मतलब नव्हता असें नाहीं, परंतु स्वतःच्या कल्पने-प्रमाणें मुख्य प्रधानकीचें कर्तव्य तो निक्षून बजावीत होता. निदान पेशव्यावरचा सर्व दोष उडण्याइतका सबळ पुरावा या प्रकरणांत उपलब्ध नाहीं. एकूणच तो आपला शह एकंदर मराठमंडळावर बसवीत

चालला होता. प्रत्यक्ष शाहूस मुळीं न जुमानतां स्वतःच्या जबाबदारी-वर राज्यकारभार चालविण्याचा उपक्रम त्यानें आरंभिला, आणि इतउत्तर या उपक्रमाचीं अनेक उदाहरणें पुढील कालभागांत दिसून येतील. अड-चणीच्या प्रसंगीं राज्याची जोखीम सांभाळणारास आडमार्ग स्वीकारावा लागतो, असें इतिहासांत नेहमीं दिसून येतें.

कर्नाटक-प्रकरणाचा उत्तरभाग पुढें यथावकाश देण्यांत येईल. नाईक व पेशवे यांजमधील वर सांगितलेल्या तंट्यास पक्षांधतेमुळें महाराष्ट्रांत केक वर्षे अवास्तव महत्त्व प्राप्त झालें आहे. या व्यक्तिविषयक वादाचें महा-राष्ट्राच्या इतिहासांत मुळींच महत्त्व नाहीं म्हटलें तरी चालेल. रा. पांगार-करांनीं मोरोपंतचरित्रांत प्रथम हा वाद उगाच उपस्थित केला; आणि त्या चरित्रांत अत्यंत अप्रस्तुत व अत्यंत खोडसाळ असा एक अभिप्राय नानासाहेब पेशव्याविषयीं ठोकून दिला, त्यामुळें पाध्ये व पेशवे, आणि जोशी व पेशवे, या दोन वादांनीं ऐतिहासिक सत्य लोपून जाऊन पक्षभेदास मात्र निष्कारण प्रखरता आली होती. कोर्टाचा निकाल म्हणून रा. श्री. वि. आठल्ये यांनीं केसरींत या नाईकपेशव्याचे वादाचा खुलासेवार वृत्तान्त दिला आहे. [ केसरी, १७ मे पासून ९ ऑगस्ट स. १९१० पावेतोंचे अंक ]. या वादांत पुराव्याचे म्हणून जे कागद दिलेले आहेत, त्यांपैकीं शाहूच्या मृत्यूनंतरच्या कागदांस विशेष महत्त्व नाहीं. शाहूच्या मृत्यूनंतर तारा-बाई, दाभाडे, प्रतिनिधि इत्यादिकांच्या पक्षांत नाईक सामील झाला, परंतु तो पक्षही पेशव्यानें हळू हळू मोडून काढिला. स्वतःचा मतलब साधण्या-साठीं पेशाव्या जोरावर पाहिजे त्या पक्षास मिळण्याची नाइकास खोड होती, एवढ्यासाठीं त्यास मोडून काढणें नानासाहेबास भाग पडलें. हा प्रश्न व्यक्तीचा नसून राज्यकारभाराचा होता, हें या वादांत सदैव ध्यानांत ठेविलें पाहिजे. नानासाहेबासंबंधानें प्रतिकूल ग्रह बनवून रा. पांगारकरांनीं बारामतीकरांचें प्रकरण लिहून, एका लहानशा उदाहरणावरून त्या पेश-व्याच्या एकंदर राज्यकारभारावर जरूर नसतां अभिप्राय दिला, तो यथार्थ नाहीं.

---

# प्रकरण अठरावें.

## शाहूछत्रपतीची अखेर.



१ शाहूची वृद्धावस्था, दोन राण्यांचीं भांडणें ( १७४५–४८ ).
२ नानासाहेब पेशवाईवरून भ्रष्ट ( जानेवारी–एप्रिल १७४७ ).
३ अखेरच्या खटपटी व पुढील व्यवस्था.
४ पुढील व्यवस्थेच्या शक्याशक्यतेचा विचार.
५ रामराजाचें पूर्ववृत्त.

१ शाहूची वृद्धावस्था, दोन राण्यांचीं भांडणें, (१७४५–४७).–सन १७४३ पासून शाहूची प्रकृति बरीच ढांसळली. म्हणजे त्या वेळीं त्याचें वय ६१ वर्षांचें होतें. त्या सालच्या उन्हाळ्यांत तारीख १३ मे पासून २० जून पावेतों त्याचा वाखा जोरात असून त्याच कारणामुळें नानासाहेबास प्रयागच्या स्वारींतून ताबडतोब साताऱ्यास यावें लागलें. परंतु ही प्रकृति लवकरच निखालस बरी झाली. 'प्रथम दरबारास आले तेव्हां लोकांनीं सत्के व नजरा केल्या. ( ता. २५–५–१७४४, शा. मे. रो. ले. ९१ ). सर्व लोकांस समाधान झालें. तरी पण हें दुखणें म्हणजे शाहूच्या अंतसमयाचें पूर्वचिन्ह होतें यानंतर जरी आणखी सहा वर्षें शाहूची आयुष्यमर्यादा होती, तरी त्यास पुत्रसंतान नसल्यामुळें, त्याच्या मनास व तमाम मराठमंडळास मराठशाहीच्या भावी स्थितीसंबंधानें एव्हांपासूनच हळू हळू मोठी चिंता उत्पन्न झाली; आणि पुढील व्यवस्था ठरविण्याकडे सर्वांचें चित्त वेधलें गेलें. अर्थात् तितक्या मानानें पेशव्याचे व प्रमुख सरदारांचे महाराष्ट्राबाहेरील उद्योग ढिले पडूं लागले. एकंदरींत स. १७४३–४४ पासून शाहूच्या मृत्यूनंतर एक दोन वर्षें पावेतों मराठे सरदारांचें व्यवधान राजधानींतील अंतर्व्यवहारांकडे असून, दूरच्या घडामोडींतून बऱ्याच अंशीं निवृत्त झाले, प्रत्यक्ष नानासाहेबाचें मन

शाहूच्या अस्वास्थ्यामुळें व राजधानींतील खटपटींमुळें द्विधा होऊन, प्रयागच्या स्वारींत जी त्याच्या हिंमतीनें जोराची भरारी मारिली, ती पुढें नऊ दहा वर्षें पावेतों, पुष्कळ नरम झाली. स. १७५२-५३ पासून पुढें मात्र पुनः त्याच्या परराष्ट्रीय उद्योगास जोराचें भरतें आलें. या दृष्टीनें स. १७४१ पासून ५२ पर्यंतचीं वर्षें बाह्य व्यवहारांत मराठशाहीच्या पिछेहाटीचीं गणलीं पाहिजेत.

बाजीराव व नानासाहेब यांच्या परिस्थितींत पुष्कळ अंतर होतें. बाजीरावाच्या वेळेस शाहूची प्रकृति चांगली असून राज्याचीं कामें त्याच्याच हुकमानें सर्व होत असत, परंतु वर सांगितल्याप्रमाणें स. १७४९ पासून राज्याच्या बाहेरच्या काळजीबरोबर शाहूच्या प्रकृतीची व पुढील घडामोडींची जबरदस्त चिंता नानासाहेबाचे पाठीमागें लागली. शाहूची ढांसळलेली प्रकृति, त्याच्या राण्यांचीं भांडणें, ताराबाईचीं कारस्थानें व सरदारांचे कावे, इत्यादि कारणांनीं नानासाहेबाचे मनास अशी कांहीं जबरदस्त व्यग्रता उत्पन्न झाली, कीं दुसरा एखादा लेच्यापेचा गृहस्थ या अडचणींतून निभावूं शकला नसता. परंतु नानासाहेबास जसे जबरदस्त प्रतिस्पर्धी होते, तसेच पुरंदरे, शिंदे, होळकर, चिटणीस वगैरे कित्येक त्याच्या जिवास जीव देणारे स्नेहीही होते, त्यांच्या साह्यानें व अंगच्या धूर्ततेनें नानासाहेबानें सर्व अडचणींचें निरसन करून, एकंदर कारभार यशस्वी करून कसा दाखविला, हें समजून येण्यासाठीं प्रथम शाहूमहाराजांच्या दरबारांतील मानगडींचें स्पष्टीकरण केलें पाहिजे.

स. १७४९ हें वर्ष नानासा० नें बहुतेक सातान्यासच काढिलें. त्या वेळची हवाल त्यानें रामचंद्रबाबास कळविली ती येणेंप्रमाणें:—

'दरबारचा मजकूर विस्तारानें सरदारांस लिहिला आहे त्यावरून कळेल. आमचा गुंता आजपर्यंत दरबारांत व्हावयास कारण, रा. स्वामींचें सरकार कर्जदार झालें; महालचे (राण्यांचे) खर्च अनिवार, नित्य कथलें; यास्तव राजश्रींनीं आपले कारभाऱ्यांस ताकीद करून बंदोबस्त करतात.

करण्याच कारभारांत राजश्री स्वामी दंग आहेत. त्यांहीं होऊन आम्हांस निरोप द्यावा, तर ते आपले कारभारांत निमग्न. आम्ही विनंति करावी तर, त्यांनी अर्जी विलक्ष पाहून आज पावेतों चर्चा न केली. सहज राहत गोष्ट राहिली. आम्ही निरोपाच्या विचारांत आहों. रा. स्वामींची मर्जी पाहून, निरोप घेऊं, परंतु इतक्यां येणें आमचें तिकडे होतें असा विचार नाहीं. निरोपासच किती दिवस लागतील तें न कळले. निरोप घेऊन पुण्यास आलियावर, कोंकणचा वगैरे कारभार करणें लागेल. तुम्हांस कळावयाकरितां लिहिलें आहे' [ता. २१ ऑक्टोबर स.१७४३,—का. सं प. या. ले.७१]. यावरून नानासाहेबाची माळवा बुंदेलखंडांत जाण्याची इच्छा असून, शाहूच्या प्रकृतीमुळें तो साताऱ्यास अडकून पडला. नानासा० आपल्या जवळून दूर गेला, तर मागें आपलें येथें कसें होईल, याची चिंता शाहूस मोठी होती. कर्जाचा जाच होता. अशा स्थितींत एकट्या नानासा०चा कायतो शाहूला आधार होता. निदान नानाच एकटा हरएक प्रसंग निभावून नेणारा आहे, दुसरा तसा इसम आपले जवळ नाहीं, अशी शाहूची त्या वेळीं पूर्ण भावना झाली होती. वरील पत्रानंतर दोन महिन्यांनीं खालील पत्र नानासा०नें रामचंद्रबाबास लिहिलें.

" दरबारचें वर्तमान व राजश्री श्रीपतराव निवर्तलियाचा अर्थ पहिला तुम्हांस लिहिलाच आहे. श्रीपतरायाचे बंधु रा. जगजीवनराव परशराम यांजकरी रा. स्वामींनीं कृपा करून पोष वद्य १ देस ( ता. १७ डिसेंबर १७४३ ) प्रतिनिधिपद दिल्हें. वस्त्रें व हत्ती बहुमान दिल्हा. बरकहरी त्यांचे लग्नाकमीं मुतालिक व राजश्री कृष्णाजी परशराम याचे पुत्र दोघे यांसही वस्त्रें दिलीं. रा. उदाजी चव्हाण येथेंच आहेत. अद्याप कांहीं बोलीचाली जाहली. शरीर, उभयतां महाराजें ( राण्यांचें ) अति आलस्य झालें आहे. त्याचा विस्तार कोठवरी लिहावा! आम्ही युक्ति करून देतों तें देतों. कांहीं ऐकावें लागतें. कांहीं करून देतों म्हणतों. या रीतीचा येथील विचार आहे. रा. रघुजी भोसले वऱ्हाडांतून मसूर प्रांतें आले.

त्यांच्या विषयीं आमच्या मुलखांत चांगल्याने असावे ऐसा विचार आहे. जागोजागांहून महालकरी यांची पत्रें येतात. मल्हारजिव्हे तों स्नेहयुक्त भावभक्तीचीं पत्रें पाठवितात. तथापि त्यांचा प्रकार कपटी आहे, तो मुम्हीं आपणास आहां. आम्हीही कागदोपत्रीं स्नेहयुक्त लिहीत असतों. येथें येणार ऐसेंही वर्तमान आहे. पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल [१७ डिसेंबर स १७४६ नंतरचें, का. सं. प. या. लें. ६७].

स. १७४६ ता. २५ नोव्हेंबर रोजीं श्रीपतराव प्रतिनिधि साताऱ्यास मरण पावला. त्यावर शाहूचा अत्यंत लोभ होता आणि आपला जुना, व फार दिवसांचा बरोबऱ्याचा सोबती निघून गेल्यामुळें शाहूस फारच दुःख होऊन आपलीही आतां इहलोकची यात्रा संपली असें वाटूं लागलें. प्रतिनिधीची स्त्री राधाबाई परमपतिव्रता होती. तिनें सहगमन केलें. महाराजांनीं आपल्या वाड्यांत बाईस आणून वस्त्राभरणें देऊन मोठ्या समारंभानें दानधर्मसहित सरकारांतून देऊन व्यवस्था लाविली. ( भा. व. पु. २, शा. म. ब. ) 'प्रतिनिधीस राय असें स्वमुखें म्हणत होते. नित्य सरकारदर्शनास येत. एक दिवशीं आले नाहींत. म्हणोन महाराजांची स्वारी त्यांचे वाड्यांत गेली. तीन लक्ष खर्च करून महाराजांचे राज्यांत एक अन्नछत्र घालावें, त्याची याद करीत प्रतिनिधि बसले होते. महाराज येतांच त्यांचे हातास प्रतिनिधीनें याद दिली. महाराजांनीं पाहून ती याद फाडून टाकिली आणि कांहीं एक उत्तर न देतां परत वाड्यांत गेले. प्रतिनिधीला अचंबा वाटला आणि पुनः दर्शनास गेले, तेव्हां क्षमा मागितली. त्यावर महाराज बोलले, तीन लक्षांची थोडकी याद केली म्हणून फाडून टाकिली आणि अठरा लक्षांची नवीन याद करून मातुश्री येथें अन्नछत्र घालण्यासाठीं नऊलाख व स्वतः प्रतिनिधीस नऊलाख अशी वसूल करून दिली.' ( म. द., रुमाल १ ला. ). श्रीपतरावास मूल नसल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ जगजीवनराव ऊर्फ दादोबा यास शाहूनें प्रतिनिधिपद दिलें ( १७ डिसेंबर १७४६ ), आणि यमाजी शिवदेव

वाच त्याचा मुतालिक नेमिलें. या यमाजी शिवदेवानें पुढें पेशव्यांशीं मोठा विरोध केला.

गंगाधर स्वामी चाफळकर सनें १७३४ ता. २६ नोव्हेंबर रोजीं सातारा मुक्कामीं समाप्त झाले, त्यांचे पुत्र लक्ष्मणबावा ते मठाधिपति झाले, त्यासमयीं तंटे झाले ते मिटविण्यासाठीं स्वतः महाराज रामनवमीचे उत्सवास चाफळास गेले; तेथील बखेडा मोडून एक मुक्काम करून, ललिताचा प्रसाद घेऊन स्वारी परत आली. नारो राममंत्रीही स. १७४६ च्याच सुमारें वारले. जिवाजी खंडेराव चिटणीस ता. ६ जानेवारी स. १७४१ त वारला ( शा. म. ब. पृ. ८३, व पुरंदरे रो. खं. ६, पौष शा ७ ). अशा रीतीनें संबंध जुनी पिढी हळूहळू नाहींशी होऊन शाहूस मोठी उदासीनता प्राप्त झाली. दोघां बायकांचे भांडणाचा विकोप कळसास पोंचला.

मदारी म्हणून महाराजांचा एक आवडता हत्ती होता. सर्वकाळ मस्तीत असूनही कोणास इजा करीत नसे. ऐसें दौलतींत केवळ रत्नच होतें. तो रात्रीस सुटून बाहेर जाऊन शनवारांत विहीर होती, तींत पडून मेला. याजमुळें बहुत खिन्न झाले. या उपरी आमचा पुढें काल विपर्यास येईल. वार्धक्य आलें, संतान नाहीं, संभाजीराजे आहेत तेही वृद्ध झाले त्यांसही संतान नाहीं, म्हणून बहुत यागी झाले. विरूबाईस शरीरीं पीडा झाली. ती वारली (शके १६६१ स. १७३९. विरूबाईच्या मृत्यूचा निश्चित काल मिळत नाहीं. ) उभयतां राण्या त्यांचे आज्ञेंत चालाव्या असें होतें. विरूबाई वारल्यावर थोरली धनीण सकवारबाई उग्र प्रकृतीची होती, ती महाराजांपासून सरंजाम व नेमणूक करून घेऊन वागूं लागली. धाकटी धनीण सगुणाबाई यांजकडेही सरंजाम नेमणूक केली ती महाराजांचे आज्ञेंत व मर्जीनें वागूं लागली. परंतु थोरली धनीण बहुत नाजूक यामुळें आग्रह करणें पडूं लागलें. एकीकडे दिलें तें दुसरीकडे पाहिजे, ऐसे आग्रह

१. सत्कार्यो. खं. १ पृ. ३९९.

पडले. गांवांतील शहरांतील मनसुबी व फिर्यादी याच्या हिमायती पडूं लागल्या. गांवखंडणी, अमल पाहिजे तेथें पाठवावा, वतनें विकत घ्यावीं, ऐसें होऊं लागलें. यावरून महाराज बहुत उदास झाले. प्रधानपंतांस आणवून दोहींकडे गांवनेमणूक करून, खर्च पाहून कसून देऊन, शहरांत फिर्याद किंवा वतन घेणें, अंमल पाठविणें, कांहीं एक कारभार, दोही वाड्यांकडून होऊं नये, कोणाची भीड मनसुबी करूं नये, ऐशी याद प्रधान यांजपासोन लिहून आपले खास दस्तुर करून, निक्षून दोहींकडे ताकीद केली. तें मान्य दोहींकडे करविलें. एक दिवस एक महालांत भोजन, एक दिवस एकीकडे ऐसें केलें. ( शा. म. च. पृ. ८८ ). हे तंटे तोडण्याच्या हेतूनें शाहूनें दोनही वाड्यांनीं वर्तणूक करण्याची याद तयार केली ती येणेंप्रमाणें:—

१ उभयतांनीं इनसाफ करूं नये; २ नक्त गांव, परगणा, जमीन जें स्वामीनीं देणें तें उभयतांस बरोबर द्यावें; ३ जो सरंजाम, सरकारचे सनदे-खेरीज, उभयतांनीं धरिला असेल, स्वराज्यांतील व परराज्यांतील, तो सोडावा; ४ गांव, खेडें, परगणे, जिल्हेदारांकडील, मोकासदाराकडील, खासगीक-डील, स्वराज्यांत, परराज्यांत, रोखे करूं नये; ५ सरंजाम गांवखेडे परगणा जमीन धरूं नये; ६ कोणाचें वतन देशमुखी पाटिलकी घेऊं नये; ७ ज्यास देणें वाड्यांत, नजर, गांव, खेडें, तें उभयतांस बरोबर द्यावें; ८ पेठ शाहू-नगर येथील कज्ज्या मनास आणूं नये; ९ कोणाचें कर्ज कोणाकडे असेल, तो फिर्याद आला तरी, त्यांत चित्त घालूं नये; १० आगाआगांची जफा-तीची परगण्यांची कमावीस करूं नये.' सदरहूप्रमाणें उभयतांनीं मान्य केलीयास स्वामी निरंतर संतोषी आहेत. येणेंप्रमाणें चालावें. करार. ( मा. व. पु. १, ऐ. प. या. ले. ४१ ).

'सौ. श्रीमंत सगुणाबाईसाहेब यांस सरंजाम दिल्हा त्याची याद–सुरू सन खमस आर्बैन मया व आलफ् ( स. १७४५–४६ ). पुणें व जुन्नर प्रांत खेरीज करून, खानदेश गंगथडी वगैरे प्रांतांत, रुपये दहा हजार,

फलस्त करमाळ रु. पंधरा हजारांचे द्यावे. मोकासबाबती, सरदेशमुखी मिळोन तनख्याचे गांव नेमून द्यावे. ( भा. व. १, पे. प. या. ले. ४४ ). लेखांक ४१ स. १७४६ चा असावा.

दोघी बायकांच्या कलहांत शाहूची भेथा कशी उडत असे त्याचें वर्णन एका पत्रांत मोठें गमतीदार दिलेलें आहे तें असें. हें पत्र साताऱ्याहून महादोबा पुरंदऱ्यानें पेशव्यास लिहिलेलें, बहुधा स. १७४६ च्या अखेरीचें असावें. ' सांप्रत राजश्री स्वामींची प्रकृत तरी तिजरे प्रहरापासून अंग मोडून येत असतें. पोटावर सिन्याच्या कुस्या घातल्या असेत. ऐसेंही असतां, दोनही वाड्यांतील नित्य एक दुसरा कजिया ठेवलेलाच आहे. कजिया असा वालिप्पास असे बावरे होतात कीं गर्भगळित. देव मरण लौकर देईल तरी उत्तम म्हणतात. शरीरास उपाय करावयाची उपेक्षा करतात. हे गोष्ट फटकळ. दोहीं वाड्यातून तुमचें ( पेशव्याचें ? ) इंगित समजावें, आणि तदनुसार वर्तणूक करावी, हें तरी त्यांचे ध्यानांत येत नाहीं;आणि साहेब तरी कोणाचें ऐकत नाहींत. म्हणोन यशवंतराव ( महादेव पोतनीस ) एक दोन वेळ बोलले व गोविंदरावही बोलले. परंतु कांहीं मुद्दां जवाब दिल्हा नाहीं. याउपरी वांचून काय करणें आहे म्हणतात. बुधवारीं प्रातःकाळीं नागोजीराव केशवराव दरबारीं होते. रामोरामाचे लोकांनीं शेणवी कर्जदार होता, त्यास घेव्याकरितां मारला. त्याचा कजिया दरबारास आला. तो केवळ हास्यावर राजश्रींनीं म्हटलें, ' हाच कजिया देवळीवर जाता आणि आपाजी रघुनाथ यांस नेऊन मारते तर कसें होतें ? माझे कळावर कोण्ही आलं नवें. आमची सत्ता उडाली. स्वामित्व दोहीं वाड्यांत आहे. तीं जीं करतील तें आमचे वस्तु नको म्हणवत नाहीं. कातार व पलकाचा कजिया उपस्थित केला आहे. वाघी हरताळ पाडितात तें आम्यानें ऐकवत नाहीं. वाघी वगैरे आता उठोन गेले, तेव्हां कबूल करील. सनदा (विकणार्थ शिपाअमान) मिळेनाशा झाल्या तरी, मजपुरतें तरी आम्हां बायकांकडून अवकळा

लेऊं घालतील तें पुरवलें. परंतु बायकांचीं कजिया माझ्यानें होत नाहीं. गजराबाईची नांदणूक उत्तम व्हावी, आपण पहावी, हा आपला संकल्प होता. परंतु थोरले धनिनीचे मर्जीस्तव आबाई आदिकरून बायकांस तंवी दिल्ही कीं नाहीं! मग परकड कळतच आहे. या उपरी माझे वस्तु कांहीं होत नाहीं, म्हणून बहुतच भाषण केलें. सारांश इतकाच कीं, बायकांतील मजकुराविषयीं राजाश्यानें तिळप्राय बोलवत नाहीं. तीं जें म्हणतात तें हे बरें म्हणतात. या प्रकारचा मजकूर झाला आहे. याच समयांत या दोहीं तिहीं दिवसांत गोसावी व साहुकार येरझारा घालूं लागले आहेत. आमचीं दिवाळीं निघावयास आलीं, याउपरी पैका पाहिजे, म्हणोन तगादा करितात. आज उद्यांच येऊन बसले तरी फजितीस कारण, म्हणोन राजश्रींनीं धोसरा घेतला आहे. हाच मजकूर दोनही बाजूयांत ऐकतों. बुध्धिनें दिसतात. बाजूयांत कोणता परिणाम कसा लागेल ते पाहवें. सविस्तर स्वामींस कळावें म्हणोन लिहिलें आहे.' [ भा. व. पु. १. ऐ. प. या. ले. ६२ ].

वरील पत्रांत उल्लेखिलेली गजराबाई शाहूमहाराजांची मुलगी ( बहुधा सगुणाबाईची ). 'संतानवृद्धि झाली नाहीं म्हणून लग्नसमारंभ मोठा करावा हेंहि मनांत येऊन लग्नाचा निश्चय दहा लक्ष रुपये खर्चावेसें करून, भरजरी मंडप व साहित्य कारखाने तर्तूद करून, अष्टप्रधान व सरदार, नामी संस्थानी व मांडलिक राजे बोलावून अपूर्व समारंभ केला. उभयतां राण्या होहींकडे बसवून पुण्याहवाचनादि आपण केलें. मंडपास मजलस जाली, ते केवळ इंद्रभुवनाहूनही अधिक. [ शा. म. च. पृ. ९० ]. 'सौभाग्यादि संपन्न गजराबाई यांडे यांसी इनाम धाराद्त्त व वंशपरंपरेनें परगणा नंदुरबार व परगणे मुक्तानपुर, सुभे खानदेश पैकीं गांवें आहेत.'[1]

---

१. ही सनद ता. १२ ऑगस्ट स. १७४६ ची आहे, त्यावरून वरील पत्र यानंतरचें असावें, कारण १७४७ च्या ११ एप्रिलास नानासाहेब सातारा सोडून बाहेर गेला.

वरील पत्रावरून शाहूची परिस्थिति, त्याची निराशा, त्याचे कर्जाचा बोजा आणि दरबारांतील एकंदर अस्वस्थता इत्यादि प्रकार फार चांगले व्यक्त होतात.

२. नानासाहेबाची पेशवाईवरून थोडे दिवस भ्रष्टता, (१७४७). अशा स्थितींत भावीराज्यव्यवस्थेसंबंधानें मंडळींचीं मनें चिंताक्रान्त होऊन नानाप्रकारच्या खटपटी सुरू झाल्या. हळूहळू शाहूच्या मनावर पेशव्याचा पगडा ज्यास्त बसत चाललेला दिसत असून तो हाणून पाडण्याकरितां खटपट करणारा दुसरा एक पक्ष होता. रघूजी भोसले, राणी सकवारबाई, प्रातिनिधींत विशेष कर्तव्य नव्हतें तरी त्याचा मुतालीक यमाजी शिवदेव आणि त्यांचे पश्चात् दाभाडे गायकवाडादि कित्येक सरदार हे सर्व पेशव्याचे विरुद्ध असून, ते वेळी अवेळीं शाहूचें मन पेशव्याबद्दल कलुषित करण्याविषयीं टपलेले असत. रघूजीच्या साशंक वृत्तीसंबंधानें वर स्वतः नानासाहेबानेंच एका पत्रांत उल्लेख केला आहे. स. १७४५ च्या ऑगस्ट पासून पुढें दोन वर्षें नानासाहेब लांब कोठें न जातां पुणें साताऱ्याचे बाजूसच होता. ता. ५ डिसेंबर १७४६ रोजीं सदाशिवरावाची पहिली मोठी स्वारी कर्नाटकांत झाली, तिकडील त्याचे पराक्रम उत्सुकतेनें ऐकत स. १७४७ च्या आरंभी नानासाहेब साताऱ्यास होता. ता. १३ एप्रिल रोजीं निरोपाचीं वस्त्रें घेऊन तो निघाला, तो पंढरपुरास जाऊन ९ मे ला जेजुरीस आला तेथें सदाशिवराव कर्नाटक स्वारींतून परत येऊन नानासाहेबास भेटला. पुढें उभयतां २४ मेला पुण्यास आले. जून महिन्यांत थेउरास तुलादान वगैरे होऊन सेप्टेंबरांत सिद्धटेकास जाऊन, रस्त्यानें जानोजी निंबाळकरास भेटून पेशवा परत पुण्यास आला. २५ ऑक्टोबराला बारो आपाजी ( तुळशी बागवाले ? ) यास पुणे सुभ्याची दिवाणगिरी सांगितली; आणि शिंदेहोळकर दक्षिणेंत आले होते त्यांस भेटून उत्तरहिन्दुस्थानांत जाण्यास निरोप दिला. नंतर १० डिसेंबर सन १७४७ पासून ९ जुलई १७४८ पावेतों,

पेशवा स्वतः उत्तरहिन्दुस्थानचे स्वारीस गेला, त्यास नेवाईची स्वारी म्हणतात. याच स्वारींत रामचंद्रबाबाचा व जयापाचा बेबनाव होऊन पुढें त्यावरून सदाशिवरावाचें व पेशव्याचेंही थोडेसें बिघडलें. सन १७४८ त २५ ऑगस्ट पासून १४ सेप्टेंबर पावेतों नानासाहेब सातान्यास होता. आपण जवळ राहिल्यानें शाहूला मोकळेपणानें व्यवस्था करतां येत नाहीं, शाहूच्या मनावर दडपण पडतें, तें न पडावें व शाहूनें वाटेल ती व्यवस्था निर्भीडपणें करावी ह्या हेतूनें बहुधा नानासाहेब बराच दूर राहत असे. अतंस्थरीतीनें सातान्यास त्यानें सर्व बंदोबरत ठेविला होता. परंतु तेथील भानगडींत आपण प्रत्यक्ष हात न घालतां काय होतें तें पाहत तो स्वतः बराच दूर राहिला. शिवाय त्यास बाहेर कामही पुष्कळ होतें. नाना बेफाम झाला आहे, तो नेहमीं व्यसननांत दंग असतो, प्रत्यक्ष शाहूसही तो आतां जुमानणार नाहीं, अशी विरूद्ध पक्षानें सातान्यास ओरड करून शाहूचें मन कलुषित केलें. तेव्हां खन्याखोटयाची परीक्षा शाहूनें पाहिली, तींत हे आरोप खोटे ठरलें. बहुधा स. १७४९ एकदां पांचसात हजार फौज घेऊन नानासाहेब सातान्यास गेला आणि शाहूची भेट झाल्यावर डेन्यांत राहिला. तेव्हां अकस्मात् चिटणीस यांस बोलावून महाराजांनीं आज्ञा केली कीं, प्रधान यांस चिठ्ठी लिहावी जे, तुमचें प्रधानपद दूर केलें आहे, तरी शिके कटार व जरीपटका हुजरे पाठविले यांजबरोबर जामदारखान्यांत दाखल करणें.' प्रधानपंतांनीं चिठ्ठी वाचून, तसेंच उठोन शिकेकटार व जरीपटका हुजरे यांचे स्वाधीन करून रवाना केलें; आणि लष्करापासून दूर एक राहुटी घेऊन स्वयंपाक करविला; आणि महाराजांस चिठ्ठी लिहिली कीं, सरकारी कारखाना व फौज सरकारची आहे ती कोणाचे हवालीं करावी तें लिहून यावें, त्याप्रमाणें करून पायांपाशीं दर्शनास येतों.' त्यावरून 'सरकारकून पाठवितों तोंपर्यंत तेथेंच राहवें,' असें सांगून पाठविलें. याप्रमाणें आठ दहा दिवस गुदरले.

दुरू झाली. मुत्सद्दी मंडळींनीं महाराजांस विचारिलें 'पुढें

विचार काय ! हिंदुस्थान प्रांतीं वगैरे हे बातमी गेली व आईल. चहूंकडे सरदार यांचे विद्यमानें आहेत, त्यांत बखेडे होतील, वास्तव यांजवर कृपा करणें, किंवा दुसऱ्यास पद सांगून आधीं बंदोबस्त व्हावा.' इकडे नानासाहेबानें चिटणीस व मंत्री यांजपासोन विनंति करविली कीं, आम्ही एका राहुटीनें बाहेर राहिलों, चरणापाशीं येण्याची आज्ञा व्हावी, किंवा दुसरी सेवा कांहीं सांगावी.' तेव्हां उत्तर आलें, कीं 'नजर काय देतां बोलावें.' यावर सांगून पाठविलें जे, आम्ही एकटे येथें आहों, सलतनत सरकारची सरकारांत आली. घर व सर्व जें आहे तें सरकारांत नजर आहे, आणावें.' याजवर 'प्रधानपद दुसरीकडे सांगावयाचें,' इतकेंच उत्तर केलें. नंतर एके दिवशीं अकस्मात् हुजरे बोलावणें पाठविलें. बाळाजीपंत एकच खिजमतगारानिशीं येऊन मुजरे करून उभे राहिले; बोलले जे, 'पायां पाशीं कोणती सेवा सांगणें ती आज्ञा होऊन पायांच्या वियोग मात्र न व्हावा.' यावरून, हे एकनिष्ठ सेवक खरे, यांजपासोन कदापि अंतर पडावयाचें नाहीं. म्हणून सर्व प्रकारचे बहुमान आणवून प्रधानपद पुनः दिलें. यांणीं पायांवर मस्तक ठेविलें. बाजीरावाचे पुत्र, बाळाजी विश्वनाथाचे नातू खरे, तुमची सेवा व निष्ठा पाहून बहुत संतोषित जालों, असें बोलिले; आणि पोषाख जवाहीर वगैरे आणखी दिलें (शा. म. च. ८७–८८).

ही हकीगत केवळ अख्यायिका नसून ती खरी असल्याबद्दल पुरावा आहे. नानासाहेबासंबंधानें विरूद्ध पक्षानें शाहूचें मन अति कलुषित केलें होतें. विरुद्ध पक्षाची ही भीति अगदींच निराधार नव्हती. नानासाहेब पेशवाई पदावर राहील तर, शाहूचे पश्चात्, दुसरा कोणीही राजा गादीवर आला, किंवा कोणतीही व्यवस्था झाली, तरी पेशव्याचे हातांत सर्व सत्ता जाणार ही गोष्ट उघड उघड दिसत होती. अशा प्रसंगीं सामान्य जनसमूहाचे मनावर विचारा पेक्षां विकाराचाच असर ज्यास्त होत असतो. हा प्रश्न हुशारीचा किंवा कर्तबगारीचा नव्हता. सर्व सरदार व प्रधान मंडळी शाहूच्या आज्ञेत वागण्यास तत्पर होती, परंतु ती आज्ञाधारकता

त्यांनी फक्त कांहीं वर्षांच्या पोराचें काम म्हणून समजावी ! आजपर्यंत पेशव्यांशीं विरोध करीत आल्यामुळें, पेशव्यांकडेच कायमची सत्ता आली, म्हणजे ते आपली वाट लाविल्याशिवाय राहणार नाहींत, अशी भीति पंतप्रतिनिधी व इतर मंडळीच्या मनांत निःसंशय वागत होती. या भीतीचा निरास होईल तितका करावा अशी त्यांनीं मनापासून खटपट केली. शाहू कर्जाच्या पेचांत होता. पेशव्यानें द्रव्यसंचय चांगला केला आहे, अशी सर्वांची समजूत होती. तेव्हां यांचें प्रधानपद दूर केलें म्हणजे सरकारास द्रव्य मिळून, पुढील व्यवस्था निराळी करतां येईल, असा या मंडळीचा थाट होता. बाळाजीराव उघड बंडावा करील, शाहूचा हुकूमही धाब्यावर बसवील, अशी कदाचित् या मंडळीची अटकळ होती. परंतु नानासा० अत्यंत धूर्त; शाहूचा स्वभाव ओळखून मर्जी कशी राखावी, हें त्यासच उत्कृष्ट ठाऊक होतें. म्हणून त्यानें सर्वस्वी शरण आल्याचा भाव दाखविला. हा प्रकार बहुधा चार दोन दिवसांत आटपलेला नाहीं. महिना दोन महिने तरी शाहूनें बाळाजीस कुचंबत ठेविलें असावें. मोठाला नजराणा घेऊन कर्ज तरी वारतां येईल अशी शाहूची अपेक्षा होती. भा. व. पु. १ ऐ. पत्रें यादींत ले. ४५ हा कागद या भानगडीच्या संबंधाचा आहे. नानासाहेबानें हें पत्र गोविंदराव चिटणिसास लिहिलेलें आहे, तें येणेंप्रमाणें:—

'आशीर्वाद उपरी. रात्रीं राजश्री स्वामींची गांठ पडली नाहीं म्हणून लिहिलें, ऐशियास ईश्वरी इच्छेस तुमचा इलाज काय ! याउपरी तरी सामखाय गांठ दुपारी घालून येणेंप्रमाणें विनंति करणें:—

क. १ दोनही महालांतील गुंते फार करून दूर केले. रोज नवे निघतात त्यांस मात्र आमचा इलाज नाहीं. सांप्रत महालांतील गुंता नाहीं. मोघम बोलणें चालणें असलील. बाकी महाराज कर्जाचे मजकुराचा गुंता तो, महाराज सर्व विचार ध्यानांत आणून आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक, जेसें असूं तेसें करूं. हुजूर अलस्याय आज्ञा मान्य करूं, याजेर

गेल्यास न करूं ही सबब होणार नाहीं. परंतु निभावे ऐशी आज्ञा केली पाहिजे. सांप्रत मनसबा होऊन खचित जाहला आहे. मनसब्याचा कळस रक्षण करावयाचे दिवस थोडे असतात. यास्तव दोहीं वाक्यांत समजून सेवकास निरोप द्यावा. एका दों दिवसांत हा अर्थ उत्तम असें महाराजांनीं कृपा करून करावें.

क. २ महाराजांचे कर्जाचा छरक करावा तेव्हांच जावें, ऐशीच मर्जी असली तर पुण्यास न जातांच, इकडून फिरून सेवेशीं येऊं. सावकाशीनें महाराज कृपा करून पुण्यास व वसईस जावयास आज्ञा देतलि तेव्हां आऊं. या मनसब्याचा डौल पंधरा दिवसां अलीकडे आहे. तेव्हां मालकास, ऐसा गुंता काढल्यानें, मनसबा नासतो. ये समयीं महिना दोन महिन्यांचा निरोप द्यावा. फिरोन सावकाशीं सुमुहूर्तं महाराजांनीं देणें तर द्यावा.

क. ३ नायकांशीं कज्जा करावयासी जातां, ऐसा संदेह, जनवार्तेवरून, मनांत वाटला असला, तर त्याविशीं निशा करून घ्यावी. जो तालुका महाराजांनीं नायकास करार केला, त्यांत त्यांनीं जावें. कज्जा करावा हे गोष्ट महाराजांचे हुकमावांचून सहसा होणार नाहीं.

क. ४ चिरंजीव भाऊ तिकडे गेले आहेत. नबाब ही तिकडे गेले म्हणजे गोंधाच्या शहास अंतर होऊन, आणखी फिरकोळ गुंते तसेच अडकून पडतील. तेव्हां त्याचा लौकीक एक प्रकारे होऊन येईल, हा अर्थ महाराजांनीं ध्यानांत आणावा. सरकारांत भर करूं द्यावा, तो उगवला [=वसूल केला] पाहिजे. सर्वांही गोष्टींत आम्हांवर तोटा पडे असें करावें कीं काय ! निदान येथून दो मजलीवर जाण्यास आज्ञा करावी. सर्व फौज व पिलाजी जाधव यांस चिरंजिवाकडे रवाना करितों; आणि सेवेशीं फिरोन येतों.

क. ५ महाराज निरोप देतात हा लौकिक जनांत जाहला. नबाबापावेतों बातमी जाईल. फिरोन दिल्हें हेही वर्तमान जाईल. तेव्हां सर्व प्रकारें आम्ही इतराजींत, हा लौकिक जाहला आहे, व बाकी राहिला आहे हाही होईल.

इतके प्रकार निखालसतेनें विनंति केली असतां महाराज ध्यानांत न आणीत तर ईश्वरें या दौलतीवर इतराजी केली अशी जाणावी. मग बोहेरील ही इज्जतीचा दरकार सोडून बसूं. सर्व मजकूर, वरल्या प्रमाणें विनंति करून उत्तर घेऊन येणें.'

या महत्त्वाच्या कागदानें शाहू व बाळाजी यांजमधील तेढीवर व तत्कालीन कारस्थानांवर चांगलाच प्रकाश पडतो. सदाशिवराव भाऊ कर्नाटकांत गेल्याचा यांत उल्लेख आहे. डिसेंबर स.१७४६ पासून मे १७४७ पावेतों सदाशिवराव कर्नाटकांत होता, अर्थात् हें पत्र व बाळाजीवरील इतराजी सन १७४७ च्या पहिल्या दोन तीन महिन्यांतली आहे, हें निर्विवाद सिद्ध होतें. तसेंच पेशव्याकडून शाहूनें प्रधानपद कांहीं दिवस काढिलें, ही केवळ आख्यायिका नसून,तो प्रकार खरोखरीचा होता; आणि बाळाजीस कारभारांतून समूळ काढून टाकण्याचा हा त्याच्या प्रतिस्पर्ध्यांचा शेवटचा प्रयत्न होता, याविषयींही संशय राहत नाहीं. राण्यांचीं भांडणें, बाबूजी नाईकास पेशव्यानें दिलेला शह, व शाहूचें कर्ज एकदम वारण्याची पेशव्याची असमर्थता, या तीन मुख्य कारणांनीं शाहूचें मन बाळाजीवर रुष्ट झालें. त्यांत प्रतिस्पर्ध्यांनीं भर घातली; आणि निदान कांहीं दिवस बाळाजीस बाजूस ठेवून दुसऱ्या कोणाकडून कारभारात जास्त सुधारणा होते कीं काय, हा प्रयोग शाहूनें एक वार करून पाहिला. खुंटी हालवून जास्त घट्ट केल्याप्रमाणेंच या प्रयोगाचा परिणाम झाला. मात्र बाळाजीचे कांहीं महिने मोठ्या विवंचनेंत फुकट गेले. शाहूची व त्याची भेट होत नव्हती; आणि दुसरी कांहीं व्यवस्थाही अमलांत येईना, अशा संदिग्धावस्थेंत व फिकिरींत नानासा० चे कांहीं दिवस गेले. 'दरबारचा मजकूर तर हा कालपर्यंत आमचा उलगडा झाला नाहीं. मोठा बखेडा थोरले महाराजा आहे. तो गुंता कळेल त्या रीतीनें उरकावा या प्रयत्नांत आहों. प्रसंग आनिवार फार, यास्तव गुंता आहे,' असें पेशवा रामचंद्रबाबास लिहितो. [ पारसनीस संग्रह ]. मुख्य बाबत शाहूच्या कर्जाची होती.

आपण कर्जमुक्त होऊन मग मरावें, दुसऱ्याचे ऋणांत पुढील जन्मीं खितपत राहूं नये, अशी शाहूची निकड होती. बाळाजीनें उत्तर हिंदुस्थानांत वगैरे स्वाऱ्या करून पैसा जमविण्याची शिकस्त केली; पण कर्ज वारण्याइतकी उपज झाली नाहीं. या कर्जाशीं दोन्ही राण्यांचाही संबंध असावा, आणि पेशव्याच्या हातून कर्ज वारत नाहीं, उगाच वायदे करून व पोकळ गप्पा सांगून पेशवा वेळ मारून नेत आहे, अशी दोन्ही राण्यानीं शाहूची समजूत घातली. आपला काळ समीप येत चालला, सावकार दाराशीं धरणें धरून बसले, आतां पुढें निभाव कसा लागणार, याची विवंचना शाहूस लागली; वरील लेखांक ६२ चें महादोबा पुरंदऱ्याचें पत्र या वेळचेंच असलें पाहिजे. त्यात बाबूजी नायकासंबंधानें शाहूने केलेली आज्ञा झुगारून देऊन उलट बाळाजीनें त्याचा छळ चालविला, अशा वार्ता शाहूच्या कानावर गेली. तुमच्या डोळ्यादेखत जर पेशवे तुमची अशा अवज्ञा करतात, तर तुमच्या पश्चात् काय प्रकार होणार, अशी धास्ती मंडळींनीं शाहूस घातली. येणेंकरून शाहूचें मन फार संतप्त झालें. बाबूजी नायकाच्या प्रकरणानें शाहूच्या रोषांत भर घातली. शाहूचें मन गोंधळून गेलें. गोविंदराव चिटणिसाचें व पेशव्याचे सख्य होतें. निदान कोणत्याही पक्षांत स्वतः उचल न घेतां, प्रत्येक बाजूचें व इसमाचें म्हणणें निर्विकार मनानें महाराजांपुढें ठेवून जशी आज्ञा होईल त्याप्रमाणें बरोबर बाहेर निकाल देणें, हें काम गोविंदराव चिटणीस योग्य प्रकारें बजावीत होता. त्याजबरोबर पेशव्याची बोलाचाली रोजच्या रोज चालू होती. तरी साफीचा जबाब पेशव्यास मिळेना, तेव्हां कंटाळून जाऊन शेवटचें निक्षून बोलणें म्हणून वरील कलमें त्यानें गोविंदराव चिटणिसास लिहिलीं. पैशाच्या प्राप्तीकरितांच बहुधा सदाशिवराव भाऊस सखाराम बापूच्या स्वाधीन करून पेशव्यानें कर्नाटकांत रवाना केलें होतें. निदान शाहूचें समाधान करण्याचा कांहीं तरी विशिष्ट मनसुबा पेशव्यानें रचिलेला असून, त्यास शाहूनें साताऱ्यास अडकवून ठेवल्यामुळें, ऐन यशःप्राप्तीच्या वेळेस तो मनसुबा बिघडत चालला होता, म्हणून थोडे दिवस

मला बाहेर जाऊं द्या, शक्य असेल अशी आज्ञा मला करा, अशीं आर्जवें पेशवा गोविंदराव चिटणिसाच्या मार्फत वरील कागदांत शाहू महाराजापाशीं करीत आहे. इतकेंही करून महाराज आपणास स्थापन करून तावडतोब बंदोबस्त न करतील तर, ईश्वरें या दौलतीवर इतराजी केली, म्हणजे शाहूच्या या कृत्यानें आजपर्यंत केलेला सर्व उद्योग फुकट जाऊन राज्याचें सर्वस्वी नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी स्पष्ट धमकीही नानासाहेबानें या पत्रांत शाहूस दिलेली आहे. अलबत शाहूनें हें पत्र लक्षपूर्वक वाचून, पेशवा धडपड करतो त्यास हे लोक आडकाठ्या मात्र घालितात, परंतु दुसरी एखादी व्यवस्था सुचवून आपल्या अडचणींचा निरास करून राज्याचें ओझें अंगावर घेण्यास कोणी पुढें होत नाहीं, अशी शाहूची पक्की खात्री पटून, त्यानें बाळाजीस पुनः कारभारावर रुजू करून त्यास बाहेरच्या उद्योगावर पाठवून दिलें, तो प्रकार असा. शाहू कांहीं केल्या मनांतील तेढ सोडीना, तेव्हां त्यागून दबकावणीचा शेवटचा उपाय म्हणून नानासाहेब तमाम बाहेर पडला. ता. २० मार्च रोजीं 'आम्हीं वडुथाहून कुच करून तुथास आलों, तुमची वाट येथें पाहत बसलों आहों,' असें तो पिलाजी जाधवास लिहितो. रुसून बाहेर पडल्यानें हा कांहीं तरी भलताच अर्थ करील असें जाणून, शाहूनें नानासाहेबास परत बोलावलें; आणि त्याच्या तंबूवर जाऊन त्यास वस्त्रें व निरोप दिला. यासंबंधानें पिलाजी जाधवास नानासाहेबानें १५ एप्रिल १७४७ चें पत्र लिहिलें तें असें. 'राजश्री स्वामींचा निरोप जाला नव्हता, याजकरितां रा० स्वामींनीं माघारें बोलावून नेलें. या उपरी आमचे डेरियास आले, त्यांस वस्त्रें दिलीं. दुसरे दिवशीं छ १२ रबिलाखरीं रविवारीं (१२-४-१७४७) राजश्री स्वामीनें हत्ती दिल्हा त्यास तुम्हांकडे....[1] केलें. आम्हांस खर्चाबद्दल सरंजाम द्यावा, वरकड सर्व मोघम ठेवून निरोप मात्र जाहला. या उपरी तुम्हीही जाल. दरमजल येणें. भेटीनंतर सर्व

1. चार अक्षरें लागत नाहींत.

वर्तमान कळेल. पुढें विचार आचार बोलणें ते बोलून तुम्हांसही जावयास निरोप देऊं. तरी सत्वर यावें. तुम्हीं खटावेस येणें. जाणीजे. श्रीकृपेनें उत्तम प्रकारें रंग उतरला. बहुत काय लिहिणें. ' या प्रकारानें बाळाजीनें शाहूचें अवसान जोखलें, त्यास लगेच थोडेसें निरंकुशत्व प्राप्त झालें, आणि या सत्तेच्या जोरावर तावडतोब एकएका प्रकरणाचा निकाल करण्यास त्यानें सुरुवात केली.

नानासाहेब साताऱ्याहून निघाल्यावर लवकरच सदाशिवराव कर्नाटकचे स्वारींतून आला, तेव्हां शाहूच्या कर्जाची व्यवस्था कांहीं तरी त्यानें लाविली असावी. कारण यापुढें कर्जाच्या बाबतीचा उल्लेख आदळत नाहीं. शाहूची मर्जी नानासाहेबावर पूर्वीहून ज्यास्त बसली. एवढाच काय तो आपला आधार असें समजून त्याजवर शाहूनें सर्व भार व कामें सोंपवून मरणापूर्वी स्वस्थ चित्तानें शाहूनें राज्याची निरवानिरव केली; आणि पुनरपि विरोधकांच्या म्हणण्याकडे त्याने लक्ष दिलें नाहीं.

ता. १२ एप्रिल १७४७ रोजीं गुडी पाडव्या नंतर निरोपाचीं वस्त्रें घेऊन बाळाजी साताऱ्याहून निघाला तो पंढरपुरास जाऊन ९ मेला जेजुरीस सदाशिवरावास भेटून उभयतां ता. २४ मे रोजीं पुण्यास दाखल झाले. निरोपांची वस्त्रें घेतल्याचा वरील एकच प्रसंग शकावलींत नमूद आहे. त्यावरून आणि उत्तम प्रकारें रंग उतरला यावरून कांहीं दिवस तरी नानासाहेब स्थानभ्रष्ट झाला होता. विरोधकांनीं समोर आघात करून पाहिला तो सिद्धीस गेला नाहीं तेव्हां पेशव्याच्या परोक्ष त्याच्या दानतीवर त्यांनीं आघात सुरू केला. हा आघात व त्याचें निरसन खालील पत्रांत दाखल आहे. नाना व तथा भाऊ पेशवे यांस पत्र महादबा पुरंदरे याचें:—

' पु. सी. नाना व तथा राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं. विनंति. शेटी मलीक स्वामीकडून येथें आला त्याजबरोबर पत्र पाठविलें, तें पावलें. शेटीनें राजश्रीस वर्तमान सविस्तर स्वामींकडील सांगितलें. महाराजांनीं सर्व ऐकून आगती येकीकडे शेटीस नेऊन पुसिलें. त्यानें सांगितलें कीं, पेशवे सुखरूप

आहेत. काम कारभार पूर्ववत् प्रमाणेंच होत आहे. आपल्या बंदोबस्तानें आहेत. ब्राह्मणांचे हात तोडिले, कलावंतिणी र//खिल्या, दारू पितात, धुंद जाहले, म्हणून महाराजांनीं ऐकिलें होतें, परंतु सर्व शोध बारकाईनेंही घेतला व दिसानेंही सर्व आला. अगदीं बाष्कळ. नाना बहुत खबरदार आहेत. तेव्हां महाराज बोलले कीं लंवडीचे लोक भलतेंच सांगतात. सर्व लटकें. नाना खुशाल आहे कीं ? तेव्हां हा ( शेटीमलीक ) म्हणाला कीं खुशाल आहेत. महाराज बोलले, इतकेंच असलें म्हणजे जाहलें. नाना जिवानें खुशाल असला म्हणजे सर्व बरें आहे. लोकांचे आम्ही मजकूर कोठें मानतों. तूं सांगतोस हें खरें. बारांना वाईट नाना. माझा तेवढा माझा चाकर पदरीं माझे मातबर आहे. सुखरूप असला म्हणजे जाहलें. मग शेटी म्हणाला, कीं सुखरूप आहेत. हें वर्तमान शेटीनें येथें येऊन आम्हांजवळ सांगितलें. खरेंच आहे. परभारें शेटीनें जेव्हां राजश्रीजवळ स्वामींचें पत्र दिल्हें, महाराजांनीं वाचलें, दरबारीं लोक फार होते, यास्तव शेटीला म्हणाले, इकडे ये. तुला वर्तमान पुसावयाचें आहे. असें सदरेस बोलून, पलीकडे शेटीला घेऊन गेले. वर्तमान पुशिलें यानेंही सांगितलें. हेंही वर्तमान राजश्री गोविंदराव यांनीं सांगितलें कीं, नानाचें वर्तमान पुसावयासीं शेटीस याप्रमाणें पुशिलें; व जाबसालही उत्तम जाहला. आतां महाराजांचे निदर्शनास आलें. इतक्या उपरी राजश्री दरबारीं काय चर्चा करितात; व बाईजवळ काय करितात हेंही येक दो दिवशीं कळेल. तदुत्तर सेवेशीं लिहीन.' [ भा. व. पु. १, ले ६४ ]. गोविंदराव चिटणीस नानाची तरफदारी करतो, यावरून नानाविषयीं त्याचे मनांत आदर होता, आणि त्याच्या कर्तबगारीची त्यास खात्री होती, हें उघड होतें. पुरंदरे कदाचित् पेशव्याचा पक्ष अंधश्रद्धेनें उचलून धरील, पण गोविंदराव चिटणिसास तसें करण्याचें प्रयोजन नव्हतें.[१]

---

१. यासारखेंच एक पत्र पेशव्यांच्या बालरतीचें वर्तमान —नारायणराव घोरपड्यानें नानासाहेबास लिहिलेलें रा. वासुदेव विष्णु जोशी सातारा यांजकडून मिळालें आहे. यावरून जनवार्तेत पेशव्यावर निंद्य आरोप होते एवढें खरें.

वरील पत्रांत उल्लेखिलेला शेटी मलीक उर्फ शेटयाबा दाजी संकपाळ हा शाहूच्या मर्जीतला खिजमतगार विश्वासू व गुप्त कामगिरीवर पाठविला जात असे. केव्हांही व कोठेंही जाऊन शाहूची गांठ घेण्यास त्यास प्रतिबंध नव्हता. ( भा. व. पु. २ शा. म. ब. पृ. ७९, ८३, ८५ ). अखेरच्या दुखण्यांत राणी सकवारबाई शाहूची पेशवेचिटणिसांशीं गांठ पडूं देईना, ती या शेटयाजीचे मार्फत पडूं लागली.

पुण्यास कारभाराची व्यवस्था लावल्यावर स. १७४७ ता. १० डिसेंबर-पासून ९ जुलई १७४८ पावेतों पेशव्यानें उत्तर हिंदुस्थानांत चवथी स्वारी केली, त्यास नेवाईची स्वारी ह्मणतात. स. १७४८ च्या मार्च महिन्यांत नासिरजंग व रामदासखांत यांचशीं पेशव्याची लढाई होऊन आसुंबरीचा तह झाला, त्याची हकीगत निजामाचे प्रकरणांत स्वतंत्र येईल. ता २१ मे रोजीं निजामुल्मुल्क मरण पावला; आणि निजामाकडील व बादशाही व्यवहारांस निराळें स्वरूप प्राप्त झालें. स. १७४८ च्या ऑगस्ट सेप्टेंबरांत नानासाहेब साताऱ्यास थोडे दिवस राहून परत पुण्याच्या बाजूस आला, तो फारसा दूर कोठें गेला नाहीं. सन १७४९ च्या मे महिन्यांत सातारा येथें शाहू महादाजी अंबाजीचे भेटीस त्याचे घरीं गेला होता ( ना. रो. १–१२१ ). त्या पुढच्या अधिक भाद्रपदांत ह्मणजे आगस्ट महिन्यांत शाहूची प्रकृति विशेष बिघडल्याची बातमी पेशव्यास कळली. तेव्हां हा अखेरचाच प्रसंग, असें जाणून मोठ्या फौजेनिशीं शिंदेहोळकर व जनार्दनबाबासह ता. २१ ऑगस्ट रोजीं पुणें सोडून नानासाहेब साताऱ्यास गेला, तो पुढें डिसेंबरांत शाहूचा अंत झाल्यावर पुढील सालीं रामराजाचें राज्यारोहण आटपून एप्रिल महिन्यांत पुण्यास आला. इकडे पुण्यांत सन १७४५ पासून दोन तीन वर्षे व पुढेंही, पर्वतीचें मंदिर, तुलादानें, येउरास कल्पलतादान व इतर दानधर्म इत्यादि प्रकार जोरानें चालू होते. अर्थात् पुढें अंगावर येणाऱ्या राज्यभाराची ही धार्मिक तयारी होती, असें दिसतें.

**३. अखेरच्या खटपटी व पुढील व्यवस्था, ( स. १७४९ ).—** मार्गशीर्ष वा॥ ३ शुक्रवार शके १६७१, शुक्लनामसंवत्सर, ता. १५ डिसेंबर स. १७४९ रोजीं सकाळीं चार घटका दिवसास शाहूनगर येथील रंगमहालच्या वाड्यांत शाहूछत्रपति मरण पावला. या गोष्टीनें मराठ्यांचे राज्यकारभारांत एक मोठी क्रान्ति घडून आली. शेवटच्या दहा पांच वर्षांत शाहूची शक्ति क्षीण होऊन, हळू हळू राज्यकारभाराची सत्ता पेशव्याचे हातांत कशी जाऊं लागली त्याचें वर्णन येथपर्यंत करण्यांत आलेंच आहे. पेशव्यावरच आतां सर्व भार टाकून आपण मोकळें व्हाव-याचें, असा बहुतेक निश्चय करून स. १७४७ च्या एप्रिलांत, शाहूनें बाळाजी बाजीरावास निरोपाचीं वस्त्रें देऊन, बाहेर पाठविलें, त्यानंतर सुमारें अडीच वर्षांनीं शाहूचा अंत झाला. या अडीच वर्षांत पुढील राज्यकारभारासंबंधानें नानाप्रकारचीं कारस्थानें घडून आलीं, नानाप्रकारचे बेत व विचार झाले; आणि शेवटीं रामराजास गादीवर बसवून पेशव्यांनीं राज्यकारभार चालवावा, असा स्वदस्तुरचा दस्तैवज पेशव्यांस करून देऊन, नंतर शाहूनें आपला देह ठेविला. 'अधिक मासांत महाराजांस अनारोग्यता प्राप्त झाली,' म्ह०स. १७४९ च्या आगस्टांत शाहूची प्रकृति विशेष बिघडली. सुमारें चार साडेचार महिने शाहू आंथरुणास खिळलेला होता. मधून मधून केव्हां थोडा भ्रम होत असे, परंतु सारखी बेशुद्धि अशी कधींच नव्हती, आणि त्याला जीं कांहीं व्यवस्था योग्य व शक्य वाटली ती त्यानें सावकाश, विचारपूर्वक व संपूर्ण शुद्धीवर असतां करून ठेविली, यासंबंधानें उपलब्ध कागदपत्र वाचले म्हणजे मनांत यत्किंचित् संशय राहत नाहीं. आज दीडशें पावणेदोनशें वर्षांनंतर आपण त्या प्रकरणाचा विचार करूं लागलों, म्हणजे आजच्या परिस्थितीनें व आवडीनिवडींनीं आपलें मन विकारवश होऊन आग्रहानें तत्कालीन घडामोडींविषयीं आपण भल-भलतेच विचार प्रगट करितों; परंतु हा विषय तत्कालीन कागदपत्रांच्या

पुराव्यावर रचिला पाहिजे, त्यांत कल्पनाशक्तीवर भर देऊन उपयोगी नाहीं. म्हणून याप्रकरणासंबंधानें उपलब्ध लेख काय आहेत, त्यांचें प्रथम थोडक्यांत दिग्दर्शन केलें पाहिजे.

शाहू महाराजांच्या दोन बखरी स्वतंत्र अशा उपलब्ध आहेत, पैकीं पहिली मल्हारराव चिटणीसकृत सुसंगत नसली तरी, परिपूर्ण व त्या वेळचे कागदपत्र पाहून तयार केलेली आहे. त्यांत शाहूच्या अंतकाळचें प्रकरण शेवटीं आठ पानांत थोडक्यांत मुद्देसूद दिलेलें असून, एकंदर परिस्थिति मनांत आणतां, तीच हकीकत भरंवसेलायक वाटते. शाहूचें दुसरें चरित्र गोविंदराव चिटणिसाचे नांवावर चाललेलें भारतवर्षांत प्रसिद्ध झालें, त्यांत जरी पुष्कळशा भाकडकथा आहेत, तरी अखेरच्या भानगडींसंबंधानें यापासून पहिल्या चिटणिसी हकीकतीस दुजोरा येतो, विरोधभाव कोठेंही येत नाहीं. या दोन चरित्रांखेरीज ठाण्याचे बखरींत पहिल्या रुमालांत शाहूची हकीकत बरीच विस्तृत दिलेली आहे, परंतु ती जितकी शाहूची योग्यता ठरविण्यास उपयोगी पडते, तितकी शेवटच्या घडामोडींसंबंधानें मुग्ध आहे. यांशिवाय भारतवर्ष मासिकाच्या पहिल्या वर्षांत अमात्यांची बखर छापलेली आहे, तींत रामराजाचे जन्मसंवर्धनाचा तपशील परिपूर्ण आहे. त्याच पुस्तकांतील प्रतिनिधींच्या बखरींतही थोडासा खुलासा आहे. शिवाय याच पुस्तकाच्या ऐ. प. या. ले. ४१, ४४, ४५, ५५, ५६, ५७, ५९, ६२, व ६४, हे कागद विशेष मुद्याचे आहेत. इतिहाससंग्रहांत पे. द. मा. ले. ४४ व ऐ. टि. भा. १ ले. ४२ चे कागद व शाहूनें पेशव्यास लिहून दिलेले दोन दस्तैवजी लेख, महत्त्वाचे असून ते पुढें अस्सलच यावयाचे आहेत. राजवाड्यांच्या आठव्या खंडांतील पत्रें ले. १२६, १६९–१७१ व १८३–१८४ हे कागद अत्यंत महत्त्वाचे आहेत. रा. राजवाड्यांच्या दुसऱ्या खंडांतील शकावलींत केवळ ग्रँट डफचा अनुवाद आहे. दुसऱ्या दोन शकावलींतील हकीकत अत्यंत त्रोटक आहे. राजवाड्यांच्या तिसऱ्या खंडांतील ले. १२७, १९५, २२८, व १५० यांचा

थोडा बहुत उपयोग होईल. शाहूची, व नानासाहेबाची रोजनिशी,यांचाही कांहींसा उपयोग होतो. सारांश, इतक्या साहित्यावर भिस्त ठेवून आपणास या प्रकरणाचें सार काढावयाचें आहे. वरील साहित्यांतील दरएक विधानाचा कालानुक्रम ठरविणें शक्य नाहीं.

पहिल्या तीनही बखरींतून खालील हकीकत प्रथम कारणापुरती देऊन मग त्याबद्दलची तफावत व विवेचन देणें रास्त होईल.

' शेवटीं शेवटीं पांच सहा वर्षे महाराजांची उदास वृत्ति झाली. सर्व काळ बहुतकरून अरण्यांतच असावें ऐसें झालें. पुढें वार्धक्य जालें. संतान नाहीं यामुळें बहुत खिन्न जाले. संभाजीराजे आहेत तेही वृद्ध जाले. त्यांसही संतान नाहीं. पुढें राज्याची दशा काय होईल नकळे. मालोजीराजे यांचे कनिष्ठ बंधु विठोजी यांचे आठवे पुत्राचा वंश बहुत आहे व शरीफजी राजे शहाजी महाराजांचे बंधु यांचा वंश आहे. त्यांत चांगला मूल कोण, कोठें राजचिन्हें व बुद्धीकरून लक्षणें, शूर उदार व चतुर, धीर, ऐसे पाहणें, शोध करणेस लाविलें. परंतु थोरली राणी यांचे विचारें सिद्धान्त होऊन आला नाहीं. या प्रसंगीं धाकटी धनीण सगुणाबाई यांचे शरीरीं व्यथा निर्माण झाली. त्यास उपाय व अनुष्ठानें वगैरे लक्षावधि खर्च करविला, परंतु आरोग्य न होय. याजवरून बहुत उद्विग्न जाले. नंतर श्रीजेजुरीस घेऊन जावें ऐसें ठरोन महाराजच घेऊन गेले. तेथेंही अनुष्ठान प्रसंग, बहुत दानधर्म करविला. आयुर्दाय संपला, तेथेंच समाप्ति जाली. ( ता. २५ ऑगस्ट १७४८ ). माहुलीस आणून दहन जालें.

चिटणिसाचा बाळाजीपंताचा घरोबा फार चांगला. कोणतेही विषयीं सरकार चाकरींत अंतर न करितां एक विचारें चालण्यामुळें कित्येकांनीं महाराजांस अनेक प्रकारें समजाविलें. परंतु महाराजांचा पूर्ण लोभ. चिटणिसाचा घरोबा प्रधानपंत ठेवीत होते. न्यूनाधिक प्रपंचांतील राज्यपरसंबंधी सर्व गोविंदरायास अवशीं पहांटे समजावून रायांचे विचारें होणें करणें तेंही करीत असावें. गोविंदराव चिटणीस, यशवंत महादेव पोतनीस

व राजाज्ञाचे मुतालिक देवराव मेघश्याम[१] लपाटे हे सदैव जवळ राहून कारभार करीत. राजकारण गोविंदरावाकडे. यशवंतराव व देवराव यांनीं खर्चवेच पाहून कारभार करावा. थोरली धनीण सकवारबाई आज्ञापालन करणें तें न करितां, आपणांस पाहिजे तो पुत्र घ्यावयाचा, अशीं राजकारणें प्रतिनिधि व यमाजी शिवदेव वगैरेशीं निराळा जमाव राखणें इत्यादि चालविलीं. पुढें, संपादिलें राज्यसंरक्षण कसें होईल म्हणून बहुत विचार होऊन पुनः सातान्यांत रहावयास जावयाचें नाहीं, श्रीकृष्णातीरींच वास करावयाचा, म्हणून माहुली व सातारा यांचे दरम्यान डेरे व छावणी छपरबंदी करून राहिले. त्यास वनवासवाडी म्हणूं लागले; आणि भोसल्यांच्या घराण्यांतील चांगलीं मुलें पारण्यास आणून एक निश्चय करावा, ऐसें महाराजांनीं मनामध्यें धरिलें. तों सकवारबाईचें व प्रतिनिधि वगैरेंचें बोलणें निराळें पडलें. प्रधानपंत, चिटणीस, पोतनीस, देवराव वगैरेंचें मत महाराजांचे मनाप्रमाणें करावे ऐसें पडलें. त्यांत ताराबाई सातारा किल्ल्यावर नजरकैदेंत होती, त्यांनीं सांगून पाठविलें. 'दुसरें मूल कां पाहतां ? राज्यास धणी शिवाजीराजे, आपले पुत्र, त्यांस मूल जालें, तें मीं गुप्तरूपें ठेविलें असोन, दुसरे दत्तक कां करितां ?' यावरून मुलें आणविलीं त्यांचा निश्चय कोणताच झाला नाहीं. अमुकच करावें असें सांगणेस कोणासही सामर्थ्य न घडे. असें होतां महाराजांचे शरीरीं ज्वराची व्यथा निर्माण झाली. तेव्हां बहुतच उदास वृत्ति धरिली. सर्वकाळ अध्यात्मचर्चा, पुराणश्रवण, दानधर्म, ऐसें व्रत चालविलें. सर्व प्रधान समीप असावे, ऐसी आज्ञा केली. 'याउपरि बहुत दिवस राहवयाचें नाहीं, लौकरच समाप्तिकाळ आहे,' अशी चर्चा करूं लागले. तेव्हां सर्वांनीं धैर्य करून विनंति केली जे, पुढें राज्य चालविण्याची आज्ञा सर्वांस कशी ते जाली पाहिजे.' त्यावरून उत्तर सांगितलें कीं, थोरली धनीण मनस्वी, आपले चित्तांत येईल तोच मनसबा करितात,

---

१ देवराव मेघश्याम याचा जावई विठ्ठलराव हा आनंदराव सुमंताचा मुलगा. अर्थात् हा देशस्थ ब्राह्मण [ शा. म. च. पृ. ७३ ].

तुम्हां सर्वांस घेऊन राज्य संभाळावें, ऐसें त्यांचे दैवीं नाहीं. संभाजी राजे राज्याचे धणीच, परतु इतके सर्वांस घेऊन राज्य संभाळावें ऐसें बुद्धिवैभव, आवरशक्ति नाहीं. याकरितां दत्तपुत्र घेणेंच प्राप्त. बाबजी महाराजांचा वंशविस्तार आहे, त्यांत ताराबाईसाहेबांचें म्हणणें मूल गुप्त रूपें ठेविला आहे, त्याचा उघडेपणीं शोध करून खरेंच असल्यास दत्तक घेणें. अस्सल वंश असतां, बाहेरचा केल्यास पुढें निभावणेस कलह पडतील.' म्हणून आईसाहेबांपाशीं गोविंदरावास पाठवून सर्व मजकूर लेहून आणिला, त्याजवर आपले हातें लिहून ठेविलें; आणि यावडेकर बाजीराव अमात्य यांस आणावयास आज्ञा केली. त्यांची येण्याविषयीं खातरजमा न होय, ती यशवंतराव व गोविंदराव यांस पाठवून कराविली. त्यांस आणिलें. श्रीकृष्णेखांनिध्य त्यांस विचारिलें. मूल आहे तें खरें आहे ऐशी खातरजमा जाहल्यावरून बोलले, 'तुम्हीं सर्वांनीं एक विचारें राहून आमचे मागें त्यास आणून मुलासच धनी करून, त्यांचे आज्ञेत चालून राज्य रक्षावें.' हें वर्तमान धनिणीस समजलें. त्यावरून बहुत रोषेंकरून निराळीं राजकारणें करूं लागली. त्यांचे मनांत आपणास ताराबाईचे आज्ञेत राहवें लागेल. यास्तव आपण 'दुसरा दत्तक घेऊं,' ऐशीं बोलणीं पडलीं. त्यांच्या मनांत आपण मागें राहून दत्तक घेऊन दौलत चालवावी, त्याउ, आपले आप्त मंडळीस कारभार सोंपून हीं खरी मंडळी धरावी, कैद करावी, वाटेस लावावी, असा संकल्प करून, आपसांत मंडळी घेऊन ठायीं ठायीं खलबतें होऊं लागलीं. ताराबाईचा नातू खोटा आहे, हें सर्व ताराबाईचें थोतांड आहे, अशी मसलत केली. यावरून महाराजांनीं बाळाजीपंत प्रधान यांजकडील कारकून व पाचशें स्वार व गोविंदराव चिटणीस यांजकडील कारकून विश्वासू देऊन पानगांवीं रवाना केले. यावरून प्रधान, चिटणीस, देवराव व यशवंतराव यांजवर धनिणीचा रोष बहुत जाला. प्रतिनिधि व यमाजीपंत यांस विचारांत घेऊन, फौज जमाव करून करवीराहून संभाजी राजे यांणीं यावें, ऐसें

राजकारण केलें; आणि आपलेकडून पानगांवीं खंडेराव न्यायाधीश पाठवून ठेविले.[1] ताराबाईसाहेबांचा बंदोबस्त करावा, म्हणून किल्लेदार व गडकरी यांशीं राजकारण केलें. त्यांत महाराजांचे शरीरीं व्यथा बहुत होत चालली. कारभाऱ्यांचा प्रवेश महाराजांपर्यंत होऊं नये, ऐसा विचार बाई करू लागली. त्या समयीं महाराजानीं मनात आणिलें, 'हा समय कठीण, सरदार आणविले ते येऊन पावत नाहींत. प्रधान यांजविरहित बलवान विचारवान कोण्ही नाहीं. त्यांस एकान्तीं बोलावून आपले हातची यादी लिहून गोविंदरावाचे विद्यमाने ठरवून दिली.

यांतील कांहीं प्रकार बाहेर वनवासवाडींतच[2] झालेला दिसतो. वाड्यांत न्यावयाचे म्हणून आग्रह करून राणीसाहेब यांनीं महाराजांस रंगमहालांत नेलें; आणि वाड्यांत व बाहेर सर्व आपला बंदोबस्त करविला. संभाजी राजाकडील ब्राह्मण प्रतापगडावर अनुष्ठानास आले होते, त्यांस सकवारबाईनें हुकूम पाठवून किल्ल्याखालीं घालवून दिलें; आणि स्वामीस बरें वाटत नाहीं येविशीं श्रीस संकट घालून किती दिवसांत उतार पडेल तो विचारून प्रसाद व तीर्थ स्वामींस पाठवून देणें (खं. ३. ३५०– आगस्ट ३१. १७४९). स्वामींस बरें वाटत नाहीं सबब जागोजाग भिमाशंकर, मोरेश्वर, थेऊर, जेजुरी, पुरंदर या ठिकाणीं ब्राह्मण अनुष्ठानास बसविले. ता. ५–९–१७४९ [ ना. सा. रो १–१२२ ]. रंगमहालांत महाराजांजवळ चौकीपहारे ठेवून, प्रधान, चिटणीस, देवराव, व पोतनीस, यांचा प्रवेश परवानगीशिवाय होऊं नये, महाराजांजवळ आपली मंडळी असावी ऐसें केलें. प्रधान व चिटणीस यास वाड्यांत येतां जातां दगा करावा, ऐसे विचार चालले. महाराजांचा मनोदय व आज्ञा सिद्धीस न्यावयासाठीं कारभारी यांणीं आईसाहेबांपाशीं राजकारण राखिलें. किल्ल्या-

१. खंडेराव न्यायाधीशास शाहूनेंच पाठविलें. का. सं. पं. प. श. पृ. १०.

२. भारतवर्ष बखरकार म्हणतो, शाहूमहाराज साताराचे किल्ल्यावर आजारी होते; व तेथेंच वारले. पण हें खरें नाहीं.

वरील राजकारण व बंदोबस्त महादोबा पुरंदरे व गोविंदराव चिटणीस यांजपासोन करविले; आणि अस्सल मूळ आहे तेच अधिकारी करावे ऐसा मनसोबा सिद्ध जाला. राणीसाहेबाचा मनमोबा, हे गोष्ट न घडावी, आपण पाहिजे तो मूल घ्यावा. ताराबाईचा बंदोबस्त राखून आपण राज्य-कारभार चालवावा, ऐसा चालला. गोविंदराव व प्रधानपंत यांनीं हजार पांचशें निवडक लोक बरोबर घेऊन वाड्यांत जावें, ऐसें प्राप्त जालें. इरप्रकारें यांस वाटेंत जिन्यांत दगा करावा, ऐसें राणीसाहेब करूं लागली. महाराजापाशीं आग्रह करून बोलली, तेव्हां 'राजकारण करणार तुझे विश्वासु कोण आहेत ? शेवटास कसें जाईल ?' तेव्हां 'प्रतिनिधि यमाजीपंत व सेनापति ( दाभाडे ) आहेत,' बोलली. 'ते लांब राहिले फौजेविना शेवटास जाणार नाहीं, त्यास विश्वासू असतील त्यांस फौज जमा करावयास सांगावें,' असें महाराज बोलले. दादोबांस राणीसा-हेबांनीं सांगितलें, ते सात आठ हजार जमा जाले. राणीसाहेबांनीं दमाजी गायकवाडास बोलाविलें. तो शूर व दैववानही आहे. मसलत सिद्धीस नेऊं, असा त्यांचा बेत जाला. गोविंदरायास कळलें. त्यांनीं मनांतच ठेविलें, आणि चार महिनेपर्यंत तमाम सरदार पागा वगैरे नामांकित बोलावून खासे खासे आणिले. प्रधानपंत यांसही आज्ञा झाली. त्यांनीं चोवीस तीस हजार जमाव केला. सर्वांचे घरोघरीं गोविंदराव जातीनें एकटे जाऊन, महाराजांची आज्ञा त्यांस सांगावी. त्यांणीं उत्तर करावें कीं, महाराजांची आज्ञा आम्हांस शिरसामान्य, परंतु पेशवे यांची स्पर्धा करून दौलत संरक्षावयास आमच्यांत सामर्थ्य नाहीं. फौज व पैसा दोन पाहिजेत. त्यांत दैव अनुकूल पाहिजे. या गोष्टी आपणच मनांत आणून आम्हांस सांगावें, त्याप्रमाणें आम्ही करतों याप्रमाणें एका एकाचे घरीं दोन चार वेळां सामार्थी गेले. प्रतिनिधि, सेनापति, सरलष्कर, अक्कलकोटकर व विंबाजी ( ? ) भोसले, सेनासाहेब सुभा व सेनाधुरंधर आदिकरून यांचे घरीं दोन दिवसां एका दिवशीं आड जाऊन प्रहर

प्रहर बसोन बोलावें; परंतु कोणाचा हिय्या होऊन ' मी राज्य सांभाळतों, ' असें उत्तर न जालें. त्याजवर महाराजांनीं नवरात्रांत ( ऑक्टोबर ता. १ स. १७४९ ) गोविंदराव चिटणिसास बोलाविलें, तेथें जाऊन एकांतीं बसोन झाला मजकूर सर्व श्रुत केला, ' कीं मी बिंबाजी ( ? ) भोसले व अक्कलकोटकरांस नानाप्रकारें उलटून बोललों, परंतु त्यांचे वस्तु आमचेंही सामर्थ्य नाहीं, असें साफ उत्तर त्यांणीं मला दिलें. मीं पराकाष्ठा करण्यांत बाकी ठेविली नाहीं. माझ्या मागें त्यांस बोलावून आणून विचारावें, नंतर जशी आज्ञा करावयाची असेल तशी करावी, त्याप्रमाणे चालेन. ' फत्तेसिंगबाबास विचारतां, ' मला राज्यभार चालवणें आटोपणार नाहीं ' असें बोलले. महाराजांनीं राणीसाहेबांस सांगितलें, राजपुत्र दत्तक घेऊन तुम्ही त्यांचे आज्ञेंत चालून सर्व कारभारी यांचे विचारें चालावें. ' परंतु घडलें नाहीं. गोविंदरावास बोलावून, त्यास आपल्या पक्षांस आणण्याबद्दल बाईनें शिकस्त केली इनामाच्या सनदा वगैरे करून दिल्या; आणि बाहेर निघून जातांना त्याचा खून करावयाचा घाट घातला, त्यांत भूलचुकीनें तुळाजी खिजमतगार मारला गेला. गोविंदराव सुटून घरीं आले आनंद झाला. प्रत्यक्ष रायास दगा केला. आतां एकचित्त होत नाहीं, अशी पेशव्याची खातरजमा झाली. दोन तीन वेळां महाराजांकडे पंतप्रधान मोठ्या बंदोबस्तानें गेले. बाईसाहेबांनीं रघूजी भोसले यास जलद येण्याचीं पत्रें पाठविलीं. त्यांस सत्वर घेऊन यावें म्हणून बहिरव खंडेराव चिटणीस रवाना केले; परंतु समयास येऊन पोंचल नाहींत. सेनापति व गायकवाड यास पत्रें गेलीं. सेनापति व्यसनी झाले, आले नाहींत. यमाजीपंतांनीं किल्यावर ताराबाईच्या बंदोबस्ताकरितां बंधु अंताजी शिवदेव व कांहीं लोक पाठविले; परंतु प्रधान व गोविंदराव यांणीं किल्याचे अधिकाऱ्यांशीं, महाराजांचे आज्ञेनें, राजकारण राखिलें; आणि त्यांनीं अंताजी शिवदेव व त्याचे लोक काढून दिले. राणीसाहेबांनीं संभाजीराजे यांस फौजसुद्धां यावें, म्हणून लिहून पाठ-

विलें. यावर महाराजांनीं बापूजी खंडेराव यास पाठवून संभाजी-कडील कारभारी व जिजाबाई यांनीं या खटल्यांत आपण पडून शेवटास जावयाचें नाहीं, असें राजे यांणीं सांगितल्यावरून पुढें न येतां माघारे गेले. महाराजांचे शरीरीं व्यथा बहुत जाली. 'राज्यास धणी पुत्र करून, सर्वांनीं आज्ञेंत चालून, राज्य देवब्राह्मणांचें, हें एक विचारें रक्षावें'; आणि पेशव्यास बजावलें कीं "आम्हीं देवब्राह्मणांस धर्मादाय, अग्रहार, व खैरखैरात, व ज्यांस, भाऊबंध व गोत्रज व आणखी इतर कुणबी मराठे लोक वगैरे नाना जाती यास, चाकरीबद्दल, व सरंजाम, व अहागिरा, व गांव, जमिनी, वगैरे लोकांस आम्हीं इनाम देणगी दिली आहे, ती तुम्हीं आमचे पाठीमागे चालवावी. कोणास अटकाव करूं नये. आमच्या हातचे देणगीस बाध आणिल्यास व आम्हीं मान दिलेल्या लोकांचा छळ वगैरे केल्यास तुम्हाकडे पेशवाई पद कायम राहणार नाहीं.' याप्रमाणें सर्व मंडळीस सांगोन, भस्म लावून, रुद्राक्ष धारण करून, दर्भासनावर पांढरी घोंगडी टाकोन, श्रीरामनाम व शिव हरहर असा अकरा वेळ शब्दोच्चार करोन, प्राण आक्रमण करून, मिती मजकुरीं, रंगमहालचे वाड्यांत शहर सातारा येथें शाहूमहाराज छत्रपति कैलासवासी शांत जाहले. त्या वेळीं त्याचें वय ६७ वर्षें सात महिने होतें.[1]

शाहूनें आपल्या पश्चात् मराठी राज्याचा कारभार कसा चालावा, यासंबंधानें वर सांगितल्याप्रमाणें दोन कागद स्वदस्तुरचे निधनापूर्वी पेशव्यास लिहून दिले, ते महत्वाचे असल्यामुळें अस्सल छायाचित्रासह येथें देतों.

## यादी नंबर १

राजमान रा बाळाजी प्रधान पंडित यास आज्ञा. तुह्मी फौज धरनें.

---

1 जन्म वैशाख व॥ ७ शके १६०४ (इ. सं. पे. द. मा. १).

सर्वांस आज्ञा केली त्यांच्या देवीं नाहीं. महाराजांस लिखेनें जालें नाहीं. बरे होत नाहींत. राज्यभार चालला पाहिजे. तर पुढें वंश बसवनें. कोलापुरचें न करणे. चिटणिसास सर्व सांगितलें तसें करनें. वंश होईल त्याच्या आज्ञेंत चालून राजमंडळ चालवनें. चिटणीस स्वामीचे विश्वासू. त्याच्या तुमच्या विचारें राज्य राखनें. वंश होईल तो तुमची घालमेल करनार नाहीं. सुज्ञ असा.

## यादी नं. २

राजमान रा। बाळाजी पंडित प्रधान आज्ञा जे. राज्यभार तुम्ही चालवाल हा भरवंसा स्वामीस आहे. पहिलें सांगितलें (त्याची) खातरजमा, ती चिटणिसांनीं आहत केली. तुमचें मस्तकीं हात ठेविला आहे; वंश होईल तो तुमचें प्रधानपद चालवील. करील अंतर तर शपथ असे. त्याचे आज्ञेत चालून सेवा करनें. राज्य राखनें. बहुत काय लिहिनें. सुज्ञ असा.

या दोन यादी म्हणजे मराठशाहीच्या सूत्रचालकत्वाची शाहूनें पेशव्यांस करून दिलेली सनद होय. आज पावेतों या यादी थोड्या बहुत त्रोटक रीतीनें अनेक ठिकाणीं छापण्यांत आल्या होत्या. परंतु त्यांचे अस्सल कागद पैदा करून ते इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध केल्याबद्दल रा. यशवंत राजाराम गुप्त याचे आभार मानिले पाहिजेत. अस्सलच येथें प्रसिद्ध होत असल्यामुळें, वाचनाचे मतभेद असतील, ते ज्याचे त्यानें मर्जीप्रमाणें लावावे. या कागदांवर मिति नाहीं हें एक वैगुण्य आहे. तथापि दोनही कागद थोड्या दिवसांच्या अंतरानें शाहूनें शेवटच्या आसन्न स्थि-

---

१. कित्येक मंडळी दुसणें वाचतात. परंतु त्याचा अर्थ बरोबर लागत नाहीं. दोन जाणत्या मंडळीचे हातांत अस्सल लेख ठेवून त्यांस तो बाळबोधीत लिहून काढण्यास सांगितला असतां त्यांनीं वरप्रमाणें लिहिला. लिखनें जालें नाहीं, म्हणजे आज पावेतों लिहून ठेवण्यास सवड झाली नाहीं; आणि आतां पुढें बरे होण्याची आशा नाहीं, असा अर्थ.

तींत लिहिलेले आहेत. त्यांत प्रथम फौज आणून बंदोबस्त करण्याविषयीं पेशव्यांस आज्ञा आहे. इतर सरदार फौजा घेऊन वेळेवर येऊन पोंचले नाहींत. चिटणिसास सांगितल्याप्रमाणें राज्यास नवीन धनी करून पेशव्यांनी सर्व कारभार करावा. कोल्हापुरचे संभाजीस साताऱ्च्या गादीवर आणूं नये, अशी शाहूने आज्ञा केली. त्यानंतर पेशव्याचे संबंधानें शाहूचे मनात, कदाचित् इतरांच्या सांगण्यावरून, संशय आला, तो संशय चिटणिसानें घालविला. वर दोन कागद चिटणीस व पेशवा यांच्या दरम्यानचे दिले आहेत, ते या संबंधाच्या भानगडीचे असूं शकतील. पेशव्यासंबंधीं शाहूची दिलसफाई झाली, आणि 'तुमचे मस्तकीं हात ठेविला,' असा आशीर्वाद त्यानें पेशव्यास मरणापूर्वी दिला.

पंतप्रतिनिधीच्या बखरींत खालील मजकूर आहे. [ भा. व. पु. १. ] 'शाहू महाराजांनीं प्रतिनिधीस विचारले. तुम्ही सर्व राज्याचा बंदोबस्त कराल कीं काय ? त्यांणीं विनंति केली कीं तीस हजार फौज जवळ आहे. नंतर पेशवे यास विचारिलें, त्यांणीं एक लक्ष फौज जवळ आहे; आणि हुकूम झाल्यास पाहिजे तितकी फौज जमा करूं; व आज्ञेप्रमाणें राज्याचा बंदोबस्त राखीन. त्यावरून राजांची मर्जी पेशव्याबर प्रसन्न होऊन, आपल्या पैजारा व निशाणें व शिक्केकटार आपली, पेशवे याचे ताबीन करून, सर्व सरदार मानकरी यांशीं हुक्कम केला कीं, पेशव्यांचे हुकुमांत र्वांनीं चालावें. कोणी फितवा केल्यास त्यांचें पारिपत्य पेशवे करितील. शी आज्ञा केली.' शाहूच्या मृत्यूनंतर या हुकुमाचा पहिला अंमळ तिनिधीवरच झाला.

मृत्यूपूर्वीच दत्तक घेऊन व्यवस्था करण्याची खटपट चालली होती सें खालील पत्रावरून दिसतें. 'चि. वि. महाराजांनीं थोडासा संदेह रेला आहे. याकरितां तुम्हीं आतांच वर यावें. दत्तविधान करून नाहीं म्हणतात. याजकरितांच वर यावें. भोजन येथेंच होईल. ळ मागून येतील. येथून चिठी पावल्यावर त्यांनीं यावें. तुम्हीं

आतांच यावें, वरकड मंडळी आधीं वर येऊं नयेत. हे वि. मराठ्यांच्या बायकाही आधीं वर न्याव्या. हे वि.' [ इ. सं. पे. द. मा. १ ]. हें पत्र सातारा किल्ल्यावरून कोणीं पेशव्यास लिहिलें असावें काय (?)

४. पुढील राज्यव्यवस्थेसंबंधानें शक्याशक्यतेचा विचार.— सामान्यत: शाहूच्या अंतकाळीं कसकशा हकीकती बनत गेल्या, हें वरील उताऱ्यांवरून बरेंच स्पष्ट होतें. त्यांत मुख्य सूचना व शक्याशक्यता काय होत्या, त्यांत कोणत्या पक्षाचे काय हेतु होते; आणि शेवटीं रामराजास आणून पेशव्यानीं राज्य चालवावें, असा बंदोबस्त करून शाहू कसा मरण पावला, इत्यादि प्रकार विशद होतात. त्या वेळीं पुढील राज्यव्यवस्थेसंबंधानें खालील सूचना पुढें आलेल्या होत्या: —

१ छत्रपति संभाजी यास साताऱ्यास आणून राज्यपदावर बसविणें.

२ विठोजी किंवा शरीफजी यांचे वंशांतील भोसले किंवा तत्संबंधीं दुसरा लायक इसम दत्तक घेणें.

३ सकवारबाईनें आपल्या मर्जीप्रमाणें मुलगा दत्तक घेऊन राज्य चालविणें.

४ रामराजा गुप्त होता, त्यास राज्यावर आणवून कारभार चालविणें.

या चार योजनांसंबंधानें तीन चार पक्ष होते. शाहूला कांहीं तरी पुढील व्यवस्था ठरविणें अपरिहार्य होतें. पेशवा, चिटणीस व दुसरे कारभारी या सर्वांचा एक पक्ष असून, जें करणें तें एकमतानें शाहूची आज्ञा होईल तें करावें, अशा विचाराचा होता. दुसरा महत्त्वाचा पक्ष राणी सकवारबाईचा, त्यांत यमाजी शिवदेव मुख्य असून, रघूजी भोसले, दमाजी गायकवाड इत्यादिकांचा त्यांस थोडाबहुत मुग्ध पाठिंबा होता वास्तविक हे लोक प्रसंग बनेल त्याप्रमाणें वागण्याच्या इराद्यानें दोन दगडींवर हात ठेवून होते. सकवारबाई किंवा यमाजी शिवदेव याजप्रमाणें त्यांनीं पेशव्याशीं उघड विरोध या वेळीं दाखविला नव्हता. चौथा पक्ष ताराबाईचा. तिला राज्यकारभार करण्याची मोठी हाव असून, त्या धोरणानें तिनें अगोदरपासूनच शाहूचें मन वळवून, पेशव्याशींही तूर्त सख्य ठेविलें. शाहूची भिस्त सर्वस्वी

पेशव्यावर आणि भरंवसा गोविंदराव चिटणिसावर होता. संभाजीस साताऱ्यास आणून दोनही राज्यें एक करावीं, असा पूर्वी पेशव्याचा घाट होता, परंतु त्याछही संतान नसून वृद्धावस्थाच असल्यामुळें, पुनः दत्तकाचा प्रश्न लवकरच उद्भवणार. ताराबाई व सकवारबाई दोघीही संभाजीच्या विरुद्धच होत्या. आपला डाव सिद्धीस जात नाहीं, असें दिसतांच सकवारबाईनें कोल्हापुराहून संभाजीस साताऱ्यावर येण्यास भर दिली; परंतु ती केवळ तेवढ्या संकटापुरतीच होती. शिवाय संभाजीशीं शाहूचें फार दिवस वैर, मारेकरी घालण्यापर्यंतचे प्रसंग आलेले, आणखी त्याच्यातही राज्यकारभाराची आवरशक्ति नाहीं, अशी शाहूची खात्री, तेव्हां संभाजीस साताऱ्यास आणूं नये अशी निक्षून आज्ञा शाहूनें दिली. भोंसले कुटुंबांतील अगदीं बाहेरचा इसम दत्तक घेण्याची कल्पना शाहूस आरंभीं पसंत होती, परंतु त्यास सकवारबाई व ताराबाई दोघी विरुद्धच होत्या. कारण असा दत्तक घेतल्यानं या बायांचें महत्त्व कारभारात राहिलें नसतें. अर्थात् ताराबाईच्या हातांतला रामराजाचा डाव तिनें हलकेच सुसंधि पाहून बाहेर काढतांच, इतर पक्ष आपोआप मागें पडले; आणि रामराजांच्या अस्सलपणाविषयीं खात्री वगैरे करून घेण्यांत कांहीं काळ गेला. सकवारबाई व ताराबाई याचें अत्यंत वांकडें. दोघीही कारस्थानी व महत्त्वाकांक्षी होत्या. सकवारबाईस सती घालविण्यांत सुद्धां, पेशवे किंवा इतर मंडळीपेक्षां, ताराबाईचा आग्रह विशेष होता, हें पुढें सांगावयाचेंच आहे. सकवारबाईची योजना अगदींच टाकाऊ नव्हती. तिचाही शाहूनें चांगला विचार केला. परंतु बळाबळाचा विचार करतां सकवारबाईच्या हातीं कारभार दिल्यास लगेच रणकंदन माजेल, आणि राज्यांत घोर अनर्थ होतील, असे विचार मनांत येऊन ताराबाईच्या रामराजाचीच सूचना शाहूनें पसंत केली. अस्सल वंश असतां, दुसरा कोणी भोसले कुलांतील इसम दत्तक घेतल्यास, हा अस्सलवंशी इसम तरी लढाई केल्याशिवाय थोडाच राहणार, अशा भावनेनें शाहूनें रामराजाचाच विचार मनांत कायम केला. ताराबाईचें ब

पेशव्याचें या वेळीं बरे होतें. इच्याच तंत्रानें चालण्यांत राज्याचें हित आहे आणि शाहूचाही ओढा रामराजाकडे आहे, असें पाहून पेशव्यानें शाहूच्या या योजनेचा स्वीकार केला, आणि ती पार पाडण्याचे जोखीम अंगावर घेतले. शाहूस काय, किंवा पेशव्यास काय, नवीन राजा करण्यांत युद्ध-प्रसंग नको होता. सर्व व्यवस्था शांतपणानें पार पडावी. अशीच त्याची मनापासून इच्छा होती. युद्धाची खुमखुम सकवारबाईस विशेष होती; आणि आपला हेतु सिद्धीस नेण्यासाठीं कितीही प्रयास पडले किंवा युद्ध-प्रसंग झाले, तरी ती डगमगणारी नव्हती. ही तिची प्रवृत्ति दाबांत ठेवण्यास शाहूस मोठे प्रयास पडले. तसाच प्रसंग आल्यास बंदोबस्त ठेवण्यासाठीं मोठी फौज जमविण्यास त्यानें पेशव्यास व सरदारांस आज्ञा केली. त्यामुळेच कदाचित् रामराजास तावडतोब आणून त्याने आपल्या देखत दत्तक घेतलें नाहीं. ( पहा, रा. खं. ८–१८३ ). रामराजास राणी अपाय करील, आपल्या डोळ्यादेखत राजधानींत युद्धप्रसंग माजेल, आणि आपणास मरणप्रसंगीं चित्तशांति मिळणार नाहीं, अशा भावनेनें, सर्व मंडळींत बलवान व हुशार असा जो पेशवा त्यास स्वहस्ताने पुढील व्यवस्थेचे लेख करून देऊन; आणि सर्वांनीं पेशव्यास मदत करावी, असें विनवून शाहूने प्राण सोडिला. एवंच राणी सकवारबाईशिवाय इतर सर्व पक्षांस व मराठशाहीच्या सर्व हितचिंतकांस शाहूचीच योजना संमत होती. पेशव्याचे हेतु खालील पत्रांत व्यक्त होतात. ताराबाईला मिळवून कारभार करावा, अशी पेशव्याची इच्छा होती. ता. १९ ऑगस्ट रोजीं ताराबाईच्या कारभाऱ्यास त्यानें खालील पत्र लिहिलें:—

'येथील अर्थास निखालसतेस वाकफ होऊन गेलां. संप्रत तुम्ही केलिया सर्व होतें. असें असतां विलंब संशय ठेविला हें अपूर्व दिसले. याउपर दिनकर महादेव यांस लिहिले आहे, ते समजाऊन त्याप्रमाणें करणें. आमचे इतबारी प्रामाणिक जाणून तुम्हांस लिहिले आहे. जेणेंकरून बाइ-साहेबांचे मनोदयासिद्धि, आमचे ठायीं पहिल्यापेक्षां विशेष कृपा, राजश्री

राजी, लौकिक उत्तम, हे तीनही अर्थ करणें. इतकें लिहिलें असता न कराल तर ईश्वरइच्छा प्रमाण. ( खं. ३-१२७ ता. १९-८-१७४९ ).

या एकंदर हकीकतींत पेशव्याची वागणूक सरळ दिसते. धूर्ततेनें वागून त्याने आपली बाजू सांभाळिली, हा त्याचा दोष म्हणतां येत नाहीं, राज्यकारभार चालविणाराने दक्ष व धूर्त असलेंच पाहिजे. पेशव्याचा स्वतःचा म्हणून निराळा उद्देश नव्हता. चार चौघांचे संमतीने शाहूनें जी आज्ञा केली ती वंद्य समजून तडीस नेण्यांत त्यानें कसूर केली नाहीं. रामराजाचे अंगीं कर्तृत्व नाहीं, हें त्यास आगाऊ ठाऊक असण्याचें कारण नव्हतें; आणि कर्तृत्ववान् राजा गादीवर असता तर, शाहूच्या हयातींत ज्याप्रमाणें बाजीरावानें करामत करून दाखविली, त्याप्रमाणें नानासा०नेंही केलें त्यापेक्षां कदाचित् जास्त कार्य करून दाखविलें असतें. शाहूच्या पश्चात् मराठ्यांचे गादीस लायक छत्रपति मिळाला नाहीं, हा प्रकार शोचनीय होय; परंतु त्याची जबाबदारी पेशव्यावर नाहीं. 'तारुण्य राजतेजयुक्त, प्राक्रमवान आहेत' ( इ. सं. ऐ. टि. भा. १ पृ. ६६ ) म्हणून हा कर्तृत्ववान निघेल अशीच त्याजविषयीं पेशव्याची भावना होती. पेशव्यानें आपल्या हातीं सत्ता यावी, म्हणून मुद्दाम नालायक इसम गादीवर आणिला, हा समज चुकीचा आहे. 'पेशवे व चिटणीस यांस हातांशीं धरून तूं वाग, त्यांत तुझें कल्याण आहे,' असें शाहूनें राणीस परोपरी सांगितलें, परंतु तिचा आग्रह सुटला नाहीं. पेशवे व चिटणीस संगनमतानें वागत होते. राज्यांत दुफळी होऊं नये, सर्वांनीं एकजुटीनें वागावें, आणि जी कांहीं योजना शक्य व सर्वांच्या हिताची असेल, ती शाहूपासून ठरवून घ्यावी, अशी उभयतांची मनापासून इच्छा होती. तिच्या सिद्ध्यर्थ शाहूच्याच आज्ञेनें गोविंदराव चिटणीस सर्व सभासदांचे व मुत्सद्यांचे घरोघर सामार्थी हिंडला. राज्याचें जोखीम अंगावर घेण्यास दुसरा कोण तयार आहे, कोणांत तशी ताकद आहे, आपसांत युद्ध माजल्यास बंदोबस्त कोण करूं शकेल, इत्यादि गोष्टींची गोविंदरावानें निरनिराळ्या इसमांशीं भरपूर चर्चा

केली. पेशव्यांच्या हातीं कारभार गेल्यानें ब्राह्मणांचें माहात्म्य वाढेल, पेशव्यांच्या अरेरावीपणाबद्दल अनेक सरदारांची अगोदरपासूनच कुरकूर होती; आणि त्यांच्या समजुती घालण्यास शाहूस कधे नाकीं नव येत, हें सर्व गोविंदराव चिटणीस जाणत होता. पेशव्याबद्दल म्हणजे त्याच्या मनांत विशिष्ट उमाळा होता, असा प्रकार बिलकूल नव्हता. पेशवे कारभारांत नसून दुसरा कोणी पराक्रमी इसम पुढें येता तर चिटणिसास हवाच होता. परंतु पेशव्याचें धोरण व शक्ति त्या वेळच्या मंडळींपैकीं एकांतही नव्हती. कोणासही राज्यभार अंगावर घेण्याचा हिय्या होईना. शाहूचें आत्मलिंग फत्तेसिंग भोसले यानेंही कानावर हात ठेविले, आणि कोणीही पुढें होऊन शाहूस तसें आश्वासन देईना. चिटणीस व पोतनीस हे दोघे व देवराव मेघश्याम देशस्थ ब्राह्मण, आनंदराव सुमंताचा व्याही, अर्थात् परंपरेने पेशव्याचा विरोधी, हे शाहूच्या अंतरंगांतले मुख्य इसम होते; आणि पहिले दोघे प्रभु जातीचे असल्यामुळें तिकडूनही ब्राह्मण पेशव्याबद्दल त्यांचे मनात विशेष आदर असण्याचें कारण नव्हतें; परंतु ते राजनिष्ठ व राज्यहितैषी होते; आणि त्यांनीं सर्व साधकबाधक विचार करून एक मतानें पेशव्याचे हातीं राज्यकारभार देण्याची शाहूस भर दिली, यावरून असें करण्यांतच राज्याचा फायदा आहे, अशी त्याचीं व गोविंदराव चिटणिसाची भावना व्यक्त होते. गोविंदरावाच्या कुटुंबावर सकवारबाईनें नाहीं नाहीं तीं संकटें आणण्याचा प्रयत्न केला, परंतु नानासाहेबानें त्याचीं मुलें माणसें पुण्यास नेऊन बंदोबस्तानें ठेविलीं; आणि सर्व प्रकारें चिटणिसाचा बचाव केला. [ खं. ६–२४३ ].

रघूजी भोसले व दमाजी गायकवाड हे दुसरे दोघेच सरदार त्या वेळीं वजनदार व पराक्रमी होते. त्यांस फौजा घेऊन शाहूनें बोलाविलेंही होतें, परंतु ते वेळेवर आले नाहींत. अशा वेळीं राजधानींत येऊन जोखमांत पडण्यापेक्षां दूर राहूनच प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागण्याचा त्यांचा इरादा असावा. रघूजी तर मुद्दाम आला नाहीं, असें दिसतें. खंड ३ लेखांक

१९५ व २२८ हीं रघूजीचीं पत्रें १७४९ च्या नोव्हेंबरांतलिं आहेत. ' आम्हीं नांदेडनजीक गंगा उतरून आलों, पुढें तुळजापुरासंनिध येत असों. रा. विसाजी रघुनाथ व विसाजी गोविंद यांस रवाना केले आहेत. सांविस्तर अर्थ सांगतील त्याप्रमाणें ध्यानास आणून, रा० फत्तेसिंग बाबा यांसीं फौजेसह तुळजापूर प्रांतें शीघ्र घेऊन यावें, भेटी अंतीं योजिला मनसुबा होऊन येईल. ' असें रघूजी कोल्हेरांतास सातान्यास लिहितो. यावरून पाहतां रघूजी सातान्यास येण्याची उडवाउडव करीत आहे, असा भास होतो. निदान आपण ही राजधानींतील नवीन भानगड अंगावर घ्यावी, अशी त्याची मनोदेवता त्यास सांगत नव्हती, म्हणून त्यानें मन लावून या कामीं उद्योग केला नाहीं. शिवाय त्यानें आपला पंथ वऱ्हाड नागपुराकडे स्वतंत्र पाहिलेला असल्यामुळें, तेथून दूर अंतरावर साताऱ्याच्या नवीन भानगडी अंगावर घेणें रघूजीस जरूर नव्हतें. दमाजी गायकवाडाचाही असाच जम गुजराथेंत बसलेला होता. अर्थात् गायकवाड व भोसले यांचे हितसंबंध असे दूर असल्यामुळें त्यांस साताऱ्चें प्रकरण अंगावर घेणें शक्य झालें नसतें, त्यामुळें पेशव्याचा कार्यभाग आयताच तितका सुलभ झाला. तथापि पुढील एक दोन वर्षांत या अनिष्ट स्थितीचा परिणाम पेशव्यासही भोगल्याशिवाय राहिला नाहीं. कदाचित् यमाजी शिवदेवाच्या सल्ल्यानें सकवारबाईनें निराळाच दत्तक घेऊन राज्यकारभार चालविला असता, आणि त्यास पेशव्याची मदत किंवा अनुमति नसती, तर सर्व मराठमंडळास ताब्यांत ठेवून राष्ट्रकार्य करवून घेण्याचें सामर्थ्य सकवारबाईंत किंवा तिच्या पक्षाच्या मंडळींत नव्हतें. बाईंची हुकमत मराठमंडळास खपली नसती. ताराबाईसारख्या पराक्रमी बाईची जर राज्यकारभारांत डाळ शिजली नाहीं, आणि आयुष्याचीं निदान चाळीस वर्षें तरी तिला बंदिवासांतच कंठावीं लागलीं, तर सकवारबाईचा जम आणि तो ताराबाई जिवंत असतां, कितीसा बसला असता, याची कल्पना सहज करतां येते. कोल्हापुरच्या संभाजीची बायको

जिजाबाई बरीच पराक्रमी होती; परंतु बायकोमनुष्य म्हणून पुरुष मुत्सद्यांवर तिचें तेज पडलें नाहीं. सकवारबाई या दोघींपेक्षांही कमी दर्जाची होती. तिच्या बाजूचा प्रतिनिधि स्वत: कर्तृत्ववान नसून मुतालिकावर अवलंबून होता. भोसले, गायकवाड वगैरे सरदार मुद्दाम कलह उपस्थित करणारे नव्हते, आणि इतकें असून तिचा पक्ष प्रबळ झाला असता तर मराठशाहीची लवकरच इतिश्री झाली असती, असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. सारांश, असलेल्या परिस्थितींत शक्य व हितकर अशीच व्यवस्था शाहूनें पूर्ण विचाराअंतीं केली, असें म्हणावें लागतें. दुसरी कोणती व्यवस्था जास्त श्रेयस्कर झाली असती हें दाखविण्याचें काम पेशव्यांच्या आक्षेपकांचें आहे.

सकवारबाईच्या मनांत आपल्या बहिणीचा मुलगा मुधोजी यास दत्तक घ्यावयाचें होतें, असें डफचें व शकावलीचें विधान आहे. ( रा खं. २ पृ. ७० ). शाहूच्या अंतकाळची डफची हकीकत त्रोटक व धरसोडीची दिसते. त्याचे आधार काय ते समजण्यास मार्ग नाहीं. नागपुरच्या रघूजी भोसले याचे मुलगे जानोजीबाबा व मुधोजी आपासाहेब असे होते. रघूजीस अनेक बायका होत्या. मरणसमयीं तेरा बायकांनीं सहगमन केलें. [ ना. भो. का. प. पृ. १२ ]. मुधोजीस दत्तक घेण्याचा शाहूचा विचार असावा. ना. भो. बखरींत खालीलप्रमाणें मुधोजीचा उल्लेख आहे ' रघूजीचे चिरंजीव मुधोजी देउरांत ( वाईजवळ ) होते, तेथून साताऱ्यास राजश्रीकडे येणें झालें. राजश्रींच्या धाकट्या राणीच्या ( सगुणाबाईच्या ) चुलतबहिणीचे लेक, सबब राजश्रीही लोभ विशेष करून होते. फत्तेसिंग भोसले व गोविंदराव चिटणीस यांजकडेस वहिवाट त्यावरून गोविंदराव चिटणिसांचे विद्यमानें विचार ठरला, व गावांतही झालें कीं राजश्री साळीचे लेकास दत्तक घेतात. ताराबाई आईसाहेबांनीं ऐकून ' अस्सल वंश असतां, बाहेरचा कां घ्यावा, ' असा निषेध केला. मग राजश्रींनीं दत्तक घेणें राहविलें. मुधोजी भोसले वय लहान, परंतु शहाणे फार. जिवास

खिन्नता फार केली. बापाची अनास्था, त्यांत सर्व मुत्सद्दी यांचे येथें येणें जाणें, म्हणून प्रातिनिधींनीं मुधोजीबोवांचें समाधान करून, पालखी वगैरे कांहीं स्वारांनिशीं बहुमानांनीं ठेविले. धाकटी राणी त्यांची मावशी; स्वारी शिकार घोडे फेरण्याचा शोक फार. पुढें त्यांची रवानगी महाराजांनीं स्वारींत करून दिली.' यावरून सकवारबाईचा ओढा मुधोजीकडे असण्याचें कारण नव्हतें. कदाचित् मुधोजीसंबंधाची खटपट सगुणाबाईची असावी, ' परंतु सगुणाबाई वारल्यावर त्या उपक्रमाचा आधार तुटला. मुधोजी हा बापाचा नावडता होता, आणि त्यास सातारची गादी मिळवून देण्याची खटपट रघूजीनें केली नाहीं. चिटणिसी बखरींतील एकाही लेखांत मुधोजी व सकवारबाई यांचा आप्तसंबंध असल्याचा उल्लेख नाहीं. सकवारबाईच्या हातीं कारभार येता, तर ती कोणास दत्तक घेणार होती, याची स्पष्टता कोठेंच आढळत नाहीं. रघूजीचा मुलगा मुधोजी घ्यावा, अशीच तिची इच्छा असावी.

आपल्या पश्चात् हरएक बाबतीची स्थिति काय होणार, आणि ती चांगली राहण्यासाठीं आपल्या देखत काय उपाययोजना करितां येईल, याची चर्चा व विचक्षणा शाहूनें सारखीं चार वर्षे अगदीं पुरेपूर केली. इतकी चिकित्सा आज पावेतो बहुधा दुसऱ्या कोणत्याही राज्यकर्त्याच्या हयातींत झाली नसेल. शाहूनें अमक्याची भेट घेतली नाहीं, किंवा अमक्याचें म्हणणें त्याच्या कानावर गेलें नाहीं, असें म्हणण्यास कोणासच जागा नाहीं. तेव्हां शाहू सर्वस्वी नानासाहेबाचे मुठींत होता, आणि पेशव्यानें आपणास वाटेल तशी व्यवस्था आसन्नमरणस्थितींत शाहूचें मन वळवून त्याजकडून ठरवून घेतली, या म्हणण्यांत बिलकूल तथ्य नाहीं. उलट या शेवटच्या चार वर्षांत पेशव्याच्या विरोधकांचाच पगडा शाहूवर विशेष होता. अर्थात् मराठमंडळाच्या ठिकाणीं जितकी अक्कल व शक्कल होती, तितक्याचा उपयोग करून शाहूनें सर्व प्रकारची पुनः पुनः वाटाघाट करून शक्य तितक्या शहाणपणानें व शांत विचारानें पुढील योजना ठरवून दिली.

वास्तविक पाहतां, स्वतःची अशी विशिष्ट योजना पेशव्यानें पुढें आणिलीच नाहीं. यांतच त्याचा धूर्तपणा व्यक्त होतो. कोणतीही योजना कागदावर किंवा वचनांनीं कितीही स्पष्ट रीतीनें आगाऊ ठरविलेली असली, तरी राज्यकारभारांत प्रसंग पडेल त्याप्रमाणें शहाणपणानें वागून यश मिळविणें, हें काम युरोपांत काय किंवा आपल्याकडे काय, चालकाच्या योग्यतेवर व शहाणपणावर अवलंबून असतें. अर्थात् रामराजा येवो, संभाजी येवो, किंवा दुसरा कोणी राज्यावर येवो, राज्याची जोखीम अंगावर घेऊन कारभार करण्याचा नानासा०चा निश्चय मूळपासून दिसतो; आणि तोच त्यानें अखेरपर्यंत चालविला, मग त्यास दृष्टिभेदानुरूप कोणी मुत्सद्दीगिरी म्हणतील, किंवा कोणी आपमतलब म्हणतील. विरोध किंवा पक्ष जितके कमी असतील, तितकें राज्यकारभारांत यश जास्त येतें. एवढ्याच पुरता नानासाहेबाचा सकवारबाईशीं विरोध होता; आणि सकवारबाई सती गेली नसती, तर ताराबाईचा व तिचा कलह जुंपून, तितक्यापुरतें पेशव्याचें काम त्यामुळें सुलभच झालें असतें असेंही म्हणतां येईल. सारांश, दुसरी कोणतीही व्यवस्था शाहूनें त्या वेळच्या स्थितींत ठरवून दिली असती, तरी मराठशाहीचा पुढील कारभार, ज्यास्त यशस्वी झाला असता, असें ह्मणतां येत नाही.

या अखेरच्या घालमेलींत पेशव्यानें स्वतः अंगावर घेऊन एखादा विशिष्ट पक्ष स्वीकारिला नाही. पेशव्याबद्दल बहुतेक सर्व पक्षांचीं मनें साशंक होतीं. अशा स्थितींत चिटणीस, पोतनीस वगैरे शाहूच्या मर्जीतील गृहस्थांशीं संगनमत राखून, शाहूची आज्ञा होईल त्याप्रमाणें अंमलांत आणावयाचें, अशी त्यानें आपली तयारी ठेविली. आंतून सर्व खलबतांची व घडामोडींची बातमी राखून, फौज, पैसा वगैरेची तजवीज त्यानें यथायोग्य ठेविली. शाहूजवळ गोविंदराव चिटणिसाचें माहात्म्य विशेष होतें. शिवाजीचा जसा बाळाजी आवजी, तसा शाहूचा गोविंद खंडो. पुष्कळ काळपर्यंत हरएक प्रकारच्या आज्ञा व तजविजी चिटणिसामार्फतच कागदावर

येत असल्यामुळें, ज्यांत चिटणिसाचा संबंध नाहीं, ती गोष्ट महाराजांस मंजूर नाहीं, असा पक्का समज कैक वर्षे मराठमंडळाचा झाला होता. जनानखान्यांत त्याचा प्रवेश असे. बायकांस समजुतीच्या गोष्टी सांगणें, त्यांचे तंटे तोडणें, नाजूक कामांची निरवानिरव करणें, हीं सगळीं प्रकरणें शाहू गोविंदरावाकडून तडीस नेई. एखाद्या प्रसंगीं काय करावें, याचा निर्णय होईना, म्हणजे आपल्या राण्यांच्या वगैरे समोर गोविंदरावास बोलावून, मुद्दाम त्याचा सल्ला विचारी, आणि निस्पृह व योग्य सल्ला दिल्याबद्दल त्यास शाबासकी देऊन त्याप्रमाणें निकाल देई. भारतवर्षातील बखरींत गोविंदरावाच्या कौशल्याच्या व निस्पृहपणाच्या अनेक गोष्टी वर्णिलेल्या आहेत, त्यावरून त्याच्या चातुर्याची खात्री पटते. तंटे वाढूं नयेत, सर्वांची एकवाक्यता व्हावी, राज्यलौकिक वृद्धिंगत व्हावा, अशा बुद्धीनें सर्वांचीं कामें गोविंदराव करी; स्वतः पक्षाग्रह कधीं धारण करीत नसे. अशा गोविंदरावानें शाहूच्या अंतसमयीं बाळाजी पेशव्याशीं एकमत करून शाहूच्या मार्फत पुढील व्यवस्था ठरवून घेतली, यावरून तत्कालीन परिस्थितींत राष्ट्रहिताचा त्यांस दिसलेला उत्तम मार्ग, तोच त्या उभयतांनीं स्वीकारिला असें म्हणावें लागतें. चिटणीस घराण्याचें व पेशव्याचें वाकडें असें कधींच नव्हतें. गोविंदराव चिटणीस शाहूच्या मृत्यूनंतर सुमारें पसतीस वर्षे जिवंत होता, एवढ्या मुदतींत पेशव्यांची राज्यनीति त्यास पसंत नसती तर त्यानें विरुद्ध बाजूनें कांहीं तरी हालचाल केली असती; ती त्यानें केली नाहीं, यावरून पेशव्यांची कृत्यें त्यास मानवलीं होतीं, असें म्हणावें लागतें. प्रस्तुत प्रकरणीं पेशवे व चिटणीस यांचा आपसांत कांहीं तरी ठराव झालेला होता. शाहूच्या मनांत पेशव्यासंबंधी कांहीं संशय आला असतां, त्याचें निरसन गोविंदरावानें केलेलें दिसतें. खालील पत्र नानासाहेबानें चिटणिसास लिहिलेलें पहा:—

'रा. गोविंदराव गोसावी यांस आशीर्वाद उपरी. तुम्हांस रूबरू खातर जमा केली असतां, स्वामी दिक्कत घेऊन लिहितात, त्यास

तुम्ही खातर जमा करावी. तुम्हांस अंतर दिलें तरी, वडिलांस व श्रीस मानणार नाहीं. पूर्वीपासून महाराजांचे कृपेस पात्र केलें, हे विस्मरण कसें होईल ! वचनाप्रमाणें घडेल. निखालसपत्र द्यावें, हे आशीर्वाद.' ( भा. व. पे. प. या. ले. ५७) पत्रावर मिति नाहीं. कदाचित् तें पेशवेगिरी काढून घेतली त्यावेळचें असू शकेल. बाळाजी बाजीराव प्रधानानें चिटणिसास स्वदस्तुरची यादी करून दिली ती येणेंप्रमाणें:—[ सदर ले ५९ ]. ही यादी रामराजाचे वेळची दिसते.

यादी गोविंदरावाचें कार्य येणेंप्रमाणें आम्हीं करावें.

१ किल्लेकोटांस कर्ज दिलें असेल तें रुजवातीनें मनास आणून सरकारांतून द्यावें. सरंजाम व किल्ले द्यावयाचे करार केले आहेत ते ताकीद हवालीं करावे. हे करार.

२ हातरोख्यामध्यें मजमुदार नवा दाखला करूं इच्छितात, तो करूं देऊं नये. याचा कायदा शाहूमहाराजांचे वेळेस चालत आल्याप्रमाणें चालवावा. करार.

३ राज्यकारभाराचे कार्यासाठीं व मराठे राजापाशीं व्हावयाचे मजकुरासाठीं, जें ज्याशीं बोललें असाल, तें मनास आणून, योग्यायोग्य करून देऊन, गोविंदरावांचें वचन रक्षावें. करार.

४ राजश्रींचे मनांत यांचे ( पेशव्यांचे ) विशीं वाईट आलें असेल, तें सर्व दूर करून राजश्रींची यांची निखालसता, शपथपूर्वक करून द्यावी. करार.

गोविंदराव याणीं आम्हांशीं येणेप्रमाणें वर्तावें.

१ आईसाहेबांचा लगाम मनापासून सोडून, सर्व प्रकारें आमचे राजश्रींचे विचारांत यावें. जें कार्य आम्ही अवलंबूं, त्याचे प्रयत्नांत मनापासून असावें. अंतर करूं नये.

२ हरएक मजकुराची तोडजोड जे बोलणें तें निरवालसतेनें आपले जागां बोलावी. परंतु बाहेर जें करणे तें आमचे विचारास येईल तें करावें. [ वरील नंबर ४ चें कलम येथें पाहिजे असें वाटतें. ]

हा कागद अत्यंत महत्त्वाचा दिसतो. चिटणीस व पेशवे यांनीं एकमतानें एकमेकांची कामे करून पुढील उपक्रम तडीस नेण्याचा हा ठराव आहे. याजवर मिती नाहीं हे त्यास वैगुण्य आहे. उभयतांनीं आपापलीं कलमें ‘ करार ’ म्हणून कबूल केलीं आहेत. रा. ब. साने कळवितात कीं,

‘ गोविंदराव चिटणिसाचा व पेशव्याचा ऋणानुबंध उत्तम तऱ्हेचा होता. साताऱ्याकडील सर्व कारभार पेशवे गोविंदरावाच्या सल्लामसलतीनेंच करीत. पुढें ताराबाईनें तटा माजविला, तेव्हां गोविंदराव पेशव्यांचा मसलतदार असून त्याच्या तर्फेनेंच तो व त्याचा भाऊ बापूजी खंडो ताराबाईच्या विरुद्ध वागले. याबद्दल ताराबाईने पेशव्यांच्या इतर हस्तकांबरोबर चिटणिसांवरही ताशेरे झाडलेले आहेत. निदान नानासाहेबाच्या अखेरीपर्यंत तरी गोविंदरावाचा इतमाम चांगला चालत असे. माहिपतराव चिटणीस हा पेशव्याचा चिटणीस असून तो नानासाहेबाच्या व सदाशिवरावाच्या अंतस्थ सल्लागारांपैकीं एक होता, असे दाखले मिळतात. ’ एकंदरींत चिटणीस व पेशवे या दोन कुटुंबाचा घरोबा चांगला असे. मात्र गोविंदरावास, साम्राज्याच्या मसलतींत म्हणजे हिंदुस्थान, कर्नाटक वगैरे ठिकाणीं व हैदराबादकडे, व मोगलांवर मोहिमा केल्या त्यात पेशव्यानीं सल्लागार केलें नव्हतें. तसेच शाहूच्या मृत्यूनंतर पसतीस वर्षे जिवंत असलेल्या या पुरुषाचे उद्योग यत्किंचित् प्रसिद्ध असूं नयेत, हेंही एक गूढ आहे. शाहूच्या मृत्युसमयीं गोविंदराव तरुणच म्हणजे चाळिशीचे आत होता.

शाहूच्या मृत्यूनंतर काय प्रकार घडला, तें सांगण्यापूर्वी रामराजाचें पूर्ववृत्त येथेंच दिले पाहिजे, म्हणजे वरील विषयाची पूर्तता होईल.

**५ रामराजाचें पूर्ववृत्त.**—ताराबाईनें ह्या आपल्या नातवाला आपल्याच नवऱ्याचें राजाराम हें नाव दिलें. पुढें नवऱ्याचे नांवाचा उच्चार करावयाचा नसल्यामुळे, नांवांत थोडा फरक करून ती त्यास रामराजा असें म्हणूं लागली. रामराजाची आरंभींची हकीकत त्यानें गादीवर बसल्यावर भगवंतराव अमात्यास सनद करून दिली त्यांत व, ताराबाईनें

लिहिलेल्या कित्येक पत्रांत उपलब्ध आहे, तीच भरंवसेलायक समजली पाहिजे. भारतवर्षांत छापलेल्या अमात्यांचे बखरींत किंचित् ज्यास्त खुलासा आहे. तेव्हां त्या त्या कागदांतून उतारे घेऊन ती हकीकत देतों.

'शाहूमहाराजांस समाधान वाटेनासें झालें. त्या काळीं राज्यास अधिकारी कोणी नाहीं. यास्तव संभाजीमहाराजांस बोलावणें पाठविलें असतां आले नाहींत, म्हणोन पांच चार मुलें आणून दत्तक घेणेचा बेत होऊन मुधोजी भोसले नागपुरकर यास दत्तक घेणेचा निश्चय चिटणीस यांचे विचारें ठरला. तेव्हां मातुश्री ताराबाईसाहेब यांनीं समाचारास येऊन सांगितलें, जे तुम्हीं दत्तक मुलगा घेण्याचा निश्चय केला, त्यास आपला वंश प्रत्यक्ष असता परकी कां घ्यावा ? असे म्हणतांच महाराजांनीं उत्तर केलें जे, मला मूल नाहीं; व आबासाहेब यांस मूल नाहीं, व आपल्यास नातू जाहला होता तो वारला. तेव्हा प्रत्यक्ष कोणाचा ? असें म्हणतांच आईसाहेबीं उत्तर केलें जे, शिवाजी माझा पुत्र याचे पोटीं तिघी कन्या; व भवानीबाई गरोदर असतां चिरंजिवाचा काल जाहला. नंतर तीन महिन्यांनीं प्रसूत जाहली. पुत्र जाहला. पन्हाळे मुक्कामीं आबासाहेब यांनीं पुत्र पाहून पुत्रावण करून मुलास जतन करा म्हणून सांगून गेले. नंतर विपर्यास दिसों लागलें, म्हणून मूल वारलें असा बाहणा करून, किल्लेखालीं घालवून दिला. तो मूल थोर जाहला आहे, तो तुमचा आणावा, दुसरा घेऊं नये, असें ऐकून महाराज बोलले जे. मूल वारलें जगप्रसिद्ध आबासाहेबही मुलाकरितां मजपाशीं श्रमी जाहले व मलाही श्रम वाटला. आपण वडील, आज्ञा करितां हें मला प्रमाण वाटतें. परंतु लोकांची खात्री कशी होईल ! त्यावरून आईसाहेब बोलली कीं मी बायको राजद्वाळ असें लोक म्हणतात. त्यास मूल वारल्याचा बहाणा करण्यास, पारसनीस व वाकनीस व काकासाहेब भोसले जितीकर व भवानीबाई यांच्या विचारें असें करावें असें ठरलें. परंतु मूल कोणाचे स्वाधीन करावें ! त्या वेळेस त्यांनीं ठरविलें जे, खासगी चौकीचा

परदेशी रजपूत ( घाशीराम-खं. ८-१८४ ) विश्वासू, त्याची बायको बाळंत जाहली. तिचें मूल वारलें. तिचे स्तनीं दूध आहे. तो देशास जातो; म्हणोन त्याचे तलबेचा हिशेब करून निरोप द्यावा; आणि मूल वारलें असा बाहणा करून त्याचे बायकोचे स्वाधीन करून किल्ले बावडे येथें जाऊन बाजीराव अमात्य यांजपाशीं राहून मुलास संरक्षण करून असावें, असें ठरवून, रजपुताचा हिशेब करून देऊन, उदईक जातो असें, आबासाहेबसुद्धां कळवून दुसरे दिवशीं मुलास अफू ज्यास्त दिली. त्यामुळें चलनवलन राहिलें. दोनघटका रात्रीं मूल वारलें म्हणोन रडारड होऊन, मूल रजपुताचे बायकोचे स्वाधीन केलें. काकासाहेब यांनीं मूल पुरावयास जातों म्हणोन बराबर जाऊन, खळगा उकरवून, त्यांत भाकर १ व कोंबडीं २ घालून पुरवून, रजपुताचे घरीं मूल पोचतें करून माघारे आले. दुसरे रोजीं रजपूत बायको मुलास किल्लेखालीं उतरून बावडेस जाऊन अमात्य यास जाहलेला वृत्तान्त सांगून, पांच वर्षे तेथें राहून मुलाचें संरक्षण अमात्यपंतांनीं केलें. हें वृत्त जिजाबाईस कळलें. चौकशी होणार हें आम्हांस व अमात्य यांस कळलें. यावरून खालीं कोंकणांत दोनवर्षे मुलासह रजपूत होता. नंतर रजपूत याची बायको वारली. नंतर रजपुतानें पानगांवीं कृष्णाबाई वडील बहीण ( दर्याबाई निंबाळकर ) यांपाशीं [ ता. २६ जानेवारी १७४५ नंतर ] मुलास नेऊन ठेविलें. पुढें दोन वर्षांत तो रजपूत मेला. सांप्रत कृष्णाबाईजवळ मूल पानगांवीं आहे. मूल वारल्याचें जगप्रसिद्ध झालें. या प्रकारें मुलाचें संरक्षण केलें आहे. म्हणोन आईसाहेब यांनीं लिहून दिल्हें. त्यावरून महाराजांनीं विचारिलें जे, यांपैकीं कोण मेले व कोण आहेत ? आईसाहेबांनीं उत्तर केलें जे, बाजीराव अमात्य आहेत. तेव्हां महाराज बोलले कीं अमात्यांनीं येऊन माझे हातावर श्रीकृष्णेचें उदक घालावें; म्हणजे माझी खात्री होईल आणि तो मूल राज्याचा धनी आहे, दुसरा मूल दत्तक घेणेंचें कारण नाहीं. त्यावरून भगवंतराव रामचंद्र अमात्य ऊर्फ बाजीराव

यांस सातारेहून आज्ञापत्र पाठवून घेऊन गेले. महाराजांस समाधान बहुतच वाटेनासें जालें. म्हणोन, अमात्य यांस आईसाहेबांनीं मुलाविषयींचा मजकूर सांगितला, तो महाराजांनीं अमात्यास सांगितला. अमात्य यानीं मजकूर वास्तविक आहे, म्हणोन विनंति केली. तेव्हां शाहूमहाराजांनीं आज्ञा केली जे, तुम्हीं कृष्णेचें उदक हातावर घालावें. अमात्य यांनीं मान्य केलें. आपल्यास समाधान नाहीं; सबब जगजीवन परशराम प्रतिनिधि यांस बरोबर देऊन संगमीं पाठविलें. अमात्य यांनीं हा मजकूर वास्तविक आहे, म्हणोन उदक प्रतिनिधि यांचे हातावर घातलें. हे वर्तमान तंवपावेतों गोविंदराव चिटणीस यांवांचून दुसरे कोणास माहीत नाहीं. ते समयीं सकवारबाईस वर्तमान कळलें, तेव्हां प्रतिनिधि व यमाजी शिवदेव यांस धनीणसाहेब यांनीं नेऊन मसलत केली; आणि आईसाहेब याचा नातू दत्तक घेऊं देऊं नये, करवीरकर यांचे घरीं राज्य जातें, या मसलतींत गोविंदराव चिटणीस आहेत, ते पेशवे यांचे लक्षानें वागतात, यास्तव तुम्हीं सरकार लक्षानें वागोन, रघूजी भोसले यांचा मूल मुधोजी आणोन दत्तक घ्यावा, दौलतीचें काम तुम्हीं चालवावें, असें ठरलें. हें वर्तमान महाराजांस कळले. नाना पेशवे व महादेव पुरंदरे व गोविंद खंडेराव चिटणीस यांस बोलावून सविस्तर दौलतीचें वृत्त सांगोन, बायको वेडी जाहली, ही मसलत करूं नये, आईसाहेबांचा नातू आणावा, आमचा काल समीप आला, यास्तव जलद मूल आणावा, असें सांगोन दौलतीचा बंदोबस्त प्रधानाचे हातें करविला. मूल आणावयास पाठवावें इतक्यांत महाराजांनीं कैलासवास केला. नंतर पेशव्यांनीं चिटणिसांस हाताखालें घेऊन, वाड्याचा व शहराचा बंदोबस्त करून, दादोबा प्रतिनिधि ऊर्फ जगजीवनराव यांस व त्यांचे मुतालिक यमाजी शिवदेव यांस कैद करून, सकवारबाईसाहेबांचे पुढें करंडा सदाशिव चिमणाजी[१] यांनीं ठेविला. सकवारबाईसाहेब यांनीं कुंकू

१. हें खरें नाहीं. सदाशिव चिमणाजी मागून ६ दिवसांनीं २० डिसेंबर रोजीं पुण्याहून सातान्यास आला.

लावून घेऊन माहुलीसंगम कृष्णातीरीं सहगमन केलें. नंतर पेशव्यांनीं पानगांवास बापूजी खंडेराव चिटणीस, धोंडो अनंत ऊर्फ रस्तुमराव वाकनीस, व पुरंदरे यांस पाठवून बराबर पांच हजार फौज दिली. तेथें जाऊन कृष्णाबाई निंबाळकर सुद्धां रामराजे यांस वर्ये नजीक सातारा येथें घेऊन आले. पेशवे सहवर्तमान मंडळी जाऊन दर्शन घेतलें. सुमुहूर्तें आईसाहेबांची भेट विधिपूर्वक करविली. नंतर शहरांत घेऊन आले. ते समयीं सर्व मानकरी आतविषयी स्वजाती एक होऊन आईसाहेबांस विनंति केली, महाराज, आपण व अमात्य बावडेकर मिळोन केलेलें आम्हांस माहीत नाहीं. श्रीकृष्णेचे उदकावर हात ठेवावा; आणि राजारामसाहेबांस घेऊन एक ताटीं भोजन करावें. म्हणजे सर्वांचा खात्री होईल. याप्रमाणें पेशवे यांचे विद्यमाने सर्वांची खात्री केली. नंतर व्रतबंध होऊन सिंहासनाधीश्वर व्हावें असें ठरलें. तेव्हां प्रतिनिधि पुरंदरावर कैदेंत होते, त्यांस आणवावें म्हणोन, विनंति आईसाहेबास केली जे, प्रतिनिधि व यमाजी शिवदेव हे राज्याचा बखेडा करणार, यास्तव दुसरेस पद देण्याविषयीं हुकूम व्हावा. त्यावरून मातुश्रीची आज्ञा जे, तुमची मर्जी प्रतिनिधीस आणावयाची नाहीं, तर श्रीपतरावांनीं कृष्णाजीपंताचा पुत्र भवानराव आपल्यास दत्तक घेणेस आणविला होता, त्या काळीं चिरंजिवांचा रुकार पडला नाहीं, सबब माघारे पाठविले. त्यास आणवून प्रतिनिधि पदाचीं वस्त्रें द्यावीं; म्हणोन आज्ञा जाहली. त्यावरून गोपाळ महादेव पेंढारकर विशाळगडास पाठवून भवानरावास सातारेस घेऊन राजारामसाहेबांस शके १६७१ पौष शु॥८ स (४ जानेवारी १७५०) तक्तारूढ केलें. तेव्हां भवानराव यांस प्रतिनिधि पद देऊन नांव श्रीनिवासराव ठेविलें. यमाजी शिवदेव याचे पुतणे वासुदेव यास मुतालिकी दिली. दादोबाची सुटका होई पर्यंत हा भवानराव प्रतिनिधि होता. पिढीजाद कामें चालविण्याचें बीज किती खोल गेलें होतें हें या उदाहरणावरून स्पष्ट होतें. असो.

---

१. भा. व. पु १ अ. या. केफियत पृ. १८–२१.

उपलब्ध हकीकतींत सर्वांत ज्यास्त तपशीलवार अशी ही हकीकत असल्यामुळें प्रथम दिली आहे. यांत भर आतां दुसऱ्या कागदांतून घालून पूर्तता करतां येईल.

रा. खं. ८ ले. १६९ त कांहीं ज्यास्त माहिती आहे, ती अशी. हा ले. स. १७४५ त लिहिलेला नसून तो शाहूच्या मृत्यू पूर्वी थोडे दिवस लिहिला असावा, असें रा. वा. वि. जोशी यांनीं इ. स. त [ पु. ८ अं. १ ] प्रतिपादन केलें आहे, तें सयुक्तिक दिसतें. या पत्रानें समस्त प्रधानांस व सरदारांस ताराबाई आज्ञा करते, आणि रामराजास आणण्याचें कामीं साह्य करण्यास सांगते. ताराबाई लिहिते. ‘ शिवाजीराजे यांसि संतान सौ. पार्वतीबाई यांसि दोघे पुत्र जाहले. त्यांपैकीं पहिला पुत्र क्रमला. दुसरा पुत्र त्यासी देवी सगर्भ होती. प्रसूत झाली. त्याचा फेर मोबदला करून हा मूल देवीच्या स्वाधीन केला. पालग्रहण करविलें. सौ. भवानीबाई सगर्भ होती, त्यानंतर चिरंजिवास देवी येऊन कालवशें समाप्त झाले. समागमें पार्वतीबाईनीं सहगमन केलें. त्यांचा पुत्र देवीच्या स्वाधीन केला तो अद्यापवर तिजपाशीं सुखरूप आहे. भवानीबाई पोटिसी होती, ती प्रसूत जाली, पुत्र जाला, तो संभाजीराजे व राजसबाई यांनीं कपटबुद्धि करून मारिला. त्याउपरि उभयतां चिरंजिवांचा विवेक होऊन शाहूराजे यांजपाशीं आपणास राहवें लागलें. देवी व मूल समागमेंच होतीं ( कोठें ? ), परंतु ते समयीं यांणीं त्यासि पळवून समागमें आले. त्यानंतर शाहूराजे यांणीं आपणास दोन चार वेळां पृच्छा केली, पुढें वंशाचा विचार कसा आहे. परंतु आपण अंत न देतां उडवाउडवी केली. त्यावरी उत्तर दिलें कीं, गोत्रजाचा तुम्ही पुत्र घ्यावासा काय आहे, श्रीमहादेव तुम्हांस पुत्र देईल, इतक्यांच त्वरा करावीशी नाहीं. त्याउपरी ते गोष्ट तशीच राहिली. चिरंजिवांचा मनोदय निःसंशय आपणास कळला नाहीं, ऐसें पाहोन स्त्रीलोभें, धनलोभें, राज्यलोभें विसर पडोन कालहरण केलें. समयपरत्वें उद्भव होणें

ते समयीं होईल हा भाव चित्तीं आणून, हा काळपर्यंत गुप्पच राहिलों. पुढें वृद्धापकाळ, देशकाल वर्तमान न कळे, मुलास सतरा अठरा वर्षें होत आलीं, मागें पुढें कोणी खरें लटकें म्हणतील, याजकरितां बाळ्यांतील मूल राणोजी माने व शिवाजी खांडेकर यांजबरोबर पत्रें व वस्त्रें देऊन बाजीराव अमात्य शहाणा आहे, त्याजकडेस पाठविलें, आणि येविशींची आज्ञा त्यास केली आहे. युक्तिप्रयुक्तीनें हे आपणाजवळी आणवून तुम्हांस लिहून व सांगून पाठवितील त्याप्रमाणें, सर्व गोष्टींस साह्य होऊन कार्य करणें. यासी एकंदर हेगै न करणें. राजबीज खरें, हें राजश्री उपाध्यांस व आपा प्रतिनिधि व चिंतो महादेव आदिकरून सर्वांस दखल आहे यानंतर शाहूराजे यांणीं या गोष्टीची पृच्छा भगवंतरायांस वेगळे वाटेनें केली. रायांनीं इकडील आधारें उत्तरप्रत्युत्तर करणें तें केलेंच. चिरंजीवांनीं रायांसी आज्ञा केली जे, तुम्हीं याचा शोध जे युक्तीनें होईल ते प्रयुक्तीनें करणें. ऐशासि तुम्हीं सर्वांहीं राव मशारनिल्हे यांचें सर्वविशीं सारथ्य करून मुलास ठिकाणीं आणवणें, म्हणजे आज्ञा करणें ते केली जाईल. लग्नमुहूर्ताचा प्रसंग होणें आहे, त्यास राजश्री संताजी मोहिते व नागोजी घाटगे यांच्या संमतें पुढें करणें.'

रामराजा जन्मापासून अज्ञातवासांत वाढला. त्यास मारण्यासाठीं प्रथम जिजाबाई व पुढें सकवारबाई टपलेल्या होत्या. परंतु तो कोठें आहे, हें ठाउक नसल्यामुळें त्यांचा उपाय चालला नाहीं. एकदां तो बावड्यास आहे, असा सुगावा लागल्यावरून जिजाबाई बावड्यावर चालून गेली, पण त्या वेळीं रामराजास घांटाखालीं पळवून लपवून ठेवण्यांत आल्यामुळें त्याचा जीव बचावला. ताराबाई साताऱ्याहून केव्हां तरी गुप्तरूपें विश्वासू माणूस पाठवून त्याचा समाचार घेई. रामराजाची ही स्थिति ताराबाईनेंच शाहूमहाराजांस कळवून त्याजकडे त्यांचें लक्ष वेधिलें. पुढें शाहूमहाराजाचा विचार रामराजास गादीवर आणण्याचा चालला आहे असें समजतांच, सकवारबाईनें रामराजास नाहींसा करण्याचीं

कारस्थानें चालू केलीं. शाहूस तिचा स्वभाव ठाऊक असल्यामुळे त्यानें ताराबाईच्या कानांवर हीं कारस्थानें घालून तिला सावध केलें, तेव्हां गोविंद खंडेराव चिटणीस यास बावड्यास पाठवून रामराजास तेथून काढून मोगलाईंत पानगांवास,त्याची मावशी होती तिजकडे पाठविण्याची तजवीज केली. यासंबंधानें ताराबाईनें खालील पत्र भगवंतराव अमात्यास लिहिलें. 'तुम्हाजवळ रामराजे आहेत अशी सकवारबाईस बातमी समजली आहे, म्हणून चिरंजीव शाहू बुवा यांनीं सूचना केली. त्यास रा. गोविंद खंडेराव चिटणीस यांचें व तुमचें बोलणें झालें, तें आम्हास व शाहू बावांस सविस्तर सांगितलें. त्यास त्यांणी व तुम्हीं मनसुबा केला कीं, चिरंजिवास पानगावीं चि. सौ. दर्याबाई निंबाळकर याचे स्वाधीन करून तुम्ही महायात्रेस जावयाचे उद्देशानें निघोन निरोपास म्हणून यावें, तदनंतर जो विचार जाहला आहे, तो होईल. तेथें तूर्तकाळीं संचार फार जाहला त्यास हल्लीं राजश्री भगवंतराव नरहरी पाठविले आहेत, व लखनपुर तर्फ पानगावीं चिरंजिवास पाठवितों. वरकड चि शाहूबावांनीं तुम्हांस वचन देऊन पत्रही तुम्हास दिल्हें आहे. याजकरितां बहुत सावधपणें चिरंजिवाची रवानगी करणें. जाणिजे माहे मोहोरम सु॥ खंमस आर्बैन मया व आलफ ( जानेवारी १७४५ ). '
वरील पत्रांत उल्लेखिलेलें शाहूचें भगवंतराव अमात्यास पत्र गेलें तें असें. 'चि. रामराजे बावडयास तुम्हांजवळ आहेत; म्हणून काकीसाहेबानीं स्वामीजवळ सांगितलें. त्यावरून आम्ही भगवंतराव नरहरी दप्तरदार दि॥ मजमू यासी पाठविलें. त्यांनीं तुमची भेट घेऊन चिरंजिवास पाहून आले. सकल अर्थ कळविला त्यांचें तुमचें बोलणें होऊन रा. शिवरामपंडित यास गुप्तरूपें तुम्हीं येथें पाठविलें आहे त्यास तीर्थस्वरूप मातुःश्री साहेबांचे विद्यमानें रा. गोविंदराव चिटणीस याणें भेटोन दोन तीन वेळां त्यांशीं बोलणें ठरविलें. त्याप्रमाणें चिरंजिवास पानगांवास पाठवून द्यावे, तिकडेही सूचनेस भगवंतराव दप्तरदार पाठविले जातात येथून तुम्हांकडे शिवरामपंडित यांसी व मग गोविंदराव यासी पाठवावे, असें ठरलें आहे. त्यास

मागाहून पाठविले जातील. भगवंतराव दप्तरदार यांसी पानगावींहून नेहमीं इकडे व तुम्हांकडे येण्यास जाण्यास आज्ञा केली आहे. सौ.वती शिवरामपंताची स्त्री दुर्गाबाई यांणीं रामराजास फार फार जपून संरक्षण केलें, म्हणून कळलें, त्यास दुर्गाबाईस साडीचोळीबद्दल कऱ्हाड येथील देशमुखीचें वतन स्वामीचें आहे, तें तिजला इनाम करून चालविलें जाईल. कोणेविशीं संशय न धरणें. स्वामी तुमचें ऊर्जित करतील. ' [ता. २६ जानेवारी १७४५]. ( खं ८. १७० व १७१ ).

मृत्यूपूर्वी रामराजास आणून आपल्या देखत राज्यावर बसवावा, असा शाहूचा विचार प्रथम असावा; परंतु सकवारबाई त्यास अपाय करील सबब तूर्त आणूं नये, असें थोडे दिवस पूर्वी चिटणिसानें किंवा पेशव्यांनीं वगैरे ठरविलें असावें, असें खालील पत्रावरून दिसतें. हें पत्र स. १७४९ च्या नोव्हेंबर डिसेंबरांतलें आहे. ' पाणगांवामध्यें राजा असे. तो निघोन सप्तऋषीस ( सातारयास ) येत असे. त्यास हें वर्तमान आपणास विदित आहे कीं नाहीं कळत नाहीं. यावें यामध्यें उत्तम नाहीं. मातुश्री सकवारबाईचा मजकूर तर आपणास विदितच असे. त्या चिंतितात जे, एक वेळ आपले हातीं यावा, मग ईश्वर आहे. महाराजांच्या चित्तांतील शोध घ्यावा, तर तूर्त समाधान नाहीं, वास्तव धनीण जवळ असे, बोलतां येत नाहीं. बरे जाहलेवर चित्तांतील शोध करून लिहून पाठवितों. तंवर उतावळी करून आणाल तर न आणणें. येथें आलेवर परिणाम बरा नाहीं. तुम्ही सुखरूप राहणें. राजश्री बरे जाहलेवर आम्ही निरोप घेऊन येतों, मग आपले चित्तामध्यें जावयाचें असेल तर निरोप देऊं. परंतु तुम्ही तूर्त आहे ऐसाच असो देणें. तुम्ही तेथेंच राहणें. खर्चावेचाविशीं रा. जानोजी पवार यांस लिहिलें असे ते देतील. सकल वर्तमान शिवाजीपंत ( खांडेकर–वर खं० ८–१८३ पहा ) लिहितील. पत्र फाडून टाकावें. ' हें पत्र गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं चिटणीसपेशव्यांनीं सकवारबाई शाहूजवळ नाहीं, अशी संधि काढून; सकवारबाईचीं कारस्थानें शाहूच्या कानांवर

घातली आणि त्याचा मनोदय विचारून घेतला. तेव्हांच शाहूनें या विश्वा-सांतील मंडळीच्या साह्यानें रामराजास तूर्त न आणितां, आपले पश्चात् आणावा, असें ठरविलें; आणि या आज्ञेस लेखी आधार असावा, म्हणून वर दिलेल्या स्वहस्ताच्या दोन यादी मृत्यूपूर्वी कांहीं दिवस लिहून पेशव्यास दिल्या असल्या पाहिजेत. अर्थात् त्या यादीही मृत्यूपर्यंत गुप्तच ठेविल्या असाव्या. कदाचित् सकवारबाईचें सतीजाणें शाहूनेंच ठरविलें असेल काय ?

स्वतः रामराजानें आपली पूर्वपीठिका, राज्यारोहणानंतर सुमारें दोन महिन्यांनीं अमात्यांस मज्मूची सनद देऊन शाहूनें दिलेलीं वचनें पूर्ण केलीं त्यांत, संक्षेपानें दिली असून ती वाचण्यालायक आहे. ‘ पन्हाळ्यास तीर्थरूप नजरबंद असतां आमचा जन्म झाला, ते काळीं वडिलांनीं आम्हांस शिवरामपंत यांचे स्वाधीन केलें. त्यांनीं पंधरा सोळा वर्षें पुत्रापेक्षांही लोभ करून संगोपन केलें. तेथें बोभाट होऊं लागला, याजकरितां पान-गांवी पोचविलें. तेथें व तुळजापुरीं हा काळपर्यंत अज्ञातवास क्रमिला. हल्लीं आबासाहेब यांनीं सातारियाचे मुक्कामीं आणून प्रगट करावयास तुम्हांस ( भगवंतराव ) अमात्यास शिराळ्याहून आणिलें. तों त्यांचे शरीरीं स्वस्थ नाहीं. आरोग्य झालियावरी प्रगट करावें, इतक्यांत कैलासवास जाहला. हल्लीं मातुश्रीसाहेबीं बाळाजीपंत प्रधान व गोविंदराव चिटणीस यांस आज्ञा करून आम्हांस आणोन, सिंहासनारूढ करून लग्न केलें. इ०.’ [ इ. सं. पे. द. मा. ले. ४४ ].

भगवंतराव अमात्यास रामचंद्रपंताप्रमाणें राज्यकारभारांत प्रमुखपण मिळविण्याची मोठी हाव होती, परंतु पेशव्यापुढें त्याचें कांहींच चालेना, आणि रामराजा सर्वस्वी पेशव्याचेच तंत्रानें चालूं लागला, तेव्हां त्यासून भगवंतरावानें त्यास स्वतः धनीपणा गाजविण्याचा ठासून उपदेश एका पत्रांत केला आहे, त्यांत खालील वाक्यें आहेत. ‘ साहेबांस बावड्यासी नेलें. पाळणपोषण केलें. दहा बारा वर्षें जाहलीं, तेथें आम्हावरी राजा शंभूची इतराजी जाली. सौ जिजाबाई चालोन आली. ते समयीं घासी-

राम परदेशानें व बायकोनें आम्हांस नकळत साहेबांस पळवून घाटाखालीं नेलें. तेथून चौऱ्यायशींचे फेरे फिरत घिरट्या घेत तुळजापुरास गेले. तेथें थाग आम्हांस लागला. नारोजीबावा आराधी याचा सहवास आला. तेथें राहणें जालें. श्रीतुकाबाईनें दया केली. ते समयीं साहेब पाणगांवास आले. बाईचा सहवास जाला. मुलकांत पुकारा होऊन राजाशाहूपर्यंत चहूंकडे नांव गाजलें. यामुळें आम्ही बावडियाहून श्रीसुंदरीचे यात्रेस आलों. साहेबांकडे पत्र लेहून मातु:श्रींचे आज्ञेप्रमाणें भुजंग हुजरे व रा. एस ठाकुर व बहिरजी पडवळ वस्त्रें देऊन पाठविले. मुबलग मातुश्रीमुळें साहेबांचें जालें. आईसाहेबांमुळें राज्यपदावरी स्थापना जाहली, ती एकी-कडे राहून साहेब दुसऱ्याचे मायेस गुंतले. धनलोभास मोह पावले. मातुश्रींची उपेक्षा केली, ही ईश्वरास न माने. येणेंकरून राज्यास अपाय आहे. साहे-बांस राज्यपदावरी बसोन एक वर्ष जालें. मातु:श्री नलगेत ऐसा मोहो घालून दुष्टांनीं कपटविद्या करून मातापुत्रांस अंतर पाडिलें. राज्य म्हणजे बुद्धिबळाचा डाव आहे. बुद्धीकरून जिंकिला पाहिजे इ० [खं.८ले.१८४].

स. १७२६ च्या मार्च, एप्रिलांत बाप वारला, त्यापूर्वी थोडे दिवसां-तला राजारामाचा जन्म. त्याचीं पहिलीं दोन तीन वर्षें पन्हाळ्यावर गेलीं. नंतर पंधरा सोळा वर्षें बावड्यास गेलीं. स. १७४५ च्या जाने-वारी नंतर त्याची तुळजापुरावरून पानगांवास रवानगी झाली. म्हणजे राज्यारोहण समयीं रामराजाचें वय तेवीस वर्षांचें असलें पाहिजे. जन्मा-पासून सर्व कारभार गुप्तपणाचाच असल्यामुळें प्रत्येक प्रसंग केव्हां घडला, हें सांगणें शक्य नाहीं; आणि याच कारणास्तव निरनिराळ्या लेखांत लेख-काच्या माहितीप्रमाणें तपशिलाची थोडीबहुत तफावत आहे. रामराजाचें अस्तित्व फारच थोड्यांस माहीत असल्यामुळें, राज्यारोहणाचे पूर्वी त्यास स्वतःचे ताटांत भोजनास घेऊन प्रमुख मराठमंडळाची खात्री ताराबाईस पटवावी लागली. ताराबाई मोठी कारस्थानी बायको, वाटेल तें उलट सुलट करण्यांस मागें पुढें पाहणारी नव्हे, अशी त्या वेळीं सुद्धां शाहूची व मराठ-

मंडळाची तिच्याबद्दल समजूत होती, म्हणूनच कृष्णेचें उदक घेऊन सत्य करणें किंवा एका ताटांत जेवून घांस देणें, इत्यादि प्रकारांनीं तिला लोकांची खात्री पटवावी लागली. इतकें करूनही पुढें नऊ वर्षांनीं आपल्या या कारस्थानापासून आपणास काहींच लभ्यांश न होतां पेशव्यांनींच सर्व कारभाराचा आटोप केला असें पाहून, रामराजा खोटा, ही वस्तु खरी नाहीं, असें बेधडक ताराबाईनें लिहून दिलें, तो कागदही मौजेचा असल्यामुळें खऱ्या खोट्याच्या निर्णयासाठीं येथेंच देणें अवश्य आहे. पेशव्यांनीं व्यंकोजी नानाजी या समागमें ताराबाईशीं समेट करण्याची याद पाठवून दिली, तिला हें ताराबाईचें कलमवार उत्तर आहे.

१ "चिरंजीव कैलासवासी जाल्यावर साहेबांनीं आम्हांस खावंद करून दिला. जो देव वडिलांनीं करून दिला, त्याची पूजा आम्ही करूं लागलों," म्हणून अर्ज लिहिला, ऐशास याचा विचार तुम्हांसही कळून गेलाच आहे. प्रथम दिवशींच श्रीकोटेश्वरीं[1] साहेबांची स्वारी नेली, तेव्हां भीऱ्या देवाळयांत पुराणिक व गोपाळराव यादव व गोविंद खंडेराव व बापूजी खंडेराव चिटणीस यांच्या दुवर्गाच्या साहेबींत (?) तत्क्षणींच आज्ञा केली कीं, 'ही वस्तु खरी नाहीं. वंशास डाग लागतो, तेव्हां दूर करणें; चौघांनीं अर्ज केला कीं आतां समय 'नाहीं' म्हणावयाचा नव्हे. घात होतो. याप्रमाणें साहेबांच्या (ताराबाईच्या) बुद्धीस भ्रंश करून तो समय या प्रकारें संपादिला. साहेबांचे मानसीं कित्येक क्षणींच तुम्हांस समक्ष बोलावून हे आज्ञा करावी, तों मध्यस्थ कारभारी यांचे चित्तीं कीं समक्षता होऊं न द्यावी हें मानस; त्यावर दुसरा प्रकार प्रायश्चित्त आरंभिलें, तेव्हां साहेबीं आज्ञा निरोपिली कीं पुर्ता शोध होऊं द्या, मग हा विधि करणें. हेंही कोणाच्या चित्तास नये. तोही विधि केला. त्यानंतर मुंजीबंधन व शरीरसंबंधाच्या निकडी होऊं लागल्या. ते समयींही आज्ञा करीतच गेलों कीं, स्वग कार्याची नाहीं. कार्यभाग न समजेत. ऐसी वर्तणूक करून अपभ्रंशी

१ कोटेश्वर हें सातारा येथें शंकराचें प्रसिद्ध मंदिर शुक्रवार पेठेंत आहे.

पाडिलें. गोतपत आरंभिली. तेव्हां साहेबीं व रामाऊ भोसली यांनीं एकंदर तट केला कीं, हें काय करतां ? ते वेळेस मराठे यांनीं तरी विचार करावा, तर त्यांस ताकीद तुमची, सर्वांनीं भिडेस्तव कर्दम केला. आतां तुम्हीं तो आश्रय धरून, खरें खोटें प्रत्ययास आणून द्यावें, ऐसा दुराग्रह करून, अभिमानांत पडून, हा पर्याय पुढें आणून विनंति लिहितां तर तुमचा या पक्षीं अभिमान पूर्ण असतां, मराठे निर्दोष खोटें ऐसें म्हणूं शकतात कीं काय ? तुम्हींच याचा विवेक चित्तांत आणून भोसल्यांच्या वरदी राज्यास व वंशास डाग न लागो हें करावें ! हें तुम्हां मंत्रियांस उचित आहे. खामखा दुराग्रहच करून, येथील अमर्यादाच करावी, हाच निश्चय पुरता धरिला असला, तर बेरड महार मांग शहरांत घातले आहेत ते अन्योन्य वर्तणूक करितात, यांतच तुमची मातबर सेवकाची कीर्ति असली तर हेंही उत्तमच आहे. मागें पुढें जनास बोलावयास जालें जे तख्ताची मर्यादा ऐशी घडोन आली. साहेबाच्या मानसीं कीं वंशास डाग लागून राज्यभार करावा, हें किमपि घडणार नाहीं. इह लोक आणि परलोक उत्तम असेल तेंच व्हावें. मानवी देशास दुराग्रह नसावा. कोणतेही गोष्टीची शाश्वत नाहीं ऐसें चित्तांत आणून, उत्तम मार्ग असेल तो करावा, यांतच निर्दोष आहे. हा खोटासा परिच्छिन्न तुमचे चित्तीं कळलाच आहे. इतःपर, संशय न धरणें. खरें आहे तेंच सर्वथा करावें, विलंबावर न टाकणें. छ ७ रमजान सुा समान खमसेन मया व आलफ, " ( १५ मे १७५८, इ. सं. ). या पत्रांत दुसरीं कलमें आहेत त्यांचा विचार यथास्थळीं होईल.

शाहूच्या मृत्यूनंतर मराठशाहीचें रूपांतर झालें, त्य तील न्यायान्याया-संबंधानें अद्यापि महाराष्ट्रांत तीव्र मतभेद चालू असल्यामुळें ह्या प्रकरणाचे उपलब्ध कागद मुद्दाम थोडक्याशा विस्तारानें दिले आहेत, त्याजवरून ज्यानें त्यानें आपलें मत बनवावें, हें बरें. राज्यव्यवस्थेसंबंधानें पेशव्याचे मनांत प्रथम कोल्हापुरच्या संभाजीसच गादी द्यावी असें होतें. पुढें ती

गोष्ट शाहूस पसंत न होऊन भोसले कुळांतील मुलें शाहू हुडकूं लागला, तेव्हां ताराबाईनेंच रामराजाच्या अस्तित्वाची गोष्ट पुढें आणिली, आणि अनेक खटखटी करून कृष्णेची शपथ व घांस देणें घेणें वगैरे प्रकार होऊन असेरीस त्यास गादीवर आणिलें. असें असतां वरील पत्रांत ताराबाई काय म्हणते पहा. स. १७५८ त रामराजा खोटा, वंशास डाग लागला, लोकांनीं तिच्या बुद्धीस भ्रंश केला, असले शब्द ती लिहिते आणि पेशव्यास शिव्या-शाप देते. अशा स्थितींत न्यायान्यायाचा निर्णय ज्याचा त्यानेंच करणें योग्य आहे. ताराबाईनें आपल्या वर्तणुकीनें मानवी स्वभावाचा एक अपूर्व मासला इतिहासांत कायमचा नमूद करून ठेविला आहे, यांत संशय नाहीं. ताराबाईनें पाठीमागून कांहीं म्हटलें तरी राज्यारोहणप्रसंगीं सर्व मराठमंडळानें रामराजाच्या खरेपणाबद्दल तिच्याकडूनच आपली पूर्ण खात्री करून घेतली होती; आणि झालेला प्रकार नऊ वर्षांनंतर बदलणें शक्य नव्हतें.

एकंदरींत शाहूनें मृत्यूपूर्वी, दत्तक पुत्र न घेतां, रामराजासच गादीचा वारस करावा हा पुष्कळ दिवस मनांत घोळत असलेला विचार कायम करून, तदनुसार आपली इच्छा स्वहस्तलेखानें पेशव्यास ठरवून दिली. रामराजा गादीचा मालक झाल्यास ताराबाईच्या हातांत सर्व अधिकार जाऊन आपणास कैदेंत राहवें लागेल, हें मोठें भय सकवारबाईस होतें. आपणास व संभाजीस पुत्र नाहीं; व होण्याची आशा नाहीं, रामराजाची स्थापना केली तर त्यास संतति होऊन वंशपरंपरा कायम राहण्याचा संभव आहे; आणि गादीवर वास्तविक हक्कही त्याचाच आहे; त्यास एकीकडे सारून दुसराच कोणी दत्तक घ्यावा, तर आपण मेल्यानंतर रामराजास हातीं धरून कोणी बलिष्ठ सरदार अगर परकी सत्ताधीश राज्यांत बखेडा करतील, याजकरितां रामराजासच गादी द्यावी, असा शाहूचा विचार ठरला. बिचाऱ्या रामराजाचे ग्रह मात्र त्यास मुळींच अनुकूल नव्हते, असें दिसतें. त्याचें पहिलें आयुष्य हालविपत्तींत व अज्ञातवासांत व पुढें गादीवर आल्यावर कैदेंत गेलें. तो प्रकार पुढें सांगण्यांत येईल.

# प्रकरण एकुणिसावें.

## शाहू छत्रपतीची योग्यता.

१. अंत्यक्रिया, सकवारबाई सती, ( १५-१२-१७४९ ).
२. रामराजाचें राज्यारोहण ( ४-१-१७५० ).
३. शाहूची योग्यता, व्याप व कर्तबगारी.
४. तत्कालीन लेखकांचा अभिप्राय:—
१ विद्याभ्यास, २ दिनचर्या, ३ कुटुंबपरिवार, ४ लोभांतील मडळी, ५ स्वभाव, राज्यकारभार.
५. शाहूनगराची स्थापना.
६. मराठशाहीचें रूपान्तर, रा. खरे यांची चिकित्सा.
७. मराठशाहीचें रूपान्तर, रा. राजवाड्यांची चिकित्सा.
८. राजवाड्यांच्या विवेचनांतील दोष.
९. पेशव्यांस प्रमुखपण येण्याचें कारण.

**१. शाहूची अंत्यक्रिया, राणी सकवारबाईचें सती जाणें.**— मार्गशीर्ष व॥ ३ भृगुवारीं पुष्यनक्षत्र, शके १६७१ शुक्ल संवत्सरीं सकाळीं चार[1] घटका दिवसास विष्णुलोकवास केला. सर्व जनांस दुःख जाहलें. मनुष्यमात्र लहान थोर दासदासी पदरचे त्यांचा बाप, प्रतिपालनकर्ता, तें दुःख स्मरून क्लेश जाले, ते लिहावयास असमर्थता आली. कारण असा प्रभु दयावंत दुसरा जाला नाहीं. धन्याचे राज्यांत अपराधी झाला तरी, ' हत्यारें करून घ्या, ' परंतु ' मारा ' असा शब्द त्याचे मुखीं आला नाहीं. अजानुबाहु, आजातशत्रु, पुत्र-मित्र-अरी एकरूप व्यवस्थेनीं वागवावयाचे. कोणास गैर भाषण केलें नाहीं, असा पुण्यश्लोक राजा निधन

१ [ ना. सा. रो. १-१२३ व रा. श. ]

पावला. ते समयीं राव व पंत सर्व लहान थोर जाऊन बसले. एकच हाहाःकार जाला, तेथें यांणीं लोकांस किती समजावून सांगावयाचें. अशा आकांतीं ताराबाई, राजारामसाहेबांची स्त्री, शाहूमहाराजाची चुलती, कैदेत ठेविली होती, तो पहावयास आली. परंतु रायाने (गोविंदराव चिटणिसानें) तितक्यांत त्यांजवळ जाऊन विनंती केली कीं, ' महाराज, आपण धनी, आणि हा प्रसंग पाहूं नये, असें सर्वांचे मनोदयांतून, याजकरिता विनंति करितों, तर आपण आपले ठिकाणीं चलावें, तेथें आज्ञा करावी, जशी आज्ञा होईल, तसें करण्यास नीट पडेल. ' असें बोलून तेथे नेऊन बंदोबस्त केला आणि पुढें कसें करावें म्हणोन विचारिलें. त्याचे उत्तर त्यांणीं केले कीं, ' सकवार राहिल्यास राज्याचा डोहाणा करील, राज्य बुडवील, कोणाचे पाय भुईस लागूं देणार नाहीं, याकरितां बरोबर राहील तर फार चांगलें, सहगमनाचा विचार कळेल तसा तिने करावा, मग पुढें विचार करणें तो करावा, करवीराहून संभाजीस आणावयाचें सर्वांचे सल्लेस येणार नाहीं, आणि मीही सल्ला देत नाहीं. माझे सुनेचा मुलगा पानगावांस आहे त्यास आणून गादीवर बसवावा, दुसरें काय. ' याप्रमाणें आज्ञा आल्या नंतर पंतास ( नानासा०स ) येऊन झालेला मजकूर ( चिटणिसाने ) सांगितला. नंतर प्रतिनिधि, अक्कलकोटकर, दाभाडे, राजाज्ञा आदिकरून लहान थोर एक विचारें मनसोबा ठरला, कीं ' सकवार बाईसाहेबांस सती घालवावी, न जातील तर बळें न्यावी, महाराजांमागें दुर्लौकिक बखेडा करितील; मग विचारीं पडावें, नीट नाहीं, आतांच शेवट केला पाहिजे. ' नंतर बाईचे भाऊ चांगले थोर माणूस शहाणे होते, त्यांस बोलावून आणिलें आणि ' तुम्ही बाईस समजून सांगून समागमे जाण्याचा विचार ठरवा. ' त्यावरून त्यांणीं जाऊन बाईस वाईटबरेपणांनीं परनिष्ठ सांगितलें कीं ' उद्यां या ब्राह्मणाशिवाय राज्यास आवर घालील, असा दुसरा सरदार मला दिसत नाहीं. तूं उगाच भलत्याचे नादास लागून मागें राहशील तर, यांचे हरभरे भरडावे लागतील. यांत तुझा पुरुषार्थ नाहीं. आमचे कपाळास

आलें तें भोगूं, पण तूं आपला लौकिक मिळवून या, यांत फार चांगलें लोक म्हणतील.' असें पर्यायानें सांगितल्यावर उमेदवारी जी मनांत धरली ती खचली. बरें बोलली, म्हणोन त्यांणीं रायास व पंतास येऊन सांगितलें, कीं सिद्धता करावी, गेली तर बरें, न गेली तर आम्हीं तिला नेतों. असें बोलल्या-नंतर सहगमनाची सिद्धता करून हळदकुंकूं वाणें दिलीं. गोप्रदानादि कित्येक प्रकारचे धर्म केले. राजश्रीच्या कानांतील कुड्यांची जोडी प्रसाद म्हणून सकवारबाईनें पेशव्यास दिली. [ ना. सा. रो. १-१२४ ]; आणि दंडकडी जडाव जोडा १ महादाजी अंबाजीस दिला. [ सदर. १२८ ]; यावरून ती पेशव्यावर लोभ ठेवून गेली असें दिसतें. अनेक वाद्यें, घरोघरीं हळदकुंकूं, समारंभें करून, माहुलीस मोठ्या गजरांनीं दोन लाख मनुष्यें जमा झालीं. सहगमनविधि झाल्यानंतर सर्वांनीं स्नानें करून शहरांत येऊन दीपदर्शन घेऊन श्रीचे अवलोकनानें पुनीत होऊन घरोघरीं गेले. आईसाहेबास जेवण घालून, राव, पंत, यमाजी शिवदेवही आले. नंतर घरीं जेवण झालें. सारे दिवसाचे उपोषित होते.' [ गो. खं. चि. कृत शा. म. ब.-भा. व. पु. २ पृ. ८९ ]. ' शाहूमहाराज छत्रपति कैलासवासी झांत झाल्यावर त्यांची तिसरी स्त्री राणूबाईसाहेब (माहेरचें नांव ) ही रामोजी राजे शिर्के यांची कन्या, यांचे पोटीं पुत्र संतति नाहीं, म्हणून सहगमन संगम माहुली येथें सती गेली; व दोन

---

१. शाहूचा आई जिजाबाई ऊर्फ येसूबाई व त्याची बायको सकवारबाई या दोघी एकाच शिर्के घराण्यांतल्या. या घराण्याची वंशावळ म. रि. पू. पृ ६६३ वर दिली आहे. त्यांत कान्होजीचा मुलगा रामोजी दाखविला आहे त्या रामोजीची मुलगी सकवारबाई होय. रामोजी

| [ ग. ब पारसनवीस यांचे कागदांवरून ].



नाटकशाळा बरोबर गेल्या. ( का. सं. श. ); पैकीं लक्ष्मीबाईचे मुलगे येसाजी व कुसाजी भोसले होत. तिसरे दिवशीं दुसरी राख धाकली सखू सती गेली, ( इ. सं. पे. द. मा. पृ. २ ), त्यांचें दहन करून नंतर प्रतिनिधि व अष्टप्रधान सर्व मिळोन त्यांचे नांवची पाषाणाची लिंगप्रतिमा शाळोंका घडोन वेणाकृष्णा उभयसंगमीं वाळूवर लिंग ठेवून त्याची प्राणप्रतिष्ठा करून, तेथें स्थापना केली.[1] त्याची पूजा अर्चा नैवेद्य सेवाधारी मनुष्यें नेमून बंदोबस्त केला तो चालत आहे. तेथें शाहूमहाराज छत्रपति अद्यापि आहेत. त्यांची मर्यादा जो कोणी ठेवील त्यास कदापि न्यून पडणार नाहीं. प्रथम पेशवे प्रधान हे श्रीकृष्णासंगमापलीकडे रुमालानें हात बांधून पायउतारा होऊन, नगारे नौबती बंद करून तेथें शाहूमहाराज छत्रपति यांचें दर्शन घेऊन, नंतर सातारा येथें जी मुद्रा तक्तारूढ असेल, त्यांचे दर्शनास येत होते. मग विरूबाई मृत्यु पावली। तिचें दहन संगममाहुली येथें केलें, व तिचे नांवाची पाषाणाची मूर्ति करून शाहूमहाराजांचे शेजारीं बसविली. तिचें उत्तरकार्य फत्तेसिंग भोसले अक्कलकोटकर यांचे हातून करविलें.' [ रुमाल १ ला. पृ. १३४ ].

---

१ 'शाहूमहाराजांची ही प्रतिमा गुप्त झाली होती ती वेंकाजीराजे यांनीं दुसरी नवीन घडवून प्राणप्रतिष्ठा करून स्थापन केली,' ( मराठी दप्तर रुमाल १ ला-शेवटचें पृष्ठ ). हल्लीं दोनही शालुंका ऊर्फ पाषाणप्रतिमा संगमावर आहेत. शके १७७५ सालीं कृष्णेस महापूर येऊन पहिली शालुंका वाहून गेली ती सांपडेना तेव्हां वेंकाजीराजांनीं दुसरी घडवून बसविली. नंतर पहिली वाळूंत सांपडली तीही, नवीचया शेजारींच बसविण्यांत आली. म्हणून हल्लीं दोन शालुंका आहेत. तेथें बारा महिने प्रतिदिवशीं ठरीव वेळीं चौघडा वाजत असतो, त्यास सालीना १२०० चीं नेमणूक आहे. छत्रपतींचे वंशजांकडून शाहूमहाराजांची पुण्यतिथि दरसाल पाळण्यांत येते, त्याजबद्दल नेमणूक रु. ३०० आहे. शालुंकांवर येणारी वाळू दरसाल काढून जागा साफ करण्यांत येते. ( बा. वि. जोशी ).

गोविंद बल्लाळ यांचे मार्फत महाराजांच्या अस्थि काशीस गंगेत वाहविल्या, त्यास खर्च रु. दहा हजार झाला ( ना. सा. रो. १-१२९ ).

शाहूमहाराजांच्या चिटणिशी बखरींत कांहीं थोडा फरक तपशिलांत आहे. शाहूमहाराज यांणीं बेचाळीस वर्षे राज्याभिषेक यवनाचे नजरबंदींतून येऊन अप्रतिहत आज्ञा पृथ्वीचे ठायीं करून, परमपुण्यश्लोक होत्साते कैलासवास केला. तो समय परमदारुण ! प्रधानपंत व गोविंदराव कारभारी व सरदार यांणीं शहराची नाकेबंदी करून वाड्याभोंवत्या व कारखान्यांस चौक्यापहारे याप्रमाणें करून, प्रधानपंत वगैरे गोविंदरावाचे वाड्यांत येऊन बसले. राणीसाहेबांचे तीर्थरूप कुवरजी शिर्के यांस बोलवून सांगितलें जे, 'बाईसाहेबांची मर्जी कशी आहे ? पुढें राज्यभार चालणें त्यास आम्हा सर्वांस घेऊन, महाराजांची आज्ञा जाली आहे त्याप्रमाणें, राज्याचे अधिकारी करून करावयाचें आहे ? आम्ही सर्व आज्ञांकित, महाराज तेच बाईसाहेब आहेत, कीं सहगमन करण्याचा संकल्प आहे ? हें विचारून यावें; आणि 'आपणांशीं बखेडा करणार कारभारी यांचा बंदोबस्त महाराजांचे आज्ञेनें करितों,' म्हणून सांगून पाठविलें. आणि दादोबा प्रतिनिधि व यमाजीपंत व त्यांचे लोक यांभोवते आपले लोक पाठवून नजरबंद करविली. शिर्के यांणीं बाईसाहेबांस निरोप सांगितला. तेव्हां बाईसाहेबीं विचार केला जे, 'सर्व प्रकारें बलवान प्रधानपंत व गोविंदराव व सर्व कारभारी होऊन ताराबाईचे नातू राज्यावर बसविणें हें राजकारण सिद्ध जालें. तेच पुत्र घेऊन आपण राहवें तरी त्यांचे आज्ञेंत चालून ताराबाईचे आज्ञेंत चालावें, यांत शोभा राहवयाची नाहीं. याउपरी राहणें व्यर्थ आहे,' म्हणोन सहगमन करण्याचा निश्चय केला, आणि साहित्य लौकर करावें म्हणून आज्ञा पाठविली. याप्रमाणें निरोप येतांच तात्काळ प्रतिनिधि व यमाजीपंत यांस बेड्या घालून कैद केलें, आणि पुरंदर व कांचनई[1] किल्ल्यावर रवाना

१ कांहीं ठिकाणीं सिंहगड, लादेगड व अणकाई असें आहे. मागाहून निरनिराळ्या किल्ल्यांवर त्यांची रवानगी झाली असावी.

केले. नंतर कारभारी व प्रधानपंत यांणीं दोन पालख्या तयार करून वाड्यांत गेले. सर्व कारखान्यांस कुलपें घालून बंदोबस्त केला आणि उभयतां पालखींत सर्व राजोपचार वस्त्रें, जवाहीर अलंकार करून समारंभें गेले. अंत्यविधि यथाशास्त्र करणें तो केला. उत्तरकार्य मालोजी भोसले मुंगीकर याजपासोन चालतें केलें.' उत्तरकार्याचा एकंदर खर्च ४५४१२ झाला. [ इ. सं. पे. द. मा. पृ. १ ].

सकवारबाईला पेशव्यानें बळजबरीनें सती घालविलें, असें नीच कृत्य करण्यापेक्षां तिला उघडपणें फांशीं दिले असतें तर तें पुरुषार्थाला शोभलें तरी असतें, अशा आशयाचा अभिप्राय सकवारबाईच्या सतीजाण्यासंबंधानें ग्रँट डफनें नानासाहेब पेशव्यावर दिला असून, अद्यापिही कित्येक लोक या मताचे आहेत. याप्रकरणासंबंधानें खरा प्रकार काय झाला, त्याचें बरोबर आकलन व्हावें यासाठींच उपलब्ध हकीकती वर जरा विस्तारानें दिल्या आहेत. शिवाय ज्या दृष्टीनें याप्रकरणाचा निर्णय ठरवायचा, ती दृष्टि तत्कालीन वस्तुस्थिति पाहणारी असून दुराग्रहदूषित नसावी. ग्रँट डफचें खंडन करण्यांत जागा अडविण्याची जरूरच नाहीं. पाश्चात्यांस जितका सतीचा किळस वाटतो, तितका तो हिंदूंस वाटणें शक्य नाहीं. बाई सती गेल्यानें नानासाहेबाचें पुढील काम तितकें हलकें झालें, एवढ्यावरून केवळ स्वार्थबुद्धीनें त्यानें तिला चिडवून सती घालविलें असें मात्र नाहीं. आपण हिंदूच आहों; तरी पण तत्कालीन स्थितीशीं तादात्म्य कल्पून या गोष्टीकडे पाहिल्याशिवाय तिचें रहस्य कळणार नाहीं. तशा दृष्टीनें पाहता पुढील मुद्दे लक्षांत येतात.

( १ ) वर दिलेल्या पुराव्यावरून पाहतां सकवारबाईस सती जाण्याचा निरोप पाठविण्यांत एकटा पेशवाच प्रमुख नसून, त्या वेळीं जमलेल्या सर्व प्रमुख मंडळीचा त्यांत भाग होता. किंबहुना त्यांत ताराबाईच अग्रेसर होती. सकवारबाईसही कदाचित् कारभाऱ्यांचा ताबा पुरवला असता, परंतु ताराबाईचा पुरवणार नव्हता.

( २ ) ही चाल हल्लीं कितीही क्रूर व वेडगळ भासत असली, तरी त्या वेळीं सर्वत्र प्रचलित होती. बहुधा सती जाणें हा नियम व न जाणें हा

अपवाद समजला जाई. न जाण्यास योग्य प्रापंचिक कारणें असतील तर गोष्ट निराळी. एरवीं जिला असें कांहीं कारण लागू नाहीं, तिची साहजिक प्रवृत्ति सती जाण्याकडे कोणीं न सांगतांच होत असे.

( ३ ) राजे लोकांच्या वैभवाचें व सत्कीर्तीचें वर्णन कर्तव्य असतां, त्यांच्या शवाबरोबर किती बायका व दासी सती गेल्या हेंही मुद्दाम सांगण्यांत येई. कान्होजी आंगरे, रघूजी भोसले, प्रतिनिधि इत्यादिकांचीं उदाहरणें मागें ठिकठिकाणीं देण्यांत आलींच आहेत. तात्पर्य वैभवाचें व सुकीर्तीचें अनुमान करण्यास हें एक गमक मानण्यांत येई. हें विधान विशेषत: रजपुतान्यास सर्वथा लागू होतें. उदेपुर, जयपुर येथील राजांशीं बरोबरी, किंबहुना, वरचढ करण्याची शाहूला हौस होती. हिंदुधर्मासाठीं तूं काय केलेंस, मीं काय केलें, असा त्याचा जयसिंगाशीं वाद झालेला आहे.

( ४ ) सकवारबाईच्या वयाला पंनासी उलटली असावी. तिला मूल वगैरे पाश कांहीं एक नव्हता. तिचा प्रपंच झालेला होता. शाहूला आतां दुसरी राणी सती जाणारी नव्हती. तेव्हां या राणीनें सती जाणें शाहूच्या लौकिकाला त्या काळीं साजेसें व जरूरही होतें.

( ५ ) शाहूविषयीं नानासाहेबाची भक्ति निस्सीम होती. धनी मेल्यावर त्याच्या कीर्तीस कलंक लागेल अथवा कमीपणा येईल असें त्याच्या स्त्रीनें वर्तन करणें हें नानासाहेबासच काय, पण शाहूच्या कोणत्याही नोकरास रुचणारें नव्हतें. सती जाण्याचा निश्चय आगाऊ महिना दोन महिने सर्व राज्यांत जाहीर करून, आयत्या वेळीं आपण सती जात नाहीं असें सकवारबाईनें म्हणणें, जन्मभर सहचारिणीचें वैभव भोगून, नवऱ्यास परलोकींच्या प्रवासांत एकटाच सोडून, इहलोकीं केवळ बखेडे करण्याची हौस पुरविण्याकरितां, शाहूच्या विधवेनें, जिला मूलबाळ नाहीं व जी वृद्ध झालेली, अशा स्त्रीनें सती न जाणें हें कोणासच त्या वेळीं पसंत पडण्यासारखें नव्हतें. कार्य साधण्यासाठीं कांगावा करण्याचे प्रकार आहेत त्यांतला सती जाण्याचा पुकारा करणें हा नाहीं. मृताविषयीं लोकांत जी पूज्यबुद्धि असते, तिला

असल्या कांगाव्यानें धक्का बसतो, त्यांत मृताची चेष्टा केल्यासारखें होतें. [ रा. वासुदेव शास्त्री खरे यांनीं मार्मिकपणानें हे मुद्दे कळविले आहेत ].

सकवारबाई सती न जाती तर पुढील इतिहासाचा ओघ जास्त यशस्वी झाला असता असें मानण्यास कांहीं कारण नाहीं.

२. रामराजाचें राज्यारोहण, ( सन ४-१-१७५० ).—शाहूच्या मृत्यूनंतर दुसऱ्याच दिवशीं बार्शीपानगांवाहून रामराजास आणण्याकरितां मंडळी रवाना करण्यांत आली. पानगांवास अगोदरच रामराजाचा बंदोबस्त चांगला ठेवण्यांत आला होता. सर्व कारखाने व शागीर्दपेशा, हत्ती घोडे, जवाहीर, पोषाख व खजीना देऊन बापूजी खंडेराव चिटणिस व ताराबाईकडील चिंतो विनायक आणि नानासाहेबाचा फौजबंद सरदार लिंबाजी अनंत व इंद्रोजी कदम ( व घोंडो अनंत वाकनीस, महादोबा पुरंदरे-भा. व. १—अ. कै. ) असे पानगांवीं जाऊन, खूण म्हणून मातुश्रीसाहेबांचे हातची आंगठी दाखवून ( इ. सं ) तुळजापुरचे गोंधळ्यास पांच चार हजार रुपये देऊन, निघोन येतां मार्गी दर्याबाई निंबाळकर फौज सुद्धां बरोबर घेतली. ता. २६ डिसेंबरास कृष्णाकांठीं वडुथाजवळ आले. आईसाहेब शहरांत तेरा दिवस होती, त्यांची भेट बहुत दिवसांची म्हणून श्रीकृष्णा उत्तरतीरीं शकुंतेश्वराचे देवालयीं तिसरे प्रहरीं घेतली. [ ना. सा. रो. १—१२५ ]. सर्व लोक सामोरे जाऊन भेटले. शहरांत प्रवेश सुमुहूर्तानें व्हावा; म्हणून वडुथ आरलेंनजीक मुक्काम करून राजे राहिले. तेथें सर्व सरदार, लोक, प्रजा, यांच्या भेटी होऊन म्हसवें ( वर्ये—भा. व. अ. ब. ) मुक्कामीं आले. इकड महाराज वारल्याची बातमी पुण्यास गेल्यावर सदाशिवराव २० डिसेंबरीं पुण्याहून साताऱ्यास आला, आणि वडुथावर तिसरे प्रहरास महाराजांची भेट घेतली. गोड जेवण तेरावा झाल्यानंतर, पौष शु॥ ८ गुरुवार, जानेवारी ता. ४ रोजीं साताऱ्यास येण्यास मुहूर्त होता, त्या दिवशीं शहरांत दाखल झाले, तेव्हां श्रीमंतांनीं ८८९ रु. चा पोषाख महाराजांस केला. त्याच दिवशीं अठरावे

घटकेस राज्यास बैसविलें; आणि लोकांच्या नजरा झाल्या, ( इ. सं. पे. द. मा. ले. ४ ). ता. २ जानेवारीस गोपिकाबाईनें ताराबाईची भेट घेतली, त्या वेळीं गोपिकाबाई, विश्वासराव, माधवराव यांस ४२५ रु. चे पोषाख ताराबाईनें दिले. बरोबर महादजी शिंदे होता. [ना. शा. रो. ९–१३६]. व्रतबंध पौष मासांत होऊं शकला नाहीं, तो पुढें ६ रविलावली माघ. शु. ८ ( फेब्रुवारी ता. ३ स. १७५० ) रोजीं झाला. त्या दिवशीं मंडपास मेढ उंबराची घातली. ११ रोजीं [ ८ फे० ] मांडवास मुहूर्त केला. पुढें यज्ञोपवीत दान, उपनयन, होम व ब्राह्मणभोजन हे सर्व विधी झाले. पुढें स्वामींचीं दोन लग्नें झालीं, बायकांचीं नावें दुर्गाबाई व सखराबाई ' [ इ. सं. पे. द. मा. पृ. ३ ]. रामराजाचीं एकंदर तीन लग्नें झालीं. वडील स्त्री दुकाबाई नेवासकर मोहित्यांची, दुसरी जानकीबाई बिंगकर मोहित्यांची, व तिसरी बराणजी मोहित्यांची सगुणाबाई, [ भिडेकृत छत्रप. व अष्ट. प्र. चा इ. ]. थोरली धनीण दुर्गाबाईच होती असें दिसतें. [ मृ. ८–१–१७७६ ]. नावाचा भेद हा माहेरच्या नावामुळें असेल.

शाहूच्या मृत्यूची व रामराजाच्या आरोहणाची हकीकत नानासा. पेशव्यानें ता. ४ जानेवारी रोजीं लगोलग पत्रें लिहून आपल्या सर्व सरदारांस कळविली, त्यांत खालील मजकूर आहे. ' कै. महाराज वर्तमान असतां, आम्हांस समीप बोलावून, स्वकीय सार्थकाविशीं व सलतनतेच्या बंदोबस्ताविशीं कित्येक प्रकारें सांगितलें. त्यावरून आगाऊ पंचवीस तीस हजार फौज जमा करून सातारा राहिलों. राजश्रींनीं परलोकसाधन करितांच, तमाम पुरेजात व कारखाने, व राजमंदिरीं चौक्या ठेवून बंदोबस्त केला. राजश्रीस माहुलीसंगमीं नेऊन यथोचित सार्थक केलें. रा. राजारामसाहेब पानगांवीं होते, त्यांस आणावयाच्या विचारांत कै. महाराज होते. तेव्हां प्रसंग जाहलियावरी आणावयास फौज पाठविली. छ. २६ ( ता. २६ डिसेंबर) मोहरमीं आले. तमाम राज्यांतील सरदार, सरकारकून, अरकानी दौलतानी [ राज्याचे आधारस्तंभ ] समस्त लहानथोरीं तसलीमात बजा-

विली. मोठा जूलूस जाहला. उमर बेवीस तेवीस वर्षांची, तारुण्य तेजयुक्त, आहेत. तदनुरूप किमपि व्यंग न पडतां राज्याचा बंदोबस्त उत्तम रीतीनें जाहला. उभयतां सरदार ( शिंदे होळकर ? ) माळवा प्रांतें रवाना जाले.' या पत्रास अमृतराव शंकर दिनकरराव, पेशव्याचा सरदार बंगाल्यांत होता, त्यानें पाठविलेला जबाब पाहतां, नानासाहेबाचें धैर्य प्रसंगावधान व राज्यचातुर्य याबद्दल लोकांत कसा विश्वास होता तें दिसून येतें. 'कै. स्वामींच्या मनोभिष्टानुरूप रा. छत्रपतीस्वामींस पदाभिरूढ केलें. राज्यभाराचा बंदोबस्त उत्तम रीतीनें केला या गोष्टीचा कीर्तिघोष या दिशेस आगाऊ पंधरा दिवस प्रविष्ट जाहला. मित्रशत्रूंस आल्हादखेद प्राप्त जाहला. रा. छत्रपतिस्वामीचे व आपले पदरीं अगाध पुण्य, तन्मुळें किमपि व्यंगपदार्थ न पडला. पूर्वी कै. बाजीरावसाहेब व आपासाहेब वर्तमान असतां, सेवकासमक्ष चर्चा केली कीं, राज्यांतील सेना व खावंदाचे चितवाती असते तरी, एक वेळ प्रजापाळण करून दाखवितों. त्यांस उभयतांचें मनोभीष्ट पूर्वपुण्यें स्वामींच्या पदरीं आलें. उत्तर, दक्षिण व पश्चिम तीन दिशांचा बंदोबस्त महाराजांच्या तेजप्रतापें सहजगतीनें जाहलाच आहे. राहिली पूर्वदिशा येथील बंदोबस्त सेनासाहित्यें अथवा सामदाम दंडभेद करून, सेवकांस शत्रुमित्रांदेखत यशस्वी करून चरणाजवळ नेणें, हेही सबळ कीर्ति महाराजांची आहे.' ( इ. सं. ऐ. टि. भाग १ पृ. ६३ ). यावरून तीन पिढ्या राज्य चालविणाऱ्या पेशव्यांचा धाक व आत्मप्रत्यय चांगलाच व्यक्त होतो. स. १७४० त बाजीरावाचे मृत्युप्रसंगीं व पुनः दहा वर्षांनीं छत्रपतीचे मृत्युप्रसंगीं आणीबाणीच्या वेळीं नानासाहेबानें दाखविलेलें मनोधैर्य थोड्यांच्याच अंगीं असतें.

पौष शु॥ ८ स समारंभ व्हावयाचा ते दिवशीं सर्व शहरांत गुढ्यातोरणें उभीं केलीं. रस्त्यांत सडे व रांगोळ्या घालविल्या. घरोघरीं सुवासिनी आरत्या घेऊन उभ्या केल्या. त्यांनीं लाह्या व अक्षता उधळाव्याशें सांगितलें. नगर देवतांच्या पूजा करण्यांत आल्या. नृत्यगायन, मंगलवाद्यें सिद्ध केलीं. सर्व

अष्टप्रधानांनीं प्रात:काळींच महसवें येथें जाऊन फौजेसह महाराजांची स्वारी निघाली. बाळाजीपंत प्रधान यांणीं राजे यांस अंबारींत बसवून आपण खवाशांत रुमाल उडविण्याचा हातीं घेऊन बसले. शंभुसिंग जाधव हे हत्तीच्या किलाव्यांत दुसरा रुमाल हातीं घेऊन बसले, आणि शहाजानें मंगलवाद्यें वाजवीत स्वारी निघाली. जिलीब वगैरे बहुत तर्तुदींनीं शहरांत आले. मार्गीं देवांस दक्षणा, विडे, नारळ देऊन, राजवाड्यांत येऊन द्वारीं सुवासिनी यांनीं पुढें कुंभ आरत्या, लिंबलोण केलें. गृहप्रवेश करून देवदर्शन घेऊन बसले. नंतर मंगलस्नान करवून राज्याभिषेकविधीस प्रारंभ करविला. शांति होऊन सिंहासनारोहण मुहूर्त नेमिला होता, त्याप्रमाणें यथाशास्त्र विधिपूर्वक केलें. नांव राजाराम ठेविलें. ताराबाई व रामराजे यांनीं सर्वांसमक्ष एका ताटांत भोजन करून एकमेकांपासून घांस घेण्याचा समारंभ याच वेळीं प्रथम झाला. ( रा. च.—चिटणीसकृत ).

या वेळीं नवीन अष्टप्रधान नेमण्याची भानगड पेशव्यानें अंगावर घेतली नाहीं. अष्टप्रधान पूर्वी होते तसेच पुढें चालले. त्यांचे तनखे वगैरे पूर्वींचेच चालू असून स. १७४६–४७ च्या प्रधानांचीं नांवें व नेमणुका इतिहास-संग्रहांत दिलेले पाहण्यालायक आहेत. ( पे. द. मा. ले. ११ पृ. २९५ ). सेनापति यशवंतराव व्यसनी; प्रसंगास आला नाहीं. सामोपचारानें किंवा धाकदपटशा दाखवून यशवंतरावास ताळ्यावर आणण्याचे प्रयत्न शाहूनें होते तेवढे करून पाहिले, परंतु तो पुनरपि प्रत्यक्ष कामावर आला नाहीं, त्यामुळें सेनापतीचें गुजराथेंतील कार्य गायकवाडानें आपल्या हातीं घेतलें. वास्तविक सर्व सेना एका मालकाची व त्याजवर सेनापति असा एकच असावयाचा, हा निर्बंध शाहूच्या वेळेपासून हळूहळू सुटत गेला. निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे सेनापति उपस्थित झाले, आणि त्यांजबरोबरच अमात्य, सचिव, न्यायाधीश इत्यादि प्रधानांचीं कामेंही मुख्य राजधानींतून त्या त्या प्रधानांचे मार्फत न चालतां, प्रांतोप्रांतीं उपस्थित झालेल्या या नवीन सेनापतींनीं अथवा खरें म्हटलें म्हणजे या मांडलिक राजांनीं आप-

त्याच कबजांत घेतली. शाहूनें बाहेरील राज्याची दगदग अंगाबाहेर टाकण्याचा व प्रांतोप्रांतीं पाठविलेल्या सेनानायकांस संपूर्ण अधिकार दिल्याचा हा परिणाम झाला. अर्थात् आनुवंशिक तत्त्व मराठ्यांचे अंगीं खिळलेलें यीडा वेळ शिवाजीनें दाबून ठेविलें होतें, पण तें शाहूच्या या ढिलाईमुळें पुनः प्रबळ झालें; आणि शाहूनें पेशव्याच्याच हवालीं सर्व राज्यकारभार केल्यामुळें, आपली जबाबदारी पारें पाडण्याकारितां, पेशव्यांनाही पूर्वीची अष्टप्रधानाधिष्ठित पद्धत एकवार बंद पडलेली पुन: चालू करितां आली नाहीं. तसें करण्याची त्यांस इच्छाही नव्हती; व फुरसतही नव्हती. अर्थात् अष्टप्रधान एकवार आपापलीं पिढीजाद वतनें सांवरून शाहूच्याच वेळेस घरीं बसले, ते पुनः पुढें कारभारांत आले नाहींत. त्यांच्या वतनावर मात्र पेशव्यांचा डोळा होता, आणि कामें केल्याशिवाय वतनें उपभोगणाऱ्या अशा इसमांस वेळ आली म्हणजे नरम करण्याची संधि त्यांनीं वाया जाऊं दिली नाहीं. रामराजाचे राज्यारोहणास प्रतिनिधीची जरूर भासली, ती तो केवळ प्रधान होता म्हणून नव्हे, तर शाहूच्या हयातींत साताऱ्याच्या कारभारांत प्रतिनिधीचें व्यक्तिशः माहात्म्य लोकांच्या निकट परिचयाचें झालेलें होतें. शाहूच्या कोणत्याही दरबारी कृत्यांत प्रतिनिधीचा भाग नाहीं, असें होत नसे. एवढ्याचसाठीं केवळ लोकसमजुतीस्तव व अनायासें यमाजी शिवदेवाचें प्रस्थ मोडण्यासाठीं पेशव्यानें मोठी घाई करून आपल्या तर्फेचा नवीन प्रतिनिधि भवानराव पुढें आणिला. सचिव चिमणाजी नारायण हयात असून तो बहुधा या राज्यारोहणास हजर होतांच. मंत्री घनश्याम नारायण, सुमंत महिपतराव आनंदराव[1], न्यायाधीश काशीराव अनंत (हेनाजी अनंताचा भाऊ) व त्याचा मुलगा खंडेराव काशी, पंडितराव रघुनाथ मुद्गल हे सर्व राज्यारोहणप्रसंगीं हजर होते, असें समजण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें आठ प्रधानांची कहाणी झाली. राहतां राहिला एक अमात्य. रामचंद्रपंत अमात्य ताराबाईस मिळाल्यापासून त्याजवर

१ आनंदराव मृत्युपावल्यावर यांस सुमंत पद मिळालें, ६ फेब्रुवारी १७४४.

शाहूचा अर्थात् विशेष रोष होता. भगवंतराव व त्याचे बंधु ताराबाईच्या पक्षांत होते, संभाजीच्या पक्षांत नव्हते. अर्थात् रामराजास लपवून त्याचें संवर्धन करण्यांत हे अमात्य प्रमुख असल्यामुळें, त्यांजवर संभाजीचाही मोठा रोष होता. मिळून ते दोनही राज्यांस अंतरले. पुढें ताराबाईच्या-मार्फत शाहूशीं खटपट करून भगवंतरावानें अमात्यगिरी स. १७२८ त परत मिळविली, परंतु त्याजवर शाहूची कृपा झाली नाहीं. शाहूच्या शिफा-रसीनें तो संभाजीकडे गेला, पण तिकडेही त्याचें जुळलें नाहीं. शेवटीं मराठमंडळास कंटाळून तो निजामाकडे जाण्याच्या बेतांत होता, इतक्यांत शाहू आजारी पडून रामराजास आणण्याची खटपट सुरू झाली, त्यांत भगवंतरावाची शाहूस मोठी गरज भासली. भगवंतरावाच्या खटपटीनें शेवटीं रामराजा गादीवर आला. अर्थात् त्या वेळीं भगवंतरावास अमात्य-पद कायमचें मिळालें. [ इ. स. पे. द. मा. ले. ४४ ]. दामोदर महादेव हिंगणे हा रामराजाचे राज्यारोहण-प्रसंगीं निजामाकडील कांहीं कारस्था-नासंबंधानें साताऱ्यास आलेला असून त्या प्रसंगास हजर होता.

रघूजी भोसले यांस महाराज असतांच फौजसुद्धां येण्याविषयीं पत्रें गेलीं, परंतु येऊन पावले नाहींत. त्यांस जलद घेऊन येण्यासाठीं बहिरव खंडेराव चिटणीस रवाना केले, नागपुराहून निघाले होते; परंतु महाराज असेपर्यंत येऊन पावले नाहींत ( रा. म. च. ). अशा रीतीनें शाहूच्या निधनानंतर मराठशाहींत मोठें रूपांतर झालें, त्याचें वर्णन करूं लागण्यापूर्वी शाहूच्या योग्यतेचा अंदाज करण्यास हेंच स्थळ योग्य आहे.

३. **शाहूछत्रपतीची योग्यता.**—स. १७०७ त जरी शाहू मराठ-मंडळांत सामील झाला, तरी संभाजीच्या किंवा राजारामाच्या मृत्यूपासूनच त्याची ओळख महाराष्ट्रास असल्यामुळें अर्धें शतक पावेतों महाराष्ट्र, मराठमंडळ व महाराज शाहूछत्रपति यांचें पूर्ण तादात्म्य होतें.

**व्याप व कर्तबगारी.**–स. १७०७ पासून १७४९ पावेतों राज्य करून ज्यानें मराठशाहीचा हिंदुस्थानभर फैलाव केला, त्या शाहूच्या अंगीं कितीही

दोष असले, तरी मराठी राज्यांत शिवाजीच्या खालोखाल त्याची योग्यता आहे. त्यानें नशिबाचे खेळ जितके अनुभविले, तितके बहुधा दुसऱ्या कोणी अनुभाविले नसतील. तथापि तो मोठा भाग्यशाली होता. त्याचा जन्म[1] वैशाख व॥ ७ शके १६०४ म्हणजे माहे मे स. १६८२ चा असल्या-मुळें, बाळपणीं बापाबरोबर रानावनांतील मोहिमांत त्याचे दिवस गेले. वयाच्या आठव्या वर्षी मातुश्रीसह तो बादशहाच्या कैदेंत पडला. तेथें त्याची सतरा वर्षें गेलीं. शिक्षण व अनुभव मिळविण्याचा या सतरा वर्षांचा उत्कृष्ट काळ बादशहाच्या जनानखान्यांत गेल्यामुळें, त्यास जगाचा अनुभव न मिळतां, उलट त्याचा स्वभाव थोडाबहुत चैनी ( easy-going ) व कांहीं अंशीं नेभळा बनला. त्यापुढें स. १७०७ पासून १७१४ पर्यंतचीं त्याची सहा सात वर्षें बरीच संकटांत व विपत्तींत गेलीं. या काळांत तो कधीं डगमगला नाहीं; व कधीं त्यानें धैर्य खचूं दिलें नाहीं. पुढें बाळाजी विश्वनाथ पेशव्यावर राज्याचा भार टाकतांच त्यास स्वस्थता प्राप्त झाली; आणि ती उत्तरोत्तर वाढतच गेली. म्हणूनच या घराण्यावर शाहूचा एवढा मोठा लोभ जडला. दैवाचा जोर अनुकूल असल्याशिवाय, मनुष्याचे हातून पराक्रम घडत नाहीं, अशी समजूत त्या वेळीं सार्वत्रिक असल्यामुळें, या दैवशाली कुटुंबास शाहूनें हाताशीं धरिलें. बाजी-रावाच्या कारकीर्दीचीं वीस वर्षें म्हणजे शाहूच्या भाग्याचा कळस होय. या काळांत शाहूचे अनेक सरदार सर्व देशभर लढून मराठ्यांचें राज्य वाढवीत होते; स्वकीय व परकीय सर्व लोक त्याची आज्ञा झेलीत होते; सर्व शत्रूंना त्याच्या नांवाचा दरारा वाटत होता; आणि हंमेश कोणत्या तरी नवीन यशःप्राप्तीची बातमी येऊन त्याचें चित्त आनंदभरानें खुलून जात होतें. या

---

१ टीप—मराठी रियासत पृ. ५५१ वर १६८० सन दिलेला चूक आहे. खरी जन्मतिथि वैशाख व. ७ गुरुवार शके १६०४, दुंदुभि संवत्सर, सूर्योदया-पासून घटिका ५४, दिनमान घ. ३२, शततारका नक्षत्र, राश कुंभ. [ इ. सं. पे. द. मा. पृ. १ ].

काळांत त्यानें अत्यंत उदार अंतःकरणानें व थोर मनानें सर्वांचा परामर्ष घेतला. लोकांनीं केलेल्या कामगिरीचा त्यांस योग्य मोबदला देऊन व कुचराई करणारांस ठपका देऊन त्यानें सर्वांवर आपला वचक कायम ठेविला. राज्याकारभार पाहण्यांत शाहू सदैव निमग्न असे. स्वत: मोहिमांवर न गेल्यामुळें सरदारांवर तो जास्त दाब ठेवूं शकला नाहीं, तत्राप त्याचीं असंख्य पत्रें पाहतां, राज्याचा व्याप त्यानें नेटानें सहन केला हें कांहीं थोडें नव्हे. तंटेभांडणें, मारामाऱ्या, खेळ, बिदाग्या, मेजवान्या, सरदारांच्या समजुती, परराज्यांतील वकिलांस जबाब, विवाहादि समारंभ, आप्त व संबंधी बायापुरुषांचे व्यवहार, अशीं नानातऱ्हेचीं प्रकरणें रोजच्या रोज विल्हेस लावून, शिवाय सरदारांस फौजा व पैसा पुरविणें, त्यांच्या अडचणीचें निरसन करणें, सर्वांस वेळेवर हुकूम व पत्रें पाठवून एकवाक्यता करणें, अशीं हजारों कामें दररोज निघत, त्यांची व्यवस्था त्यास लावावी लागे. जन्म, मृत्यु, खून, दावे, खटले, तक्रारी, जयापजय, सरदारांचे रुसवे, अपघात वगैरे शेंकडों प्रकार नित्यश: घडत, त्यांचा जेव्हांचे तेव्हां हुकूम देऊन निकाल त्यास लावावा लागे. सण, तेहवार, दरबार, जन्मोत्सव, आप्तांच्या—सरदारांच्या—बायापुरुषांच्या वगैरे भेटी व बोलणीं, अशी किती लफडीं शाहूचे पाठीवर होतीं याची कल्पनाच केली पाहिजे. व्याप वाढला तशीं कामें वाढलीं. शाहूचा हा व्याप केवढा होता याची कल्पना गॉर्डनच्या वकिलातीची थोडी हकीकत फॉरेस्टच्या पुस्तकांत आहे, तिजवरूनही होईल. सरदारांच्या भेटी घेणें, समजुती काढणें, त्यांच्या कामाचा झाडा घेणें, जरब दाखविणें, शिक्षा करणें, बक्षीस देणें, त्यांस पेशव्यांचे लगामीं लावणें, हीं कामें शाहू चांगलीं करी. संनिध असतां लोकांस त्याची दहशत व धाक मोठा वाटे. कोणीही त्याचा समोर अवमान करीत नसे. शाहूचें अंतःकरण कोमल, दयार्द्र व पापभीरु होतें. पेशवे सुद्धां त्याची मोठी मनधरणी करून असत. उद्दाम किंवा शिरजोर सरदारांस तो युक्तीनें मऊ आणी. नानासाहेब पेशव्यास त्यानें बोल बोल म्हणतां शरण

आणविलें. (भा. व. प. या. ले. ४५). शाहू स्वभावाचा मोकळा, निर्व्यसनी, व सदाचरणी असून, मोठा उदार, दीलदार व व्यवहारांत धोरणी होता. स्वतः नुकसान सोसून राज्याचें हित जोडणारा, तंटे मिटविणारा, परदुःखानें गहिंवरणारा, परोपकारी व दाता असा हा शाहू छत्रपति मोठा भाग्यशाली व अत्यंत लोकप्रिय राज्यकर्ता झाला. पेशवे व इतर झाडून सारे सरदार मुलुखगिरीहून येतांच शाहूस भेटून आपल्या कामाचा झाडा देत. कधीं खोटें करावयाचें नाहीं, सत्य शोधून पारिपत्य करण्याविषयीं वस्ताद, पक्षपात नाहीं, सबब शाहूच्या मर्जीविरुद्ध एखादा प्रसंग उरकण्यास चिटणीस वगैरे मंडळीची त्रेधा उडे. गोविंदराव चिटणीस सर्व संधान ठेवी व युक्तीनें पुष्कळ कामें उरकून टाकी. हा गोविंदराव यजमानाची मर्जी सांभाळून हरएक काम युक्तीनें पार पाडण्यांत निष्णात होता. कांहीं वावगें न करतां तो लोकांचें काम सुरळीत करून देई. पेशव्यांनीं गोविंदराव चिटणिसाचें संधान नेहमींच चांगलें राखिलें होतें. अंतकाळीं शाहूचें चित्त अत्यंत उद्विग्न व अस्वस्थ होतें, तरी शाहूबद्दल लोकांस अतोनात पूज्यबुद्धि वाटत होती, आणि तशी ती अद्यापि वाटते.

शाहूची मान्यता सद्गृहस्थ या दृष्टीनें मोठी आहे त्यामानानें राज्यकर्ता म्हणून थोडी गौण मानावी लागते. मुसलमानांचा पाडाव करून हिंदुपदपादशाही स्थापन करावयाची हें मराठ्यांचें इतिकर्तव्य. परंतु शाहूला मोगलबादशाही राखावयाची होती. ' रा. छत्रपति स्वामी ही बादशाही ( आपल्याला ) इच्छित नाहींत, जीर्णोद्धार केल्यास संतोष मानितील. बादशाहीचा बंदोबस्त केल्यास लौकिक मोठा आहे, मोडून टाकल्यास लौकिक नाहीं. कसा म्हणाल तर जीर्णोद्धार देवालयाचा केल्यास, नवीन लिंगाचे स्थापनेपेक्षां अधिकोत्तर आहे. हजारों चोरपोर खातील, आणि पादशाही मोडल्याचें श्रेय आपणाकडे. ' ( ब्र. स्वा. च. पृ. ११९. ) ही शाहूची भावना मराठ्यांच्या कर्तव्यास सर्वथैव विरुद्ध होती. बाजीराव वगैरे प्रमुख सरदारांस शाहूच्या या पद्धतीनेंच अडथळा येत होता. शाहूस खुष ठेवून स्वोद्

वागावें लागे. यामुळें त्यांचे पराक्रम थोडे विफल झाले. शाहूच्या हयातींत ही पद्धति बदलतां आली नाहीं, त्याच्या मृत्यूनंतर ती बदलली. नानासाहेब व सदाशिवराव यांच्या पुढील कारभाराचें तर तें मुख्य बीज असून, त्याचाच परिणाम पानपतचा संग्राम होय.

शाहूच्या कारभारांत दुसरा एक मुद्दा जाचक होता. 'जुनें मोडूं नये, नवें करूं नये,' ( भा. व. पत्रें यादी ले. ६७–६९ ) हें शाहूचें तत्त्व धार्मिक बाबतींत प्रधान होतें, तसेंच बहुधा राजकीय बाबतींतही होतें. उद्योगानें व पराक्रमानें नवीन रचना करितां येते, अशी नवीन सुधारणा केली पाहिजे, तसें करणें आपलें कर्तव्य आहे, अशी ज्याची भावना नाहीं त्याचे हातून राज्याचा उद्योग होणें शक्य नसतें. याच तत्त्वावर शिवाजीचें व मोरे, घोरपडे वगैरे सरदारांचें वांकडें आलें. 'जुनें मोडूं नये, नवें करूं नये' असें जर शिवाजीस वाटतें तर त्याच्या हातून स्वराज्याचा प्रचंड उद्योग झाला नसता. शाहूनें स्वतः तर हें तत्त्व शक्य तितकें पाळलेंच, परंतु मरणसमयीं पूर्वीचीं वतनें व प्रघात आहेत तसेच चालविण्याची सक्त परंतु अशक्य ताकीद त्यानें पेशव्यांस दिली. वाढत्या राज्यकारभारास असें बंधन सहन होणें शक्य नाहीं. या बंधनानें पेशव्यांचे हात निष्कारण आखडले गेले. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, रघूजी भोसले वगैरे सरदार नवीन उद्योग करूं लागत, तेव्हां शाहूच्या पोटांत धसस होई. कालमानानुसार राज्ययंत्र बदललें पाहिजे; जहागीरदार मोडावे, स्वतःची फौज ठेवावी, वसुलाची व्यवस्था करड्या नजरेनें अमलांत आणून द्रव्यबल वाढवावें, राष्ट्रोद्योगास विघात करणारांस कडक शासन करावें, अशी जी राज्यकारभारांत योजना पाहिजे आणि त्याबद्दल प्रसंगानुसार शाहूचे कारभारी सूचना करीत, तिच्या संबंधानें शाहू बहुधा चालढकल करी. कोणासही दुखवावयाचें म्हणजे त्याच्या जिवावर येई. निरनिराळे लोक निरनिराळे मतलब त्याजपुढें मांडीत, त्यांजमध्यें गोंधळून जाऊन त्याच्या मनाचा निश्चय होत नसे; आणि जें चाललें आहे तें बरें आहे, अशा ठरावर शेवटीं राज्यकारभार

येई. दूरदूरच्या ठिकाणीं चाललेले सरदारांचे प्रचंड उद्योग त्यास कळत नसत. दूरदूरच्या प्रांतांतील भूगोलिक परिस्थिति सुद्धां त्यास समजून घेतां येत नव्हती. सरदारांवर भार टाकून आपण साताऱ्यास स्वस्थ बसावयाचें, या त्याच्या धोरणामुळें बाजीरावासारखा पराक्रमी मोहरा फुकट गेला; आंगऱ्यासारख्या पराक्रमी पुरुषांची वाताहत झाली; रघूजी भोसले, शिंदे व होळकर यांनीं सर्व हिंदुस्थान तावडतोब पादाक्रान्त केलें असतें, त्यांस योग्य पाठबळ मिळालें नाहीं; परराष्ट्रीय व्यवहारांस जोर आला नाहीं; राज्याची ठरीव पद्धति म्हणून कांहीं राहिली नाहीं; ज्यानें त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें वर्तावें आणि स्वार्थ साधावा, असा प्रकार झाला. शाहूनें सर्व ठिकाणीं फिरून स्वतः सर्व मोहिमा व व्यवस्था ठरविली पाहिजे होती,— म्हणजे सर्वांना एकाच कार्यभागाच्या लगामीं लाविलें पाहिजे होतें. तसा प्रकार झाला नाहीं. सृष्टींतील सर्वच व्यवहार नेहमीं फिरत असतात, स्थिर असें कांहीं नाहीं. परंतु यत्किंचित् नवीन फेरफार झाल्याबरोबर ज्यांचे हितास बाध येई ते मोठ्यानें गवगवा करूं लागत; आणि तो गवगवा दृष्टीस पडतांच शाहूचे बेत विरघळून जात.माणसाची योग्यता ओळखून आणि त्यांजवर संपूर्ण भरंवसा टाकून ज्याच्या त्याच्या लायकीचा राष्ट्रकार्याकडे उपयोग करून घेणें हें शाहू जाणत होता. परंतु त्याचें मन प्रगतिपर नसल्यामुळें त्याचा उद्योग कायम झाला नाहीं. हें काम करणारास आत्मप्रत्यय— म्हणजे स्वतःची धमक लागते. प्रसंगविशेषी एखाद्या डोईजड इसमास दूर करून त्याचें सर्व काम स्वतःच्या हातीं घ्यावें लागतें. हें शिवाजी वगैरे कित्येक राज्यकर्त्यांचें धाडसी कसब शाहूला नव्हतें.

शाहूची सर्व भिस्त शाब्दिक हुकमांवर होती. त्याची रोजनिशी वाचली म्हणजे त्या वेळच्या राज्यकारभारासंबंधानें यथायोग्य कल्पना करितां येते. सर्व महाराष्ट्रभर, कर्नाटकांत, गुजराथेंत व हिंदुस्थानांत संचारणाऱ्या मराठे सरदारास हुकूम पाठवून आपल्या फौजा घेऊन अमक्या मोहिमेवर जा, ते न गेल्यास त्यांस ठपका द्या, अशा प्रकारची

पत्रें लिहितां लिहितां शाहूची पुरेवाट होई. सरदार मन मानेल तसें वर्तन करीत, हिशेब व वसूल पाठवीत नसत, आपसांत भांडत, लढत. त्यांच्या समजुती काढतां काढतां शाहूच्या नाकीं नव येत. राज्यव्यवस्थेची ही पद्धत सदोष आहे हें चार दोन वर्षांच्या अनुभवानें कोणासही कळून आलें असावें. बाजीरावासारखा सेनानायक जवळ असतां त्याजकडून फौजेची व्यवस्था बांधणें अशक्य नव्हतें. शाहू मोहिमा ठरविणार, पेशवे व सरदार त्या अमलांत आणणार, प्रत्यक्ष लढणारे लोक तिसऱ्याच्या हातांत, आणि खर्च तर ज्याचा त्यानें परभारें भागवावयाचा, असा हा बारभाईचा प्रकार सिद्धीस जावा कसा! एकंदर मराठशाहीच्या कारभारांतील पहिला ठळक दोष ही फौजेची अव्यवस्थित रचना होय. यासंबंधानें शिवाजीचा प्रकार अगदीं भिन्न होता. शाहूच्या पत्रांतील ठरीव वाक्य, हें ‘स्वामिकार्य सिद्धीस पाववून स्वामीस संतोषवावें हें उचित आहे.’ अशा नुसत्या शब्दांस स्वतंत्र होऊं इच्छिणारे सरदार थोडीच भीक घालणार! हुकूम अमान्य करणारांस कडक शासन केल्याशिवाय राज्यकारभार सुरळीत चालत नाहीं. स. १७४१ त शाहू रघूजी भोसल्यास लिहितो, ‘तुम्हीं बराबर मातबर फौज घेऊन सामील व्हावें म्हणून लिहिलें होतें, त्याचें उत्तर, ‘आपल्या प्रांतांतील बंदोबस्तास गुंतलों आहें, म्हणून तपशिलें लिहिलें तें कळलें. ऐशास, तुम्हीं मातबर सरदार, राज्यभाराचा बंदोबस्त राखावा या अर्थी लिहिलें असतां, तपशिलें लावून लिहितां. काय म्हणावें! स्वामीचे हातपाय तुम्ही. आजपर्यंत तुम्हींच राज्य रक्षिलें व पुढेंही भिस्त तुम्हांवरच आहे. उचित म्हणाल तसें कराल. बहुत लिहिणें तरी सुज्ञ असा.’ (रा. खं० ६–१४९). ‘तुम्हांस ऐवजाविषयीं वरचेवरी आज्ञापत्रें पाठविलीं, परंतु तुम्हीं निकाल करून पाठविला नाहीं. डोळेझांकी करून दिवस घालविले. ह्यानें परिणाम लागतो ऐसें नाहीं. ह्याउपर हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी सालगुदस्त व सालमजकूरचे ऐवजाचा निर्वाह करून खितावीनें पाठविणें. हे

गोष्टी तुम्हांपासून होत नाहीं तरी स्वामी विचार करणें तो करतील. मग तुम्हांस विचार भारी पडेल. हें जाणून वर्तणूक करणें.' (रोजनि० १६४). 'तुम्हांस दर्शनास येणें म्हणून दोन चार आज्ञापत्रें सादर केलीं असतां यावयाचा विचार केला नाहीं म्हणून अपूर्व वाटतें. सेवक लोकीं स्वामींची आज्ञा होईल तेणेंप्रमाणें वर्तावें हें उचित आहे. हुजूर यावया अनमान करतां हे गोष्टी कार्याची नाहीं. तरी जे क्षणीं पत्र पावेल ते क्षणीं स्वार होऊन टाकोटाक स्वामीसंनिध येणें. अतःपर दिवसगतीवरी न घालणें.' (रोजनि० १६५). अशाच मासल्याचें बाजीरावास पत्रः—'तुम्हीं हुजूर येण्याची आज्ञा करून वरचेवरी पत्रें सादर झालीं असतां अद्यापि येण्याचा विचार दिसत नाही. ह्यावरून काय म्हणावें! निष्ठेचें निदर्शन स्वामीस यावें, म्हणोन तुम्हांस वारंवार लिहिलें व भेटीसही येण्याची आज्ञा केली असतां, तुम्हांकडून आळस होऊन दिवस घालवितां. स्वामीसंनिध उभय पक्षींचे कळ राखून चालण्यास एक चांगला (इसम) योजावा म्हणून लिहिलें. त्याचाही विचार तुम्हींच करावयाचा तोही न घडला. याजमुळें कित्येक राज्यकारभारासंबंधीं कामें तटलीं. तुमचेही प्रत्ययास येऊन, त्यांचीं उत्तरें प्रत्युत्तरें तुम्हींच करतां त्यांची विस्मृति. हे कच्चे कपे वरचेवर लिहून तुम्हांस जागृत करण्याविषयीं स्वामीस आळस नाहीं. तुम्ही आज कराल, उद्या कराल, म्हणोन कालहरणही हुजूरून होत नव्हतें. तुम्हीं कळकळ धरून राज्यभारसंरक्षणार्थ सावधता करावयाची, हें सदैव पत्रीं किती लिहावें! कांहीं दिवस एकवेळ समक्ष झाल्याव्यातिरिक्त कोणतेंही कर्तव्य स्वामीस नाहीं. पुढें तुम्हांपासून घडतच नाहीं असा निश्चय जाल्या स्वामीस विचार करणें प्राप्त होईल. तो दिवस अवघड वाटेल. मग धावाधाव करूं लागाल. म्हणून वारंवार सुचवितों. तुमचे वडिलांनीं निष्ठा धरून चालल्या, कल्याण झालें न झालें हें तुम्हींच चित्तांत आणावें. जाणिजे.' (खं. ६–१६). हें पत्र सन १७२२ तलें आहे; आणि पुढें अशा मासल्याचीं पत्रें वारंवार शाहूनें बाजीरावास लिहिलेलीं आहेत. आंगरे, दाभाडे (भा. व. प.

या. ले. ७३ ), गायकवाड वगैरे मंडळीसही अशाच प्रकारचीं पत्रें लिहिलेलीं आहेत. पत्रांची भाषा जर इतकी कडक तर प्रत्यक्ष शाहूस केवढा राग व किती चीड आलेली असेल ह्याची कल्पना होते. एकतंत्री कारभार नसल्यामुळें असला प्रकार झाला, आणि जागेवर बसून शाहूस सूत्रें हालवावयाचीं असल्यामुळें एकतंत्री कारभाराची पद्धत शाहूस स्वीकारितां आली नाहीं. त्यांतल्या त्यांत सचिव, प्रतिनिधि, फत्तेसिंह भोसले वगैरे मंडळी शाहूशीं नम्र भावानें वागत, म्हणून त्यांजला लिहिलेलीं पत्रें वरच्या सारखीं रागाचीं नाहींत. शिवाय हे सरदार शाहूपासून दूर क्वचित्‌च जात असत. जाग्यावर बसून हे बाहेरच्यांच्या चहाड्या करीत; आणि शाहूसही जाग्यावरूनच हुकमत गाजवावयाची असल्यामुळें, असे दोन पक्ष दरबारांत त्यानें कायमचे ठेविले. स्वराज्यांत एकमेकांविरुद्ध असे दोन पक्ष कायम ठेविल्यानें राज्याचें भारी नुकसान होतें. मुसलमानांसारख्या परकीय राज्यकर्त्यांस राज्यांत असे दोन पक्ष ठेवणें जरी इष्ट असलें, तरी स्वराज्यास त्यापासून अपाय होतो. ह्याप्रमाणें शाहूच्या राज्यकारभाराचें मुख्य वैगुण्य होतें. एकंदरींत स्वतःच्या वजनानें जरी शाहूनें राज्यकारभार हांकिला, तरी राज्यकर्ता या नात्यानें त्याची योग्यता बरीच कमी मानावी लागेल.

शाहूच्या अंगीं राज्यकर्त्याला लागणारे पुष्कळसे गुण होते. मात्र नेहमीं मोहिमांवर फिरत राहिला असता तर सर्व गोष्टींचा निकाल त्यास स्वतःच्या स्फूर्तीनें करितां आला असता. निदान बाजीराव, रघूजी सारख्या सरदारांनीं त्यास प्रसंगवशात् दिल्ली, रामेश्वर पावेतों एक दोन वेळां तरी फिरवून आणिलें पाहिजे होतें. स. १७१०–११ नंतर शाहू रणक्षेत्रावर केव्हांही अवतरला नाहीं. तरी सूत्रचालक या नात्यानें त्यानें आपली कामगिरी उत्तम रीतीनें बजाविली आहे. श्रीवर्धनकर पेशव्यांनीं राष्ट्रवृद्धीचें जितकें काम केलें, तितकीच किंमत शाहूच्या धुरीणत्वाला दिली पाहिजे. नित्य राष्ट्रवृद्धि होत असतां महत्त्वाकांक्षी सरदारांना आज्ञेंत ठेवून त्यांव-

करून काम घेणें सामान्य गोष्ट नव्हे. शाहू अल्पायुषी झाला असता तर राज्यवृद्धि होण्यास मोठी अडचण पडली असती. अशा एकंदर मुद्यांचा विचार करितां मराठशाहींत शिवाजीच्या खालोखाल शाहूची योग्यता होय असें वर म्हटलें आहे.

शाहूछत्रपतीच्या कारभाराचा, त्या वेळच्या मुत्सद्यांचा व प्रचलित आख्यायिकांचा तत्कालीन दृष्टीनें विचार करितां असें दिसतें कीं, शाहूचें मराठ मंडळाशीं पूर्ण तादात्म्य झालेलें होतें. प्रतिनिधि, पेशवे, फत्तेसिंग व रघूजी भोंसले, सचिव, मंत्री, चिटणीस, रक्षा व दासदासी हीं सर्व एका कुटुंबांतल्याप्रमाणें सलगीनें वागत, एकमेकांशीं मिसळत, एकमेकांस साह्य करीत व परामर्ष घेत. विशिष्ट मतलब व वैयक्तिक चढाओढ चालू असली तरी त्यास जातिद्वेषाचें हल्लींचें स्वरूप त्या वेळीं नव्हतें. भोजनाचे वेळीं पंगत निराळी होई; परंतु बाकीच्या प्रसंगीं स्वकीय राजाच्या विस्तृत छत्राखालीं सर्व असामी अनेक प्रसंगांत प्रेमानें भाग घेत. शाहूचें राज-मंडळ म्हणजे एक विश्वकुटुंब होतें. या कुटुंबाचें कर्तेपण पेशव्याकडे होतें, कर्त्या पुत्राप्रमाणें सर्व जबाबदारी अंगावर घेऊन पेशवा नानासाहेब अंतर्बाह्य व्यवहारांची व्यवस्था लावी. प्रधानांच्या व सरदारांच्या मुलामुलींचीं लग्नें, त्यांचीं माहेरसासरें करणें, या गोष्टी स्वतःच्या कुटुंबाप्रमाणें शाहू करी. व्यंकटराव घोरपडे, बाळाजी विश्वनाथाचा जांवई म्हणून त्याजवर शाहूचाही जांवयासारखाच लोभ असे. शाहूचें राजमंडळ इतकें कांहीं एकजीव झालेलें होतें कीं, आपण निराळ्या जातीचे आहों, ही भावनाही कोणाच्या मनांत येत नसे. शाहूला पितृतुल्य मानून नानासाहेब पुढें शाहूच्या पादु-कांची पूजा करीत असे. कारण त्याच्याच आशीर्वादानें आपण यश मिळवूं, अशी त्याची पूर्ण भावना होती. अशा एकीच्या भावनेनें सर्व मराठमंडळ त्या वेळीं वर्तत होतें. याच भावनेनें मराठ्यांच्या अठरापगड-जातींनीं शेंकडों रणांगणांवर व मोहिमांत शंभर वर्षे खांद्यासखांदा लावून राज्याचा उपयोग केला. दुसऱ्या बाजीरावाच्या नादान कारभाऱ्या व

जितजेतृभावाच्या कलुषित दृष्टीनें ग्रँड डफनें आपला ग्रंथ लिहिला, तेव्हांपासून जातिभेदाच्या प्रश्नास निराळें स्वरूप प्राप्त झालें, परंतु शाहूच्या वेळचा प्रकार भिन्न होता आणि पुढील राज्यकारभाराची शक्य तेवढी चांगली व्यवस्था आपण करून ठेविली, अशा भावनेनेंच शाहूनें आपला देह ठेविला, हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे.

४. शाहू छत्रपतींसंबंधानें तत्कालीन अभिप्राय.—१ विद्याभ्यास. औरंगजेबानें शाहूच्या विद्याभ्यासाकरितां मराठी पंतोजी ठेवून शिवाय त्यास फारशीही चांगलें पढविलें होतें. 'अक्षरओळख आंखटांक समजुतीपुरतें शिकविलें. नंतर काजी न्यायनिष्ठ असत, त्याच्याकडे चार घटका मनसबा उलगडण्याचे संधींत पाठवावें. वादिप्रतिवादी विवाद कसे करितात, तो ऐकून काजी न्याय कोणत्या रीतीनें करून दोघांची समजूत करितो, तें ऐकवून आणावें. नंतर घोड्यावर हत्तीवर बसावयाचे चालगती सर्व अभ्यास करविला. महाराज सदा आनंदांत. कधींही मनास त्रास कुगुंण नाहीं. कैफ अंमल यांजकडे दृष्टावलोकन करीत नव्हते.' शुक्लजी म्हणून एक हिंदुस्थानी चतुर ब्राह्मण मनोरंजन करणारा होता, तो शाहूबरोबर दक्षिणेंत आला.

२. दिनचर्या.—'महाराज पुण्यश्लोक, राज्यभार कारभारी यांजवर सोंपवून नेमिल्या नेमाप्रमाणें काम करावें. जाजती हुकमाशिवाय करण्याचा उजूर कोणाचा नाहीं. आपण जातीनें पांढरी तुमान व अंगांत कफनी, डोईचे केंस लांब सडक, उभे राहिले असतां गुडघ्याखालीं लवणीपर्यंत, कृष्णवर्ण, तेजस्वी, पालखींत बसून अगर घोड्यावर स्वार होऊन, दहाबारा खिजमतगार, व दहा पंधरा मनुष्यें जिलिबींचीं, पुढें दोन स्वार व मागें चिटणिशीकडील कारकूनसहित, पसतीस चाळीस मनुष्य घेऊन, अरण्यांतील शिकार करून तीन प्रहर, घटका दोन घटका अलीकडेपलीकडे, शिकार साधेल तशा रीतीनें, वाड्यांत येऊन आराम करून, शौचास जाऊन, हस्तपाद प्रक्षालन करून, भोजन करावें. नंतर कचेरीस

यावें. तेथें प्रातःकाळापासोन जी व्यवस्था झाली असेल, ती विचारून घेऊन, समक्ष येतील त्यांचे जाबजबाब होऊन दिवटीसलाम मुजरा जाल्यानंतर कचेरी बरखास्त करून, राजकारणीं कामाचीं पत्रें पाहून, त्यांचे जबाब देण्याविषयीं आज्ञा करावी; आणि महालीं मुक्कामीं काम काजाचे पत्राचा डौल, दररोज पाचशें द्यावा, त्यांचा झाडा पाहून राहिलीं असतील त्यांसुद्धां पांचशें करून द्यावीं, नंतर त्या कारभारीयास रजा द्यावी; अथवा त्याचे लायक गाणे, नाच असल्यास बसवावें, अगर खुशीरंगीनें बसेल तर निरोप द्यावा. या प्रकारें प्रत्यहीं प्रातःस्नानसंध्या पुराण पूजा करून स्वारीस जावें.' [भा. व. शा. म. ब. पृ. ४१.] महाराजांचे शरीरीं बालत्वापासोन सत्तर वर्षें वय होय तों दुखणें किंवा व्याधी कधीं झाली नाहीं. बहुत दृढ होतें. वारा, उष्ण, पर्जन्य, उघडे, सर्व काळ अंगावर बहुत सोसणें, शिकारींत वगैरेही मस्तकीं पागोटें नाहीं, ऐसेंही बहुत दिवस व्रत चाललें. विजार किंवा धोतर इतकें मात्र ल्यावें. शालजोडी पासोडी पुढें पाऊखीत असावी, ( शा. म. च. पृ. ९३. ) मराठी राज्याचा भाग्योदय व कळस शाहूच्या वेळीं परिपूर्ण झालेला दिसतो. कित्येक थोर गुणांत शाहू मोठा अद्वितीय पुरुष होऊन गेला. अशा राजपुरुषासंबंधानें तपशीलवार माहिती लिहून ठेवण्याचा संप्रदाय त्या वेळीं प्रायः नव्हता, तथापि त्याच्या उपलब्ध पत्रांवरून आणि बखरींतून जागोजाग आलेल्या आख्यायिका यांजवरून शाहूच्या योग्यतेसंबंधानें अंदाज करणें शक्य आहे. बखरींतील माहितीचा विचार करून पाहिल्यानें पुष्कळ बोध होतो.

३. कुटुंबपरिवार.—मातुश्रिया दोघी, संभाजीच्या नाटकशाळा, व मदनसिंग इतकी मंडळी झुल्फिकारखानानें रायगडावर पकडली. जोत्याजी केसरकर, मोरोपंत सबनीस व उद्धव योगदेव राजाज्ञा हे, शाहू, बादशहाचे कैदेंत असतां त्याजबरोबर होते. तेथें शाहूचीं दोन लग्नें झालीं. त्या दोन राण्या अंबिकाबाई व सावित्रीबाई; आणि विरूबाई रक्षा होती. ही विरूबाई व एक राणी स. १७०७ त शाहूबरोबर दिल्लीस गेली. दिल्लीस

गेलेली ही मंडळी बाळाजी विश्वनाथानें स. १७१९ त सोडवून आणिली. इकडेस शाहूनें आणखी दोन बायका केल्या, एक सकवारबाई व दुसरी सगुणाबाई. शिवाय लक्ष्मीबाई व धाकली सखू अशा दोन नाटकशाळा होत्या. [ इ. सं. पे. द. मा. पृ. २ ]. अशा प्रकारें शाहूचा विलास होता. या जनानखान्याबाहेर त्याचें पाऊल पडल्याचा खात्रीलायक पुरावा नाहीं. त्यास मुली व मुलगे पुष्कळ झाले. मुलगे जगले नाहींत इतकेंच. सर्व जनानखान्यावर विरूबाईची हुकमत होती. येसाजी व कुसाजी भोसले म्हणून महाराजांचे दोन लेकावळे होते, ते लक्ष्मीबाईचे मुलगे असावेत. त्यांस शिरोळसुभा महाराजांनीं दिला; म्हणून त्यांस शिरोळकर म्हणत [ रा. ख. २ पृ. ८७ ]. विरूबाई स. १७४० च्या सुमारास वारल्यावर कुटुंबांत फारच अव्यवस्था झाली सगुणाबाईची चुलत बहीण नागपूरकर रघूजी भोंसल्यास दिलेली असून या बहिणीच्या मुलास दत्तक घेणेचा शाहूचा एकवार विचार होता. रामराजा पुढें गादीवर आला, त्याचें दत्तविधान झालेलें नव्हतें. दत्तक देणारा व घेणारा कोणीच शिल्लक नव्हता. निपुत्रिक क्षत्रिय राजा मरण पावला तर ' मध्यग्रह दत्तक ' विधीनें नवीन राजा दत्तक घेतां येतो, असें पृथ्वीचंद्रोदय, तोडरानंद वगैरे ग्रंथांत सांगितलें असल्याचें कळतें. रामराजाच्या राज्यारोहणप्रसंगीं असा मध्यग्रह दत्तक विधी केला कीं काय तें कळत नाहीं; परंतु शाहूनें स्वलेखानें पुतण्या राजारामाला आपला वारस नेमिलें. ( वा. वि. जोशी ).




विरुबाईच्या पोटीं शाहूला राजसबाई नांवाची मुलगी असून, भवानीबाई नांवाची तिची वडील बहीण असल्याचा उल्लेख आहे. ती तारळ्याचे शंकराजी महाडिक यांस दिलेली होती. तिनें सहगमन केलें, व तिचे मुलगे दुर्गोजी व आबाजी भांडूं लागले, तेव्हां शाहूनें आबाजीस निराळें

इनाम तोडून दिलें. [इ. सं. ऐ. टि. भा. २ ले. ५; शा. म. रो. ले. २९४; व इ. सं. पे. द. मा. ले. ३ पृ. २५७]. गजराबाई म्हणून आणखी एक मुलगी शाहूला असून ती बांडे यांजकडे दिलेली होती. [शा. म. रो. ले. ९२] बापाचे मृत्यूनंतर ती बांड्यांचे वडगावास गेली. [ना. सा. रो. १. १३०].

४. लोभांतील मंडळी.—विरूबाई, जोत्याजी केसरकर, बसवंतराव कामुरडे, विठोजी खोजे, इंद्रोजी कदम सुपेकर, शेट्या बावजी संकपाळ, हुजरे मायाजी फडतरे, मेंगोजी हुकेबारदार, अशा कित्येक मंडळींच्या मनोरंजक आख्यायिका भारतवर्षमासिकात व ठाण्याच्या बखरींत दिल्या आहेत. सातारा व त्याच्या आसमंतांतील शाहूच्या वेळचीं स्मरणीय स्थळें आणि कृत्यें, तसेंच शाहूचा स्वभाव व जवळची मंडळी, यांसंबंधाने ठाण्याच्या बखरींत पृष्ठ ११९ पासून १३६ पावेतों मजकूर अवश्य वाचण्यालायक आहे. आपल्यावर झालेल्या उपकारांची फेड शाहू अत्यंत दक्षतेनें व सढळ हातानें करीत असे. जोत्याजी केसरकर याचे पूर्वोपकार स्मरून त्यास शाहूनें मोठ्या योग्यतेस चढविलें. ' बालपणापासून एकनिष्ठपणें त्यानें सेवा केली, व त्याची सेवा घेतली. सबब महाराज छत्रपती स्वामी त्यावर कृपाळू होऊन त्यास सरदेशमुखी वतनांचे वतनी गुमास्ते केलें, व १८ कारखान्यांवर अधिकार देऊन दरख नेमून दिले. जरीपटका त्यानें स्वारीबरोबर हत्तीवर पुढें धरावा; व शहर सातारा येथें वाड्यापुढें सरकारी होळी होईल तीस त्यांनीं पोळी बांधावी व पूजा करावी. याप्रमाणें मानपान करून दिले. दिल्लीहून आले, तेव्हां उतरले, तेथें केसरकर यांनीं गुरुवार पेठेची वसाहत केली, या पेठेची जकात माफ व कायदेकानू वगैरे त्याजकडे चालवावे, अशीं राजपत्रें करून दिलीं. तुह्मीं आपलें लग्न करावें, अशी आज्ञा केली असतां केसरकरांनीं स्वामीस अर्ज केला कीं, माझें म्हातारपण, ऐशीं वर्षांची उमर, आतां लग्न नको; परंतु महाराजांनीं पुत्र होतील असा

आशीर्वाद दिल्यावरून त्यांनीं लग्न केलें. कांहीं दिवसांनीं त्यांना दोन पु झाले. सांवताचे वाडीनजीक केसरी गांवाचे वतनदार म्हणून केसरक नांव पडलें.' बाजीराव व परसोजी भोसले, शेखमिरे, विसाजी नाराय जाखी, [ इ. स. पे. द. मा. पृ. १०, ११, ११९ ]. आनंदराव सुमंत बारामतीकर जोशी वगैरे आपणांस प्रसंगीं साह्य करणारांस त्यानें मोठ्या योग्यतेस चढविलें, अशीं आणखीं शेंकडों उदाहरणें आहेत [ पहा शा. म. रो. ले. ९३–९४ ]. शहाजीचें वृंदावन व मौजे वडू येथील संभाजीचें वृंदावन यांची व अशाच पूर्वजांच्या व कुटुंबीयांच्या आठवणींची यथायोग्य व्यवस्था शाहूनें बांधून दिली. ( शा. म. रो. ले. ८७–८८ ). चिंचवडचे मोरयादेव, एकनाथ, तुकाराम, कल्याण गोसावी, नाशीक येथील पूर्णानंदस्वामी, मनसाराम उदासी, नानकपंथी व मुसलमान संत यांच्या समाधीच्या नेमणुका त्यानें बांधून दिल्या. [ पे. द. मा. पृ. २३७, २४०, २५८ ]

शाहूमहाराजांविषयीं पुष्कळ गोष्टी व आख्यायिका जर अद्यापि सांगण्यांत येतात, तर त्यांच्या हयातींत व मृत्यूनंतर कांहीं काळ पावेतों त्या पुष्कळच प्रचलित असल्या पाहिजेत, असें अनुमान होतें. आख्यायिका जरी अक्षरशः खऱ्या नसल्या, तरीं तात्पर्यार्थानें त्यांत तथ्य असतें, आणि म्हणूनच एखाद्या ऐतिहासिक व्यक्तीच्या आख्यायिका म्हणजे तिचा स्वभाव ओळखण्याची मुख्य खूण, असें पाश्चात्य इतिहासकार समजतात. सारांश, इतिहासांत आख्यायिका कधींही त्याज्य समजूं नयेत. एके प्रसंगीं कोणी सरदार ( इंद्रोजी कदम ? ) आपलें व हाताखालच्या लोकांचीं शरीरें मोलवान दागदागिन्यांनीं सजवून मोठ्या ऐटीनें शाहूचे भेटीस आला. महाराजांस हा प्रकार समजल्याबरोबर त्यांनीं आपल्या खंड्या कुत्र्याचे अंगावर दागदागिने, पागोटीं, शिरपेंच वगैरे चढवून त्यास दरबारांत बसविलें आणि आपण जवळ साधें कुडतें घालून बसले. त्या सरदारानें दरबारांत येऊन हा प्रकार पाहिल्यावर त्याचें मन खट्टू झालें आणि महाराजांची वाखाणणी

करून रीतीप्रमाणें भेट घेऊन निघून गेला. अशा रीतीनें शाहूनें सर्व लोकांस साधेपणाचा व संसारांतील खऱ्या रहस्याचा उत्कृष्ट धडा शिकविला. एकंदरींत इहलोकच्या संसारयात्रेचें खरें बीज शाहू चांगलें जाणत असून, त्याचा प्रभाव पन्नास वर्षें पावेतों एकंदर मराठमंडळावर बिंबला होता. तसेंच लोकांनीं केलेली सेवा अगर कामगिरी याचा बदला यथायोग्य दिल्याशिवाय शाहू कधीं राहत नसे. इ. स. पे. द. माहिती या पुस्तकांत इनामें वगैरे दिल्याचे इतके कागद छापलेले आहेत कीं, त्यांचा नुसता नामनिर्देशही करणें येथें शक्य नाहीं.

बाळाजी विश्वनाथ, रघूजी व फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधि वगैरे अनेक मंडळीस शाहूनें किती योग्यतेस चढविले, तें महशूर आहेच. आख्यायिकां-वरून शाहूच्या स्वभावाची अटकळ होते. अशा गोष्टींत सुद्धां, अनीतीचा किंवा गाफीलपणाचा ध्वनि शाहूच्या संबंधानें क्वचित् ऐकूं येतो. सर्वत्र त्याचा गौरवच आहे. बसवंतराव कासुरडे नांवाचा जातीचा वाणी विरूबाईजवळ होता. विरूबाईही त्याच्याच जातीची होती. तीं दोघें एकमेकांचा अभिमान बाळगून बहीणभाऊ म्हणवीत. जनानखान्यांत राहण्यायोग्य असल्यामुळें बळवंतराव खोजे असें नांव त्यास पडलें होतें. विरूबाईला तो समुद्रस्नानास घेऊन गेला होता. जनानखान्यास दरुनीमहाल असें म्हणत, त्या ठिकाणीं बसवंतरावाचा पहारा सक्त असे. त्याच्या दक्षतेचीं अनेक उदाहरणें घडून आल्यावरून शाहूने त्यास उदंड द्रव्य बक्षीस दिलें. 'राजे मोठे पुण्यप्रतापी, पुण्यपुरुष, दानशूर, लहानथोरांस देणग्या देऊन कीर्ति जगविख्यात केली; राज्यांत सर्वांचा जीर्णोद्धार केला. प्रत्यक्ष शिवाचा अवतार. बसवंतरावानें पुष्कळ द्रव्य जमा केलें, तें तो सरकारांत देऊं लागला; परंतु महाराजांनीं त्यास दानधर्म करण्यास सांगितलें. त्यावरून श्रीशंभुमहादेवाचें देवालय हेमाड-पंती सिंघणराजाच्या वेळचें होतें, तें उकलून बारामतीहून दगड आणून देवालय नवीन बांधविलें. पायरीचे कांसवालगत ' चरणीं तत्पर बसवंतराव निरंतर, ' अशीं अक्षरें कोरलेलीं आहेत. साताऱ्यांत बसवंतपुरा ऊ०

बसाप्पाची पेठ व बसाप्पाची वाडी त्याचे नांवाची आहे. कसबे निंब येथें विरूबाईनें बाग व विहीर बांधिली, त्यानजीक बसाप्पानें वाडा बांधिला. विरूबाईनें परळी किल्ल्यावर रामदासाचे समाधीसमोर आपल्या नांवचें एक तुळशीवृंदावन बांधिलें, आणि शंभुमहादेवास तिनें एक दीपमाळ बांधिली.' शंभुमहादेवाचा पुजारी शिवरामभट याजवर बसवंतरावाची मेहेरबानी होती. त्याजला तेथें राहाण्यास ठिकाण करून दिलें. शाहूस मारण्याकरितां मारेकरी आले होते; परंतु त्यांस महाराजांवर हात उचलण्याची छाती झाली नाहीं. त्यांस बक्षीस देऊन परत कोल्हापूरच्या संभाजीकडे पाठविलें. कारण त्याजकडून ते आले होते. ज्या हुजऱ्यानें त्यांचा प्रवेश करविला, त्यास त्या मारेकऱ्यांकडून शाहूनें ठार मारविलें.

मायाजी फडतरे नांवाचा हुजऱ्या हुशार व अक्कलवान असून शाहूच्या कृपेनें मोठ्या योग्यतेस चढला होता. तसेंच श्रीनिवासराव प्रतिनिधि यांजवर महाराजांची फार मर्जी होती. त्यांस स्वत: 'राव' अशी ते हाक मारीत. ते नित्य दर्शनास सरकारवाड्यांत येत. एके दिवशीं त्यांस येण्यास उशीर लागला, तेव्हां स्वतः महाराज त्यांच्या घरीं भेटीस गेले. महाराजांस शिकारीचा नाद विशेष होता. पुष्कळदां शिकारीच्या नादांत एकटेच कोठें तरी भटकत जात, त्या वेळीं ज्यांचा त्यांस उपयोग घडे त्यांचा परामर्ष ते स्मरणपूर्वक घेत. मेगोजी हुक्केबारदार नांवाचा इसम बादशाही चालीप्रमाणें हमेश हुक्का घेऊन स्वारीबरोबर फिरत असे. या मेगोजीवर शाहूनी मोठी मेहेरबानी होती. महाराजांचा आवडता खंड्या कुत्रा होता, त्याजला पोषाक व जडजवाहीर घालून ते दरबारांत जवळ बसवीत. या कुत्र्याचें थडगें संगममाहुली येथें बांधलेलें आहे. माहुलीजवळ एक पाणपोई लोकांस पिण्याचें पाणी मिळण्याकरितां ठेविलेली होती त्या जागेस पोईचा माळ म्हणत. तसाच महाराजांनीं एक गेंडा बाळगलेला होता, तो ज्या माळावर बांधीत त्यास गेंड्याचा माळा म्हणत. तेथेंच पुढें दामाजी गायकवाडाचा पेशव्याच्या फौजेनें पराभव केला. फत्तेसिंग भोसले यास शाहू स्वतःच्या पुत्राप्रमाणें

मानी. त्यास राजपुत्र असें संबोधून लिहिण्यांत येई. त्यास शाहूनें अक्कल-कोटास स्वतंत्र जहागीर तोडून दिली.

५ स्वभाव व राज्यकारभार.—“मनुष्यमात्रांस कृपाममता लावून वेध लाविला. सर्वांस वाटावें कीं, आपले इतकी कृपा कोणावर नाहीं. तैनाता, नेमणुका, जमिनी, इनामें, ज्याच्यापासून ज्या कामांत उपयोग त्यांत एखादा अवगुण आहे, तरी युक्तीनें झांकून तो त्याजपासून सोडवावा. गुण तितका प्रकट करून द्यावा, माणसें वाढवावीं. याप्रमाणें राज्याची उदयकालवृद्धि व्हावी हें समजून, पूर्वी वडिलांनीं सर्व माणसें दुखविलीं, मारिलीं, कारखाने बुडविले, त्यायोगें राज्यनाश झाला, उग्रदंड ब्रह्महत्या झाल्यावरून देवब्राह्मणांचे ठायीं बहुत निष्ठा, यथास्थित संगोपन करून माणसांचा गुणग्रहणच बहुत केला. आपलेसे करून वेधास लाविले. प्रौढ माणसें सर्वकाळ सहवासांत असावीं. त्यांच्या युक्ति व बुद्धि ऐकत असावें. सर्वांचा विचार विचारून कार्य करीत असावें.’ (शा. म. ब. चिटणीसकृत, पृष्ठ १९ ). ‘देवब्राह्मणांचें इनाम अग्रहार पूजा नैवेद्य नंदादीप पूर्वील दिले ते चालवून जेथें नाहीं तेथें नवीन बंदोबस्त करून दिले. सेवक लोक बहुत निष्ठेनें आज्ञा तिळप्राय उल्लंघन न करितां महाराजांसीं चालूं लागले. जें कार्य ज्यास सांगितलें तो करावयासी गेला, तेथें त्यास यशच प्राप्त व्हावें. ज्यांनीं त्यांनीं राज्यवृद्धीस पावावें, हेंच करूं लागले’ [ सदर. पृ. ३२ ] “पूर्वी विसकळीत प्रसंगीं चांगलीं माणसें, मातबर लोक परराज्यांत गेले, ते प्रयत्नानें आणून, सेवेंत त्यांचे बंदो-बस्त करून ठेविले. गोरगरीब फिर्यादीस उभे राहिले असतो, स्वारींत पालखी उभी करून अगर मजालसींत ऐकून घेऊन समक्ष आज्ञा लाग-लीच सांगावी. न्यायप्रकरणाकडे सांगावयाचें असेल तें त्यांजकडे सांगून पुनः ऐकून घ्यावें. तालुकदार सुभेदार यांजकडील असेल तें त्यांजकडे सांगावें. वाजवी तें होऊन कोणास वावगा उपद्रव लागूं नये, असें केलें. उग्र दंड करावयाचा नाहीं. शिरःच्छेद करणें असतां अन्याय असल्यास

आणि बहुत विवेकें करून ठरल्यास कान्होजी आंगरे यांजकडे रवाना करावें. त्यानीं मारणें त्यांस मारावें ' ( पृष्ठ ३३ ). शिरःच्छेदाची शिक्षा कुलाब्यावर कडेलोटानें होत असे, असें दिसतें.

" शिकारीचा हव्यास राजधर्म होय. ते बहुत तरतूद सामान वाघ्रा ( वागुरा=जाळीं ) वगैरे असावें. त्या कारखान्यावर हजारों माणूस जळस्थळआकाशीं शिकारीचे तिन्ही प्रकार सिद्ध असावे. बाज, लगड, चित्ते, कुत्रे, जोडया, पायदाने वगैरे बाळगिले. त्यावर मल्हार प्रभु दरोगा केला. " ( पृ. ३३ ).

" सातान्यास तख्त करून राहिले तेव्हांपासून राज्यकारभार सेवक लोकांपासून मोठ्या मसलती व युद्धप्रसंग मोठ्या फौजा पाठवून केले, मनसब्यांत बहुतच चतुर, सर्व राज्य मोगलाईत गेलें होतें, तें मसलतीनें सोडविलें. सर्व लोक आज्ञेंत वागवून नवीन मोठीं माणसें निर्माण केलीं, वाढविलीं. जुनीं माणसें अनुकूल झालीं त्यांचे चालविलें. शहाण्या पोक्त माणसांच्या मसलतीनें चालावें. विश्वासू सेवक लोकांचे हातें कामें घ्यावीं. लघु मनुष्य कैफी व्यसनी दारूबाज यांस समीप न ठेवितां मुत्सद्दी लोकाचे हातून कारभार चालविला. मराठे लोकांस शिपाईगिरीचे कामांत ठेविलें. उत्तरदेश सोडवून थोरले महाराजांचा उद्देश सिद्धीस नेला. पूर्वेस दक्षिणेस चतुःसमुद्र मर्यादा होऊन चहूं दिशेचें राज्य एक आज्ञा चालूं लागलें.

" श्रावणमासांत ब्राह्मणांची वेदशास्त्रांत परीक्षा करून प्रथम दाभाड्यांचे मार्फत तळेगांव येथें, व पुढें पुणें येथें, चार पांच लक्ष धर्म करावा, असें ठरविलें. दिगंत कीर्ति जाऊन विद्वान तपस्वी महापुरुष चहूं दिशेचे लक्षावधि येऊं लागले. जशी काशी तसें सातारा पुणें विद्यापीठच झालें, आज्ञा कोणीं उल्लंघन न करावी, ऐसें सार्वभौम राज्य केलें. नीतिन्यायें करून प्रजेचें पालन पोषण केलें. गरीब अनाथाचे ठायीं बहुत दया करून त्याचें दुःख परिहार करावें. रयतेस उपद्रव काडीमात्र नाहीं. पर्जन्यवृष्टि यथाकाल होऊन पृथ्वीनें धान्यपीक बहुत द्यावें ऐसें सुभिक्ष झालें."

सातारा हें किल्ल्याचें नांव. शहराचें नांव शाहूनगर ठेवण्यांत आलें. “ सर्व कारखाने किल्ला साताऱ्यावरी ठेवून वरता वाडा बांधविला. शाहू-तलाव म्हणून तळें केलें. कांहीं लोक वरते, कांहीं खालीं रहावे असें केलें. खालीं शाहूनगर त्यास व वाड्यास पाणी खर्चास नाहीं; म्हणून यवतेश्वराहून नहर बांधून आणिले.”

शाहू मोठा मनमिळाऊ होता. निःस्पृहता व क्षमा या गुणांच्या जोरावर त्यानें आपला दरारा सर्व मराठमंडळावर बसविला. या दराऱ्याच्या व वैभवाच्या दृष्टीनेंच विचार केला तर उत्तर मराठशाहींत शाहूच्या बरोबरीचा दुसरा पुरुष झाला नाहीं. शत्रूशीं लढत असतांना सुद्धां कधीं आग्रहाने एखाद्यास क्रूर शिक्षा केली, असा प्रकार झाला नाहीं. सर्वांस ममतेनें वागवून त्यानें आपल्या लगामीं लाविलें. मनुष्य जोडावा कसा हें तो उत्कृष्ट जाणत असे, जणूं काय बापाच्या विपरीत वर्तनानें राज्यावर काय परिणाम झाला,, तो त्याच्या हृत्पटलावर सदैव कोरलेला होता लोकांनीं केलेले अपराध साफ विसरून तो त्यांस काम देई; आणि त्यांनीं चांगलें काम करून दाखवितांच त्यांस मोठमोठीं इनामें व बक्षिसें देऊन नेहमीं खूष ठेवी. केव्हां त्यांस जरब दाखवी, व केव्हां त्यांचीं आर्जवें करी. (भा. व. पु. १., प. या. ले. ३६, ३८; व रा. खं. ६, ले. १६, ८६ व ८५ ). त्याचें औदार्यही अप्रतिम होतें. स्वतः साध्या वृत्तीनें राहून दुसऱ्यास सुखी व आनंदी पाहून त्यास कृतार्थता वाटत असे. बखरींतलि हकीकती वाचल्यावर वरच्या सारखा ठसा मनावर उठल्याशिवाय राहत नाहीं. प्रत्यक्ष मारेकऱ्यांनीं येऊन हल्ला केला असतां, त्यांसही त्याजवर शस्त्र उगारण्याची छाती झाली नाहीं. ‘ कारभाऱ्यांनीं पाहिलें तर तुम्हांस मारतील. शस्त्रें ठेवून निघून जा कसे, ’ असें सांगून शाहूनें त्यांस वाटेस लाविलें. ( भो. म. बखर, पृ. ६०. ) ‘ याप्रमाणें अजातशत्रु महाराज, शत्रूसही घाताची इच्छा होऊं नये, ’ अशी शाहूची वृत्ति होती. शाहूच्या वेळेस मराठी राज्याचा फैलाव जितका वरील गुणानें झाला, तितका

बहुधा सर्व मराठे सरदारांच्या शौर्यानेंही झाला नसता. तो स्वतः मोठासा मुत्सद्दी अगर कल्पक नव्हता, पण हे गुण ज्यांच्या ठिकाणीं होते, त्यांस त्यानें उपयोगांत आणिलें. त्यास अन्यगुणपरीक्षा चांगली होती. रयतेच्या आबादानीकडे शाहूचें लक्ष नेहमींच विशेष असे. ओसाड प्रदेशाची वस्ती करणें, धामधुमीच्या प्रसंगीं रयतेस सवलती देणें, वाढलेले धारे कमी करणें, नवीन धारेबंदी करून देणें, अशीं कामें शाहूनें पुष्कळ केलीं आहेत. [इ.सं. पे. द. मा. पृ. २७५-२८६]. त्याच्या बहिणीचा नवरा शंकराजी महाडिक तारळेकर यानें आपल्या इनाम गावांस रयतेवर जुलूम केला, त्याचा निषेध करून जरब दिल्याबद्दलचें पत्र इ. सं. ऐ. रि. भा. २ पृ. २ येथें दिलें आहे. 'ऐसा वतनदारीचा पेशा नर्मदेपासून रामेश्वरपर्यंत नाहीं. रयत चोराची नव्हे,' अशीं झणझणीत वाक्यें त्यांत आहेत.

'पर्दे दूर केलीं किंवा नजर ठरविलीं, मुलखाच्या घालमेली केल्या असतां कोणही एक फंद किंवा आज्ञा उल्लंघन न करितां चालले. याप्रमाणें मोठे धारेनीं व मनसब्यांनीं राज्य बहुत दिवस महाराजांनीं अकुंठित आज्ञा (absolute power) चालवून केलें. (शा. म. च. पृ. ८८).

शाहूला राज्याची दगदग आवडत नसे, हें म्हणणें खरें नाहीं. तो प्रत्यक्ष स्वारींत गेला नाहीं, व स्वसंरक्षणाची हमी त्यानें दुसऱ्याचे हातीं दिली, या मुत्सद्देगिरीच्या चुका म्हणता येतील. परंतु जाग्यावर बसून सर्व कारभाराची व्यवस्था लावण्यांत तो यत्किंचित् हयगय किंवा आळस करीत नसे. व्यसनांत किंवा चैनींत निमग्न राहून कर्तव्य विसरला असें उदाहरण नाहीं. शाहूला क्षणाचीहि फुरसत नव्हती. रोजनिशींतील पत्रव्यवहार बारकाईनें वाचला म्हणजे त्याच्या उद्योगाची कमाल वाटते. रोज पांचशें कामांचा तो निकाल करी, असें जें बखरींत विधान आहे तें सामान्यतः खरें दिसतें. सर्व बारीकसारीक व्यवहारांची व तपशिलाची व्यवस्था तो स्वतः लावी. स्वतः सर्व सरदारांचा झाडा व जाबसाल घेई. त्याची आज्ञा मोडण्याची छाती कोणास होत नसे. या गोष्टी तो अधिकाराच्या जोरावर करीत असे, असें नाहीं. राष्ट्राचा

मुख्य पुरुष या नात्यानें तो सर्वांचा परामर्ष घेई. त्यांच्या सुखदुःखांत संविभागी होऊन, सण, उत्सव, मेजवान्या वगैरेंच्या निमित्तानें सर्वांचें हृद्गत समजून घेऊन सर्वांवर आपली छाप कायम ठेवी. बाजीरावास मुलगे झाले, त्यांचे पुत्रोत्सव झाले. दानधर्म वांटला, दिल्हा, महाराजांची स्वारी मेजवानीस गेली. सर्व लहानथोर मंडळी गेली होती; ' विश्वासराव जन्मास आला. साखरा वांटल्या. देकार ब्राह्मणांस दिले. मेजवान्या लहानथोरां सहित, महाराजांस पूर्वी करून, केल्या. ' सर्व प्रमुख व्यक्तींसंबंधानें असाच परामर्ष शाहूकडून घेतला जात असे. लग्नादि प्रसंगानें सर्व सरदारांकडून महाराजांस मेजवान्या होत. शाहू असे प्रसंग मुद्दाम घडवून आणी. एवंच शाहू हा राष्ट्रहिताचा केवळ प्रचंड बलसंचय व तत्कालीन राष्ट्रोद्योगाचा मूर्तिमंत अवतार होता, यांत संशय नाहीं. शाहूच्या आगमनापासून अखेरीपावेंतों त्याचा व मराठशाहीचा एकंदर उद्योग एकसमयावच्छेदानें मनांत आणला म्हणजे याच्यासारखा थंडा, मनमिळाऊ, रुआबदार व दयार्द्र राजा चाळीस बेचाळीस वर्षें पावेतों मराठशाहीस लाभला म्हणूनच मराठी राज्याची भरभराट झाली असें निःसंशय वाटूं लागतें. निरनिराळ्या प्रकृतींच्या शेंकडों इसमांस एका कार्याच्या लगामीं लावून त्यांजकडून कामें घेणें, हें काम अत्यंत बिकट असून तें शाहूइतकें चांगलें सहसा कोणासही करतां आलें नसतें. व्हिक्टोरिया महाराणीच्या कारभाराची आठवण शाहूचे उद्योग वाचतांना होते. सरदार रागावले किंवा चिडले तर आपण न चिडतां त्यांची समजूत घालणें, आणि शांत वृत्तीनें त्यांजवर आपली छाप बसविणें, हें काम सोपें नाहीं. चिमाजी आप्पास शाहू लिहितो, " तुम्ही विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. लेखनार्थ अक्षरशः अवगत जाला. ' स्वामींनीं आमचे गळां नेहेमीं चहूं लक्षांचा खर्च बांधला आहे; आणखी राऊत पाठवावयाची आज्ञा होते हेंच अपूर्व, हे किल्ले कोणाचे स्वाधीन करणें तें करावे, म्हणजे तळें घोसाळ्यास राऊत पाठविले आहेत तेच तिकडे रवाना करूं. ' म्हणोन विषादें लिहिलें,

" त्यास तुम्हीं स्वामीचे अखत्यारी सेवक, राज्यांतील स्थळें जतन करून राज्याभिवृद्धी करावी हाच तुमचा सेवाधर्म, त्याप्रमाणें तुम्हीही करीत आहां. पुढेंही सर्वप्रकारें स्वामीस तुमचाच भरंवसा आहे. किल्ले कोणाचे स्वाधीन करावे, म्हणोन लिहितां हेंच अपूर्व. तुम्हांसारिखे कर्ते सेवक स्वामीचे पदरीं असतां, दुसरा जतन करणार कोण ? किल्ले कोट जतन करून स्वामींचें राज्य संरक्षण करावें, असेंच पद तुमचें आहे. सात किल्ले ते काय आहेत ! त्यांचें संरक्षण करून गनीमास शासन तुम्हां-सच करावें लागतें. गोवळकोटाचे मसलतीस राऊत तुम्हांकडील आलेच पाहिजेत. पर्यायें लिहिल्यानें स्वामीची निष्ठा होत नाहीं. तुम्हीं लोकीं असें लिहिलें हें तुम्हांस उचित नाहीं. यास्तव हें आज्ञापत्र सादर केलें आहे. तरी पत्रदर्शनीं राउतांची रवानगी करणें. याविषयीं अंतर सहसा न करणें. सूज्ञ असा." [ भा. व. प. या. ले. ३८. ] आपला शह ठेवून वैतागलेल्या चिमाजीस घेतलेला मऊ चिमटा किती मार्मिक आहे !

बाजीरावास उत्तेजनार्थ लिहिलेलें असेंच एक पत्र स्मरणीय आहे. " रा. पिलाजी जाधवरावास स्वामीचे आज्ञेप्रमाणें रवाना केले; म्हणोन रा. मल्हारराव तुकदेव ( पुरंदरे ) यांस लिहिलें तें त्यांनीं स्वामींस विदित केलें. त्यावरून स्वामी बहुत संतोष झाले. तुम्ही हुकूमबारदार सेवक. तुम्हांस स्वामींचे आज्ञेपेक्षां अधिकोत्तर काय आहे. जें स्वामींचें मानस तोच अर्थ तुम्ही सिद्धीस पाववाल हा स्वामींस भरंवसा आहे. स्वामि-कार्यांचें यश तुमचेच विभागास आलें आहे. जाधवरावास पाठविलें, येणेंकरून स्वामिकार्य सिद्धीस पावत आहेच, यांत संदेह नाहीं. याउपरी मशारनिल्हेस जलदीनें स्वामींसंनिध पाठविणें. आम्हांस आगत, तें तुम्हांस आगत. जें स्वामिकार्य तेंच करितां. बहुत काय लिहिणें सूज्ञ असा. " [ भा. व. प. या. ले. ३९ ]

६ निष्कर्ष—मानवी व्यवहार अपूर्ण असून ते सुद्धां सर्वथैव आपणास अवगत नसल्यामुळें कोणत्याही मुद्यासंबंधानें किंवा व्यक्तीसंबंधानें अमुक

एक निश्चित मत आग्रहानें प्रतिपादन करणें केव्हांही विचारवंतांस मान्य होणारें नाहीं. शिवाय एकाच विषयाकडे भिन्न दृष्टीनें व भिन्न अनुभवानें पाहिल्यास, तोच विषय भिन्न दिसूं लागतो. उदाहरणार्थ, शाहूच्या गुण-दोषांसंबंधीं कितीही विचार केला तरी त्या वेळची परिस्थिति, त्याच्या खऱ्या अडचणी इत्यादिकांचो भरपूर माहिती आपणांस नाहीं. तेव्हां एका दृष्टीनें पाहतां, जितकें कांहीं राज्यहित करणें शक्य होतें तितकें त्यानें केलें. एकंदर मराठमंडळाच्या अंगीं जितका पराक्रम होता, तेवढ्याचा परिणाम त्यानें करून दाखविला. अशा अर्थानें झालें हेंच पुष्कळ, इतकें सुद्धां होणें अनेक कारणांनीं शक्य नव्हतें. शाहूच्या जागीं दुसरा कोणी असता, तर याहून कदाचित् वाईटच परिणाम झाला असता, असें समजून संतोष व्यक्त करणें जरूर आहे. बंगाल मद्रासप्रमाणें महाराष्ट्रभाग्याचा अंत अठराव्या शतकाच्या मध्याचे वेळीं न होतां, मराठशाहीनें पानिपत खडर्यां-सारख्या युद्धांत पराक्रम गाजवून आणि आपलें नांव इतिहासांत अजरामर करून, इतराहून पाऊणशें वर्षें ज्यास्त टिकाव धरिला, याचें पुष्कळसें श्रेय शाहूच्या शांत व प्रोत्साहक राज्यनीतीला दिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांची व राज्याची अंतर्बाह्य अधोगति धूमधडाक्यानें चालली होती; परिस्थितीशीं टक्कर देऊन पांचशें वर्षांत क्वचित् एखादा शिवाजी निपजला. प्रचंड मोगल बादशाही उलथून पडून पाश्चात्यांची हळू हळू सरशी होत चालली होती. अशा संकटसमयीं अठराव्या शतकाच्या प्रथमार्धांत मराठी राज्यांत शाहूनें नवीन जोम उत्पन्न केला, आणि सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचे नांवाचा दरारा बसविला, हा पराक्रम कांहीं लहान नव्हे. त्याच्या पश्चात् छत्रपतीच्या घराण्याचा बहुतेक अस्तच झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

५. **शाहू नगराची स्थापना**—सातारा हें किल्ल्याचें नांव. धामधु-मीच्या काळांत मराठ्यांची राजधानी प्रथम किल्ल्यावर असे; परंतु वाढत्या राज्यकारभारास किल्ला फार गैरसोयीचा वाटूं लागल्यामुळें शाहूनें

किल्ल्याच्या उत्तरेकडील पायथ्याशीं एक लहानसें शहर वसवून त्यास शाहूनगर असें नांव दिलें. त्यासच हल्लीं सातारा असें म्हणतात. या शाहूनगराची रचना व त्यांतील भागाचीं नांवें शाहूछत्रपतीच्या अमदानीची चांगली ओळख करून देतात. व्यक्ति, स्थळें, आख्यायिका इत्यादि राष्ट्रीय भावना जागृत करणाऱ्या गोष्टींचें स्मरण कायम ठेवणे, हें इतिहासाचें एक मुख्य काम असल्यामुळें, अर्धें शतकपर्यंत महाराष्ट्राशीं एकजीव झालेल्या या पुण्यविभूतीसंबंधानें मागें न आलेली अशी माहिती या स्वतंत्र कलमांत संकलित करण्याचा विचार आहे. त्यांत शाहूचें राजधानीचें शहर सातारा यास साहजिक महत्त्व आहे.

शाहूनगराची स्थापना सन १७२१ च्या सुमारास झाली असावी. शाहूच्या व पेशव्यांच्या आरंभीं भेटी होत त्या रोजनिशींत नोंदलेल्या आहेत, त्यांवरून त्याच्या रचनेचा थांग लागतो. इहिदे अशरीन मया व आलफ्च्या सफर महिन्यांत (स. १७२१) शाहूची भेट बाजीरावानें सातारा किल्ल्यावर घेतली. त्यानंतर सात आठ महिन्यांच्या भेटी माचीं किल्ले सातारा येथें झालेल्या आहेत. त्यापुढें इसन्ने अशरीनच्या जिल्काद महिन्यांत (सन १७२२) शाहूनगर नजीक किल्ले सातारा येथें बाजीरावानें शाहूची गांठ घेतली, असा उल्लेख आहे. अर्थात् स. १७२२ चे सुमारास शाहूनगरची स्थापना झाली. राजधानींतल्या या भेटी शाहू तख्तावर बसून घेई. (ना. सा. रो. भा. २ बाजीरावाचे मुक्काम.)

शाहूची गादी प्रथम सातारा किल्ल्यावर राज्याभिषेक झाला तेथें होती, तेथून पुढें ती त्यानें शाहूनगरांत माचीवर रंगमहालचा वाडा बांधून तेथें आणिली. तख्ताचे मागील बाजूस चौकांत विहीर होती त्यास तख्ताची विहीर असें म्हणतात. रंगमहालचा वाडा स. १८७४ त जळाला, त्याचा आतां अवशेष कांहीं नाहीं. जिला अदालत म्हणतात, ती इमारत शाहूनें बांधिली, त्या जागेंत पेशवे उतरत, आणि त्याच्या जवळच पुरंदऱ्यांचा वाडा आहे. शाहूच्या वेळच्या व त्यानंतरच्या स्थितींत शहराची रचना व

मोठमोठ्या लोकांचे वाडे ह्यासंबंधानें पुष्कळच फेरफार झाला; आणि हल्लींची स्थिति तर त्याहूनही कांहीं वेगळीच आहे. ता. २० मार्च स. १७५३ रोजीं होळीच्या रात्रीं शाहूनगरांत मोठी आग लागून पुष्कळसे वाडे जळाले. त्यांत पेशव्यांचा, पुरंदऱ्यांचा, गोविंदराव चिटणिसाचा, तसेंच नारोराम मंत्री व दत्ताजीपंत वाकनीस ह्यांचा, असे वाडे एका रात्रींत जळाल्याचा उल्लेख पुरंदरे रोजनिशींत आहे. [खं. ६–पु. रो. पृ. १०३]. यावरून पेशव्यांनीं पुनः आपला वाडा जरूर नसल्यामुळें साताऱ्यास बांध॰ लाच नाहीं असें दिसतें. शहरांतील पेठांचीं नांवें सात वारांवरून ठेविलेलीं असून शिवाय रामाऊचा गोठ, यादव गोपाळ पेठ, व्यंकटपुरा, चिमणपुरा, दुर्गापुरा, केशरकरपेठ, राजसपुरा, पंताचा गोठ, रघुनाथपुरा इत्यादि भाग ऐतिहासिक व्यक्तीवरून पडले आहेत. अदालतीच्या वाड्यापलीकडे खतीबांचें घर व मशीद आहे. हे खतीब शाहूनें आपल्याबरोबर आणून त्यांजला खुत्बा पढण्याचा अधिकार दिला. शाहूची सुटका होतांना त्यास जी सनद मिळाली तींत खालील मजकूर आहे. 'तुम्हीं आमच्या निवडक सरदारांपैकीं उंच पदवीचे असून, मुसलमानी धर्माला नमून वागणारे आहां, म्हणून तुम्हांस तख्त ठेवण्याकरितां करंजे हद्दींतील साताऱ्या किल्ला व हिंदुपदपातशहा व सरदेशमुख हे किताब देण्यांत आले आहेत. किताब देण्याचें कारण कीं तुम्ही झेबुन्निसा बेगम यांस पोटच्या पुत्राप्रमाणें होतां.' [ हतवळणे–सातारा वर्णन पृ. १३ ]. या बेगमेच्या स्मरणाकरितां शाहूनें हे खतीब व पंजे बरोबर आणिले. त्यांस तो आपल्या कुटुंबांतील माणसांप्रमाणें वागवून त्यांचा सर्व कच्चा खर्च चालवी. स्वतंत्र नेमणूक शाहू करून देत असतां ती खतीबांनीं घेतली नाहीं. त्यांचें घराणें साताऱ्यास नांदत आहे. माचीवर डफळ्यांची पागा, अक्कलकोटकरांचा वाडा, मंत्र्यांचा वाडा, पिंगळ्यांचें घर, व शेख-मिऱ्याची पागा वगैरे शाहूच्या वेळच्या स्थळांचे थोडेबहुत अवशेष आहेत. शेखमिरे हे आदिलशाहींत वाईप्रांताचे सुभेदार असून शाहू

आला तेव्हां साताऱ्या किल्ल्यावर परशुराम त्रिंबकाच्या हाताखालीं होते. त्यांनीं प्रतिनिधीस कैद करून किल्ला शाहूच्या स्वाधीन करून दिला म्हणून शाहूची त्यांजवर मर्जी बसून साताऱ्याशीं त्यांचा निकट संबंध जडला.

माचीच्या संबंधानें हल्लीचा प्रत्यक्ष प्रकार पाहिला असतां त्या वेळची माची म्हणजे स्वप्नसृष्टिच होय, असें वाटल्याशिवाय राहात नाहीं. यवतेश्वराहून व महादऱ्याहून उत्तम पाणी आणून साताऱ्यांत नळाच्या पाण्याची चांगली व्यवस्था शाहूमहाराजांच्या वेळेपासूनच करण्यांत आली होती. मंगळवारांत रामाऊचा गोठ म्हणून स्वतंत्र पेठ होती, तेथें नागपूरकर भोंसल्यांचा वाडा आहे. भोंसल्यांच्या घराण्यांत रामाऊ म्हणून स्त्री होती, तिच्या नांवावरून वरील नांव पडलें. व्यंकटपुरा म्हणून दुसरा एक भाग आहे, तेथें इचलकरंजीकरांचे पूर्वज व्यंकटराव घोरपडे ( बाळाजी विश्वनाथाचा जांवई ) याची पागा असे, त्यावरून या पुऱ्याचें नांव पडलें. यांतच श्रीकृष्णेश्वराचें प्रसिद्ध देऊळ आहे. तें बाजीरावाचा मामा कृष्णराव चासकर साताऱ्यास मामलेदार होता, त्यानें शके १६४५ त. ( स. १७२४ ) बांधिलें. हें देवालय शहरचे पश्चिमेस टोंकास यवतेश्वराचे पायथ्यास आहे. देवालय बांधलें तेव्हां त्या भागास सदाशिवपुरी असें नांव असून, पुढें पांच वर्षांनीं व्यंकटराव घोरपडे त्या भागांत वाडा बांधून राहूं लागले, तेव्हांपासून त्यास व्यंकटपुरा हें नांव प्राप्त झालें.

१ या देवालयांत खालील शिलालेख गाभाऱ्याचें बाहेर दगडी खांबावर आहे.
'श्रीकृष्णेश्वर नामक पशुपतेर्लिंगं शिवं नार्मदं
ज्योतिर्वित्कुलदीपकृष्णजमहादेवेन संस्थापितम् ।
स श्रीशाहुनृपात्सदाशिव इति प्राप्याभिधानं नवं
लिंगाग्रं कृतवान्सदाशिवपुरीमित्यूचिवान् चास्करः ॥
शके १६४५ शोभकृत् संवत्सरे, माघ शुा. त्रयोदशी सोमः ॥
कृष्णाजी जनार्दनपंत'

चिमणाजी दामोदर म्हणून शाहूचा सरदार असून त्याची पागा साताऱ्यास होती, त्या जागेस चिमणपुरा हें नांव मिळालें. विष्णु विश्वनाथ पंडित हा सगुणाबाईचा खासगी कारभारी होता, त्याच्याच विद्यमानें धावडशी येथील भार्गवरामाच्या इमारतीचें काम झालें. शाहूस सगुणाबाईपासून एक मुलगी मात्र झाली, तिचें नांव राजसबाई. साताऱ्यास राजसपुरा नावाची पेठ आहे, ती इच्या नांवानें वसली. यादव गोपाळ खटावकर नांवाचा ताराबाईचा कारभारी होता त्याचे नांवावरून साताऱ्यास एक पेठ बसलेली आहे. या पेठेस पेठखालसा असेंहा म्हणत, कारण यादव गोपाळ याला शाहूनें खालशाचे उत्पन्नाची बाब तोडून दिली होती. यावरून यादव गोपाळचे घरास खालशे हें अडनांव पडलें होतें सचिवांचा वाडा आहे. सचिवांस साताऱ्यास यावें लागे तेव्हां, ते आपल्या या वाड्यांत उतरत. सरकारी पीलखान्याचा खर्च सचिवानें भागवावा, असें ठरलें होतें. यादवगोपाळपेठेंत पिलखाना होता, तो पूर्वी रंगमहालाजवळ असे. महाराजांची स्वारी रंगमहालांतून निघून अदालतीवरून यादवगोपाळ पेठेंतून वाड्यांत जावयाची, किंवा मोठमोठ्या समारंभाचे वेळीं वाड्यावरून भवानी पेठच्या मोठ्या रस्त्यानें गुरुवारांतून पोईच्या नाक्यावरून परत रंगमहालांत यावयाची, असा परिपाठ होता. सातारा शहरच्या उत्तर बाजूस 'रघुनथपुरा' नांवाची पेठ हल्लीं करंजे गांवांत मोडते. ती बाजीरावाचा मुलगा रघुनाथराव याचे नांवावरून बसली.

सोमवार पेठत अनगळांचा वाडा होता. त्यांच्यांत परशुराम नारायण अनगळ म्हणून मोठा सावकार होऊन गेला. माहुली येथील रामेश्वराचें देवालय व एक घांट अनगळांनीं बांधिला; आणि महाबळेश्वर येथील कृष्णाबाईच्या देवळाची दुरुस्ती केली. शनिवार पेठेंत बाळाजीपंत नातूंचे दोन वाडे आहेत. प्रतापसिंहमहाराजांच्या वेळीं त्यास जुना वाडा बक्षीस दिला होता तेथेंच नानाफडणीस साताऱ्यास आला असतां उतरे. नातूंच्या वाड्यासमोर सुमंताचा वाडा आहे. सुमंतांचे वंशज कऱ्हाड

तालुक्यांत रिसवड येथें राहतात. शिर्क्यांचा वाडा व पंडितरावांचा वाडा हे गुरुवार पेठेंत आहेत. शिर्के यांचें मूळगांव 'श्रीक;' शाहूची बायको सकवारबाई व संभाजीची जिजाबाई ह्या शिर्क्यांच्याच घरांतल्या. रविवार पेठेंत पंतांचा गोट आहे, तेथें प्रतिनिधि उतरत. प्रतिनिधींचा वाडाही तेथेंच आहे. साताऱ्यास महाराजांचे खालोखाल संबंध म्हणजे ह्या प्रतिनिधींचा असून, त्यांचा इतिहास या पुस्तकांत ठिकठिकाणीं आला आहे. मल्हारपेठ व दुर्गापेठ हीं नांवें कोणाचे नांवावरून पडली, तें समजत नाहीं. बसाप्पा पेठ व केसरकर पेठ यांची उत्पत्ति मागें दिलीच आहे.[1]

तानशेट भुरके नांवाचा गृहस्थ शाहू महाराजांचे वेळीं टांकसाळीवर अधिकारी होता. त्यास हा अधिकार शाहूनें राजशक ६७ रौद्रनाम संवत्सरीं दिला, [ स. १७४० ]. तानशेटाचे पूर्वज आदिलशाहीत संगमनेर येथें टांकसाळीचे कामावर होते अद्यापि हें घराणें सातारा येथें सावकारी करून नांदत आहे. हल्लींचे त्या घराण्याचे वंशज वासुदेवराव यांचे वडील रामशेट फेब्रुआरी १९१७ त वारले, तेव्हां त्यांचें वय १०५ वर्षांचें होतें. सदाचरणानें वागून धंदा करणारीं, मध्यम स्थितींतील अशीं कुटुंबें हींच राष्ट्रीय सामर्थ्याचे मुख्य घटक होत

वंशावळ,-भुरके टंकसाळीचे कामदार.

मुडकशेट
।
तानशेट
।
महादशेट
।
बाळशेट
।
रामशेट
।
वासुदेवराव

या घराण्यांत नानाप्रकारच्या शिक्क्यांचे ठसे उपलब्ध आहेत. साताऱ्यास शाहूच्या राजवाड्याजवळ बाजार भरे, त्यास 'हुजूर बाजार' म्हणत. या हुजूरबाजारांत 'श्री शाहूनगर छापा' अशा अक्षरांचा शिक्का चालत असून, त्या उत्पन्नाची बाब कृष्णाजी नाईक जोशी पोतदार यांजला सोंपवून दिलेली होती.

---

1 शाहूनगर या कलमांतील माहिती रा. वा. वि. जोशी सातारा यांनीं मेहेरबानीनें दिली.

**६. मराठशाहीचें रूपान्तर, रा. खरे यांची चिकित्सा** –शाहूच्या मृत्यूनें मराठशाईच्या राज्यकारभारांत रूपांतर झालें. हें रूपान्तर राज्यक्रान्तीच्या स्वरूपाचें होतें, त्यांत पेशव्यांची अपहार बुद्धी प्रमुख होती, वगैरे विचित्र विधानें अनेकांनीं आपापल्या समजुतीप्रमाणें केलीं असून ठिकठिकाणी त्यांचा निर्देशही केला आहे. सबब त्या प्रश्नांची विस्तृत चर्चा पुनः येथें करण्याची जरूर नाहीं. नानासाहेबास पेशवाई प्राप्त झाल्यापासून त्यानें आपलें धोरण कसें ठेविलें,'परिस्थिति कसकशी बदलत गेली; आणि त्यास राज्यकारभार चालवितांना कायकाय कृत्यें करावीं लागलीं, या गोष्टींचें विस्तृत विवेचन अस्सल पुराव्याच्या आधारांसह आतां पावेतों करण्यांत आलें आहें; त्यावरून सर्व पुरावा पाहून प्रत्येक वाचकानें वरील रूपांतराचा आपापला अंदाज ठरवावा हें बरें. शिवाय या रूपान्तराचें विवेचन इतिहासापेक्षां राजनीतीच्या भागांत समाविष्ट होतें. तसा राजनीतीचा म्हणजे Maratha constitution चा इतिहास आपला बनावयाचा आहे. सरंजामी पद्धतीचाही त्यांतच अंतर्भाव होतो. या विषयाचें बरेंच सूचक विवेचन रा. खरे यांनीं इचलकरंजीच्या इतिहासांत व रा. राजवाडे यांनीं आपल्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत केलें आहे. त्यांतील कांहीं थोडे मुद्दे उतरून घेण्याजोगे आहेत. रा. खरे म्हणतात:—

पेशवाईच्या अधिकारासारखा अधिकार दुनियेंत कधीं कोणीं चालविला नसेल. पेशवे ( १ ) दिल्लीच्या बादशाहाचे सुभेदार, ( २ ) छत्रपतींचे प्रधान, व ( ३ ) आपल्या स्वतःच्या राज्यापुरते ( कोणतें राज्य? ) मालक होते. हे तीन विजातीय संबंध एके ठिकाणीं आल्यामुळें, पेशव्यांचें राज्ययंत्र बरेंच बिकट व नाजूक झालें होतें. ( १ ) बादशाहाचे नोकरांशीं म्हणजे, सुरत, जंजिरा, सावनूर, अर्काट वगैरे संस्थानांच्या नबाबांशीं दोस्त सरकार या नात्यानें त्यांस वागावें लागे. हे संस्थानिक चौथसरदेशमुखी-

१ मराठी राज्याच्या सरंजामी घटकावयवांस राज्य हा शब्द लावणें योग्य नाहीं. गो. स. स.

च्या ऐवजीं फक्त खंडणी देण्यास पात्र होते. निजामाशीं पेशव्यांचा संबंध त्याहून अधिक निकट होता. कारण कीं, मोगलाईच्या सहा सुभ्यांत ठाणीं बसवून चौथसरदेशमुखीचा वसूल परभारें घेण्याचा प्रघात पेशव्यांनीं यापूर्वी पुष्कळ दिवस पाडिला होता, त्यामुळें मोगलाईचें व पेशवाईचें नफानुकसान एकच असल्यामुळें हर्षामर्षाचे प्रसंग वारंवार येत. हे सर्व परके संस्थानिक वगळले म्हणजे (२) राज्यांत पेशवाईस स्वतःहून वरिष्ठ अशीं दोन संस्थानें होतीं. त्यापैकीं पहिलें सातारकर छत्रपतींचें संस्थान पूर्णपणें त्यांच्या ताब्यांत होतें; पण दुसऱ्या म्हणजे करवीर संस्थानाचा प्रकार निराळा होता. तें संस्थान कोणासही खंडणी देण्यास पात्र नसून हल्लीं स्वतःपुरतें स्वतंत्र व पृथक् झालें होतें. इतकें असून पुनः शिवशाहीमध्यें त्याचा अंतर्भाव होतच होता. त्याखालचा दर्जा (३) नागपूरकर व अक्कलकोटकर भोसले, गायकवाड, प्रतिनिधि, सचिव, आंग्रे व वाडीकर सावंत इत्यादि संस्थानिकांचा असून ते पेशव्यांच्या बरोबरीचे होते. त्यांनीं जेथपर्यंत राज्यांत कांहीं फंदफितुर केला नाहीं, तेथपर्यंत त्यांच्या संस्थानांत ढवळाढवळ करण्याचा पेशव्यांस अधिकार नव्हता. हे सर्व सालीना जुजबी खंडणी देण्यास पात्र होते. त्यांपैकीं कांहीं जणास कधीं काळीं तर कांहींस दरवर्षी लष्करी चाकरी करावी लागे. [ ज्यास ही चाकरी करण्याची ताकद असे, त्यास अवश्य नोकरींत बोलावीत गो. स. स. ] आंग्रे, सचिव व सावंत यांस लष्करी चाकरीचें कलम लागू नव्हते. आसपास कोठे काम पडलें तर तितक्या पुरती त्यांनीं जुजबी फौजेनिशीं मदत करावयाची असे. [ आंग्र्याचें काम बहुतेक दर्यावरचें होतें. सचिवास पराक्रम नव्हता व सावंत अगदीं शिवाजीच्या वेळेपासून आपणास बहुतेक स्वतंत्र राजेच समजत. गो. स. स. ] तसेंच (४) पाटणकर, घोरपडे वगैरे हुजरातीचे मानकरी होते, तेही सर्वमानानें पेशव्याच्या बरोबरीचेच होते [ कसे ? ] तेही जेथपर्यंत फंदफितूर करीत नसत, तेथपर्यंत त्यांच्या वाटेस जाण्याचा पेशव्यांस अधिकार नव्हता. या मान-

कन्यांत जे मातबर होते, त्यांच्या सरंजामास लहान मोठे तालुके होते; पण गरीब पांच दहा स्वारांचे धनी होते, त्यांच्या सरंजामास एखादें खेडेंच लावून दिलेलें होते. हे सर्व मानकरी फक्त लष्करी नोकरी करणारे होते. (५) त्या खालचा दर्जा पेशव्यांनीं ज्यांच्या सरदाऱ्या उत्पन्न केल्या त्यांचा. ते शिंदे, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर वगैरे असंख्य होते. त्यांवर मात्र नारायणराव पेशव्याच्या खुनापर्यंत पेशव्याची सत्ता अबाधित चालत होती. हे जे अनेक दर्जाचे लोक वर सांगितले, त्या सर्वांचा सांभाळ होऊन, त्यांचे परस्परांत कलह होऊन रयतेची पायमल्ली न व्हावी, आणि ती रयत निर्भय व संतुष्ट राहावी, म्हणून शाहू महाराजांनीं मराठी साम्राज्य शिवस्व म्हणून पेशव्यांच्या हवालीं केलें. थोरल्या मुलावर संसाराचा व कुटुंबाचा भार सोंपवून एखाद्या मनुष्यानें महायात्रेस जावें, त्याप्रमाणें महाराजांनीं पेशव्यांवर राज्य सोंपवून कैलासवास केला. ती जबाबदारी ओळखून नानासा० पेशव्यांनीं शिवस्व यथाशक्ति सांभाळिलें यांत काय संशय! त्यांनीं कोणाच्याही दौलतीचा अभिलाष केला नाहीं, अपराधावांचून कोणास शासन केलें नाहीं, सामर्थ्यानें उन्मत्त होउन कोणास पायांखालीं तुडविलें नाहीं, रावापासून रंकापर्यंत सर्वांचे मानमरातब व सरंजाम यथायोग्य चालविले, हें त्यांस मोठें भूषणावह आहे. महाराजांनीं भोसले-गायकवाडांचे हातीं अधिकार दिला असता तरी याहून अधिक कार्य त्यांचें हातून खचित झालें नसतें.

'शाहूमहाराजांच्या स्वार्थत्यागानें मराठी राज्याचें आत्यंतिक कल्याण झालें ,असें मात्र मुळींच नाहीं. आजचें मरण उद्यांवर ढकलें गेलें, इतकेंच. लगेच महाराष्ट्रांत प्रळयी होण्याचा योग आला नाहीं, एवढेंच पेशव्यांचें कर्तृत्व गो. स. स.] असें होण्याचें कारण धड ना धनी, ना नोकर, अशी पेशव्यांची स्थिति हेंच होय. शाहूमहाराजांच्या ज्या सनदेनें पेशव्यांस अधिकार मिळाला, त्याच सनदेनें मराठी-राज्यांत आपापल्या क्षेत्रापुरते असंख्य पेशवे आपोआप निर्माण झाले. 'जुनें मोडूं नये, नवें

करूं नये, ' या वाक्यद्वयांत राज्यकारभाराचें चातुर्य समाविष्ट होऊन बसलें. महाराजांचे वेळेचे सरंजाम, तैनाती, अधिकार वगैरे सर्व या सनदेनें त्या त्या इसमांस कायमचीं वतनें म्हणून मिळाले. पेशव्यांस एखादा किल्ला पाहिजे असला तरी त्यास हा मिराशीचा हक्क आडवा येऊं लागला. एखाद्या शंभर स्वारांच्या पथक्यास स्वारांचें पथक मोडून, पायदळाचें तयार कर, असें सांगण्याची सुद्धां पेशव्यास सोय राहिली नाहीं. महाराजांच्या वेळेस जसा सरंजाम होता, तसा बाळगून मी चाकरी करीत आहे, त्या बाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुम्हांस अधिकार नाहीं, असें तो म्हणणार. यद्यपि एखादा पथक्या कबूल झाला, तरी त्याचे कारभारी, मुजुमदार, फडणीस व स्वारसुद्धां असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत. कारण तेही सर्व मिरासदारच. महादजी शिंद्यांनीं पलटणें तयार केलीं, तीं दिल्लीच्या बादशहाच्या दौलतींतून. मराठी राज्याच्या उत्पन्नांतून तें काम ते करूं जाते तर उलट मिरासदारांनीं त्यांचेंच उच्चाटन केलें असतें. या मिरासदारीमुळें सरदारांस भय नाहींसें झालें, कशीबशी चाकरी करून दिवस काढण्याची चाल पडली, त्यामुळें राज्याची वाढ खुंटली. राज्यांतल्या फौजा गोळा करून पेशव्यांनीं परमुलखीं स्वाऱ्या करून महाराष्ट्रांत दौलत आणावी, राज्य वाढवावें, व त्यांचें तेज व उत्साह कायम राखावा, अशी शाहू महाराजांची मनीषा होती. एक दोन पेशवे बरे निघाले तोंपर्यंत ही मनीषा कांहीं अंशीं सफल झाली. ' परंतु एकंदरींत शाहूची सनद कळ्जुनें मोडूं नये, नवें [जरुरीप्रमाणें फेरफार करीत जाण्याची सोय ज्या राजव्यवस्थेंत नाहीं, तें राज्य टिकणें शक्य नाहीं—गो. स. स. ] करूं नये हें तत्व राज्यवृद्धीस व राज्य चिरस्थायिकतेस घातक होतें. पेशव्यांनीं सातारचे महाराजांचें राज्य हरण केलें, असा प्रवाद आहे. परंतु असा प्रकार हिंदुस्थानांत एवढा एकच झाला नसून हैदराबाद, म्हैसूर, कर्नाटक, दिल्ली, मुर्शिदाबाद वगैरे ठिकाणींही झालेला आहे. पेशवाईच्या कृत्यांसंबंधीं हल्लींच्या काळांत चर्चा होतें; तेव्हां असा-

क्यानें अमूक केलें असतें तर अमुक झालें असतें, असें पुष्कळ टीकाकार लिहीत व बोलत असतात. परंतु पेशवाईची घटना कशी होती, तिचे अधिकारी कोणत्या बंधनांनीं बांधले गेले होते, हें माहीत नसल्यामुळें ही टीका बहुधा अप्रयोजकपणाची असतें.' (इचलकरंजी इ. पृ. ९४-९८)

७. राजवाड्यांची चिकित्सा.—यांच्या एकंदर लेखांत पहिल्या खंडांतील प्रस्तावना अत्यंत मार्मिक व इतिहासाभ्यासेच्छूंस मार्गदर्शी आहे. मराठ्यांच्या विसकळीत कृत्यांस एकोद्दिष्टाच्या सांखळींत ग्रँट डफ यास गोवतां आले नाहीं, ही गोष्ट राजवाड्यांनीं या प्रस्तावनेंत दाखवून दिली आहे. स्वराज्य स्थापनेच्याच उद्देशानें शिवाजीपासून तों थेट खर्ड्याच्या लढाईपर्यंत सुमारें दीडशें वर्षें पावेतों मराठ्यांचे प्रयत्न सुसंहत व सुसंगत चालले होते. विशेषतः बाळाजी विश्वनाथ, बाजीराव व नानासाहेब या तीन पेशव्यांचें हें मुख्य ध्येय होतें. हा प्रकार राजवाड्यांनीं अप्रतिम पृथक्करण शैलीनें व्यक्त केला आहे. अस्सल कागदपत्रांची पुरेशी ओळख नसल्यामुळें ही प्रस्तावना सामान्यवाचकास समजण्यास जरा अवघड वाटते. परंतु या कागद पत्रांची ओळख जसजशी वाढते तसतसा प्रस्तावनेचा विषय स्पष्ट होत जातो. मात्र स्वतःचें मत म्हणून रा. राजवाडे देतात, तेव्हां तें पारखून घ्यावें लागतें. शाहूच्या मृत्यूनंतर राज्यकारभारांत फेरफार झाला, त्यासंबंधानें रा. राजवाडे म्हणतात, 'स. १७५० पर्यंत मराठ्यांचें आधिपत्य सातारच्या छत्रपतींकडे होतें. त्यांच्या नांवानें हिंदुपदबादशाहीची स्थापना व प्रसार करण्याची मेहेनत बाजीरावाने व बाळाजी बाजीरावानें केली. मुत्सद्देगिरीनें व पराक्रमानें बाजीराव बल्लाळ शाहूराजापेक्षां अतिच श्रेष्ठ होता. परंतु शाहूचें आधिपत्य कमी करण्याकडे त्याचा बिलकूल कल नव्हता. बाळाजी बाजीरावाला पेशवाई मिळाल्यापासून मात्र, शाहूचें व त्याच्यानंतर येणाऱ्या छत्रपतींचें माहात्म्य कमी करण्याचा प्रयत्न झाला. शाहू असे तोंपर्यंत बाह्यात्कारें छत्रपतीची सेवा अनन्यभावें करण्याचा बाळाजीनें बहाणा (!) केला; व तो वारल्यानंतर, रामराजा

गादीवर आला असतां, त्याची पायमल्ली बाळाजीनें मनःपूत, परंतु मोठ्या युक्तीनें केली. बाळाजीच्या खऱ्या पराक्रमाला व त्याच्या मनांत घोळत असलेल्या अबाढव्य हेतूंना स्वरूप स. १७५० पासून येऊं लागलें. ह्या वर्षापासून बाळाजी मराठ्यांचा खरा पुढारी झाला व सातारच्या छत्रपतींचें आधिपत्य अस्तास गेलें. पुढील ११ सालांत सर्व भरतखंड महाराष्ट्रमय करून टाकण्याचा उद्योग बाळाजीनें केला. सारांश, स. १७५० पासून ब्राह्मणपदबादशाहीचा प्रारंभ झाला, व हिंदुपदपादशाही हा शब्द मागें पडला.' पुढील विवेचनांत बाळाजीनें महाराष्ट्रांत सातारच्या छत्रपतींचें व त्यांच्या राजमंडळाचें महत्त्व कमी करून आपलें महत्त्व कसें स्थापिलें याचा विचार केला आहे. ह्या विवेचनाचे रा. राजवाड्यानीं दोन भाग केले आहेत. पहिला भाग मराठी राज्याचा प्रसार बहुतेक सर्व हिंदुस्थानभर बाळाजीने मोठ्या शिताफीनें कसा केला, यासंबंधाचा असून, त्याचा विचार पुढें त्या प्रकरणांत अन्यत्र व्हावयाचा आहे. दुसरा भाग पेशव्यांनीं स्वतःचें महत्त्व कसें वाढविलें यासंबंधाचा असून, तेवढ्याचाच येथें विचार कर्तव्य आहे. 'बाळाजी विश्वनाथापासून बाळाजी बाजीरावापर्यंत सुद्धां सर्व पेशव्यांचा मुख्य हेतु स्वतःचें महत्त्व सर्वांहून अधिक वाढविण्याचा होता. धनाजी जाधवाच्या मृत्यूनंतर चंद्रसेन जाधव शाहूचा सेनापति झाला, त्याला बाळाजी विश्वनाथानें प्रथम पिटून लाविलें. नंतर त्यानें बहिरोपंत पिंगळ्याला एकीकडे सारिलें, व आपण मुख्य प्रधानकीचा अधिकार म्हणजे मराठ्यांचें धुरीणत्व मिळविलें. बाजीरावाचे मुख्य प्रतिस्पर्धी प्रतिनिधि, त्रिंबकराव दाभाडे व रघूजी भोसले हे होत. यापैकीं पहिल्या दोघांचें महत्त्व स. १७३१ च्या आंत त्यानें पूर्णपणें नाहींसें केलें; व पुढील ९ वर्षें मराठ्यांचें धुरीणत्व अनन्यसामान्यत्वेंकरून चालविलें. रघूजीचें प्रस्थ बाळाजीनें १६ जानेवारी १७४४ त मोडून त्याला आपला

---

१. नुकतेच वर राजवाडे म्हणतात, बाजीरावाचा असा हेतु बिलकुल नव्हता.

स्नेही; केलें.[1] शाहूच्या मृत्यूनंतर लहान मोठे अनेक प्रतिस्पर्धी बाळाजीवर उठले, त्यांना जागच्याजागीं बसविण्यांत त्याला तीन वर्षें खटपट करावी लागली. सातारच्या छत्रपतीविषयीं बाळाजी बाजीरावाच्या मनांत फारशी प्रेमबुद्धि कधींच नव्हती. [ यास पुरावा काय ? गो. स. स. ] खुद्द शाहूशीं त्याचें वर्तन घरखोडीचेंच होतें. कोल्हापुरची व सातारची गादी एक करावी व सर्व सत्ता आपल्या हातीं ठेवावी हा बाळाजीच्या मनांतला द्विविध हेतु होता. ही एकी करण्याची कल्पना शाहूच्या डोक्यांत शिरली नाहीं. शाहूच्या हट्टामुळें व अज्ञानामुळें बाळाजीला हा आपला फार दिवसांचा हेतु एकीकडे ठेवावा लागला; आणि शाहूच्या आज्ञा त्या वेळेपुरत्या तरी शिरसामान्य कराव्या लागल्या. [ याचा विचार पूर्वी येऊन गेला आहे. ] रामराजा कोणालाच हवा असें वाटत नव्हतें. कांहींतरी राजकारण करून त्याला काढून टाकावे अशी बाळाजीची इच्छा होती, असें जरी खास म्हणतां येत नाहीं, तरी त्याचें महत्व होईल तितकें कमी करण्याच्या इच्छेनें बाळाजीनें त्याचा शिक्का[2] तीन वर्षेंपर्यंत चालू केला नाहीं. अशा अनेक खटपटी बाळाजीनें केल्या. येणेंप्रमाणें बाहेर मेहनत करून बाळाजीनें स. १७६० त बहुतेक हिंदुस्थान व बहुतेक सर्व दक्षिण जिंकून टाकिली; व आंत मेहनत करून सातारचे छत्रपति व त्याचें राजमंडळ यांस बहुतेक संपुष्टांत आणून आपलें वर्चस्व सर्वत्र स्थापित केलें, व ब्राह्मणपदपादशाहीची कल्पना खरी करून दाखविण्याचा प्रसंग जवळ आणून ठेविला. पानपतच्या लढाईत पेशव्यांस यश येतें तर त्या यशाच्या दराऱ्याच्या जोरावर सर्व भरतखंड त्यानें महाराष्ट्रमय करून टाकिलें असतें;

---

१. त्रिंबकराव दाभाड्याशीं बाजीराव कडला, तशी रीत रघूजीशीं बाळाजीनें केली पाहिजे होती, असें राजवाडे म्हणतात कीं काय ? राज्याचें हित कशांत होतें ?

२. शाहूच्या मृत्यु नंतर नवीन शिक्के लगेच चालू झाल्याचीं उदाहरणें शेंकडों आहेत. तीन वर्षें नवीन शिक्का केला नाहीं हें विधान खोटें आहे. ता. २०-१०-१७५० रोजीं नवीन शिक्के झाले. [ पु. रो. पृ. ५८. ]

व बाळाजी विश्वनाथाचा वंश ब्राह्मणपदबादशाहीचा आधारस्तंभ झाला असता; तसेंच पानपतच्या लढाईंत पेशव्यांस यश येतें तर या दुर्बल छत्रपतींचा मागमूसही न राहता. सामान्य नीतीच्या दृष्टीनें पहातां या दुर्बल छत्रपतींचे महत्व बाळाजीनें संपुष्टांत आणिलें हें बरेंच गर्हणीय आहे. परंतु बुद्धीनें व शक्तीनें बलिष्ठ अशा पुरुषाच्या किंवा पुरुषांच्या हातांत कोणत्याही राष्ट्राचीं सूत्रें असणें मोठें हितकर असतें. या राजनीतीच्या धोरणानें बाळाजीच्या प्रयत्नांचा विचार केल्यास झाले ते योग्यच झालें असें म्हणणें प्राप्त येतें.[1] ब्राह्मणपदबादशाही म्हणजे हिंदुपदबादशाहीच होय. स. १७५० पर्यंत या बादशाहीची प्रस्तावना भोसल्यांच्या कुळाच्या नांवानें होत असे, आतां ती पेशव्याच्या कुळाच्या नांवानें होऊं लागली. पहिलीस भोसलेकुलबादशाही अथवा मराठपदबादशाही व दुसरीस भटकुलबादशाही किंवा ब्राह्मणपदबादशाही म्हटल्यास चालेल. नाव पाहिजेल तें द्या. वस्तुस्थिति ध्यानात आली म्हणजे झालें. महाराष्ट्रधर्म व महाराष्ट्रराज्य जिकडे तिकडे करण्याचा प्रयत्न त्याकाळीं मराठ्यांचा चालला होता. प्रसंगोपात या प्रयत्नाचा पुढाकार कधीं महाराष्ट्रांतील मराठ्यांनीं व कधीं महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनीं केला.[2] बाळाजीरावानें साताऱ्च्या छत्रपतींना शून्यवत् करून टाकिले, ही गोष्ट सर्वस्वी खरी आहे. परंतु त्या छत्रपतींना शून्य होऊन बसण्याखेरीज अन्य गति शक्य नव्हती, हीही गोष्ट तितकीच खरी आहे. शाहूराजा वयातीत होऊन राज्य करण्यास अयोग्य झाला. त्या नंतर रामराजा गादीवर आला तो बुद्धीनें मंद, राज्यपदाला अयोग्य व मतलबाला अजागरूक होता. तेव्हां आत्यंतिक राज्यहित साधण्याची ज्याच्या अंगीं कर्तबगारी विशेष, त्याच्या हातांत राज्याचीं सर्व सूत्रें जाणें

१ हीं राजवाड्यांचीं विधानें पहिल्याशीं किती सुसंगत आहेत, याचा विचार वाचकांनीं करावा.

२ नेहमींच हा प्रयत्न उभयतांनीं अथवा खरें म्हणावयाचें म्हणजे सर्व जातींनीं केला आहे. मुख्य चालकांत मात्र फेरफार होत गेला.

स्वाभाविक व अपरिहार्य होतें. रामराजाला व ताराबाईला पेशव्यांनीं शून्य-वत् करून सोडलें, म्हणून कोणी सरदार पेशव्यांच्या विरुद्ध गेल्याचा दाखला तर कोठें मिळत नाहींच, परंतु कोठें ध्वनि देखील काढलेला आढळत नाहीं. " [रा. खं. १ प्रस्तावना—पृ. ३८–४९].

८. **राजवाड्यांच्या विवेचनांतील दोष.**—विस्तृत प्रस्तावनेंतून थोडेसे उतारे घेऊन वर रा. राजवाड्यांचें म्हणणे दिलें आहे. या उताऱ्यांच्या शेवटच्या भागांतील विवेचन पूर्व भागाशीं विरुद्ध आहे. रा. राजवाड्यांच्या मनांत किंवा वाचनांत ज्या शंका उद्भवल्या त्यांचाच अनुवाद त्यांनीं करून आपलें मन गोंधळून घेतलें आहे. ब्राह्मणपद-बादशाही, भटकुलबादशाही वगैरे अप्रयोजक शब्द वापरून त्यांनीं वाचकांचा व थोडाबहुत स्वतःचा गोंधळ उडविला आहे. रा. राज-वाड्यांच्या अधिकारी लेखणींतून हें विवेचन उतरलें असल्यामुळें, त्यास पेशवाईच्या विवेचनांत एवढें महत्त्व देणें भाग पडलें. समग्र विवेचन वाचलें म्हणजे राजवाड्यांनीं आपल्या आक्षेपाचें निरसन आपणच करून घेतलें आहे असें म्हणावें लागतें. ज्याच्या अंगांत कर्तबगारी तो कोठेंही महत्त्वास चढतो. ज्या कर्तबगारीनें शिवाजी किंवा शाहू उदयास आले, त्याचप्रकारच्या कर्तबगारीनें बाळाजी विश्वनाथ व बाळाजी बाजीराव महत्त्वास चढले. महापुरुषाचें तेज चमकूं लागलें म्हणजे हीनबुद्धींचा प्रकाश त्याजपुढें चालत नाहीं. survival of the Fittest हा न्याय जगांत सर्वत्र दिसून येतो. पूर्वीच्या इतिहासांत काय किंवा आज-कालच्या घडामोडींत काय हाच नियम सिद्ध होतो.[1] एका इसमानें दुसऱ्यास शून्यवत् केलें, अगर त्याचें महत्त्व नाहींसें केलें, हें विधानच मुळीं सदोष आहे. अंगच्या नालायकीमुळें मनुष्याचें महत्त्व कमी होतें. हीन बुद्धीवर बुद्धिमत्तेचा पगडा बसला यांत वावगें तें काय? मात्र दुसऱ्याचें महत्त्व कमी करून आपला बडेजाव वाढवितांना, त्या इसमानें

---

१ लॉयड जॉर्जनें तीन वर्षें पार्लमेंटची सत्ता धाब्यावर बसविलीच कीं नाहीं!

कोणतें कृत्य साधलें, स्वताची चंगळ करून घेतली कीं राष्ट्रकार्य सिद्धीस नेलें, हें पहावें लागतें. दुसऱ्याचें नुकसान करून आपलाच फायदा पाहणाराचें वर्तन गर्हणीय होय, याविषयीं वाद नाहीं. तसा प्रकार बाळाजी बाजीरावानें केला नाहीं, असें राजवाडेच म्हणतात. मराठशाहीचें मुख्य कर्तव्य ज्यास महाराष्ट्रधर्म म्हणून राजवाडे म्हणतात, तें नानासाहेबानें आटोकाट प्रयत्न करून तडीस नेलें. आणि पानपतावर अपयश आलें नसतें तर त्याची सांगता झाली असती, हें राजवाड्यांनींच दाखविलें आहे. रामराजाच्या किंवा ताराबाईच्या आज्ञा शिरसावंद्य करून हें कार्य साधतां आलें असतें काय? नाहीं. अर्थात् मुख्य हेतूच्या आड येणाऱ्यांना पेशव्यानें दाबून टाकिलें; आणि आपला राष्ट्रोद्योग सिद्धीस नेला, हा त्याचा दोष कीं गुण समजावयाचा? हिंदुपदबादशाहीचें कार्य सिद्धीस नेण्याकरितां, घरच्या शत्रूंस दाबून टाकणें अपरिहार्य होतें हें काम शक्य तितक्या मृदुपणानें पेशव्यानें केलें, यांत त्याचें राज्यचातुर्य दिसून येतें. अर्थात् आपल्या हातांत जी संपूर्ण सत्ता पेशव्यानें घेतली, तिचा उपयोग त्यानें राष्ट्रकार्य साधण्याकडे केला. स्वतःकरितां त्यानें चिरंतन अर्थ साधल्याचा पुरावा नाहीं. शाहूच्या मृत्यूसमयीं राज्यभार अंगावर घेण्यास कोणी तयार नव्हता, पेशव्यानें ही जोखीम साहसानें अंगावर घेतली; आणि बव्हंशीं ती तडीस पोंचविली याबद्दल त्याची प्रशंसाच केली पाहिजे. येथपावेतों व पुढें नानाप्रसंगांचे कागदपत्र ठिकठिकाणीं उतरून घेतले आहेत, त्यावरून हा प्रकार स्पष्ट होतो. सर्व पक्षांची समजूत काढणें कठीण असतें, प्रत्येकाच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी तडीस जाणें शक्य नाहीं. अडचणींतून मार्ग काढितांना पुष्कळदां चालकांस दुटप्पी वर्तन ठेवावें लागतें. अनेक पक्ष व व्यक्ति नाराज होतात. पण या सर्वांचा बरावाईट विचार शेवटच्या मुख्य हेतूवरून ठरवावयाचा असतो. बाळाजी बाजीरावानें हिंदुपदपादशाहीचें शिवसंकल्पित कार्य सिद्धिस नेलें. आणि मराठशाहीचें आयुष्य निदान पन्नास वर्षांनीं वाढ-

विलें. किंबहुना, आज मराठ्यांचा इतिहास व लौकिक झळकतो आहे, त्याचें बरेंचसें श्रेय या तीन पेशव्यांस आहे. या तीन पेशव्यांच्या कृतीनेंच शिवाजीचा उपक्रम उठावदार दिसतो, या तीन पेशव्यांच्या कारकीर्दी मराठ्यांच्या इतिहासांतून वजा करा आणि बाकी काय राहतें तें पहा, म्हणजे या पेशव्यांच्या कर्तबगारीचा अंदाज मनांत उभा राहील. सर्वस्वी निर्दोष असा मनुष्य कोणीच नाहीं. तदनुरूप या पेशव्यांचे अंगीं स्वभावाचे व कृतीचे दोष नव्हते असें नाहीं. परंतु गुण व दोष यांचा आढावा जमाखर्चाच्या पद्धतीनें मनांत आणिला म्हणजे त्यांनीं केलेलें कार्य मनांत भरतें. शाहूचा मृत्युकाळ म्हणजे अठराव्या शतकाचा केवळ मध्य या मध्यबिंदूचे काळीं हिंदुस्थानांत उत्तरदक्षिणेस व पूर्वेस स्वदेशी राज्यांचा चुरा होत होता. तसाच चुराडा पश्चिम हिंदुस्थानचा व्हावयाचा निदान शतकार्ध तरी लांब पडला. हा परिणाम पहिल्या तीन पेशव्यांची कर्तबगारी दाखवितो.

अप्रयोजक शब्द योजनेमुळेंही राजवाड्यांचा घोटाळा उडाला आहे. हिंदुपदबादशाही, ब्राह्मणकुळबादशाही, भोसलेकुलबादशाही, भटकुल बादशाही असे शब्द योजून मनांत नसलेला भलताच अर्थ त्यांनीं व्यक्त केला आहे. संभाजीच्या वेळेस कलुशा, राजारामाचे वेळेस रामचंद्र नीलकंठ अमात्य, ताराबाईच्या वेळेस परशुराम त्रिंबक प्रतिनिधि हे राज्यकारभारांत प्रमुख होते. एवढ्यावरून त्या वेळच्या कारभारास राजवाडे काय नांव देणार. बहिरोपंत पिंगळ्याला बाळाजी विश्वनाथानें दूर सारिलें यांत कोणती नवीन बादशाही उत्पन्न झाली ? कारण बहिरोपंत ब्राह्मणच होता. अष्टप्रधानांत सरसनीरस असे इसम नेहमीच होते व असणार, शिवाजीच्या वेळेस मोरोपंत पिंगळेच प्रमुख होता. परंतु जोंपर्यंत मुख्य धनी आपला धनीपणा सर्वांवर गाजवून प्रत्येकाकडून ज्याच्या त्याच्या लायकी प्रमाणें कामें घेतो, तोंपर्यंत तो कारभार व्यवस्थित चालतो. रामचंद्र नीळकंठ व परशुराम त्रिंबक हे त्यांच्या धन्यांहून ज्यास्त कर्तृत्ववान होते, म्हणून त्यांचें महत्त्व वाढलें. प्रत्येक प्रधान काय किंवा सरदार काय आपलें

स्वतःचें व आपल्या पाश्चात् कुटुंबाचें महत्त्व वाढविण्यास सदैव तत्पर असणार. परंतु त्यांच्या पाश्चात् येणाऱ्या पुरुषांच्या अंगीं पराक्रम नसला तर त्याबद्दल दुसऱ्यास नांवें कां ठेवावी ! धुरीणत्व कर्तबगारींत असतें. बहिरोपंत पिंगळ्यानें शाहूची बाजू सांवरली असती तर भट घराणें पुढें आलेंच नसतें. प्रतिनिधि, आंग्रे, दाभाडे यांचे मूळ पुरुष पराक्रमी होते तसे पश्चाद्गामी नव्हते, म्हणून राज्याच्या जीवनकलहांत ते मागें पडले. आणि त्यांच्या जागीं शिंदे, होळकर, गायकवाड, पवार वगैरे अनेक नवीन सरदार स्वपराक्रमानें पुढें आले रामराजा व ताराबाई यांच्या अंगीं योग्यता असती तर पेशव्यांचें तेज त्यांच्यापुढें पडलें नसतें. शाहूशीं बाळाजीनें कपट वर्तन केलें असें राजवाडे म्हणतात, त्याचा विचार मागें ठिकठिकाणीं केलाच आहे. पेशव्यांच्या वेळेस नवीन ब्राह्मण सरदार पुष्कळच पुढें आले, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु हाही मनुष्य धर्मच आहे. ज्याला राज्य चालवावयाचें असतें, त्याला स्वतःच्या माहितीची मंडळी मदतीस हवी असते; आणि तितक्या दृष्टीनें पेशव्यांनीं ब्राह्मणांसच प्रोत्साहन दिलें; आणि तें थोडेसें दोषार्हही म्हणतां येईल, परंतु यापलीकडे त्यांत अत्यंत निंद्य असें कांहीं नाहीं. कारण ब्राह्मण सरदारांच्या बरोबरीनेंच किंबहुना, नानासाहेबाचे वेळेस तर ब्राह्मणाहूनही ज्यास्त भिस्त, शिंदे होळकर वगैरे मराठा सरदारांवर होती. ही गोष्ट त्या पेशव्यानें आपल्या पत्रांतून वारंवार नमूद केली आहे; आणि पानपतचा संग्राम हेंच त्याचें उत्कृष्ट उदाहरण आहे. मुसलमानी अंमलाचा व इंग्रजी अंमलाचा प्रकार पाहिला म्हणजे पेशव्यांस या बाबतींत दोष देण्यास थोडीच जागा राहते. शाहूचें माहात्म्य बाळाजीनें मुद्दाम कमी केलें असें नाहीं. उतार वयांत त्याची आवरशक्ति कमी झाली, तेव्हां अंगांत धमक असलेला बाळाजी पुढें सरसावला. त्यानें प्रतिनिधीस व रघूजीस आपल्या बाजूस वळविलें, आणि युक्तीनें आपले प्रतिस्पर्धी जाग्यावर बसविले हा त्याचा गुण सम-

आवयाचा की दोष समजायचा ! असो. या सर्व बाबतींचा खल पूर्वी ज्या त्या प्रसंगीं इतका पूर्ण व स्पष्ट करण्यांत आला आहे कीं, त्याजबद्दल ज्यास्त चर्चा करणें जरूर नाहीं. रा. राजवाड्यांच्या लेखांतील भ्रामक विधानें दाखविण्याचा मात्र उद्देश होता. तीं विधानें वाचून आणि ठिकठिकाणीं दिलेले अस्सल लेख व उतारे ध्यानांत घेऊन या वादग्रस्त बाबतीचा ज्यानें त्यानें आपल्या समजुतीप्रमाणें निर्णय करावा हें योग्य आहे.

९ पेशव्यांस प्रमुखपण येण्याचें कारणः—युरोपांतील कांहीं कांहीं चिजा पाश्चात्यांच्या संसर्गानें महाराष्ट्रांत हळूहळू शिरूं लागल्या होत्या. मात्र या चिजा कशा करतात व आपलेकडे होतील कीं नाहीं अशी शोधकबुद्धि आपल्या ठिकाणीं उत्पन्न झाली नाहीं. बाजीरावाचें एक घड्याळ मुंबईहून दुरुस्त होऊन आणल्याबद्दल बाजीरावास आलेलें स. १७३५ सालचें एक पत्र इ. स. पे. हि. भा. ४ पृ. २ येथें दिलें आहे, त्यावरून घड्याळांचा रिघाव त्या वेळीं वरच्या लोकांत झाला होता असें म्हणतां येतें. कित्येक संसारिक गोष्टींतही शाहूचें लक्ष होतें. ' औरंगाबाद प्रांतीं लाल चिंचा आहेत, त्यांनीं पांघरूण रंगतें व मुरंबा करीत असतात, तरी मुद्दाम जासूद पाठवून असतील तेथून चिंचोक्या समवेत दोन बैल भरून आणवून जरूर हुजूर पाठविणें. [ रा. खं. ६ ले १३६ ] असें पत्र शाहूनें पिलाजी जाधवास लिहिलेलें आहे. स. १७५४ त उत्तर हिंदुस्थानांतून हिंगण्याकडून चहाचे पेले न तापतील असे रघुनाथरावानें मागविले आहेत; ( खं. ६ ले. ३१८ ) ते कदाचित् दगडी असूं शकतील व चहाही कदाचित् देशी पातीचा ओला असूं शकेल. परंतु चहा घेण्याचा प्रघात सुरू झाला होता असें अनुमान होतें.

एकंदरींत शाहूचें काय किंवा त्याच्या प्रमुख मदतगारांचें काय, सर्व चित्त रोजच्या व्यवहारांत गुंतलेलें होतें. प्रापंचिक व्यवस्था व टापटीप ठेवण्यांत ते तरबेज होते. नानासाहेब पेशवा किंवा त्याचीच सुधारलेली आवृत्ति म्हणतां येईल असा नानाफडणीस हे हुशार किंवा पराक्रमी होते,

या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, हिंदुस्थानच्या हिंदुस्थानांत म्हणजे प्रचलित अंतर्व्यवस्थेंत त्यांची प्रवीणता होती; परंतु त्यांची दृष्टि स्वतःच्या पलीकडे यत्किंचित् गेलेली नव्हती. पाश्चात्य लोक हजारों मैलांचा प्रवास करून हिंदुस्थानांत येऊन नानाप्रकारची उपयुक्त माहिती केवळ लुटून नेत होते; पण आमचे लोकांस मुंबईस काय चाललें आहे याची दाद नव्हती. कोलंबसानें लावलेले शोध किंवा छापण्याची कला यांचा युरोपांत फैलाव होऊन सुधारणेचे मार्ग फैलावत होते, तर आपणांस कांहीं सुधारायचें आहे, याची जाणीव सुद्धां आपल्या मुत्सद्यांस नव्हती. युरोपांत मोठमोठ्या पाठशाळा चालू होऊन विद्येचा फैलाव होत होता, तर आपल्याकडे विद्यावृद्धीची योजनाही नव्हती, व्याख्यानें नाहींत, वाद-विवाद नाहींत, विचारविनिमय नाहीं. म्हणजे राज्यकारभारांत समाजाचें अंग मुळींच नव्हतें. युरोपांतले तत्कालीन सेनापति आपल्या लोकांस स्फुरण आणणारे उपदेश करून लढाया जिंकीत अगर लोकमत बनवीत, तसा प्रकार आपल्या सेनानायकांचा नव्हता. राजा करील तें लोकांनीं निमूटपणें मान्य करावयाचें, असाच इकडील रिवाज होता. सर्व सरदार पैसा जमवून धनसंचय करीत असतां मुख्य सरकार नेहमीं कर्जबाजारी असे. महाराष्ट्राबाहेर जाऊन सर्व हिंस्थानभर हिंदुपदपातशाही स्थापावी, ही हांव वरच्या चारदोन किंवा दहापांच सरदारांची होती, तशी जाणीव तमाम समाजांत सार्वत्रिक उत्पन्न झाली नव्हती. विलायतेंत शाहूचे समकालीन राजे पहिला व दुसरा जॉर्ज हे होत. त्यांच्या वेळेस राज्य-कारभारांत जरी मोठीशी घडामोड तिकडे झाली नाहीं, तरी व्यापार व उद्योगधंद्यांत ब्रिटिश लोकांची प्रगति झपाट्यानें पण शांतपणानें होत होती. बाजीराव, नानासाहेब, चिमाजीआपा व सदाशिवराव हे सर्व पुरुष बुद्धीनें व कर्तृत्वानें तत्कालीन युरोपियन मुत्सद्यांशीं बरोबरी करूं शकतील असे होते; त्यांचीं हस्ताक्षरें उत्कृष्ट असून लेखकही ते पहिल्या प्रतीचे; परंतु व्यापक दृष्टीनें त्यांची बुद्धि फैलावलेली किंवा विकास

पावलेली नव्हती. अर्थात् राज्यव्यवस्था, प्रगति, धनोत्पत्ति इत्यादि महत्त्वाच्या विषयांत युरोपियन मुत्सद्यांच्या मानानें ते बहुधा दुर्बळच होते, असें म्हणावें लागतें. यामुळें शाहूच्या अंतकालच्या समयीं कोणत्या प्रकारची राज्यव्यवस्था ठरविल्यानें पुढें राष्ट्राचें हित होईल, या प्रश्नाचा तात्त्विक विचार कोणाही मुत्सद्याच्या मनांत आला नाहीं. जे मुत्सद्दी स. १७४५ पासून चार पांच वर्षें व्यग्र अंतःकरणानें दरबारांत बसून पुढील थाटाथाट व खटपटी करीत होते, त्यांनीं आपापले सर्व अनुभव व्यवस्थित-पणें पुढें मांडून राज्यकारभाराचें यंत्र सुधारण्याचा उद्योग केला असता तर, आनुवंशिक अधिकाराची सरंजामी पद्धत मोडून सरकारी फौज बनविणें व अष्टप्रधानांसारखें एखादें राजमंडळ मुकर करून त्याच्या हातीं सत्ता देणें, असे अनेक उपयुक्त फेरफार त्यांस सहज सुचले असते, आणि सर्वांनीं एकजुटीनें आग्रह धरला असता तर शाहूच्या मार्फत ते अमलांतही आणतां आले असते. पण अशी संहत राज्यपद्धति ठरविण्याकडे मुत्सद्यांचें लक्ष गेलें नाहीं. आमचा सर्वच कारभार व्यक्तिप्रधान राहिला. शाहू होता तेथपर्यंत शाहू, पुढें पेशवे आले तर पेशवे, मिळून नफानुकसानीची जबाबदारी सर्व एकट्यावर. त्यास हाणून पाडण्यास बाकीचे तयार, मदत करण्यास कोणी नाहीं. शाहूनें तरी आपल्या पंनास वर्षांच्या अनुभवाचा उपयोग पुढील पिढीस काय दिला ! शिवाजीपासून चालत आलेल्या मराठशाहीच्या एकंदर कारभाराचा चित्रपट त्याच्या डोळ्यांसमोर होता, त्याचा उपयोग करून पुढील कार्यक्रम आंखून ठेवण्याची तजवीज त्यानें कांहीं एक केली नाहीं. उलट चाललेलीं उत्पन्नें बंद करूं नयेत, कोणास दुखवूं नये, अर्थात् 'जुनें मोडूं नये नवें करूं नये', यत्किंचित् फरक केल्याशिवाय राज्यशकट हांकावा, अशी अशक्य आशा पेशव्यांचे मस्तकीं हात ठेवून त्यानें त्यांच्या हवालीं केली. म्हणजे मुख्य विचार शाहूच्या मनांत लोकांच्या वतनांचा होता, पुढें राज्य कसें चालेल याबद्दलचा नव्हता. या अशक्य आशेचा परिणाम रामराजास गादीवर बसविल्याक्षणींच चालकांच्या प्रत्ययास येऊं लागला.

चालकाची आज्ञा सर्वांनीं लष्करी शिस्तीनें मान्य केल्याशिवाय, राज्य-कारभार चालणार कसा, आणि आज्ञा न मानल्यास त्याजबद्दल चालकानें गुन्हेगारास शासन कोणतें करावयाचें ! वतन काढून घेणें, ही एकच शिक्षा शक्य होती, ती शाहूनें मना केली, आणि दुसरी शिक्षा कोणतीच राहिली नाहीं. अर्थात् वर्ष दोन वर्षांतच पेशव्यांस असा अनुभव आला कीं, शाहूची लेखी आज्ञा किंवा पूर्वीचे प्रघात अक्षरशः पाळून राज्य-कारभार चालविणें शक्य नाहीं. उगाच अशा रीतीनें सर्वांस संतुष्ट ठेव-ण्याच्या नादांत कांहींच साध्य होत नाहीं, उलट निजामासारखे शत्रु या क्षणींच मराठशाहीचा विध्वंस करतील, आणि अपयशाचे मालक मात्र आपण होऊं. आज्ञा बाजूस ठेवून, आपणास जें कांहीं राष्ट्राच्या हिताचें करणें योग्य किंवा शक्य असेल, तें खुशाल करावें, मग त्याबद्दल लोक पाहिजे तें म्हणोत. याच विचारपरंपरेनें पेशव्यांनीं एकंदर राज्याचा आटोप स्वतःच्या मुखत्यारीनें केला. याच कृतीस कांहीं लोक पेशव्यांचें कर्तृत्व म्हणतात व त्यांस दुवा देतात; तर दुसरे कांहीं लोक राज्यापहार म्हणतात, आणि वाक्ता-डन करतात. पेशव्यांच्या ठिकाणीं यमाजी शिवदेव अथवा रघूजी भोसले किंवा अन्य कोणी असता तरी त्यास हाच प्रकार करावा लागला असता, आणि तो नसता केला तर महाराष्ट्रांतही र्‍हासीच झाली असती. सारांश, पेशव्यांनीं राज्याचा आटोप केला, त्याची मीमांसा वरप्रमाणें असून हा आटोप सांगोल्याचे व्यवस्थेपासून सुरू झाला, हें पुढें दिसून येईल.

एकंदरींत शाहूच्या व तत्कालीन कर्तृत्ववान् मुत्सद्यांच्या चाळीस पन्नास वर्षांच्या कारभारांत राज्यविस्तार झाला असला तरी राज्यनीतीचा व राज्यकारभाराचा उत्कर्ष झाला नाहीं, असें म्हणावें लागतें. आणि मराठशाहीचा पुढें लवकरच अंत झाला, याचें तरी बीजकारण हेंच होय. कारभारांत दोन पक्ष होते, ते व्यक्तिरागद्वेषानें बनलेले असून, त्यांच्या दरम्यान दोन दगडींवर हात ठेवून वेळ येईल तशी संधि साधणारा बराच मोठा वर्ग होता. चालकाच्या दृष्टीनें पेश-

ज्याचा पक्ष वरचढ असून, त्याजकडेच राज्याचें चालकत्व होतें. तद्विरुद्ध पक्ष प्रतिनिधि, यमाजी शिवदेव, रघूजी भोसले व गायकवाड वगैरे मंडळींचा. ही मंडळी साताऱ्यांतच पेशव्यांच्या छातीवर बसून कसून प्रयत्न करती तर, घर्षणापासून कांहीं फलनिष्पत्ति झाली असती; परंतु त्या पक्षांत तरी व्यक्तिहित भिन्न असल्यामुळें, स्वतःचा कार्यक्रम सोडून बाहेरच्या उठाठेवी अंगावर घेण्यास ते तयार नव्हते, त्यामुळें पेशव्यांकडे सहजच प्रमुखपणा आला. प्रमुखपणाशिवाय राज्यशकट चालला नसता, म्हणून तो धारण करणें पेशव्यांस, जबाबदारी पत्करल्यामुळें, अपरिहार्य झालें. आपल्या संरक्षणाची हमी दुसऱ्याचे हातांत दिली कीं, आपण दुर्बल झालों, हें सामान्य तत्त्व संसारांत, एका कुटुंबांत लागू आहे, तसेंच तें राज्यकारभारांतही आहे. शाहूनें संतोषानें ही राज्यसंरक्षणाची हमी पेशव्यांस दिली, त्यामुळें पेशवे प्रमुख झाले. इंग्रजी अंमल येथें सुरू होतांना एतद्देशीय राजांचा हाच प्रकार झाला. म्हणूनच राज्य हें करणाराचें आहे भोगणाराचें नव्हे, असें म्हणण्यांत येतें.

पेशवे तरी हें प्रमुख पद पावले तें अंगच्या कर्तत्वामुळेंच पावले. कर्तृत्वांत स्वहितास जपणें, वेळीं पचलें जाईल तितकें कपट करूनही स्वहित साधणें, या प्रवृत्तीचाही अंतर्भाव होतो. शौर्यौदार्यादि गुणांस अकलेची जोड पाहिजेच. अक्कल नसली तर ते गुण वायां जातात. अशा दृष्टीनें शाहूच्या दरबारांतील तमाम मुत्सद्यांच्या कर्तृत्वाचा अंदाज बांधूं लागलें तर, इतरांच्या मानानें पेशव्यांचें कर्तृत्व वरचढ दिसतें. जो समर्थ तो टिकतो, जो असमर्थ तो लय पावतो, हा (survival of the fittest) न्याय येथेंही लागू पडतो. गुणसमुच्चयाच्या दृष्टीनें इतर जातींपेक्षां ब्राह्मणांचें पारडें जड होतें, म्हणून त्यांची सरशी झाली. पेशव्यांनीं क्षत्रियांप्रमाणें रणशौर्य संपादन केलें, आपणांस मनोभावानें साह्य करतील अशीं नवीं ब्राह्मणघराणीं पुढें आणिलीं; तशी प्रवृत्ति असेल तेवढीच इतर घराणीं ह्यातांत घरिलीं, आणि घरच्या घरांतही प्रत्येक स्त्रीपुरुषाची लायकी वाढ-

मिण्याचा करून प्रयत्न केला. येणेंकरून ते शक्य तितके स्वावलंबी झाले. नानासाहेबाच्या कारभाराचें हें मुख्य रहस्य आहे. शक्य तितक्या सौम्य-वृत्तीनें वागून त्यानें आपला कार्यभाग साधला आणि जसजसें स्वसामर्थ्य वाढत गेलें, तसतशी दुसऱ्यांच्या मदतीची अपेक्षा त्यानें कमी ठेविली; आणि पुढें जातां प्रसंगीं सौम्य वृत्ति सोडून सामर्थ्याचाही उपयोग करण्यास त्यानें कमी केलें नाहीं. ब्रिटिश राज्यस्थापनेचा क्रमही जवळ जवळ अशाच मासल्याचा आहे. एकास जितकीं नांवें ठेवतां येतील तितकींच दुसऱ्यासही ठेवतां येतील. अद्यापि सुधारलेल्या राष्ट्रांतही हाच प्रचार दृग्गोचर होतो.

आपमतलब व स्वार्थत्याग ह्या गोष्टी तरी सापेक्ष आहेत म्हणून त्यांची योग्य मर्यादा ठरविणें शक्य नाहीं. पेशव्यांनीं राज्याचा आटोप केला, तो कदाचित् क्षम्य असेल, परंतु असें करितांना स्वजातीयांपलीकडे इतरांस पुढें येण्यास त्यांनीं संधि दिली नाहीं, उलट पूर्वीचीं घराणीं त्यांनीं उत्तरोत्तर नाहींशीं केली, असाही त्यांजवर पुष्कळांचा आक्षेप आहे, त्यांत थोडेंबहुत तथ्यही आहे; परंतु संधि ही ज्यानें त्यानें उत्पन्न करावी लागते, दुसरा कोणी ती आपण होऊन आणून देत नसतो. सारांश, जशी परिस्थिति येईल, तसें धोरण ठेवून त्यांतच उद्योग करून दाखाविणें प्रत्येकाचें काम असून, आपल्या दोषाचा बोजा दुसऱ्यावर टाकण्यांत फारसें हांशील नसतें. सार्वत्रिक हितापेक्षां व्यक्तिहिताकडेच पाहण्याचा महाराष्ट्राचा स्वभाव होता; आणि तोच शेवटीं निदर्शनास आला.

पेशव्यांचे हातांत राज्याचीं सूत्रें गेल्यावर ब्राह्मणमंडळी पुष्कळच पुढें आली, आणि फौज, वकिलाती या दोन खात्यांत त्यांचा शिरकाव विशेष झाला. म्हणजे पेशव्यांच्या पूर्वी कारकुनी म्हणजे, चिटणिशी व हिशेबी या कामांतच जे ब्राह्मण वावरत होते, ते पेशवाईत वकील व सरदार बनत चालले. पेशव्यांचे जातीचे असल्यामुळें भरंवशाच्या कामांवर त्यांची नेमणूक होऊन त्यांस प्रोत्साहन मिळालें; आणि उत्तर-पेशवाईत या

पद्धतीचा कदाचित् थोडा अतिरेकही झाला असेल; परंतु पहिल्या तीन चार पेशव्यांसंबंधानें पाहतां ब्राह्मण व मराठे अशी भेदबुद्धि राज्यकर्त्यांच्या मनांत किंवा एकंदर कारभारांत फारशी दिसून येत नाहीं. या दोन जातींमध्यें चुरसही नव्हती. सर्वांस पुढें येण्यास व पराक्रम गाजविण्यास पाहिजे तितकी संधि व प्रोत्साहन मिळत असे. एवढेंच नव्हे तर त्या काळच्या स्वराज्याचा हाच प्रकार स्मरणीय आहे. हजारों पत्रांत ब्राह्मण सरदारांनीं मराठे सरदारांच्या मर्दुमकीची तारीफ केली आहे. एवढेंच नव्हे तर, 'जुने मोडूं नये' हेंच प्रधान तत्त्व राज्यकर्त्यांच्या दृष्टीसमोर असल्यामुळें, फौजेंत तर पूर्वींच्याच सरदारांचा व मराठे घराण्यांचा भरणा प्रामुख्यानें असे. बाजीरावाचें खालील पत्र या संबंधांत वाचण्यालायक आहे.

'रा. नरसोजी नाईक वणजारे गोसावी यांस. स्नो. बाजीराव बल्लाळ. तुमचें वर्तमान रा. त्रिंबक गोपाळ यांणीं निवेदन केलें त्यावरून कळों आलें. ऐशास तुम्हीं पुरातन राज्यांतील, तुमचे हातून सेवा घेऊन तुमचें ऊर्जित करावें, हें आवश्यक आहे. सर्वप्रकारें पूर्ववत्प्रमाणें चालेल, व ऊर्जित होईल यांत संदेह नाहीं' (स. १७२७).[1] अशाच प्रकारचीं पत्रें सुमारें वीस इसमांस लिहिलेलीं असून, त्यांत १४ मराठे सरदारांस व ६ ब्राह्मणप्रभूंस आहेत. फौजेंतील सरदारांच्या व सरंजामदारांच्या याद्या निरनिराळ्या काळच्या शेंकडों प्रसिद्ध आहेत, त्यांवरून हाच निष्कर्ष निघतो. वकिलात व कारकुनी हीं कामें लेखनव्यवसायाचीं समजलीं जात असल्यामुळें, त्यांत बहुधा ब्राह्मण व प्रभु मात्र असत. मराठे फारसे नसत; पण अगदीं नसत असें मात्र नाहीं. पिलाजी जाधव व त्याचे वंशज निजामाकडे राहून लढाईचें व वकिलातीचें अशीं दोनही कामें करीत. पिलाजीच्या मुलाचीं पानपतचीं पत्रें फारच महत्त्वाचीं आहेत. शिवाजीच्या वेळेपेक्षां पेशवाईत कोंकणांतील ब्राह्मण राज्यकारभारांत ज्यास्त पुढें आले, याचें कारण राज्यकारभार ब्राह्मणाकडे होता, एवढेंच

---

१ इ. सं. ऐ. टि. भाग २ ले. ४७.

नाहीं तर मराठीराज्याचा फैलाव हिंदुस्थानावर होऊं लागला, तसें राज्य-कारभाराचें क्षेत्र विस्तृत झालें, लायक मनुष्यांची जरूर भासूं लागली, दळणवळण व प्रवासाची संधि वाढली, वाई, झांशी, सागर, मिरज, कर्नाटक, नागपुर अशा शेंकडों ठिकाणीं शेंकडों दक्षिणी कुटुंबांच्या नवीन वसाहती होऊन, महाराष्ट्रीयांचें जीवनक्षेत्र विस्तृत झालें. थोड्या बहुत अंशानें आज जसा इंग्रजी राष्ट्राचा फैलाव पृथ्वीभर झाला आहे, तसाच थोडासा प्रकार हिंदुस्थानांत झाला. तेव्हां अशा सुसंधींत महाराष्ट्रांतील शेंकडों नव्हे हजारों घराणीं हिंदुस्थानभर फैलावलीं. तीं फक्त पेशव्यांच्या जातीचींच नव्हतीं. शेणवई, प्रभु, मराठे, व्यापारी, सर्व धंद्यांचे व जातीचे लहान मोठे लोक हिंदुस्थानभर फैलावले. बडोदें, इंदूर, धार, ग्वालेर, झांशी, नागपूर वगैरे शेंकडों नवीन राजधान्या उत्पन्न झाल्या, त्या वरील सर्व जातींनीं गच्च भरल्या गेल्या भोसले, शिंदे, होळकर यांसारखे सरदार आपापल्या लष्करांत मुद्दाम दक्षिणेंतील मराठ्यांची भरती करीत असत, आणि निरनिराळ्या हुन्नराचे लोकही ते मुद्दाम आपल्याबरोबर घेत. तेव्हां पेशव्यांनीं ब्राह्मणांस मात्र उत्तेजन दिलें, बाकीच्यास मागें लोटलें, हा प्रकार त्या वेळच्या स्थितीची माहिती घेतल्यावर खरा वाटत नाहीं. विसाव्या शतकांतील दृष्टीनें अठराव्या शतकाचा विचार केल्यास असे प्रमाद उत्पन्न होतात.

सरदारांच्या गृहकलहांत अथवा मयत सरदारांचे वारस निवडण्यांत पेशवा नानासाहेब कपटानें किंवा अन्य तऱ्हेनें तंटे उपस्थित करून, पुरातन घराण्यांचा उच्छेद करीत असे, असाही आरोप या पेशव्यासंबंधानें कित्येक ठिकाणीं केलेला आढळतो. निरनिराळ्या घराण्यांच्या संबंधानें प्रत्यक्ष उदाहरण घडलें असतां या आरोपाचा विचार केलाच आहे. परंतु हा आरोप पुराव्यानें सिद्ध नाहीं. याच्या उलट, घराण्यांचें संरक्षण करण्यांत पेशव्यानें शिकस्त केली, असे पुरावे आहेत.

नानासाहेबानें राज्यांतील संस्थानास सुव्यवस्था लावून तीं राखण्याचा प्रयत्न मनापासून किती केला, हें सावंतवाडीच्या उदाहरणावरून चांगलें

व्यक्त होतें. हें संस्थान फार जुनें असून सभोंवार वावरणाऱ्या प्रबल शत्रूंच्या तडाक्यांतून अनेक शतकें टिकाव धरून राहिलें, हें त्यास भूषणावह आहे. शाहू त्याजवर प्रेम ठेवून परामर्ष घेत असे. तीच भावना नानासाहेबानेंही चालू ठेविली. पोर्तुगीझ, आंगरे, कोल्हापुरकर छत्रपति व इंग्रज यांचा डोळा या सावंतांवर नेहमीं असे. सोबतच्या वंशावळींतील पुरुषांचा संबंध या काळाशीं येतो.

वंशावळ

फोंडसावंत ( १७०९–३८ ).
|
नारसावंत — जयराम सावंत. (१७३८-५३).
|
रामचंद्रसावंत ( १७३८–५५ ).
|
खेमसावंत ( १७५५–१८०३ ).

फोंडसावंत यांस ११ मुलगे व ६ मुली मिळून १७ मुलें झालीं. आंगऱ्याचा व सांवताचा झगडा नेहमींच चालू असे. पोर्तुगीझांशींही त्यांच्या लढाया होत. वसईची मोहीम चालू असतां सावंतांनीं पोर्तुगीझांच्या गोव्याचे प्रदेशावर स्वारी करून बराच नवीन प्रदेश संपादन केला. नानासाहेबाचे वेळीं पांडुरंग विश्राम सबनीस व त्याचे आणखी चार बंधु, जगन्नाथ, निवाजी, विठ्ठल व गुणाजी हे सर्व इसम सावंतवाडी संस्थानांत व एकंदर मराठशाहीच्या कारभारांत दक्षतेनें वावरत होते. पैकीं जिवाजीविश्राम व विठ्ठलविश्राम यांचा नानासाहेब पेशव्यांशीं मोठा ऋणानुबंध होता. विठ्ठलविश्राम हा लढवय्या असून स. १७६१ च्या आरंभीं नानासाहेबाच्या उत्तरेकडच्या स्वारींत हजर होता. वास्तविक जीं नांवें इतिहासांत हल्लीं प्रचलित आहेत, त्यांव्यतिरिक्त आणखी किती तरी पुरुष राष्ट्रीय कामांत भाग घेत होते. मात्र त्यांचीं नांवें व कामगिरी कागदावर नमूद झालेली नाहीं, एवढेंच वैगुण्य आहे. फोंडसावंत मृत्यु पावल्यावर त्याचा नातू रामचंद्रसावंत गादीवर बसला. पुढें कांहीं वर्षांनीं रामचंद्रसावंत व त्याचा चुलता जयराम सावंत यांचेमध्यें भांडण लागलें. हा जयरामसावंत फार पराक्रमी होता, आणि त्यास सबनीसबंधूंची चांगली मदत होती. तुळाजी आंगरे स. १७५० त त्याजवर चालून आला असतां त्याचा

जयरामसावंतानें लढून पाठलाग केला. यामुळें पेशवे व सावंत यांच्य स्नेहाची दृढता झाली; आणि जयरामसावंत व त्याचा कारभारी जिवाजी विश्राम याजवर पेशव्याची चांगलीच मेहेरबानी बसली. या वेळीं रामचंद्र सावंतास मुलगा झाला, आणि पुढें आपणास गादी मिळण्याची जयराम-सावंताची आशा खुंटली. त्यामुळें रामचंद्रसावंत व जयरामसावंत यांचें वांकडे आलें. हें भांडण मिटविण्याचीं पेशव्यानें जिवाजीविश्राम यास लिहिलेलीं पत्रें मार्मिक आहेत. [ पिंगुळकरकृत सावंतवडीचा इतिहास, परिशिष्ट १ ले. ६२ ते ६८ ]. ‘ रामचंद्र सावंत यांचा लढा आहे, तो दूर करण्याविषयीं विठ्ठलविश्राम यांस आज्ञा करणें ते केली आहे. उभयतां कलहास प्रवर्तले, ही गोष्ट त्यांचे महत्वास व दौलतीचे संरक्षणार्थास योग्य नव्हे. गृहकलह निर्माण होणें हेंच दौलतीचे अपायास कारण. तुह्मी बुद्धिमंत आहां, तुम्हांस न कळेसारखें काय आहे ? आमचा व त्यांचा स्नेह, उभय पक्षीं भिन्नता नाहीं. त्या दौलतीस अपाय म्हणजे आपलेच पदरचें गेलें ऐसें आहे. तेव्हां हा कलह तुटोन दौलतीचें संरक्षण होय, ते गोष्ट आम्हांस खामखा केलीच पाहिजे. तुम्ही तेथील पुरातन प्रमुख आहां, तुम्हांस आमचा अंतर्भाव कळावा, तदनुरूप तुम्ही वर्तोन संस्थान संरक्षावें, या करितां रामचंद्र बाबाजीस पाठविलें आहे. ते सांगतील तीं आमचीं वचनें जाणून संस्थानचें संरक्षण होय ते करणें. उभयतांही आमचे स्नेही. या-करितां तुम्हीं समस्त मंडळी एक विचार होऊन उभयतांचा कलह निवारणें. क्षुद्र बुद्धीनें कोण्हीं उभयतांस लढवितील, त्यांचा परिच्छिन्न मुलाहिजा होणार नाहीं, अशी सर्वत्रांस ताकीद करणें. उभयतांही आमचीं गोष्ट ऐकतील. ’ [ ता. १३ ऑगस्ट १७५२ ]. हे पेशव्याच्या अंत-र्भावाचे स्पष्ट उद्गार ध्यानांत ठेवण्याजोगे असून संस्थानासंबंधानें पेशव्याची अपहारबुद्धि होती किंवा काय, याचा निकाल करण्यास चांगले उपयोगी पडतील. मुद्दाम हा कलह मिटविण्यास त्यानें रामचंद्रबाबांस पाठविलें. त्यावरून या शेणवई मंडळीचा व पेशव्याचा घरोबा केवढा होता, हेंही उघड होतें. [ पहा, पिं. सा. इ. ले. ६७. ]

# प्रकरण विसावें.

## छ. रामराजा, ताराबाई व पेशवा.

स. १७५०—१७६१.

१. पुढील अकरा वर्षांच्या कारभाराचें स्वरूप व महत्त्व.
२. ताराबाई व पेशवा ह्यांचा बेबनाव.
३. मराठमंडळाची सदोष भावना, दाभाडे व अमात्य.
४. सांगोल्याची लढाई व व्यवस्था, रामचंद्र मल्हार. ( ऑगस्ट–नोव्हेंबर स. १७५० ).
५. रामराजाची साताऱ्यावर कैद (१४.११.१७५०–२८.३.६३)
६. पुण्याच्या कारभारांतील भानगडी, रामचंद्रबाबा व पुरंदरे. (१७५०—५२).
७. रामराजास सोडविण्याचे प्रयत्न.
८, ताराबाईशीं पेशव्याचा समेट ( स. १७५१—५२ ).
९. कोल्हापुरगादी संबधानें पेशव्याचे उद्देश.

१. पुढील अकरा वर्षांच्या कारभाराचें स्वरूप व महत्त्व.— मराठ्यांच्या एकंदर इतिहासांत विशेष भानगडीचा, मतवैचित्र्याचा, परंतु अत्यंत महत्त्वाचा असा भाग म्हटला तर तो शाहूछत्रपतीच्या निधनापासून पानपतपावेतोंच्या अकरा वर्षांचा होय. ह्या कालांत मराठशाहीच्या कारभाराचें रूपांतर होऊन त्याचें चालकत्व छत्रपतींच्या घराण्याकडून पेशव्यांकडे आलें. जानेवारी ता. ४ स. १७५० रोजीं रामराजास राज्याभिषेक झाला आणि ता. १४ जानेवारी १७६१ रोजीं पानपतच्या संग्रामाचा निकाल लागून पुढें ता. २३ जून रोजीं पेशवा नानासाहेब मरण पावला. संभाजीच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रीयांनीं औरंगजेबाशीं केलेला झगडा जसा एका दृष्टीनें इतिहासांत अत्यंत स्मरणीय आहे, तसाच मराठशाहीच्या

विस्तारासंबंधानें हा अकरा वर्षांचा कालही अत्यंत स्मरणीय आहे. या अकरा वर्षांत ब्राह्मण व मराठे मुत्सद्यांनीं व सरदारांनीं राज्यकारभार व रणसंग्राम या दोनही बाबतींत आपल्या करामतीची पराकाष्ठा करून दाखविली. शिवछत्रपतीच्या मनांतलें अंतिम ध्येय पूर्णत्वास पोंचविण्याची जबरदस्त हाव व तत्संबंधीं निकराचा उद्योग मराठमंडळाच्या ठिकाणीं याच अकरा वर्षांत निदर्शनास आला. याच अकरा वर्षांत ब्रिटिश सत्तेचा पाया हिंदुस्थानच्या दक्षिणोत्तर भागीं भक्कम स्थापला गेला. हा पाया पुढें मागें उखडून देण्याची थोडीबहुत ताकद दक्षिणच्या मराठ्यांत व उत्तरच्या मुसलमानांत आहे, असा कांहीं संभव असला तर तो संभव या दोनही सत्तांचा पानपतावर चुराडा होऊन नाहींसा झाला. सारांश राजकीय संबंधानें हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासात या अकरा वर्षांचें महत्त्व अतोनात आहे. बाजीरावादि पेशवे व शिंदे, होळकर, गायकवाड, भोसले या प्रमुख घराण्यांच्या उद्योगाची परिणतावस्था या अकरा वर्षांतच निदर्शनास येते. सन १७१८ त बाळाजी विश्वनाथानें बादशहापासून ज्या सनदा मिळविल्या त्यांचा फलितार्थ या अकरा वर्षांच्या धडपडींत दृग्गोचर होत होता. जिंजी, अर्काट, म्हैसूर, बेदनूर, अहंमदाबाद, लाहोर, अटक, अंतर्वेद, अयोध्या, काशीवरून पूर्वेस बंगाल कटक पावेतों हिंदुस्थानच्या आत्यंतिक स्पष्ट मर्यादांस या अकरा वर्षांतील मराठ्यांच्या उद्योगानें व्यापलें होतें. स्थळ, काल, व्यक्ति, संग्राम, विजय, पराभव, खून, मृत्यु, गैरसमज इत्यादिकांची अशी कांहीं गर्दी या अकरा वर्षांत होते कीं, त्यांची गुंतागुंत सोडवून खरी ऐतिहासिक संगति जुळविण्याचें काम अवघड होतें. ऐतिहासिक साधनांच्या विरोधी रेलचेलीनें व नानाविध लेखकांच्या मनसोक्त व विकारवश टीकांनीं ही गुंतागुंत जास्तच बिकट झाली आहे. सबब या कालाचें शक्य तितकें आकलन करून विकारवशतेस थारा न देतां, त्यांतील घडामोडींचें स्वरूप होईल तितकें विशद करण्याचा विचार आहे. खरोखर विश्वविद्यालयांतील उच्च परीक्षांच्या अभ्यासक्रमांत या ऐतिहासिक

खंडाचा समावेश केल्यास विद्यार्थ्यांस भरपूर विवेचन मिळून विषयाची सांगता होऊं शकेल, एवढी त्याची योग्यता आहे.

ही गुंतागुंत सोडविण्याचा मुख्य प्रयत्न प्रथम रा. राजवाडे यांनीं आपल्या पहिल्या खंडाच्या प्रस्तावनेंत केला. ही प्रस्तावना खुलासेवार समजून घेणें म्हणजे त्या काळाच्या इतिहासाचें यथायोग्य अध्ययन करणें होय. कित्येक किरकोळ मतभेद व चुका व रा. राजवाड्यांचा स्वभावज आग्रह हे बाजूस ठेविले, तर इतकें चांगलें ऐतिहासिक विवेचन इतरत्र क्वचित्च सांपडेल. एखादी कृति निर्माण झाल्यावर तींत दोष निघाले तरी त्यामुळें तिची योग्यता कमी होत नाहीं. पहिल्या खंडांतील सव्वाशें पानांची राजवाड्यांची विवेचक प्रस्तावना व नानाविध प्रश्नांची बाह्य साधनांनीं सव्वातीनशें टीपांत केलेली छाननी, हे प्रकार त्यांच्या बोजड विवेचनांत गुरफटून राहिल्यामुळें, अभ्यासेच्छूंचें लक्ष त्यांजकडे यथायोग्य गेलेलें दिसत नाहीं. एवढ्याच श्रमांत राजवाड्यांस ह्या अकरा वर्षांचा इतिहास समग्रपणें नवीन रचितां आला असता. असो. त्यांच्याच विवेचनाचा पुढील हकीकतींत बराचसा उपयोग होणार आहे. रा. राजवाड्यांचा हा खंड प्रसिद्ध होऊन वीस वर्षें झालीं, या अवधींत त्यांचेच २.३.४.६ हे आणखी खंड बाहेर येऊन या अकरा वर्षांतील घडामोडी स्पष्ट करितात. काव्येतिहाससंग्रहांतील लेख व राजवाड्यांचे वरील खंड ह्यांपलीकडे या कालावर ज्यास्त मेहेनत कोणीं केलेली नाहीं.

नानासाहेबाच्या राज्यकारभाराचीं धोरणें काय होतीं, त्याचें विवेचन मागें ठिकठिकाणीं आलेंच आहे. बाजीरावाच्या हयातीपर्यंत शाहूचा दरारा कायम होता. हा दरारा तरी जाग्यावर बसून कागदांनीं कारभार चालविण्यापुरताच होता. नानासाहेबास पेशवाई मिळाल्यावर शाहूच्या उतारवयांत हा कागदी जोमही उत्तरोत्तर ढिला होऊन नानासाहेबानें हळू हळू बहुतेक सर्व सत्तेचा आटोप केला. तथापि शाहूच्या हयातींत त्यास इतर प्रमुख मुत्सद्यांच्या तंत्रानेंच बरेंचसें चालावें लागे. ही पराधीनता

स. १७५० पासून सर्वस्वी गेली. त्याचे अनेक सल्लागार होते, आणि हर-एक प्रसंगीं निरनिराळ्या मंडळींचा व सर्व बाजूंच्या मतांचा सल्ला ऐकून काम करण्याची त्याची नेहमींच हातोटी होती. परंतु त्याजवर प्रत्यक्ष हुकमत चालविणारें दडपण आतां राहिलें नाहीं. ताराबाईनें दोन तीन वर्षे बराच बखेडा केला, परंतु त्याचा लगोलग बंदोबस्त करून नानासाहेबानें आपलें मुख्य काम पुढें चालविलें. ह्या कामाची दिशा सहज दृष्टोत्पत्तीस येते. आपल्या धोरणांस अडथळा करणाऱ्या मंडळींचा बंदोबस्त करणें, हे पहिलें महत्त्वाचें काम पहिल्या दोन तीन वर्षांत त्यानें तडीस नेलें. नंतर राज्यकारभाराची नवीन व्यवस्था ठरवून ती त्यानें पुण्यास अमलांत आणिली. त्यांत सरदारांचे व त्यांच्या हाताखालील फौजांचे ठराव करून देणें, त्यांस मुलुखगिरीवर पाठविणें, त्यांच्या कामाचा व खर्चाचा झाडा घेणें, आणि तदनुसार त्यांस बक्षिसी किंवा शासन देणें हीं कामें मुख्य होतीं. हीं करीत असतांनाच, राज्याच्या वसुलाची, हिशेबाची व न्यायाची व्यवस्था त्यानें ठरवून दिली. हीं कामें करितांना त्याचें सर्व लक्ष हिंदुपदपादशाहीची सांगता करण्याकडे होतें. हिंदुस्थानच्या चारही दिशांस मराठशाहीचा उद्योग चालू होता, त्यास एकतंत्री स्वरूप आणून देण्याचें काम नानासाहेबानें केलें. चौथाईसरदेशमुखीचे हक्क संपादून जी पद्धति बापआजांनीं घालून दिली होती, तीच त्यास पुरी करावयाची होती. हिंदुस्थानच्या सर्व भागांत शांतता ठेवून, सर्व कारभार आपल्या मध्यस्थीनें चालावा हें वरील हक्कांचें हृद्गत असून तें पुढें ब्रिटिशांनीं धारण केलेल्या तैनाती फौजेच्या पद्धतीसारखेंच बहुतेक होतें. दिल्लीच्या तख्तावर विश्वासरावास बसविण्यासारखे जे कित्येक आक्षेप पुढें आलेले आहेत, ते निव्वळ काल्पनिक होत, हें पुढें पुराव्यानिशीं दाखविण्यांत येईलच. सारांश, वरील उद्देशांस अनुसरून नानासाहेबाच्या उद्योगांत तीन मोठीं प्रकरणें स्पष्ट दिसतात. एक निजामाशीं घडलेले व्यवहार, दुसरें, कर्नाटकांत घडलेले व्यवहार; व तिसरें उत्तर

हिंदुस्थानांतील व्यवहार. तिसऱ्या प्रकरणांत माळवा, बुंदेलखंड, रजपुताना, रोहीलखंड, पंजाब व काशीप्रयाग इत्यादि भागांत संचार करणाऱ्या सरदारांनीं जे उद्योग केले, त्यांचा अंतर्भाव करावयाचा आहे. कारण त्या सर्वांचें केंद्रस्थान दिल्ली राजधानी होतें. गुजराथेंत गायकवाडांचा उद्योग व बंगालकडे नागपुरकर भोसल्यांचा उद्योग हे जरी भूगोलिक व अन्यकारणांनीं दिल्लीच्या कारस्थानांहून थोडे अलग असले, तरी पानपतच्या संग्रामापावेतों सर्व मराठे सरदार एकाच राष्ट्रीय भावनेनें उद्युक्त होऊन वर्तत होते, म्हणून या अकरा वर्षांत वरील अलिप्तपणास फारशी जागा राहत नाहीं. मध्यवर्ती कारभारांतून फुटून स्वतंत्र वागण्याची प्रवृत्ति मराठे सरदारांत सार्वत्रिक होती, मात्र तिचा जोराचा उद्भव पानपतानंतर झाला.

निजामाशीं चाललेला झगडा पिढीजाद होता. निजामास नाहींसा करून दक्षिण मोकळी करावी, हा पेशव्यांचा फार दिवसांचा संकल्प असून तो उदगीरच्या लढाईत त्यांनीं बहुतेक तडीस नेला. स. १७४८ त निजामुल्मुल्क वारल्यावर, त्याच्या मुलांमधील तंट्यांचा फायदा घेऊन निजामास नरम करण्याची संधि पेशव्यांस चांगलीच आली. त्याशिवाय नानासाहेबाची मुख्य करामत कर्नाटक प्रांत काबीज करण्यांत दिसून आली. किंबहुना, बाजीरावाच्या उलट, नानासाहेबाचा कटाक्ष उत्तरेकडे विशेष नसून खालीं कर्नाटकाकडेच विशेष होता. म्हैसूरचें राज्य व कर्नाटकांतलि निजामाचा व नबाबाचा अंमल मोडकळीस आल्यामुळें, तिकडील उद्योग विशेष सुसाध्य होता, आणि पानिपतचें अरिष्ट आलें नसतें तर तो सिद्धीस जाऊन हैदरअलीस पुढें येण्यास अवकाश मिळाला नसता.

उत्तरेंत दिल्लीच्या बादशहाची पडती कळा होती; आणि तिकडच्या व्यवहारांत निरनिराळ्या मराठे सरदारांच्या अनेकतंत्री पद्धतीनें नानाप्रकारची अव्यवस्था उत्पन्न होऊन, खर्चही वाढला होता. तेव्हां तिकडील भागांची व्यवस्थित वांटणी व सरदारांच्या उद्योगाचे विभाग ठरवून, वसूल

वेळेवर येईसा करणें आणि काशी, प्रयाग वगैरे हिंदूंचीं पवित्र स्थानें मुसलमानांच्या हातून सोडवून तीं आपल्या कबजांत घेणें, हें काम मुख्यतः करावयाचें होतें. त्यासाठीं नानासाहेबानें आरंभापासूनच रघुनाथरावास तिकडे पाठविण्याचा क्रम चालू केला. सदाशिवरावानें युद्धानुभव दक्षिणेंत मिळविला, तसा रघुनाथरावानें तो उत्तरेंत मिळविला.

जबरदस्त उद्योग, मनमिळाऊ व शांत वृत्तीनें सर्वांवर आपली छाप बसविण्याची हातोटी, आणि हिशेब वगैरेची व्यवहारदक्षता इत्यादि गुणांत पेशवा नानासाहेब तत्कालीन मंडळींत जरी वरचढ होता, तरी समग्र हिंदुस्थानच्या राज्यव्यवहारांचें संकलित ज्ञान त्यास होतें, असें म्हणतां येत नाहीं. त्यानें स्वतः उत्तरेंत स्वारी कां केली नाहीं आणि कर्नाटकांतील उद्योगांतच ज्यास्त लक्ष कां घातलें याचें कारण समजत नाहीं. त्यांतल्या त्यांत उत्तरेकडचे व्यवहार अल्पवयस्क व अयोग्य अशा रघुनाथरावावरच त्यानें आरंभापासून बहुतेक सोंपिले, याचा परिणाम शेवटीं अनिष्ट झाला. स. १७४८ पासूनच अब्दालीच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर होत होत्या. शिंदे होळकर वगैरे सरदारांचा बसावा तसा जम बसत नव्हता, नानाप्रकारच्या भानगडी व तक्रारी तिकडून पेशव्याकडे येत होत्या, असें असतां स्वतः पेशव्यानें एकदांही उत्तरेकडील प्रवास ह्या अकरा वर्षांत केला नाहीं, हा नानासाहेबाच्या करामतींत मोठा कमीपणा दिसतो. एकदां जरी नानासाहेबानें तिकडे जाऊन सर्व व्यवहार प्रत्यक्ष पाहिले असते, तरी पानिपतचें अरिष्ट बऱ्याच अंशीं टळलें असतें, निदान त्याचा परिणाम पुष्कळ निराळा झाला असता. स. १७६० त तरी सदाशिवरावास पानपतावर पाठविण्या ऐवजीं, स्वतः पेशवा तिकडे गेला असता, तर पानपतचा संग्राम अशा थरास गेला नसता. याचा विचार पुढें येणारच आहे.

दिल्लीस बादशहा महंमदशहा ता. १४ एप्रिल स. १७४८ त मरण पावला; आणि त्याच सुमारास म्हणजे ता. २१ मे स. १७४८ त निजामुल्मुल्क् मरण पावला. या दोन मृत्यूंनीं मुसलमानांचें हिंदुस्थानांतील मोडकळीस आलेलें

राज्य अगदींच मृत्युपंथास लागलें. महंमदशहा स्वतः जरी मोठा हुषार नव्हता तरी त्यानें शत्रूंशीं कसाबसा टिकाव धरून आपलें व बादशाहीचें थोडेंबहुत संरक्षण केलें. निजामाचा दरारा दक्षिणेंत होता, तोंपर्यंत मराठेही जरा धाकांत होते, आणि शाहूछत्रपतीच्या मृत्यूपर्यंत पेशव्यांस आपले बादशाही मनोरथ जोरानें तडीस नेण्याची स्वतंत्रताही नव्हती. शाहूछत्रपति स. १७४९ च्या डिसेंबरांत वारून, जानेवारींत रामराजा गादीवर आल्या-बरोबर पेशव्यानें मुसलमानी सत्तेचा सर्व ठिकाणीं पाडाव करून हिंदुपद-पादशाहीचे हेतु ताबडतोब सिद्धीस नेण्याचे इलाज चालू केले. ताराबाई, प्रतिनिधि, गायकवाड वगैरे मंडळींची पेशव्यास मदत असती तर, निदान त्यांनीं पेशव्यास तीव्र विरोध तरी केला नसता, तर पेशव्यानें आपले हे हेतु अल्पावकाशांत तडीस नेले असते. हिंदुस्थानची राजकीय परिस्थिति नानासाहेब व सदाशिवराव यांच्या लक्षांत चांगली उतरलेली होती. दिल्लीच्या दरबारांत वजीर गाजीउद्दीन व अयोध्येचा सुभेदार सफ्तरखान हे दोघेच कायते वजनदार पुरुष होते; आणि दोघेही पूर्णपणें मराठ्यांचे अंकित झाले होते. मराठ्यांचे बेत तडीस जाऊं न देतां मुसलमानांची सत्ता पुनरपि ऊर्जित करावी, असें म्हणणारा मुसलमान मंडळीचा पक्ष संख्येनें जरी मोठा होता, तरी ही गोष्ट सिद्धीस नेण्याचें सामर्थ्य मात्र कोणास नव्हतें. अशा प्रकारची प्रबळ इच्छा रोहिला सरदार नजीबखान याची असून, मराठे सरदारांत फूट पाडणें, अब्दालीसारख्या परकीयास देशांत आणणें; आणि धरसोड करणाऱ्या मुसलमान सरदारांस आपल्या कटांत सामील करून घेणें, या युक्त्या तो करीत होता. परंतु नजीबखानाचा हा उद्योग स. १७५० त चालू झाला नव्हता. रजपूत राजे बहुतेक मराठ्यांच्याच कह्यांत येत होते. अशा चांगल्या संधीस पेशव्यानें जानेवारी ते एप्रिल १७५० पावेतोंच्या काळांत सातान्यास सर्व मोठमोठे सरदार व ठिकठिकाणचे वकील जमवून सर्वांच्या सल्ल्यानें पुढील बेत ठरविले. हे बेत ठरवितांच ताराबाई आपल्या-

विरुद्ध जाईल याची नानासाहेबास कल्पना नव्हती. गुजराथेंत आपला अंमल बसवून, तेथून माळवा, बुंदेलखंड व रजपुताना इत्यादि ठिकाणचा आपला पाया घट्ट करून नंतर दिल्लीकडे प्रवेश करावा, आणि बादशाहास आपल्या कबजांत घेऊन पुढें प्रयाग, काशी वगैरे आपलीं पवित्र स्थळें सोडवावीं असा नानासा.चा विचार ठरला. हिंगणे, बुंदेले, अंताजीमाणकेश्वर, शिंदे, होळकर, भोसले वगैरे मंडळी सातान्याचे ह्या विचारांत होती. शिंदे होळकर तर नानासाहेबाचे केवळ दोन हातच असून, तो त्यांचा मान उत्कृष्ट ठेवीत असे. पुरंदरेरोजनिशीवरून १७५० त शिंदे-होळकरांचें कांहीं तरी थोडे बिनसलें होतें, असें दिसतें. ता. १३ जून १७५० रोजीं नानासाहेब डेरे दाखल होऊन सखारामबापू व रघुनाथराव यांस बरोबर घेऊन मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे यांची समजूत करावयास गेला. तो १९ रोजीं त्या उभयतांसह परत आला. (खं. ६ पृ. ५३–५४). चांभारगोंद्यास जाऊन आला, असा उल्लेख भा. व. शकावलींत आहे. मात्र हा रुसवा कोणाचा कोणावर होता हें संदिग्ध आहे. कदाचित् शिंदेहोळकरांचा आपसांतील असेल. त्यानंतर २४ जून रोजीं 'या दोघांस श्रीमंतांनीं वस्त्रें दिलीं. मोत्यांचे चौकडे दिल्हे. बहुमान चांगला केला. बरोबर रामाजी अनंत (दाभोळकर) फडणिशीकडील कारकून होते तेच दिल्हे'. (खं. ६ पृ. ५४). यावरून रामचंद्रबाबाचे संबंधाचा वरील रुसवा असावा. एकंदरींत एवढें खरें कीं, शिंदे व होळकर या दोघांवरच उत्तरेंतील सर्व व्यवहारांची भिस्त नानासाहेबानें ठेविली होती. निजामत व बादशाही ह्या दोनही पडत्या पायरीस लागल्यामुळें या संधीचा उपयोग करून, मराठशाहीचा फार दिवसांचा उद्योग जोरानें व त्वरेनें तडीस नेण्याचा बेत पेशव्यानें केला. या बेतास प्रथमच अडचण आली ताराबाई, प्रतिनिधि, गायकवाड वगैरेंकडून; आणि निजामाचा निकाल लवकर न लागण्यास कारण झाला फ्रेंचांचा बुशी. डुप्ले व बुशी यांनीं एतद्देशीयांच्या कारभारांत उघडपणें शिरकाव करून आपलेंच राज्य

स्थापण्याची सिद्धता केली. आणि हा त्यांचा उद्योग हाणून पाडण्याचा उद्योग मद्रासकर इंग्रजांनीं केला. परंतु इंग्रजांचा कावा फ्रेंचांच्या इतका आरंभीं उघड नसल्यामुळें, नानासाहेबास त्यांचा ठाव सांपडला नाहीं. बुसीचे प्रयत्न मात्र नानासाहेबानें निष्फळ केले. आतां हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत चाललेल्या राष्ट्रीय हालचालींचें कालक्रमानुसार वर्णन करावयाचें आहे.

२ ताराबाई व पेशवा यांचा बेबनाव.—राज्याभिषेकसमारंभ आटोपून कारभार चालू होतांच ताराबाई व पेशवा यांजमध्यें लढा उत्पन्न झाला. ताराबाईचा उद्देश असा होता कीं, पूर्वीं ज्याप्रमाणें आपला पुत्र शिवाजी यास राजारामाचे पश्चात् राज्यावर बसवून आपण संपूर्ण कारभार केला, त्याचप्रमाणें रामराजास आपल्या ताब्यांत ठेवून आपण सर्व कारभार मर्जीप्रमाणें करावा; आणि सर्वांनीं आपल्या आज्ञेंत चालावें. पेशव्यास ही गोष्ट संमत नव्हती. विशेषतः वर्धिष्णु राज्याच्या भानगडी तडीस लावणें बाईमाणसाला त्या वेळीं शक्य नव्हतें. अनेक प्रसंग, अनेक लेख, व भानगडींचे दूरदेशांतले व्यवहार, नानाप्रकारच्या युक्त्या योजून, एकाचें दुसऱ्यास कळूं न देतां, विल्हेस लावावे लागतात, ती गोष्ट प्रत्यक्ष शाहूला सुद्धां जर जड गेली तर भटपुराणिकांच्या सान्निध्यांत आयुष्य क्रमणाऱ्या ताराबाईस ती कितीशी साध्य झाली असती! ताराबाईला घरांत बसून बाहेरची परिस्थिति व अडचणी यांची जाणीव कशी असणार! तिचे सल्लागार म्हणजे भटभिक्षुक व जवळच्या नोकरींतले बायापुरुष. दरएक राजकीय गोष्टींत अशा लोकांची मध्यस्थी केवळ स्वार्थी दृष्टीनें चालूं लागल्यावर, कारभार सुरळीत चालावा कसा; आणि कारभाऱ्यांची जबाबदारी ती काय राहिली! 'बायकोचा कारभार, व्यवस्था राहणार नाहीं. कारभाऱ्यांनीं महाराजांस लौकर तयार करावें, महाराजही चांगले प्रबुद्ध, त्यांचे हातें कारभार करवून शाहूमहाराजांचे आज्ञेप्रमाणें चालावें. मातश्री मनस्वी; अथवा वडीलकीच्या नात्यानें जरूर तितकें, आईसाहेबांचे कानावर

घालून, त्यांचे संमतें होईल तितकें घेऊन चालावें, ' असा पेशव्याचा आग्रह होता, तो ताराबाईस आवडला नाहीं. दोन महिन्यांचे आंतच आईसाहेबांचे मनांत विकल्प येऊन त्यांहीं उदासवृत्ति धरली; आणि सिंहगडावर राजाराम छत्रपतीची छत्री होती तेथें फाल्गुन वा॥ ८ [ २० मार्च १७५० ] चा वार्षिक उत्सव असे, त्या निमित्तानें ताराबाई, मनांत रुसवा ठेवून सातारा सोडून सिंहगडास जाऊन राहिली.

वास्तविक हा झगडा शाहू मरण पावल्याबरोबरच सुरू झाला होता. ' शाहूची निधनवार्ता समजतांच किल्ल्यावरून ताराबाई खालीं वाड्यांत येऊन तेरा दिवस राहिली. नंतर किल्ल्यावर जाऊन प्रया(ग)जी बांदल सुभेदार याजपासून ताराबाईनें क्रिया घेतली कीं, फितुरांत येणार नाहीं, आपल्या आज्ञेनें चालेन. त्यांत यमाजी शिवदेवानें पहिल्या दिवसापासून बखेडा चालविला; परंतु गोविंदराव व पेशवे यांनीं रामराजा गादीवर येईपर्यंत बालाग्र वांकडेपणा केला नाहीं. ' [गो. खं. चि.कृत शा. म. ब.] रामराजा सिंहासनारूढ झाल्याबरोबर ताराबाईचें तंत्र कारभाऱ्यांनीं सोडून दिलें.

शाहूच्या मृत्युसमयीं बहुतेक मोठमोठे सरदार आपापल्या फौजांसह साताऱ्यास जमा झाले होते. पुढील राज्यकारभाराच्या वाटाघाटीसाठींच सर्वांस बोलाविलेलें होतें असें दिसतें. सेनापति यशवंतराव दाभाडे व रघूजी भोसले, ह्या दोघांसही बोलावणें गेलें असता ते आले नाहींत. यशवंतराव दाभाडे व्यसनाधीन होऊन दुर्बल झाला होता आणि त्याचा दुय्यम दमाजी गायकवाड गुजराथेंत होता. रघूजी भोसले येण्यास निघाला असून शाहूच्या मरणापूर्वीं दाखल झाला नाहीं. राज्याभिषेकसमारंभाचे वेळीं ताराबाईनें रामजारास एका ताटांत घेऊन जेवावें, असा आग्रह करणाऱ्या मंडळींत रघूजी होता. म्हणजे जानेवारी स. १७५० च्या आरंभींच तो साताऱ्यास आला असावा. खं. ३ ले २०९ यांत 'बाबासाहेब तेथें गेले आहेत' असा उल्लेख आहे. या पत्रावर मिति नाहीं. परंतु तें १७५० च्या आरंभींचेंच असावें. राणोजी भोसल्याची रघूजीच्या संबंधानें

तक्रार होती, ती ते साताऱ्यास गेले असतां मिटवून आपला सरंजाम वाजवीप्रमाणें ठीक करून राजपत्रें घ्यावीं, अशी कोन्हेरपंतास राणोजीनें या पत्रांत विनंती केली आहे. रघूजी पुढें ५-७ महिने तरी साताऱ्यास होता. ता. १८ एप्रिल १७५० रोजीं नानासाहेब पेशवा साताऱ्यास रघूजीच्या भेटीस त्याच्या घरीं गेला असतां त्यास व सदाशिवराव व महादाजी अंबाजी यांस मिळून एकंदर ७०० रु. चे पोषाख रघूजीनें दिल्हे, असा उल्लेख सांपडतो. ( ना. रो. १८२ ).

ताराबाईच्या कारभारास मराठमंडळापैकीं कोणाचीच फारशी अनुकूलता नव्हती. त्यांतून रघूजी येऊन दाखल होईपर्यंत पेशव्याशीं विरोध असा कोणीं दाखविलाच नाहीं. पुढें रघूजी आल्यावर त्यानेंही पेशव्याच्या उलट बाजू घेण्याचें नाकारिलें. रघूजी आतां बराच वयातीत होता; आणि साताऱ्च्या भानगडी अंगावर घेऊन लढण्याचें काम त्यास नको होतें. सामान्यत: आपल्या वऱ्हाड वगैरे पूर्वेकडील प्रांतात पेशव्यांनीं दखल करूं नये; आणि आपणही पेशव्याचे कारभारांत ढवळाढवळ करीत नाहीं, असा विचार रघूजीनें दर्शविला. त्याचा मुलगा जानोजी याच वेळेस दहा हजार फौज घेऊन नासिरजंगाचे मदतीस कर्नाटकांत गेला असून, रघूजीची कांहीं फौज त्याचे राज्यांत नागपुराकडे होती. अशा स्थितीत त्यानें पेशव्याशीं यत्किंचित् विरोध न करितां उलट सर्वस्वी मतैक्यच दाखविलें. जानेवारीपासून एप्रिल पावेतों सर्व प्रमुख मराठे सरदार साताऱ्यास होते. सर्वांस तेथील राजकारणांचा परिचय होऊन पुढील कर्तव्याचा व धोरणाचा या अवधींत चांगला विचार करितां आला. पेशव्याची करामत सर्वांस माहीत होती; रामराजाचे ठिकाणीं विशेष कर्तृत्व नाहीं, याचाही प्रत्यय बहुतेकांस त्याच अल्पावधींत आला. तेव्हां प्रत्येकानें आपापली पृथक् सोय पाहून घेतली, आणि इकडे पेशव्यानेंही विशेष कोणास न दुखवितां सर्व सरदारांची व कारभाराची व्यवस्था लावून दिली. पेशवा राज्यापहार करून राज्याचें नुकसान करील

आहे, अशी जाणीव त्यावेळीं मराठेमंडळास नव्हती: आणि तशी जाणीव असून पेशव्यास कोणीं या अपहाराविरुद्ध अटकाव केला नसेल तर, त्याची जबाबदारी सरदारांवरही आल्याशिवाय रहात नाहीं. सारांश, राज्यकारभाराचें काम इतकें बिकट झालें होतें कीं, जो तो तें अंगाबाहेर टाकूं पहात होता. रामराजाविषयींही पेशव्याचें मत लवकरच बिघडलें.

ता. १६ मार्च १७५० रोजीं पेशवा साताऱ्याहून दीक्षितास लिहितो. 'सात महिने येथें आल्यास झाले. रिकामे फिरकोळ अर्थ दोनही महालांत आह्माविशीं मनांत आणून रा. स्वामीशीं कज्जिये करितात. राजश्री स्वामी तों मळमळीत. दोन्हीकडे आहेत. आणखी किती दिवस गुंता होईल न कळे. एतदर्थी कांहीं दैवी उपाय, राजश्रींची कृपा आह्मांवर होय, आह्मांस निरोप देत ऐसा, असला तरी करावा.' [ खं. ११ ले. ७९ ]

राज्याभिषेक व लग्नमुंज ह्या समारंभांत जानेवारी व फेब्रुवारी महिने गेले. मार्च महिन्यांत ताराबाई रुसून सिंहगडास गेली. त्याच संधीस म्ह० २२ मार्च रोजीं सदाशिवरावाची बायको उमाबाई पुण्यास वारली. तेव्हां त्यांचें व विश्वासरावाचें लग्न पुण्यास करावयाचें ठरवून त्या निमित्तानें ताराबाईस बोलावून पुण्यासच सर्व विचार करावा, असें रघूजी व इतर सरदारांशीं ठरवून नानासाहेब ता. २१ एप्रिल रोजीं पुण्यास दाखल झाला. मागें महाराजांची व्यवस्था पेशव्यानें रघूजीवरच सोंपिली. यावरून पेशव्याचा व त्याचा एकविचार दिसतो. वरील दोनही लग्नें पुढें पुण्यास झालीं; सदाशिवरावाचें ता. २६ एप्रिल रोजीं पार्वतीबाईशीं व विश्वासरावाचें ता. २ मे रोजीं लक्ष्मीबाईशीं. पार्वतीबाई ही पेणचे भिकाजी-नाईक कोल्हटकर यांची मुलगी [का. सं. प. या. पृ. ५४२] व लक्ष्मीबाई ही सदाशिव हरि दीक्षित पटवर्धन कायगांवकर यांची कन्या [कित्ता पृ.५४१] ह्या दोनही बाया पानपत पाहून परत आल्या. विश्वासरावाचें लग्न मोठ्या थाटाचें झालें. 'अष्टप्रधान वगैरे सर्व लग्नास आले होते. वाड्याभोंवतीं

१ हरि चिंतामण भा. व. श.

वाडे होते ते पाडून मंडप केले होते. रंगभट ढेकणे वगैरे यांचे वाडे पाडले. त्यांस दुसरी जागा नेमून दिली.' [ का. सं. शकावलि ]. ताराबाई शेंवटी लग्नास आलीच नाहीं.

सिंहगड किल्ला सचिवाचे ताब्यांत होता. तेथें गेल्यावर ताराबाईनें चिमणाजी नारायण सचिवास सामील करून घेतलें. हा बंडावा फैलावत जाणार, असें दिसतांच ताराबाईची समजूत काढण्याकरितां म्हणून पेशव्यानें तिला बोलावून पुण्यास आणिलें. प्रथम शिवापुरास मुक्काम करून तेथून ता. २९ मे रोजीं ताराबाई पुण्यास आली; आणि बाबूजीनायकाचे वाड्यांत राहिली. तिला घेण्यासाठीं रघुनाथराव शिवापुरास व स्वत: नानासाहेब कांहीं अंतरावर सामोरे गेले होते. ताराबाईबरोबर भगवंतराव अमात्य व सचिवपंत पुण्यास आले. भेटीच्या प्रसंगीं तिला पेशव्यांनीं पांच हजार रुपये नजर केली. [ पु. रो. खं पृ. ५२] दाभाडे, सचिव, बाबूजीनाईक व प्रतिनिधि वगैरे कित्येक मंडळींचा ओढा पेशव्यांच्या विरोधामुळें ताराबाईकडे होता; आपापले हेतु साधण्यापुरते तरी ते पेशव्याचे उलट वागत. या पक्षांत यमाजीशिवदेव शहाणा गणला जात असे. अर्थात् ताराबाईकडे ओढा असलेल्या या एक इसमाची वाट लावण्याचें काम पेशव्यानें प्रथम अंगावर घेतलें.

ताराबाई पुण्यास आल्यावर पेशव्यानें महाराजांस विनंतिपत्र लिहून पुण्यास आणिलें. ' स्वारी पुण्यास येऊन मातुश्रीचें समाधान करून परत जावें, ऐसें लिहिलें. तेव्हां महाराज रघूजी भोसले सरलष्कर वगैरेंसुद्धां पुण्यास आले. प्रधान एक मजल पुढें जाऊन मोठे समारंभें घेऊन मेजवान्या केल्या. रामचंद्रबाबा यांचा वाडा सात मजली कसब्याच्या गणतीच्या मागें होता त्यांत राहण्यास जागा केली. तेथें पेशवे वगैरे मंडळींनीं जाऊन पुढील व्यवस्था ठरविली. हे भाग समजण्यासाठीं प्रथम स. १७५० तील ठळक ठळक प्रसंगांचें टांचण, तीन शकावल्या व

१ शहराबाहेर पेशव्यांनीं दिलेल्या डेऱ्यात मुक्काम झाला. ( पु. रो. सं. ६ ).

पुरंदरे रोजनिशी यांच्या साह्यानें केलेलें, खालीं नमूद करितों. थोडक्याबहुत तफावतीनें ते खरें धरून चालण्यास हरकत नाहीं.

२९ मे ताराबाई पुण्यास दाखल झाली-आगाऊ शिवापुरास आली होती.

१३-१९ जून शिंदे होळकरांचा रुसवा(बहुधा रामचंद्रबाबावरून) झाला होता, त्यांची समजूत काढण्यासाठीं पेशवा चांभारगोंद्यास जाऊन आला, त्या उभयतांस समजावून त्यांनें पुण्यास आणिलें; आणि फडनिशीकडील कारकून रामाजी अनंत दाभोळकर यांस शिंद्याबरोबर देऊन व शिंदेहोळकरांस वस्त्रें देऊन जुलईचे अखेरीस त्यांस हिंदुस्थानांत रवाना केलें.

जुलई-संप्टेंबर-रामचंद्रबाबा, पुरंदरे, सदाशिवराव इत्यादींचा पेशव्यावर रुसवा.

६ जुलई—सिंहगड सचिवापासून पेशव्यानें हिसकावून घेतला.

२६ जुलई—पुण्यास सुवर्णमय ब्रह्मांडदान, वजन सोनें ३२०० तोळे.

३० जुलई—रघूजी भोसले साताऱ्याहून पुण्यास दाखल.

१४ ऑगस्ट—रामराजा पुण्यास आला, पेशव्यांचे डेऱ्यांत मुक्काम.

२२ ऑगस्ट—रामराजा, सदाशिवराव व सचिवपंत पुण्याहून सांगोल्यास गेले.

५ सेप्टेंबर—नांनासा०स चवथा पुत्र झाला.

८ ,, रघूजी भोसले यास वस्त्रें देऊन पेशव्यानें स्वदेशीं रवाना केलें.

२५ सेप्टेंबर—भवानरावास प्रतिनिधि केलें-सांगोल्यास.

ऑक्टोबर—सांगोल्याची लढाई व राज्यकारभाराची व्यवस्था.

१ ,, ( शंभु ) महादेवास जाण्याच्या निमित्तानें ताराबाई पुणें सोडून गेली.

४ ,, पेशव्यानें दादोबा प्रतिनिधीस पुरंदरावरून सोडून सांगोल्यास पाठविलें.

२० ,, रामराजाचा नवीन शिक्का केला.

२९ ,, ताराबाई नाती व नातसुना घेऊन सातारा किल्ल्यावर गेली.

२२ नोव्हेंबर—रामराजा सांगोल्याहून साताऱ्यास गेला [ कांहीं ठिकाणीं पुण्यास येऊन साताऱ्यास गेला असें आहे. ] साताऱ्याच्या गडावर जाऊन मातुःश्रींची भेट घेऊन बायका घेऊन खालीं आले.

२४ नोव्हेंबर—चंपाषष्ठीचे दिवशीं किल्ल्यावर गेला असतां, रामराजास ताराबाईनें गडावर अटकेंत ठेविलें, तेथेंच तो पुढें बारा वर्षे होता.

डिसेंबर १७५० तें मार्च १७५१ साताऱ्यास बंडावा, त्यांत गायकवाड शामील.

२५ डिसेंबर. महादाजी अंबाजी काम सोडून घरीं गेला.

ताराबाईस पुण्यास आणून तिच्याच समजुतीनें परंतु आपल्या मताप्रमाणें पेशव्यांनीं तिच्या पक्षांतील एक एका व्यक्तीची व्यवस्था लाविली. पंतसचिवाचे किल्ले तुंगतिकोना व त्या खालील मुलूख आपल्या ताब्यांत घेऊन सचिव व त्याचा मुलगा चिटकोपंत[1] यांस पेशव्यानें पुण्यास अटकेंत ठेविलें [ १४ जून १७५० ]. त्यांस सिधासरंमजाम खानगीकडून पावत होता. पुढें सिंहगड सचिवाचे ताब्यांत असल्यानें ताराबाईचा जोर चालतो व राजारामाची समाधि तेथें असल्यानें ताराबाईस तेथें जाण्यास अटकाव करतां येत नाहीं, असें पाहून पेशव्यानें तो किल्ला सचिवाकडून आपल्या कबजांत मागितला; आणि त्याजबद्दल दुसरा प्रदेश मोबदला देऊं केला. महाराजाकडून त्याजबद्दल आज्ञापत्रें आणविलीं आणि ताराबाईची समजूत घालून किल्ला ताब्यांत घेण्यास जिवाजी गणेश खासगीवाले यास पेशव्यानें पाठविलें, सचिवाचे लोक किल्ला लढवूं लागले, त्यांचा पराभव करून जिवाजीगणेशानें किल्ला काबीज केला. [ ६ जुलई ], व खालील मावळ वगैरे गांव ताब्यांत घेतला. पुढें

---

[1] सदाशिव ( ? )

महाराजाकडून मोबदल्याच्या सनदा वगैरे सचिवांस करून दिल्या, तुंगतिकोना किल्ले सोडून दिले आणि सचिवास स्वस्थळीं पाठवून दिलें. [ २४ जुलई १७५०–ना. सा. रो. १ लें ४३ व रा. शकावली ]

पुढील व्यवस्था सर्वांनीं एकविचारें ठरवावी, या हेतूनें रघूजी भोसले महाराजांसह पुण्यास आला. दोघे बरोबरच आले किंवा थोडे मागें पुढें आले याचा खुलासा नाहीं. तसेंच पुण्यास आल्यावर रामराजा बाहेर डेऱ्यांत राहिला, किंवा रामचंद्रबाबाच्या सातमजली वाड्यांत राहिला; याचीही स्पष्टता होत नाहीं. एकंदरींत रामराजाचा मुक्काम पुण्यास आठपंधरा दिवसांहून ज्यास्त नव्हता, प्रतिनिधीचा बंदोबस्त करण्याकरितां म्हणून रामराजास घेऊन सदाशिवराव व रामचंद्रबाबा सांगोल्यावर गेले; आणि प्रतिनिधींकडून तें ठाणें आपल्या कबजांत घेऊन, तेथें व त्रिवर्गांनीं बसून पुढील कारभाराची व्यवस्था ठरविली. तथापि या महत्त्वाच्या कामांत स्वतः नानासाहेब कां हजर राहिला नाहीं, तें कळत नाहीं. ताराबाई पुण्यास होती, तिला सांगोल्यास नेणें इष्ट नव्हतें. प्रतिनिधीचा बंदोबस्त पेशव्यानें करणें ही गोष्ट लौकिकदृष्ट्या योग्य नव्हती. कारण प्रतिनिधि हा पेशव्याहून श्रेष्ठ मानला जात होता. तेव्हां त्याचा बखेडा मोडणें असल्यास तो प्रत्यक्ष रामराजानेंच मोडला पाहिजे होता; तेव्हां पुढील व्यवस्थेची रूपरेखा अगाऊ ठरवून मुद्दामच सदाशिवरावास बरोबर देऊन, जोशी यानें मुहूर्त दिल्याप्रमाणें, पेशव्यानें महाराजांची रवानगी सांगोल्यास केली असावी, [ २२ ऑगस्ट ]; आणि आपण ताराबाईसह पुण्यांत दुसरीं कामें करीत राहिला. रघूजी भोसल्याची व्यवस्था त्याच्या मर्जीप्रमाणें म्हणजे वऱ्हाड, गोंडवण व बंगाल या प्रांतांच्या सनदा त्यास करून देऊन पेशव्यानें लावून दिली, वऱ्हाडांत प्रतिनिधीचा कांहीं मुलूख जहांगीर म्हणून होता, तोही नानासाहेबानें प्रतिनिधीकडून काढून भोसल्यास दिला. म्हणजे अर्थात् प्रत्येक सरदाराच्या उद्योगाचें क्षेत्र नानासाहेबानें स्वतंत्र व सलंग तोडून दिलें, एकाची भानगड दुसऱ्यांत

ठेविली नाहीं. बाळाजीविश्वनाथाच्या व्यवस्थेंत, मुद्दामच, एकमेकांचा दाब एकमेकांवर राहण्यासाठीं, निरनिराळ्या सरदारांस स्वतंत्र क्षेत्रें तोडून न देतां एकमेकांत एकमेकांची व्याप्ति ठेवण्यांत आली होती. ह्या पद्धतीपासून फायदा न होतां घोटाळे मात्र झाले, असा नानासाहेबाचा अनुभव असून, तेवढ्या पुरती पुढील व्यवस्था त्यानें प्रत्येकाची अलग करून दिली. सांगोल्यास जी व्यवस्था ठरली तिच्या मूळाशीं हें तत्त्व आहे. शाहूनेंही हेंच तत्त्व स्वीकारिलें होतें. रघूजी भोसल्याचें व नानासाहेबाचें यासमयीं चांगलेंच संगनमत झालें असें दिसतें. कारण इतउत्तर रघूजीनें नानासाहेबाशीं विरोध केला नाहीं. किंवा गायकवाड वगैरे ताराबाईचा पक्ष घेऊन भांडत असतां त्यांत रघूजी पडला नाहीं. उलट निजामावरील स्वाऱ्यांत त्यानें नानासाहेबास साह्य केलें, आणि प्रसंग आले असतांही रामदासपंत वगैरे उपद्व्यापीमंडळींस त्यानें दाद दिली नाहीं. रामदासपंताचीच ही तक्रार आहे, हें पुढें दिसून येईल. ता. १४ फेब्रुवारी स. १७५५ रोजी[1] रघूजी मरण पावला, त्याच्या व पेशव्याच्या स्नेहांत व्यत्यय येण्यास या पांच वर्षांत विशेष कारण घडलें नाहीं. वास्तविक पाहतां पेशव्याच्या संनिध असतां सर्वच सरदार बहुधा त्यास अनुकूल असत; आणि जेव्हां आपल्या मधुर भाषणानें व योग्य विचारसरणीनें राज्याचें काम व सर्व अडचणी पेशवा त्यांस स्वत: समजून देई, तेव्हां त्याचे विचार त्यांस बहुधा पटत; परंतु प्रत्येक सरदाराजवळ शहाणपणाची घमेंड मिरविणारे व येनकेनप्रकारेण पेशव्यास गोत्यांत आणून आपला वैयक्तिक स्वार्थ साधणारे कारभारी लोक असत, ते संधि साधून आपल्या यजमानांची उलटी समजूत करीत, आणि नानाप्रकारचे घोटाळे माजवीत. अशा कारभाऱ्यांचा आपमतलबी सल्ला साफ झुगारून देण्याचें धैर्य या सरळमार्गी सरदारांत बहुधा नसे. शिवाय हे कारभारी पिढीजाद काम करणारे असून, त्या वेळची तमाम राष्ट्राची एकंदर राहटी अशी

१ रा. खं. ६ पु. रो. पृ. ११६.

पिढीजादच चालत होती. हे नोकर, आपल्याच कर्तृत्वानें दौलतीचें रक्षण होत आहे, असें आपल्या धन्यांस भासवीत. कारभारी बहुधा ब्राह्मणवर्गांतले असत. ब्राह्मणांतच सारस्वत, प्रभु इत्यादि मंडळींचा अंतर्भाव समजावयाचा. ताराबाईजवळचे पुराणिक व उपाध्ये, प्रतिनिधीचा यमाजी शिवदेव, दाभाड्यांचा यादो महादेव, भोंसल्याजवळचे कोन्हेरराम वगैरे मंडळी, शिंद्यांचे रामचंद्रबाबा, होळकरांचे चंद्रचूड, निजामाकडील रामदासपंत अशी आणीक किती तरी मंडळी प्रत्येक प्रकरणाच्या बुडाशीं असलेली आढळते. या मंडळीस मराठी राज्य, त्याचे हेतु, पुढील कर्तव्य व प्रस्तुतच्या अडचणी यांची जाणीव बहुधा नसे. जो तो आपल्यापुरतें व आपल्या दृष्टीनें पाही. समस्त राज्यकारभाराचें स्वरूप व त्याच्या अडचणी, अशा व्यक्तींस समजत नसत, किंवा थोड्या बहुत समजल्या तरी त्यांची जबाबदारी व परवा त्यांस वाटण्याचें कारण नव्हतें. भानगडीच्या प्रकरणांत मुख्य चालकाची अशीच तारांबळ होत असते; आणि 'ऐकावें जनाचें, करावें मनाचें' हा नियम त्यांस सदैव पाळावा लागतो. कोणत्याही राष्ट्रांत अडचणींतून राष्ट्रास निभावून नेणाऱ्या व्यक्तीस स्वतःच्या शिरावर कारभाराची जबाबदारी घेऊन, निंदकास भीक न घालतां, पुष्कळदां केवळ मनगटाच्या जोरावर आपलीं कामें तडीस न्यावीं लागतात. अत्यंत प्रजासत्ताक व पूर्णस्वातंत्र्याचा अनुभव घेणाऱ्या इंग्रज, अमेरिकन वगैरे आजच्या ( १९२१ ) राष्ट्रांतील लॉयड् जॉर्ज किंवा प्रेसिडेंट वुइल्सन वगैरे चालकांस जर हाच नियम पाळावा लागला आहे, तर अठराव्या शतकांत मराठशाही चालविणाऱ्या पेशव्यास अनेकांच्या मर्जीविरुद्ध स्वतःचाच विचार चालवावा लागला यांत आश्चर्यही नाहीं; किंवा त्याचा दोषही नाहीं. ही सामान्य परिस्थिति लक्षांत ठेवूनच त्या वेळच्या प्रकरणांचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे.

**३. मराठमंडळाची सदोष भावना, दाभाडे व अमात्य.**—आणखी एक महत्त्वाचा प्रकार अनेक भानगडींच्या प्रकरणांत सहसा आपल्या लक्षांत राहत नाहीं. शिवाजीनें अष्टप्रधान निर्माण केले. त्यानंतर

प्रसंगानुसार अनेक सरदार, जहागीरदार, व मुतालिक वगैरे कारभारी परिस्थित्यनुरूप पराक्रमास संधि मिळतांच या राष्ट्रीय फैलावाच्या उद्योगांत निर्माण झाले. राजारामाचे मृत्यूपासून शाहूचे मृत्यूपर्यंतच्या पंनास वर्षांत अशा कितीतरी नवीन व्यक्ती या उद्योगांत पुढे आल्या ! त्यांचा इतिहास आतांपर्यंत ठिकठिकाणीं दिलेलाच आहे. बहुधा पहिला अर्जक पुरुष विशेष पराक्रमी असावयाचा. त्याची महत्त्वाकांक्षा अशी असावयाची कीं, आपण संपादिलेलें वतन व सन्मान आपल्या पश्चात् आपल्या संततीस प्राप्त व्हावा. मुख्यतः या लालुचीवरच मराठे सरदार पराक्रम गाजवीत. दरएक सनदेंत व पत्रांत प्रत्येकाची ही ऐहिक हांव स्पष्ट सांगितलेली दिसते. केवळ कर्तव्य म्हणून राज्याकरितां झिजणारे महात्मे कोठें गेलें तरी अल्पसंख्याकच असावयाचे; परंतु त्यांच्या खालोखालच्या सर्वप्रसिद्ध व्यक्ती देखील लालुचीच्या प्रेरणेनेंच उद्योग करितात, असा नियमच आहे. यांत लंगडेपणा इतकाच आहे कीं, अर्जक पुरुषाप्रमाणें त्याची संतति पराक्रमी निघेलच असा नेम नसतो. बहुधा ही संतति वडिलोपार्जित संपत्तीवर चैन करणारी, ऐदी व आळशी बनते. अंगीं वडिलांचा पराक्रम नसूनही वडिलांप्रमाणेंच आपली बडेजावी राहावी, अशी तिची हांव असते. ही हांव पुरविणें चालकांस शक्य नसतें. हीनबळ व आळशी मंडळीस जर बलवान् आणि उद्योगी मंडळीप्रमाणेंच पोसण्याची राष्ट्रावर पाळी आली, तर नवीन पराक्रम करणारांस उत्तेजन देण्याची ऐपत राष्ट्रास राहत नाहीं; पराक्रमी व बिनपराक्रमी हे सरसकट एकाच मापानें गणले गेल्यास, एकंदर राष्ट्राच्या पराक्रमाचा ऱ्हास होतो; सदासर्वकाळ एकच स्थिति परचक्राखालीं दडपलेल्या राष्ट्राचीच तेवढी राहत असते. अर्थात् निरुपयोगी जुनीं घराणीं व त्यांचीं उत्पन्नें लयास जाणें; व नवीन उपयुक्त इसम व घराणीं पुढें येणें हें वाढत्या राष्ट्राचें जीवन असतें; परंतु ज्यांचें उत्पन्न कमी होतें, ते चालकांविरुद्ध गवगवा करितात, प्रसंगीं फितूर होतात, आणि स्वतःच्या बचावाकरीतां पाहिजे त्या युक्तीचा अवलंब

करण्यास कचरत नाहींत. अंगीं पराक्रम नसतो, ही गोष्ट ते विसरतात, आणि आपले हक्क व वतनें नाहींशीं झालीं, म्हणून राष्ट्रावर सदैव रुष्ट असतात. या संबंधाचीं दोन मोठीं ठळक उदाहरणें प्रस्तुतकालच्या धडाभोडींत ध्यानांत ठेवण्याजोगीं आहेत. एक दाभाडे सेनापतीचें व दुसरें अमात्याचें. सचिव, प्रतिनिधि वगैरेचीं प्रकरणे थोडया बहुत अंशानें याच मासल्याचीं आहेत.

खंडेराव दाभाड्यास सेनापतित्व प्राप्त झालें. त्यानें राष्ट्राची सेवा केली. पहिल्या दोन पेशव्याच्या राष्ट्रोद्योगांत तो संविभागी होता. पश्चात् त्याचा मुलगा सेनापति झाला. राष्ट्रद्रोह करूं लागतांच बाजीरावानें त्यास गांठून नाहींसें केलें, हा प्रकार शाहूस अत्यंत अनुचित वाटला; आणि त्याजबद्दल सेनापतीच्या कुटुंबाची समजूत काढतांकाढतां शाहूच्या नाकीं नव आले. त्यानें त्रिंबकरावाचा भाऊ यशवंतराव यास सेनापतिपद दिलें, दुसरा भाऊ सवाईबाबूराव यास सेनाखासखेली दिली; आणि मरेपर्यंत म्हणजे त्रिंबकरावच्या मृत्यूनंतर जवळ जवळ वीस वर्षे पावेतों शाहूनें यशवंतरावास घरीं रिकामें बसून सर्व उत्पन्न घेऊं दिलें; परंतु यशवंतराव व्यसनी व दुर्बल निघाला. त्याची आई उमाबाई, खंडेरावाची बायको, दक्ष, पराक्रमी व उद्योगी होती, यशवंतरावनें राष्ट्रकार्यांत उद्योग करावा, म्हणून तिनें शिकस्त करून पाहिली. कित्येक प्रसंगीं स्वतः तलवार धारण करून तिनें कांहीं लढाया केल्या; परंतु मराठशाहीच्या सेनापतीचें काम सर्वस्वी तिच्याकडून होणें शक्य नव्हतें. गायकवाडांस आपले दुय्यम नेमून उमाबाईनें गुजराथचा कारभार कांहीं काळ चालविला; परंतु यशवंतराव जाग्यावर बसून कर्ज मात्र करी. तें कर्ज फेडण्याची जबाबदारी गायकवाडांनीं तरी काय म्हणून घ्यावी ! असें होतां होतां गायकवाडांचें व दाभाडयांचें वाकडें आलें. गायकवाडाच्या अडचणी व उद्योग दाभाडयांस मामेमात; आणि त्याजकडून दाभाड्यांस मनमुराद पैसा पोंचेनासा झाला म्हणजे दाभाड्यांची तक्रार छत्रपतींकडे येई. अशा तक्रारींच्या किती

तरी बाबती शाहूस मिटवाव्या लागल्या. तरी शाहूनें आपल्या हयातींत या कुटुंबावरील मेहेरबानी कमी केली नाहीं. केव्हां उमाबाईकडून तर केव्हां सवाईबाबुरावाकडून तो थोडेबहुत काम करून घेई. यशवंतराव दाभाडे तर दुर्निवार्य व्यसनी बनला होता; आणि असा व्यसनी असून भांडण्यांत मात्र कमी नव्हता. शाहूच्या अंतकाळीं बोलावणें गेलें असतांही तो सातान्यास आला नाहीं. अशा स्थितींत पेशव्याचे ठिकाणीं दुसरा कोणी असता तरी तो काय करणार! त्याजकडून सेनापतीचें काम काढून घेण्याचे प्रसंग शाहूस आले असतां, ती गोष्ट त्यानें मुद्दाम केली नाहीं. पुढें गायकवाड-दाभाड्यांच्या तक्रारी उपस्थित झाल्या. पेशव्यांचे मनांत दाभाड्याविषयीं प्रेमभाव फारसा नव्हताच, अर्थात् संधि येतांच पेशव्यानें गुजराथ प्रांत 'त्वयार्धे मयार्धे' या न्यायानें अर्धा आपण घेऊन अर्धा गायकवाडास दिला, आणि सेनापति हा पोकळ किताब व थोडें उत्पन्न मात्र दाभाड्याकडे ठेविलें, तो प्रकार पुढें सांगावयाचा आहे. अंगीं पराक्रम असल्यावर त्या भरभराटीच्या व गजबजलेल्या काळांत उद्योगास कमतरता नव्हती; परंतु नुसत्या वडिलांच्या कीर्तीवर विकणाऱ्या व्यक्तींचा या जगांत निभाव सहसा लागत नसतो. पेशव्यांच्या कर्तबगारीनें राष्ट्रीय उद्योग अपरंपार वाढत होता, आणि दरघडी नवीन मार्गसें पराक्रम करून पुढें येत होतीं. जुन्या घराण्यांत सुद्धां जे पुरुष पराक्रमी निघाले, त्यांचे उद्योग व उत्पन्नें चालूंच राहिलीं. राणोजीशिंद्यापेक्षां त्याचे सर्वच मुलगे ज्यास्त पराक्रमी निघाले आणि त्यांनीं पेशव्यांच्या व इतर सरदारांच्या बरोबरीनें, किंबहुना ज्यास्तच उद्योग करून आपल्या घराण्याची कीर्ति, राज्य व मानमरातब इतिहासांत अक्षय्य करून ठेविले. पेशव्यांच्या पहिल्या तीन चार पिढ्या अशाच पराक्रमी निघाल्या. होळकरांचें घराणें पराक्रमाच्या दृष्टीनें विशेष कमी नव्हतें. नागपूरकर भोसलेही चांगले पराक्रमीच होते. उलट फत्तेसिंग भोसल्यास स्वतंत्र रीतीनें नांव काढण्याची पाहिजे तितकी संधि असतांही त्याचें तेज पडलें नाहीं; किंवा त्याचें घराणें विशेष पुढें आलें नाहीं.

सारांश, अष्टप्रधानांस किंवा दुसऱ्या घराण्यांस किंवा प्रत्यक्ष छत्रपतीस पेशव्यांनीं मुद्दाम नाहींसें केलें अशांतला प्रकार नाहीं. ज्याच्या अंगीं कर्तृत्व तो पुढें येतो, हा सृष्टीचा सामान्य नियम सर्वकाळीं व सर्वस्थळीं अबाधित दिसतो. चढती उतरती कळा सर्वांसच सारखी आहे. मात्र हा सिद्धान्त मनुष्य आपल्या दृष्टीपुढें ठेवीत नाहीं. जुन्या सरदारांचीं वतनें व मानमरातब कायम ठेवण्याची धडपड, आणि नवीन मंडळी पुढें आली त्यांच्या मुलूखगिरीचीं भांडणें या सर्वांची तोडजोड, यांनींच या पुढील बहुतेक इतिहास भरलेला आहे.

दाभाड्याच्या सारखेंच भगवंत रामचंद्र अमात्याचें उदाहरण ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. यशवंतराव दाभाडयांत कर्तृत्व नव्हतें, त्याच्या उलट भगवंतराव बराच कर्तृत्ववान् व हुशार होता. परंतु वडिलांस राज्यांत प्रमुखपण मिळालें तसेंच आपणांस मिळालें पाहिजे, या भलत्या नादांत त्याचें सर्व आयुष्य फुकट गेलें. वडिलांच्या नांवावर विकण्याची खोड आम्हां महाराष्ट्रीयांना विशेष आहे. रामचंद्रपंत अमात्याची गोष्ट निराळी होती. राजारामाच्या व ताराबाईच्या कारकिर्दीत त्यानें संपूर्ण मराठशाहीचा कारभार १५–१८ वर्षे केला. परंतु तशी संधि भगवंतरावास कशी मिळावी ? रामचंद्रपंत ताराबाईच्या पक्षांत राहिल्यामुळें शाहूची त्याजवर इतराजी झाली; आणि रामराजास लपवून ठेवण्यांत अमात्यांनीं मदत केल्यामुळें संभाजी व जिजाबाई यांचाही त्यांजवर विश्वास राहिला नाहीं, अशा दुहेरी पेंचांत सांपडल्यामुळें नानाप्रकारच्या खटपटी करण्यांत त्याचें सोन्यासारखें आयुष्य फुकट गेलें. स. १७२८ च्या सुमारास ताराबाईच्या मार्फत त्यानें शाहूची मर्जी संपादिली; परंतु समग्र अमात्यगिरी मिळविण्याचा नाद सोडून, मिळेल तें घेऊन तो करामत करून दाखविता तर महाराष्ट्रमंडळांत त्यास वाव सांपडला असता; पण पेशव्याच्या तंत्रानें त्यास चालावयाचें नव्हतें, आणि ताराबाईवर भिस्त ठेवून राहिल्यामुळें त्याच्यावर कोणीच विश्वास ठेवीना.

स. १७३१ त शाहूसंभाजीच्या तहाच्या प्रसंगीं व स. १७४० त त्या उभयतांची साताऱ्यास पुनरपि भेट झाली, त्या प्रसंगीं अमात्यानें आपला कार्यभाग करून घेण्याचा सडकून प्रयत्न केला; परंतु पेशव्याचें सहकारित्व नसल्यामुळें त्यास कांहींच निष्पत्ति झाली नाहीं शाहूच्या अंतकाळीं रामराजास पुढें आणण्याच्या कामीं शाहूस भगवंतरावाची जरूर लागली आणि तें काम त्यानें चोख केलें. त्या वेळीं शाहूनें भगवंतरावास वचनें दिलीं, तीं पुढें सांगण्यांत येतील. हीं वचनें रामराजानें पुढें शक्य तितकीं पुरीं केलीं. मात्र रामचंद्रपंताचे वेळची मज्मू व हक्क पंनास वर्षांनंतर रामराजाचें अमदानींत तसेच चालणें शक्य नव्हतें. राज्यव्यवस्थेंत नानाप्रकारचें रूपान्तर झालें होतें. मात्र त्याची जाणीव सनदा देणारांस व त्या घेणारांस नव्हती, फक्त एकट्या पेशव्यांस व त्याच्या हस्तकांस होती.

हीं वचनें स. १७४९ च्या आरंभींच शाहूनें दिलीं. तरी तीं पुरीं होण्यास म्हणजे रामराजा प्रगट होण्यास आणिक पांच वर्षें लागलीं. या अवधींत भगवंतराव मराठी राज्यावर चिडून गेला आणि त्यानें निजामास जाऊन सामील होण्याचा घाट घातला. निजामाच्या नांवाची गुप्त थैली तयार करून ती गंगाजीसंकपाळ, हुसेनखान इत्यादि लोकांबरोबर निजामाकडे औरंगाबादेस पाठविली. नारोमहादेव नांवाच्या इसमानें औरंगाबादेस या कामीं मदत केली. या नारोमहादेवाचीं व संकपाळाचीं अमात्यास आलेलीं ६ जून पासून ५ आक्टोबर १७४८ पावेतोचीं पत्रें वरील कारस्थानाचा चांगला परिस्फोट करितात. (रा. खं. ८ ले. १७२-१८२). ता. २१ मे १७४८ रोजीं निजामुल्मुल्काचा काळ झाला, त्यामुळें निजामशाहींत भानगडी उपस्थित होऊन वरील कारस्थान जमून आलें नाहीं. मयत निजामानें कळविलें होतें कीं, 'जलदी फौजेचा सरंजाम, पंनास हजार स्वार, पंचवीस हजार बर्कंदाज, सामान चांगलें आणणें. सरंजामही माकुल दिधला जाईल. आम्हास त्याचें ऊर्जित करणें अगत्य. त्याचें वडिलांस आपण जाणतों. भेटी उपरांत खर्चाचीही मदत केली जाईल, ऐसी आज्ञा

निजामाची नजरबेगखानास जाली;' हीं पत्रें भगवंतरावास येऊं लागलीं, तेव्हां त्याजवळ पैशाची व लोकांची कांहीं एक तजवीज नव्हती. बिचारे, कारस्थान जुळविण्यास निजामाकडे गेलेले इसम, कंठशोष करून थकले, कर्जबाजारी झाले; परंतु भगवंतरावाच्या मनाचा निश्चय झाला नाहीं. चंद्रसेन जाधवाचें धाडस भगवंतरावास नव्हतें. सर्व खेळ पैशाचे असतात, आणि पैशाची तर भगवंतरावास मोठीच पंचाईत. १९ ऑगस्टला नारोमहादेव अमात्यास लिहितो. 'स्वामींचा तों नांवलौकिक थोर असोन, नबाबसाहेब आपण होऊन हमेशा स्मरण करीत असतात. असें असतां आपण न यावें, हें अपूर्व दिसोन आलें. राजश्री बाळाजीबाजीरावापेक्षां स्वामीस नबाबसाहेब बहुत चाहतात. जैशी फौज येईल तैशी जहागीर देतील. तरी गंगाजीस सरंजाम देऊन सत्वर पाठवीजे. राजश्री पिलाजी जाधवाचा लेक जोत्याजी येऊन नबाबास भेटले. त्यांसी मदत खर्च लक्ष रुपये दिल्हे; आणि जहागिऱ्या चौलक्षांच्या दिल्या. रा. मल्हारजी होळकर हेही पादशाही चाकर जाले. त्यांचा मुलूख माळव्यांत आहे, ती जहागीर हुजूरहून [ बादशहानें ] दिल्ही; व यशवंतराव पवार यांसही जहागीर माळवाप्रांतीं दिल्ही; आणि किताब पंचहजारी साहेबनौबद केलें. यंदा बाळाजीबाजीरावाचा व नबाबाचा कटाक्ष बहुत आहे म्हणून यांस फौजेची बहुत जरूरी आहे. तरी स्वामींनीं आपला दुर्ग सरंजाम सत्वर पाठवीजे. दमाजी गायकवाडाचा वकील येऊन भेटला. गायकवाडांनीं तीन क्रोड रुपये नजर कबूल केली आणि मोगलाईत येतात. ऐसें असतां अपूर्व आहे, जे स्वामी चित्तीं धरीत नाहींत. हा समय फिरोन येणार नाहीं.' पुनः ५ आक्टोबरास नारोमहादेव लिहितो, 'लहानथोर अमिरांस कळों आलें कीं राऊ ( भगवंतराव ) येथें येतात. रा. प्रधान यांसही परस्परें श्रुत जालें कीं राउजींहीं या दरबारांत परिश्रम केला. नबाबाहीं बहुत चहा करून बोलाविलें आहे, ऐसें जनामध्यें प्रसिद्ध जालें. आणि स्वामीकडील वर्तमान तर अद्यापि कोणीच फिरत नाहीं. मध्यस्थानें कोठपावेतों मिथ्या भाषण करावें ! कर्तव्य नसेल तर तसें

साफ उत्तर तरी पाठवावें. पेशव्यांचें व निजामाचें चित्त शुद्ध नाहीं. चंपाषष्ठी झाल्यावर युद्धप्रसंग होणार.' अशाप्रकारचीं पत्रें लिहून लिहून नारोमहादेव कंटाळला; आणि कर्ज माफ करून बसला. भगवंतराव मराठमंडळ सोडून गेला नाहीं, म्हणूनच आज त्याच्या घराण्याचें नांव चालत आहे, असें म्हणावें लागतें. स. १७४९ त शाहू आजारी पडून त्यानें अमात्यास सातार्‍यास बोलावून नेलें; आणि रामराजास आणण्याची कामगिरी त्यास सांगितली, तेव्हां शाहूनें अमात्यास वचनें दिलीं कीं, "तेव्हां आमचा जिल्हा जातीचा सरंजाम व वतनें व इनाम गांव व कुल अखत्यार लिहिण्याचा दरख पूर्वी चालत आल्याप्रमाणें चालविला जाईल या प्रमाणें स्वामीचें वचन आहे. मातुःश्रीसाहेबांचे पायांवर हात ठेवून श्रीबाळकृष्णजीचीं व श्रीअंबाबाईची फुलें, तुळशी, शिवराम पंडित अमात्य याचे हातीं दिल्हीं तीं, तुम्हीं घेणें. त्याचीही शपथ स्वामींनीं घेतली आहे. प्रतिनिधीकडे तुमचा जिल्हा गुंतला आहे, त्याचे मोबदला मिरज तालुका व चिरंजीव कुसाजी व येसाजी भोसले यांचा तालुका व गांव खेडीं हीं मोबदला दिल्हीं जातील. जुन्नरचें सरदेशमुखीचें वतन तुमचें तुम्हांकडे चालविलें जाईल. दुर्गाबाई यांणीं रामराजाशीं फार फार जपून संरक्षण केलें. त्यांस साडीचोळीबद्दल वर्‍हाडप्रांत येथील सरदेशमुखीचें वतन स्वामीचें आहे तें तिजला इनाम करून चालविलें जाईल. तुमचे पूर्वी लाख रकम मजमू व मजमूकडील मुतालकी, फडणिशी व सरदप्तरदारी वतनी आहे, त्याप्रमाणें करून दिल्हे जातील. तुम्ही कोणेविशीं संशय न धरणें. संपूर्ण राज्यांतील मजमू व फडनिशी व दप्तरदारीच्या व जिल्हेजिल्हेच्या सबनिशी पेशजीपासून वतनी तुम्हांस दिल्हे आहेत, त्याप्रमाणें स्वामी चालवितील. [ शाहूछत्रपतीचें भगवंतराव अमात्यास आज्ञापत्र–२६ जानेवारी १७४६–खंड ८ ले १७१] वरील नारोमहादेवाचें पत्र बहुधा स. १७४८ चें असावें. एतदनुसार भगवंतराव निजामाकडे गेला नाहीं. पुढें रामराजाकडून भगवंतरावास अमात्यपद मिळालें; परंतु सर्व सत्ता पेशव्यांचे हातांत असल्यामुळें

अमात्याच्या कारस्थानांची संपूर्ण माहिती असल्यामुळें भगवंतरावास राज्यांत काम करून दाखविण्याची संधि मिळाली नाहीं. सचिवप्रतिनिधींप्रमाणेंच अमात्यांचीही पिछेहाट झाली.

भगवंतराव साताऱ्यास अमात्य झाल्यावर कोल्हापुरकरांचें अमात्यपद त्याचा मुलगा कृष्णराव यास मिळालें. कृष्णरावाचें व संभाजीचें पटत नव्हतें; परंतु त्याजवर रामराजाची कृपा होती; म्हणून रामराजानें त्याचा कोल्हापुरास जम बसवून दिला [ शा. म. रो. १८२ ] भगवंतराव स. १७५५ त पुणें येथे मृत्यु पावला. त्याची थोरली बायको व्यंकूबाई ही नीळकंठ मोरेश्वर पिंगळे ( राजारामाचा प्रधान ) याची मुलगी. वाडीचे सावंत व आंग्रे हे कोल्हापुरकरांच्या कोंकणांतील प्रदेशावर स्वाऱ्या करीत असतां त्याजवरोबर लढून दोघांसही भगवंतरावानें दाबांत ठेविलें; आणि आपल्या व कोल्हापुरकरांच्या प्रदेशाचें संरक्षण केलें. भगवंतराव उदार व प्रेमळ होता.

येथे अमात्याच्या कारस्थानाचा विस्तार मुद्दामच केला आहे. त्यावरून मराठमंडळाच्या मनोभावनांची बरीच कल्पना करतां येते. आपण एकराष्ट्र आहों. आणि सर्वांनीं मिळून हिंदुस्थानावर आपलें स्वराज्य स्थापन करावयाचें आहे, ही कल्पना थोड्या बहुत चालकांच्या मनांत कितीही असली, तरी सामान्य महाराष्ट्रजनतेच्या मनांत ही राष्ट्रीय भावना बिलकुल नव्हती. स्वार्थ साधेल तें कृत्य करण्यास मराठमंडळापैकीं बहुतेक सर्व-व्यक्ती नेहमींच तयार असत मग ते ब्राह्मण असोत किंवा ब्राह्मणेतर असोत. राजारामाच्या वेळेस काय प्रकार झाला त्याचें विवेचन पूर्वीं केलेंच आहे. तोच प्रकार बाजीरावाचे वेळेस होता, आतां नानासाहेबाच्या वेळेसही तोच दिसून येतो आणि मराठशाहीच्या अखेरीपर्यंत तो आणखीही पुढें पुष्कळदां पहावयास सांपडेल. ज्या रामचंद्रपंतानें औरंगजेबाशीं लढण्यांत शिकस्त केली, त्याचाच प्रत्यक्ष मुलगा, तोही चांगला कर्ता व शहाणा असून राजरोसपणें निजामास मिळण्याची तयारी करतो; ज्या निजामाचें

निर्मूलन करण्यांत शाहूनें व बाजीरावानें शिकस्त केली, त्या निजामाचा आश्रय करण्याची इच्छा, ऐन पडत्या काळांत तोच रामचंद्रपताचा मुलगा धारण करितो, यावरून मराठे लोकांची मनोरचना उत्कृष्टपणें दिसून येते. एकटा अमात्यच निजामाकडे जात होता असें नाहीं, तर पिलाजी जाधवाचा मुलगा, यशवंतराव पवार, मल्हारराव होळकर, दमाजी गायकवाड इत्यादि सरदारही थोड्याबहुत अंशानें तीच इच्छा धारण करितात, यावरून काय समजावयाचें तें उघड दिसतें. अशा स्थितींत पेशव्यांच्या ठिकाणीं दुसरा कोणी असता तरी त्यास याच अडचणी उद्भवल्या असत्या. पेशवे कशीबशी धडपड करून मराठमंडळाची जुळेल तशी एकत्र मोट बांधून पुढें पाऊल टाकीत होते; आणि हिंदुस्थानभर पराक्रम गाजविण्याची त्यांस संधि देऊन त्यांजकडून काम करून घेत होते. भगवंतरावानें लाख पंनास हजार फौजेची तयारी करून निजामाकडे जावयाचें! एवढा खर्च करून फौज ठेवण्याचें सामर्थ्य त्या वेळीं एकाही मराठे सरदारांत नव्हतें; आणि तसें सामर्थ्य भगवंतरावाचे ठिकाणीं असतें तर तो मराठमंडळांतच पराक्रम कां न करता! अंगीं कर्तृत्व किंवा सामर्थ्य नसून केवळ वडिलांच्या नांवावर प्रौढी मिरविणारांची जगांत हीच गत होते. भगवंतरावाचा पैसा गेला, कारस्थान साधलें नाहींच, आणि रामराजा गादीवर आला म्हणून नांवाची सरी मुज्मू मिळाली. सेनापती दाभाड्याचा प्रकारही अगदीं असा आहे. मोठमोठे मराठे सरदार निजामास जाऊन मिळण्याच्या तयारींत आहेत, असें जें वरील पत्रांत विधान आहे, ती एक प्रकारची तत्कालीन प्रचलित क्रांतिच होय. कारण अशा सरदारास देण्यास निजामापाशी होतें काय, आणि प्रत्यक्ष बादशहाची तरी ऐपत कितीशी राहिली होती! बाकी स्वार्थ साधेल तिकडे धावत जाण्यास मराठे सरदार किती तत्पर असत, हें वरील विधानावरून चांगलें कळून येतें. सारांश, छत्रपतींचें घराणें वरील अनेक सरदारांप्रमाणें नामशेष झालें; आणि ताज्या दमाचे कर्तृत्ववान् पेशवे पुढें आले, यांत राज्यापहारापेक्षां वर दर्शविलेल्या सृष्टिनियमाचाच अंमल अधिक दिसून

येतो. 'जुनें मोडूं नये व नवें करूं नये,' हें शाहूनें घालून दिलेलें तत्त्व किती अशक्य कोटींतलें होतें, आणि सर्वांचीं उत्पन्नें वगैरे, आहेत तशीं चालवावीं, अशी आज्ञा शाहूनें मरणसमयीं केली, तीही किती अशक्य होती, हें आतां चांगलें कळून येईल. अशा या नानाविध अडचणींतून पेशव्यास मार्ग काढावयाचा असून, तो हरएक बाबत कशीतरी निभावून नेत होता. पेशव्याच्या कारभाराची स्पष्टता चांगली व्हावी, म्हणून मराठमंडळाच्या रचनेंतील हें वैगुण्य मुद्दाम येथें दाखविलें आहे. ( पहा, वंशपरंपरा वतनें मागणारांचा सुळसुळाट.)

४. सांगोल्याची लढाई व व्यवस्था, रामचंद्र मल्हार ( ऑगस्ट नोव्हेंबर १७५० ) रामराजास घेऊन सदाशिवराव व रामचंद्रबाबा प्रतिनिधीचा बंडावा मोडण्याकरितां सांगोल्यावर गेले. प्रथम रामचंद्रबाबाचें वृत्त सांगितलें पाहिजे. रामचंद्र मल्हार ऊर्फ रामचंद्रबाबा हा कोंकणांतील आरवली गांवचा कुळकर्णी, निर्वाहासाठीं जन्मभूमि सोडून साताऱ्यास आला. तेथें राजगुरु कचेश्वरबाबा ओतुतकर यानें त्यास आश्रय दिला. लवकरच त्याची बाळाजी विश्वनाथाशीं ओळख झाली, आणि कारकुनी-कामांत रामचंद्र मल्हाराची हुशारी पेशव्याच्या नजरेस येऊन, पेशव्यानें अनेक भरंवशाचीं कामें त्यास सांगितलीं. राज्यव्यवस्था ठरवितांना पुढें बाजीरावासही रामचंद्र मल्हाराचा मोठा उपयोग झाला. ' रामचंद्रबाबा कर्ते पुरुष, माळव्याचे महालाचा आकार पाहून वांटण्या केल्या. पेशवे ४५ लक्ष, शिंदे २२॥, होळकर २२॥ व पवार १० याप्रमाणें आकार पाहून माळवा वांटून दिला ' ( हो. कै. पृ. १०–११ ). या कामासाठीं रामचंद्र मल्हार सरदारांबरोबर माळव्यांतच असे. नानासाहेब व सदाशिव-राव यांचें लहानपणचें शिक्षण रामचंद्रबाबापाशीं झालें. नानासाहेबानें जी एकंदर राज्याची व्यवस्था बांधिली, तिचें मूळ रामचंद्रबाबा होय. राणोजी शिंद्याचा उत्तरेंतील सर्व कारभार रामचंद्रबाबा पहात असे. राणोजी शिंदे मरण पावल्यावर त्याचा मुलगा जयाप्पा याचें रामचंद्रबाबाशीं पटलें नाहीं,

तेव्हां त्यास नानासाहेबानें आपल्याजवळ पुण्याचे कारभारांत घेतलें. सदाशिवराव व नानासाहेब यांचा कांहीं दिवस बेबनाव झाला, त्यास कारण रामचंद्रबाबा होय, असा सामान्य समज होता. रामचंद्रबाबानें उद्योग करून मोठी संपत्ति मिळविली; आणि त्यांतून अनेक ठिकाणीं त्यानें मोठे दानधर्म व देवस्थानांचे खर्च केले.

जयाजी शिंद्याचें व रामचंद्रबाबाचें बनलें नाहीं. जयाजीचा व मल्हारराव होळकराचा बेबनाव होता. त्यांत रामचंद्र मल्हाराचें लक्ष होळकराकडे होतें, याचीं कारणें पुढें सांगावयाचीं आहेत स. १७५० च्या पावसाळ्यांत शिंदे होळकरांस निरोप देतांना पेशव्यानें रामचंद्र मल्हारास शिंद्याकडून काढून आपणाजवळ घेतलें; आणि रामाजी अनंत दाभोळकर यास शिंद्याकडे दिलें. पुढे ऑगस्टच्या २२ तारखेस पुण्याहून रामराजाची स्वारी सातान्यास निघाली, तेव्हां सदाशिवरावानें रामचंद्र मल्हार यास शहाणे व कर्ते समजून स्वारीबरोबर घेतलें. शिवाय गोविंदराव चिटणीस व यशवंतराव पोतनीस वगैरे हुजूरचे कारभारी व त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे हे स्वारीबरोबर गेले. नानासाहेब स्वतः पुण्यास राहिला. महाराज निघोन श्रीजेजुरी, मोरेश्वर करून श्रीपंढरीस देवदर्शनास गेले. तेथून सांगोल्यास गेले. यमाजी शिवदेवानें प्रतिनिधीचें सांगोलें हें ठाणें आपल्या ताब्यांत घेऊन बंडावा आरंभिला. कैदेंत असलेल्या प्रतिनिधीची पुढें काय व्यवस्था करावयाची, याची वाटाघाट पुण्यासच चालली होती. सातान्याच्या पूर्वेकडील बराचसा प्रदेश प्रतिनिधींच्या हातांत असल्यामुळें सातान्यास रामराजाच्या व्यवस्थेवर प्रतिनिधीचा ताबा राही; परंतु असा ताबा पेशव्याच्या व्यवस्थेस बाधक असल्यामुळें, त्या वाटाघाटीसाठीं पेशव्यानें प्रतिनिधि व त्याचा मुतालिक यमाजी ह्यांस पुण्यास आणिलें. त्या वेळीं रघूजी भोसले वगैरे मंडळीच्या आग्रहावरून पेशव्यानें उभयतांस बंधमुक्त केलें, आणि त्यांच्या प्रदेशाची वाटाघाट चालविली; परंतु हातांतील प्रदेश सोडून देण्याची कबुली त्यांनीं मनापासून दिली

नसावी. प्रदेश पेशव्याच्या हवालीं करण्याकरितां म्हणून यमाजी पुढें गेला, आणि त्यानें सांगोलें व मंगळवेढें येथें पेशव्याशीं लढण्याची तयारी केली. प्रतिनिधीचा हा डाव मोडल्याशिवाय समराजास घेऊन साताऱ्यास जाणें धोक्याचें वाटून सदाशिवराव प्रथम सांगोल्यावरच चालून गेला. सोलापुरच्या पश्चिमेस पंढरपूर, सांगोलें व मंगळवेढें या तिहींचा त्रिकोण बनलेला असून, पंढरपुराहून साताऱ्यास येण्याच्या हमरस्त्यावर नजीकच सांगोलें असल्यामुळें, तें काबीज करण्याचा निश्चय सदाशिवरावानें केला. सचिवाच्या सिंहगडा-सारखाच हा प्रकार होता. उलटपक्षीं प्रतिनिधीच्या तर्फेनें भांडून रामराजास आपल्या कबजांत घेतल्याने पेशवा उघडा पडेल, असा यमाजीचा घाट होता. परंतु सदाशिवरावाने मोठ्या धूर्ततेनें वागून आपला डाव सिद्धीस नेला. सांगोल्याची गढी यमाजीनें आठ पंधरा दिवस लढविली. सदाशिव-रावानें मोर्चे देउन ठाणें काबीज केले. 'दसऱ्याचे दिवशीं ( २९ सप्टेंबर ) यमाजी शिवदेव बाहेर येऊन भेटले ' दादोबा पुरंदरावर कैदेत आहे, त्यास सोडवुन आणावें, अशी मागणी यमाजीनें केली. त्याप्रमाणें पुण्यास लिहून दादोबास पुरंदरावरून मुक्त केलें. ह्यापूर्वीच म्हणजे ता. २५ सप्टेंबर रोजीं सदाशिवरावानें सांगोले येथें भवानरावास आणून त्यास प्रतिनिधिपदावर कायम केलें होते. नंतर दादोबास आणुन त्याचे मार्फत सदाशिवरावानें सांगोल्याचें ठाणें हस्तगत केलें; आणि ते महाराजांच्या खासमीकडे घेऊन राणोजी मोहित्याच्या ताब्यांत दिलें. मंगळवेढ्याचें ठाणेंही त्यानें याच वेळीं हस्तगत केलें. इतका उद्योग केल्यावर सांगोल्यास महिनाभर मुक्काम करून पुढील कारभाराची व्यवस्था व सरदाराचे ठराव रामचंद्रमल्हाराच्या विद्यमानें सदाशिवरावानें महाराजांपासून लेखी करून घेतले. साताऱ्यास अनेकांची भीड पडेल; आणि ताराबाई तेथें असल्यास त्या कामास हरकत येईल, सबब मुद्दामच ही व्यवस्था सांगोल्यास मसूल करण्यांत आली.

**सांगोल्यास केलेली व्यवस्था—( ऑक्टोबर, १७५०).**

१ भवानरावास राज्याभिषेकसमयीं प्रतिनिधिपदावर आणिलें होतें;

त्यास कायम करून, यमाजीशिवदेवाचा पुतण्या वासुदेव यास त्याचा मुतालिक नेमिलें.[1]

२ दाभाडे बेहोष, त्यांचा अंमल गुजराथेंत बरोबर चालत नाहीं. सबब त्यांस खर्चापुरती रकम गायकवाडांनीं देण्याचें ठरवून गुजराथप्रांत पेशवे गायकवाडांनीं निमेनिम वाटून घेण्याचा करार झाला.

३ कर्नाटक सुभा बाबूजीनायकाकडे होता, तो ज्यास्ती रसद कबूल करून पेशव्यांनीं स्वतःकडे घेतला. याजवर पुढें पुष्कळ भानगडी उपस्थित झाल्या. (पहा खं. ६ ले २७८ व का. सं. प. या. ले १७४ व १८४ ).

४ गोविंदराव चिटणिसांनीं महाराजांपाशीं राहून पंतप्रधानांचे अनुमतानें कारभार करावा. बापूजी खंडेरावांनीं फौजेसह महाराजांपाशीं राहावें. त्याजबद्दल प्रतिनिधीकडील कांहीं मुलूख व इतर मिळून चार लक्षांचा सरंजाम हे दोघे चिटणीस व त्यांचा पुतण्या रामराव जिवाजी या तिघांच्या नांवें करून दिला.

५ यशवंतराव पोतनीस यांस कारखाने व खासगी कारभार सांगून पोतनिशी व चाळीस हजारांचा सरंजाम दिला.

६ देवराव लपाटे यांस हुजूर खासगीचें काम व तालुके, त्यांचे त्याजकडे करार केले.

७ हुजूरचे खर्चास पूर्वी अष्टप्रधानांकडून व सरदार मामलेदारांकडून नेमणुकीप्रमाणें सालाबाद पाठवावा. त्याच्या वराता हुजूरून करून

---

१ गोपाळ महादेव पेंढारकर म्हणून नानासाहेबाच्या मर्जीतला एक गृहस्थ होता, त्यास राज्याभिषेक समयीं विशाळगडास पाठवून, त्याजकरवीं भवानरावास सातान्यास आणून प्रतिनिधिपदावर बसविण्यांत आलें होतें. पुढें या गोपाळ महादेवाचा स. १७५० च्या मे महिन्यांत खून झाला. भवानराव, यमाजी शिवदेव, ताराबाई इत्यादिकांचीं कांहीं विलक्षण कारस्थानें या वेळीं चाललीं होतीं. त्यांची विस्तृत हकीकत रा. सं. ३ ले. १३९ यांत सांपडेल.

ऐवज मागवून घ्यावा. कोणीं काय ऐवज द्यावयाचा त्याची तपशीलवार नांवनिशी, ताब्यांतील मुलखासह दिलेली आहे. ती सर्व येथें देण्याचें प्रयोजन नाहीं. त्या यादींत मराठी राज्यांतील एकंदर मुलखाची विभागणी आहे [ धा. रामराजे–चरित्र -पृ. ७ ].

अष्टप्रधानांच्या व सरदारांच्या नेमणुका पूर्वी चालत आल्याप्रमाणेंच पुढें चालवाव्या, असें शाहूच्या आज्ञापत्रांत होतें. वास्तविक त्यांचीं आतां नांवे मात्र राहिलीं होतीं. अधिकार सर्व गाजवील त्याच्या म्हणजे पेशव्याचेच हातीं होता. सचिव, प्रतिनिधि, अमात्य व सेनापति हे कसे निर्वीर्य झाले, हें वर सांगितलेंच आहे. इतर प्रधानांस तर पूर्वीच महत्त्व नव्हतें. शिवाय नवीन सरदार उत्पन्न होत होते तेव्हां पूर्वीची व्यवस्था आहे तशीच पुढें चालविणें शक्य नव्हतें. जशी वेळ येईल तसे फेरफार राज्यकारभारांत करण्याची सवड जिवंत राष्ट्रांत नेहमींच असली पाहिजे. वास्तविक शाहूच्या आज्ञापत्रांतला हा भाग अशक्य कोटींतला होता. ही गोष्ट त्याच वेळीं पेशव्यांच्या किंवा इतरांच्या लक्षांत आली नसेल, हें संभवत नाहीं; परंतु शाहू मुमूर्षु असतां त्याजबद्दलची जास्त वाटाघाट करणें शक्य नव्हतें. शाहूच्या आज्ञेचा अर्थ इतकाच कीं अरेरावी कारभार करून कोणासही दुखवूं नये किंवा कोणाचीं उत्पन्नें खालसा करूं नयेत. याच अर्थानें पेशवेही हल्लींची व्यवस्था करीत होते. अष्टप्रधानांची संस्था किंवा घराणीं पेशव्यांस नको होती असें नाहीं. मात्र पूर्वीच्या घराण्यांत आतां कर्ते पुरुष निघत नव्हते; परंतु तेवढ्याच सबबीवर सरसहा सर्वांस पदभ्रष्ट केल्यास एकदम मोठा गिल्ला होऊन पेशव्यांचीच उचलबांगडी झाली असती तेव्हां असा प्रसंग येऊं न देतां, पचेल तितकाच फेरफार पेशवे करीत चालले होते, हें या सांगोल्याच्या हकीकतीवरून दिसून येतें. राजारामाच्या वेळीं अमात्य हें पद वाढून अष्टप्रधानांच्या ऐवजीं नऊ प्रधान झाले तरी अष्टप्रधानांची संस्था शिवाजीच्या पश्चात् म्हणण्यासारखी चाललीच नाहीं.

प्रत्यक्ष शाहूच्या वेळेस सुद्धां बहुतेक अष्टप्रधान नामधारीच झाले होते. सांगोल्यास या प्रधानांच्या नवीन नेमणुका खालीलप्रमाणें झाल्या.

१ प्रधान बाळाजीपंत.

२ प्रतिनिधि भवानराव गंगाधर.

३ सेनापति व सेनाखासखेल त्रिंबकराव दाभाडे [यशवंतरावाचा मुलगा ]

४ न्यायाधीश खंडेराव काशी[1] मुतालिक गोविंद मल्हार [१६ ऑक्टोबर १७५० पासून]

५ पंडितराव धोंडभट उपाध्ये ( पूर्वी राघो मुद्गल होता ).

६ मंत्री घनश्याम नारायण (२५ जुलै स. १७५०पासून).

७ सचिव चिमणाजी नारायण.

८ अमात्य भगवंतराव रामचंद्र.

९ सुमंत विठ्ठलराव आनंदराव ( पूर्वीच होता ).

अष्ट प्रधानाशिवाय आणखी पुष्कळ नेमणुका झाल्या, त्यांतील मुख्य

चिटणीस–रामराव जिवाजी–काम गोविंदरावच पहात असे.

खासनीस व पोतनीस–यशवंतमहादेव पूर्वीचाच.

सरखेल–तुळाजी आंगरे.

राजाज्ञा भवानी शंकर.

वजारतमाब–मानाजी आंगरे.

सरलष्कर–प्रथम दावलजी सोमवंशी व नंतर अपाजी सोमवंशी यांजकडे सरलष्क पद होतें, तें दूर करून निंबाजी नाईक निंबाळकर यास राज्यभिषेकप्रसंगीच देण्यांत आलें [ ता. ११ १७५०-ना. सा. रो. अंक २६० ].

या शिवाय बाबूजी नाईक, यमाजी शिवदेव, दाभाडे, यांच्या संबंधानें व गुजरात कर्नाटक संबंधानेंही सांगोल्यास वाटाघाटी झाल्या असें का. सं. प. या. ले. १७४ व १८४ वरून दिसतें.

---

१ होनाजी अनंताचा भाऊ काशीराव अनंत स. १७२६ पासून न्यायाधीश होता. तो वृद्ध झाल्यावर त्याचा मुलगा खंडेराव काशी तें काम पाही; परंतु खंडेरावाची योग्य नेमणूक या तारखेस झाली [ इ. सं. पे. द. मा. पृ. ३३४ ]

स. १७३९ त मिरजचें ठाणें मोगलांकडून काबीज करण्यांत आल्यावर तें धुळगांवचे साळुंके ऊ० डुबल बाळोजी बिन शिवाजी याजकडे देण्यांत आलें होतें. हा साळुंके सकवारबाईचा आप्त असून पटवर्धनांचे पदरीं होता. सांगोल्याचे स्वारींत मिरजेचें ठाणें डुबल याजकडून काढून तें शिवाजी बल्लाळ जोशी याजकडे देण्यांत आलें. हाच जोशी रमाबाईचा बाप व थोरल्या माधवरावाचा सासरा होय. डुबल यांचें घराणें अद्यापि आहे.

५ रामराजाची सातान्यावर कैद. ( २४.११ १७५०—२८·३. १७६३ ). याप्रमाणें सांगोले मुक्कामीं सर्व राज्यकारभाराचा बंदोबस्त पर्दे व मुलुखमहाल सदाशिवरावानें रामचंद्रबाबा व गोविंदराव चिटणीस यांचें विचारें महाराजांपासून करून घेतला. यामुळें नानासाहेबाचे मनांत वैषम्य आलें. आतांपर्यंत एकट्या ताराबाईचाच विरोध नानास होता, परंतु आतां सदाशिवरावाची तेढ उत्पन्न झाली. पुरंदरे व रामचंद्रबाबा यांचेंही त्यामुळें पटेना. वास्तविक यास अंतस्थ कारणें काय झालीं, नानासाहेबाची बायको गोपिकाबाई वगैरेचा यांत हात होता कीं काय, त्याची नक्की शहानिशा आज होणें शक्य नाहीं. मात्र या भानगडीसंबंधानें नानाप्रकारचे ग्रह व तर्कवितर्क लोकांत प्रचलित होते, तेच कित्येक लेखांत काल्पनिक स्वरूपानें उतरले आहेत. अशा घरगुती व इतर अडचणी हळू हळू येत गेल्यानें धारलेलें हिंदुपदपादशाहीचें काम लांबणीवर पडत गेलें. महाराज सातान्यास येण्याकरितां म्हणून निघाले; देवदर्शनें करीत येतांना सांगोल्यास लढाईचा प्रसंग गुदरला. तो उरकतांच रामचंद्रबाबानें सदाशिवरावाचे मार्फत पुढील कारभाराची व्यवस्था ठरविली, ती गैर होती, असें नाहीं. सातान्यास आल्यावर ही व्यवस्था केली असती तर, लगेच तेथें ताराबाईचें आगमन होऊन पूर्वीचा घोळ पुनरपि उपस्थित झाला असता. वास्तविक नानासाहेबास गैर वाटणारी कांहींच गोष्ट सांगोल्यास घडली नसतांही, सदाशिवरावाची चढती कळा गोपिकाबाईस थोडीशी दुःसह होऊन तिनें कदाचित् तसा प्रकार नवऱ्याचे मनांत भरविला

असेल. एकंदरींत सांगोल्याचे प्रकरणावरून नानासा०चे मनांत विकल्प आला खरा. हें पाहून सदाशिवराव व रामचंद्रबाबा पुण्यास गेले. त्यापूर्वीच ताराबाईनें अंतस्थ कारस्थानें चालवून ती शंभुमहादेवाचें दर्शन घेण्याचे निमित्तानें सप्टेंबरांत म्हणजे रामराजा सांगोल्यास गेल्यावर कवकरच सातारा किल्ल्यावर आली. तिनें आगाऊ ता. १५ व २० सप्टेंबरास शेखमिऱ्यास पत्रें पाठवून किल्ल्यावर दारूगोळा व साहित्य तयार ठेविण्याचा व इतर बंदोबस्ताचा हुकूम पाठविला होता; ( खं. ३-७१, ७३). साताऱ्यावरील हवालदार, सुभेदार, कारखाननीस व लोक यांचा भेद करून, त्यांजकडून आपणास मदत करण्याच्या शपथा घेवविल्या; बक्षिसें देऊन त्यांस आपलेसें करून घेतलें; आणि दोनही राण्या व नाती वगैरे घेऊन त्यांसह किल्ल्या-वर बंदोबस्तानें राहूं लागली. तों इकडून रामराजा सिंगणापुर महादेव करून फौजेसह कार्तिक अखेर म्ह० नोव्हेंबर ता. १७ चे सुमारास साताऱ्यास आला. बरोबर गोविंदराव बापूजी चिटणीस व त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे हे प्रमुख गृहस्थ होते. 'महाराजांचा मुक्काम शाहूनगरच्या बाज्यांत किल्ल्याखालीं झाला. त्यांनीं मातुश्रीस दाबून सर्व बंदोबस्त करावा असें प्रधानांचें मानस. परंतु त्यांचें तेज न पडे, तेव्हां रामचंद्र-बाबांनीं सदाशिवपंतास समजाविलें कीं, आईसाहेब व राजे ह्यांचे वांकडे-पणांत आपण न पडतां, होईल तें पहावें. गोविंदराव चिटणीस व महादोबा पुरंदरे यांचें जूग फुटल्यावांचून नानांची मर्जी ठिकाणीं येत नाहीं. ते विकल्प पाडोन, महादोबा कारभारी नसावे, राजद्वारचा कारभार आपल्या इतल्लया शिवाय होऊं नये, येविशीं कारस्थान करून महादोबास घरीं बसवून, सदाशिवराव व रामचंद्रबाबा कारभार करूं लागले.' नानानें या प्रसंगी पडतें घेऊन गृहकलह कुशलतनें मिटविला. सदाशिवरावास करभारांत घेतल्यानें उभयतांचे कर्तृत्वास जोर आला.

इकडे महाराज दुसऱ्याचे कबजांत राहिल्यानें ताराबाईंच्या कारस्थानास जोर येईना. 'कोणत्याही युक्तीनें किल्ल्यावर आणून दाबून ठेवावें, अशी

मसलत जवळ कारभारी पुराणिक बहुत प्रिय होते, त्यांनीं दिली; आणि सिद्ध केलें कीं, जुने कारभारी गाळून पुढें कारभार आपण करावा. महाराजांनीं आईसाहेबांचें मनोधारण करावें आणि किल्ल्याखालीं आणावीं, म्हणोन बोलण्याकरितां मध्यस्थ घातले, तेव्हां किल्लेकरी व पुराणिक कारभारी कोणताही विचार चालूं न देत. त्यावरून आपणच जाऊन समजूत करून आणावी, असें मनांत आणून ता° २३ नोव्हेंबर रोजीं किल्ल्यावर गेले. आईसाहेबांनीं महाराजांस निराळें काढून बहुत प्रकारें बुद्धिवाद केला कीं कारभारी गाळून प्रधानपंतसहवर्तमान दाबून राखावे; आणि आपले लक्षाचे प्रतिनिधि वगैरे फौज सुद्धां बोलवावे. तें महाराजांस मानलें नाहीं. निरोप घेऊन खालीं येतां किल्लेकरी वगैरेंचा भलताच रोख पाहून बापूजी खंडेराव सावध होऊन पालखीभोंवते बंदोबस्तास राहून महाराजांसह खालीं आले. दुसरे दिवशीं चंपाषष्ठीचें पारण्यास महाराजांस आईसाहेबांकडून बोलविण्यास लोक आले. तेव्हा 'जाऊं नये' म्हणून बापूजी खंडेराव वगैरेंनीं बहुत निषेध केला. परंतु होणारानुरूप बुद्धि झाली. कोणासही कळूं न देतां मातुश्रींस निखालसता दाखवावी म्हणून महाराज किल्ल्यावर गेले. हे कळतांच सर्व जमा होऊन बापूजी खंडेराव किल्ल्यावर गेले, तों दरवाजाशीं मनाई झाली. आईसाहेबांनीं महाराजांस खालीं जाऊं नये म्हणून आग्रह केला असतां न ऐकून दरवाजापाशीं आले तेव्हां हवालदार सुभेदार वगैरे जमा होऊन आडवे आले आणि बोलले, खालीं जाण्यास आईसाहेबांची परवानगी नाहीं, तेव्हा महाराजांस विषाद वाटून तसाच घोडा चालविला. तेव्हां दरवाजे व दिंडया लावून, स्वारी परत वाडयांत जावी, ऐसें बोलले. महाराजांस हिंमत, धैर्य, मनसबा, चातुर्य माहीतगारी विशेष नाहीं. बुद्धींत खंबीरता कमी. धनिणीही बरोबर होत्या. सर्व परत माघारे वाडयांत गेले. तेथें चौकीपाहरे दरवाज्यास ठेवून आईसाहेबीं बंदोबस्त केला. जवळचे इतबारी लोक बापूजी खंडेराव सुद्धां नाइलाज होऊन परत आले.' [ पा. रा. च. पृ. ११ ]. यावरून असें दिसतें कीं. जरा जोर करून

वागते तर महाराजांचाच हुकूम सर्वांनीं ऐकिला असतां; आणि आईसाहेबांसच कैद झाली असती. पुढें दिलेल्या कित्येक पत्रांवरूनही हा प्रकार व्यक्त होईल. रामराजा २४ नोव्हेंबर १७५० रोजीं शाहूनगरांतील सिंहासनापासून दूर झाला, त्यावर त्याचे पाय पुढें तेरा वर्षांनीं म्हणजे ता. २८ मार्च १७६३ रोजीं लागले.

येणेंप्रमाणें महाराजांस ताब्यांत घेऊन ताराबाईनें पुढें दर्शविलेलीं कारस्थानें सर्वत्र जोरानें चालविलीं. (१) दादोबा प्रतिनिधि व यमाजी शिवदेव यांना हाताशीं धरून तिनें राज्यकारभारांत बखेडा चालविला. हा बखेडा रामराजास किंवा तत्कालीन समस्त मराठमंडळास पसंत नव्हता. रामराजाचे अंगीं कर्तृत्व नसल्यामुळें पेशव्यांस व कारभाऱ्यांस बाजूस ठेवून राज्यकारभार चालविण्याची ताकद ताराबाईच्या अंगीं नव्हती. प्रथम संभाजीनें व पुढें शाहूनें तिला अखेरपर्यंत प्रतिबंधांतच ठेविलें होतें. (२) तिनें बाबूजी नायकाकडून उपद्व्याप सुरू केला. (३) सलाबतजंगाचा दिवाण रामदासपंत याच्याशीं राजकारण करून पेशवाई रामदासपंताचे पुतण्यास देण्याचा बेत केला. (४) महादोबा पुरंदरे, रामचंद्रबाबा व सदाशिवराव यांचें व बाळाजीचें थोडेंबहुत वांकडे आलें, त्यास कारण कदाचित् ताराबाईचा प्रयत्न असावा. (५) दमाजी गायकवाडास साताऱ्यास आणिलें. (६) उमाबाई दभाडे यांस चढीं लाविलें. (७) शिंदे होळकरांचा बुद्धिभेद करून पाहिला, आणि (८) रघूजीस मोगलांकडे जाण्यास भर दिली.[1] या गोष्टी पुढील दोन तीन वर्षें चालल्या होत्या, आणि रामराजा या सर्व गोष्टी उदासीनपणें पाहत होता. नैसर्गिक कर्तृत्वहीनतेमुळें त्याला हें औदासीन्य पत्करावें लागलें. रामराजाविषयीं कोणाच्याच मनांत आदरबुद्धि नव्हती. गचाळ म्हणून ताराबाई त्याचा द्वेष करी; कर्तृत्वहीन म्हणून सरदारांचे त्यांच्या ठिकाणीं प्रेम नसे; आणि प्रतिस्पर्धी म्हणून कोल्हापुरकर त्याचा मत्सर करीत. तथापि त्याला हाताशीं धरून होईल तितका कारभार

१ राजवाडे, खं. ३ म. पृ. ४४.

चालवावा, असाच बाळाजीचा प्रयत्न होता. मात्र या ताराबाईच्या प्रकरणाची तड लावण्यांत नानासाहेबास दोन तीन वर्षे लागलीं. शिवाय त्या वेळच्या भानगडींचे तपशील यथायोग्य उपलब्ध नसल्यामुळें शिंदेहोळकरांचें वांकडे पडण्यास मूळ कारण काय, तसेंच पुरंदऱ्याचें व नानासाहेबाचें कां बिनसलें, भाऊ व नानासाहेब यांजमध्यें विकल्प येण्याचें अंतस्थ कारण काय; आणि त्यांत गोपिकाबाईचा खरोखर संबंध किती होता, या गोष्टींचे निर्णय अचुक व खुलासेवार होत नाहींत, म्हणून तत्कालीन उल्लेख व पत्रांचे उतारे मिळतील तितके एकत्र दिल्याने जो मनावर बोध होतो तोच सामान्यतः प्रमाण समजून चालणें भाग आहे. 'ताराबाईनीं रघूजी व फत्तेसिंग व दमाजी गायकवाडाकडील सूत्र तुर्तीकडे चालविलें आहे. दमाजीचा पुत्र नवाबासमीप शहरीं आहे. विठ्ठल शिवदेव व पवार वगैरे सरदार जे गुजरातेकडे मार्गस्त झाले होते, ते नाशकापावेतो येऊन पावले असतां, मागती या गडबडीनें श्रीमंतासमीप परतून गेले व दमाजी निघाला म्हणून जे वदंती उडाली होती, ते सर्व इफल आढळली. या गडबडीकरितां नानांनीं सरदारांसही बोलाविलें आहे.' [ सतेंभर १७५०–खं. ६ ले. २०७ ].

६ पुण्याच्या कारभारांतील भानगडी, रामचंद्रबाबा व पुरंदरे, ( १७५०-५२ ). रामचंद्रबाबा हे शिंद्यास कारभारी दिले होते, त्यांचें व शिंद्यांचें जमेना, सबब मल्हारजी होळकर याचे विचारें त्यानें कारभार करूं नये, असें पेशव्यानें ठरविलें, तेव्हां रामचंद्रबाबा घरीं बसला. पुढें श्रावण मासांत ( ऑगष्ट १७५० ) पेशव्याची स्वारी चन्होलीच्या तळावर डेऱ्यांत राहण्यास गेली असतां सदाशिवरावानें रामचंद्रमल्हारास नेऊन भेटविलें. ( रा. श. ११२–११३ ) सदाशिवरावास रामचंद्रबाबानें छत्तीस लक्ष रुपये दिले ( पे. श. पृ. २१ ) त्यावरून त्या उभयतांचा संकेत अगोदरच झाला होता असें दिसतें. यासंबंधाचें वर्णन पेशव्यांचे बखरींत रसभरित आहे. गोपिकाबाईनें सदाशिवरावाविरुद्ध नवऱ्याचे कान भरले, तेव्हां रामचंद्रबाबाचें

साह्यानें सदाशिवरावानें कारभारांत महत्त्व संपादिलें, अशा आशयाचें वर्णन काल्पनिक दिसतें. "रामचंद्रबाबास सदाशिवरावानें पेशव्याकडे नेऊन भेटविलें, तेव्हां श्रीमंतांजवळ सदाशिवरावानें बोलणें घातलें कीं, कारभार आम्हीं करूं. हें बोलणें रामचंद्रबाबाचे संकेतें असें समजलें. मान्य केलें नाहीं. पुढें सांगोल्याहून परत आल्यावर, रामचंद्रबाबानें पूर्वीच जुळवून ठेवल्याप्रमाणें, कोल्हापुरकर संभाजीचें आज्ञापत्र पेशव्यास आलें कीं, 'आम्हीं आपली पेशवाई सदाशिवरावास देतों; आणि भीमगड, पारगड, व वल्लभगड ( कांहीं ठिकाणीं कलानिधि ) हे तीन किल्ले व पांच हजारांचा मुलूख जहागीर देतों.' असें लिहून आल्यावर सदाशिवराव कोल्हापुरास जाऊं लागला, तो मजकूर महादोबा पुरंदरे यास समजला. श्रीमंतांचें बोलणें कीं भाऊ सा. कारभार करूं म्हणतात. पुरंदरे यांणीं उत्तर केलें कीं, 'आम्ही चाकर, ते भाऊ आहेत, त्यांचें न एकिल्यास दौलत फाटेल, सदाशिवरावांस कारभार सांगावा, आम्ही घरीं बसतों.' असें म्हणोन निरोप घेऊन पुण्यास आले. पुढें श्रीमंतांनीं भाऊसाहेबाची समजूत करून कारभार सांगितला." पुरंदरे रोजनिशींत पौष शु. ८ मंगळवार (२५ डिसेंबर १७५०) चा उल्लेख आहे, तो असा. 'महादाजी अंबाजी श्रीमंतांशीं रुसोन, घरीं राहवयाची आज्ञा घेऊन धोंडोमल्हारसह दोप्रहरां पुण्यास आले. सखारामपंत बोकीलही बरावर आहेत.' [ खं. ६ पु. रो. पृ. ६० ] महादोबा पुरंदरे घरीं बसला, तरी त्याचा पुतण्या त्रिंबक सदाशिव ऊर्फ नाना पुरंदरे हा साताऱ्यास महाराजांपाशीं राहून पेशव्यांची बाजू चांगल्याप्रकारें संभाळीत होता. महादोबाचें व नानासाहेबाचें एकाएकीं सदाशिवराव भाऊच्या हट्टावरूनच बिघडलें असें मात्र नाहीं. कारण नानासाहेब जानेवारी १७५१ त जयापास लिहितो 'महादोबाची आमची विमनस्कता तीन वर्षें आहे. सातारियापासून विशेष वृद्धि पावली. तुमचे पक्षपातामुळें अती कष्टी होते. आम्हांस हरएक कामांत मुरदास करावयाची तजवीज रामचंद्रबाबा व भाऊंकडे पत्रें जात

बेत असत. आम्हांपासून हरएक मसलत पुरती पायाशुद्ध शेवटास न जावी, या भावें भाऊकडेच फौज पाठवावी, आम्हांस घरीं बसवून ताराबाईस गोविंदरायाचे मार्फतीनें चढवावें, आम्हांवर सर्वांचे हुकूम राहवे, ऐसा विचार ( महादोबाचा ) दिसोन आला. तेव्हां आम्हीं भाऊस साफ लिहिलें कीं, जर भाऊ असलेस तर पत्रदर्शनीं येणें. दाभाडियाकडील काम चांगलें करूं. त्यावरून भिडेस पडून आले. दाभाडियाकडील काम रगडन आरंभिलें. नासिरजंग मेला, जप्ती करावी, दहावीस लाख मेळवावे, ...नी दाखवून जें मिळेल तें मेळवावें, ऐसा विचार आम्हीं केला, त्याजमुळें महादोबांनीं बहुत वाईट मानून घरास गेले. कोणी म्हणतात कीं, ताराबाईकडे जातील. परंतु ते कुलीन, जुने चाकर, हरामखोरी कधीं करणार नाहींत असें वाटतें. कालगत मात्र नकळे. असो आम्हाशीं बाबाशीं (महादोबाशीं) तुट पडली. भाऊ अर्धे इकडे अर्धे तिकडे. रामचंद्रबाबा बाह्यात्कारें आम्हांकडे, अंतर्यामीं बहुत गुप्तरीतीनें बाबाकडे. येथें बाहेर तों सर्वत्र दाखवितात कीं, खावंदाची मर्जी तेंच प्रमाण, परंतु अंतर्भाव तुम्ही जाणतच आहां. त्रिंबक विनायक, कोन्हेरपंत हे केवळ बाबांचे. गंगोबाशीं याशीं राजकारण पूर्ण. आमची तवकल ईश्वरावर आहे. तुमचे भरंवशावर ऐसें केलें.' [ का. सं. प. या. ३५९ ]. या पत्रावरून या कारभारी मंडळीच्या अंतःकलहाची थोडीशी स्पष्टता होते. पुरंदरे, रामचंद्रबाबा, सदाशिवराव इत्यादिकांचा विचार ताराबाईस खूष ठेवून, महाराजांचे सल्ल्यानें कारभार व्हावा; आणि नानासाहेबांचें मत, बाईची मनधरणी करण्याचे भरीस न पडतां, तीस कायमचे बाजूस ठेवून आपणास योग्य दिसेल त्याप्रमाणें चालवावें, असा सारांश वरील विवेचनावरून व्यक्त होतो.

निजामाचा वडील मुलगा गाजीउद्दीन याचा व शिंदे होळकरांचा स्नेह असून, त्यास दिल्लीतून दक्षिणेंत आणून निजामाचे गादीवर स्थापावें म्हणजे निजामाशीं नेहमीं चाललेली कटकट मिटेल असा बेत पुण्यास स. १७५० च्या पावसाळ्यात ठरून ते सरदार बाहेर पडले होते. तदनुसार

स. १७५० नंतर पेशव्यानें स्वतः फौज घेऊन निजामाचे पाठीवर जाण्याचा उपक्रम केला. यावेळीं निजाम नासिरजंगानें मोठी फौज घेऊन कर्नाटकांत कूच केलें होतें. स. १७५० च्या डिसेंबर ता. ५ रोजीं नासिरजंग मारला गेला, तेव्हां पुढील व्यवस्थेंत हात घालून गाजीउद्दीन-संबंधाचा पूर्वीचा बेत तडीस नेण्यास ही संधि चांगली आहे, असें पाहून पेशव्यानें सदाशिवरावासह निजामावर कूच केलें. फत्तेसिंग व रघूजी भोसले हेही पेशव्याबरोबर होते ( खं. २ पृ. १२० ) या स्वारीस भागानगरची स्वारी म्हणतात. पेशवे या स्वारींत असतां, इकडे 'ताराऊसाहेब यांणीं आपली आज्ञा चालवून दमाजी गायकवाड बोलाविला. तो वीस हजार फौजेनिशीं चालून आला. पुणें पळों लागलें. पुण्यास मुतालकीवर बाबा फडणीस होते. महादाजी पुरंदरे आपले घरीं असतां, या उभयतांनीं विचार करून गायकवाडास चिठ्ठी पाठविली कीं पुण्यावर न यावें त्यावरून तो साताऱ्यास गेला. नाना पुरंदरे तेथें होता. त्यानें दमाजीशीं लढाई देऊन त्याचा पराभव केला.' [ का. सं. प. ] सारांश, यावेळीं पुरंदरे बंधूंच्या कामगिऱ्या पेशव्याच्या बचावास चांगल्या कारण झाल्या; आणि पुरंदऱ्यांस दुखविण्यांत आपण केवढी चूक केली हें त्याच्या नजरेस आलें.

स. १७५० ता. ८ डिसेंबरास नानासाहेब बुंदेल्यास लिहितो,—

'येथें दाभाडियाशीं कजा प्राप्त झाला, व ताराबाईनीं राजश्रीस गडावर अडकावून ठेविलें. आमचेठायीं विषम मानून आहेत. नानाप्रकारें मनसबे करितात. असो. श्रीकृपेनें उत्तमच होईल. गुदस्तापासून फौज घरीं बसली याजमुळें चाळीस लाख कर्ज जालें. पुढेंही होतच आहे. फौजेचे समजाविशीस तोटा पांच सात लाख जाला. कर्जही मिळत नाहीं. गुजराथेंतूनही पैसा येणें दिसत नाहीं. सविस्तर तुम्ही समजून, खावंदाची ओढ जाणून, हरप्रकारें ऐवज प्रविष्ट करावा. दुसरे खर्च सर्व तोडून रुपया जमा करून कर्ज वारावें. पत्राचें उत्तर तपशिलें न लिहितां सरकारची ओढ वारेल तैशी तर्तूद करणें.' [ खं. ३-१५४ ]

ता. ८ जानेवारी १७५१ त नानासाहेब दीक्षितास लिहीतो,—

' सांप्रत माहादोबास बरें वाटत नाहीं व कांहीं रुसवाही करून घरास गेले. आम्ही, भाऊ, रामचंद्रबाबा नवे मनसब्यास निघालों आहों. आमचें महत्तर कार्य स्वामींचे आशीर्वादावर व्हावें हे इच्छा आहे. ' [ खं. ३ ले. ३७३ B ] हा मनसबा निजामाचें राज्य संपुष्टांत आणण्याचा होता. ' जेणें करून कर्जपरिहार होय तो अर्थ करावा, सर्व प्रकारें जहागीर व मनसब निजामाकडून घेऊन, आमचे हातून आपलें बरें करून घ्यावें ' [ खं. ३ ले. ३७२ B ] ' जरूर पोटाचे संकटासाठीं रसदा घेतल्या. सर्वांपुढें इलाज आहे, पोटापुढें, कर्जापुढें इलाज नाहीं. तो विचार पत्रीं काय लिहावा. भेटीनंतर समक्ष एक वेळ फार वाईट तुम्हांशीं बोलूं यांत संशय नाहीं, ' असें पेशवा ८–१०–१७५१ रोजीं होळकरास लिहितो. [ का सं. प. या. ३९१].

बाकी याच वेळेस उत्तरेंतील जंगीं कारस्थानें शिंदे होळकरांनीं घडवून आणिलीं, त्यांचा उल्लेख ( का. सं. प. या. ले. १६२–१६३ येथें) नानासाहेबांचे पत्रांत आहे, त्यावरून त्याची हिंमत व मराठशाहीच्या उद्योगाची दिशा हीं व्यक्त होतात. ' रामेश्वरपासून इराणतुराणपर्यंत मराठ्यांचें यश प्रफुल्लित झालें. शाबास सरदारांची व तुम्हा लोकांची, ' असें शिंदे होळकरांस पेशव्यानें लिहिलें त्याचा उल्लेख उत्तरप्रकरणांत पुढें येईल.

पुनः ता. १४ जुलई स. १७५१ रोजीं नानासाहेब लिहितो,—

' रामदासपंतांनीं करारच केला आहे कीं तुमचें कर्ज फिटोन तुमचे हातून मोहरांची दक्षणा वांटविजे वडिलांचे इतिफाकानें सहा सुभ्यांचा यथास्थित बंदोबस्त जो थोरले नबाबांस न जहाला; तो करितों. ' [खंड. ३, ले. ३८७] ' येथील वर्तमान तर कलहप्रसंगें देश उद्वस्त झाला, रुपया नाहीं, याजमुळें मोठी वोढ पडली. कर्ज अति जाहलें. सर्व संकटें मागें परिहार जाहलीं, पुढेंही देवब्राह्मण कृपेनें कुशलच होईल ' [२७ मार्च १७५२. खंड. ३ ले. ३९३ ]. नानासाहेबाची पहिल्या दोनतीन वर्षांतली

ही कर्जाची रड लवकरच दूर झाली. 'रघुनाथराव, शिंदे, होळकर इत्यादींनीं गुजराथ, काठेवाड, अयोध्या, दिल्ली वगैरे ठिकाणीं सर्व अंमल बसवून बहुत खजिना मेळविला; प्रधानपंत कर्नाटकांत जाऊन सर्व खंडण्या घेऊन श्रीरंगपट्टणपर्यंत अंमल बसवून बहुत द्रव्य मेळवून पुण्यास आले. हिंदुस्थान कर्नाटकांतून द्रव्य नदीचा प्रवाह येऊं लागला' [ भा. रा. च. पृ. १३]. हिंदुपदपातशाही स्थापन करण्यांत पेशव्याचा एक मुख्य उद्देश कर्जाची कटकट कायमची मिटावी हा होता. बाजीरावाचे वेळेपासून पेशव्यांस कर्जानें गांजलें होतें. हें मागें सांगितलेंच आहे. स. १७४३ त द्रव्यनद्यांचा प्रवाह दक्षिणेंत आणण्याचा नानासाहेबाचा उपक्रम पुढें दहा वर्षांनीं सिद्धीस गेला. तदुत्तर पेशव्यानें आपल्या दरिद्रतेचें रडगाणें गाइलेलें आढळत नाहीं; उलट उदगीर पानपत वगैरे मोहिमाचे जबरदस्त खर्च पेशव्यानें सहज भागविले; तथापि हा पैसा केवळ लुटीनें व खंडण्यांनीं जबरदस्तीनें फौजेच्या बळावर त्यानें मिळविला. राज्यकारभारांतील कौशल्यानें धनोत्पादनाचे मार्ग नानासाहेबास उमगले होते असें म्हणवत नाहीं. म्हणूनच मराठ्यांचे अंमलास 'राज्य' न म्हणतां, 'लुटारू संस्था' असें सामान्यतः हिंदुस्थानभर पुढे समजण्यांत येऊं लागलें. शिवाजीच्या राज्यस्थापनेंतील उच्चतर हेतु कालांतरानें बदलत गेले, आणि बाहेरील दिखाऊ ऐश्वर्यांत अंतर्यामीं राज्यास भयंकर कीड लागून राहिली. नानासाहेब, सदाशिवराव, रामचंद्रबाबा, महादोबा पुरंदरे, गोविंदराव चिटणीस इत्यादि त्या वेळच्या मुख्य मुख्य पुरुषांच्या मनांत वैमनस्य उत्पन्न झालें, त्यांत दोन पक्ष कोणते याचा उलगडा पाहूं गेलें तर फक्त पेशवा एकाबाजूस व इतर सर्व मंडळी दुसऱ्या बाजूस अशी होती. म्हणूनच पेशव्याचें मन त्याची बायको गोपिकाबाई इनें या सर्व मंडळीविरुद्ध बिघडविलें, असा त्या वेळीं बोभाटा असून अद्यापि संशय घेण्यास जागा राहते. त्या अडचणीच्या प्रसंगीं रामचंद्रबाबानेंच मोठ्या समंजस व दूरदृष्टीनें कारभाराचें जोखीम अंगावर घेउन अनेक भानगडींच्या प्रश्नांची तड

कावली. त्याचा व महादोबा पुरंदऱ्याचा स्नेह असून, पेशव्यानें महादोबास दुखविलें हें रामचंद्रबाबास आवडलें नाहीं. रामचंद्रबाबाचा मुख्य कारभार वर्ष सहामहिनेच प्रमुखपणाचा झाला. पुरंदरे वगैरे मंडळींच्या विरुद्ध दोनतीन वर्षे नानासाहेबाचें मन कलुषित होत चाललें होतें. त्याची निवृत्ति दमाजी गायकवाडाच्या पराभवानें झाली. स. १७५१ चे आरंभीं नानासाहेब निजामावर गेला असतां, ताराबाईचे आग्रहावरून दमाजी एकाएकीं खानदेशांतून प्रथम पुण्याकडे व पुढें साताऱ्यावर चालून आला, तेव्हां पुणें सातारा येथील लोक भयभीत होऊन लुटीच्या भीतीनें पळून जाऊं लागले, त्या अडचणीच्या प्रसंगीं चिटणीस व नानापुरंदरे व बळवंतराव मेहेंदळे आणि बापूजी भीवराव या सर्वांनीं मिळून जमाव करून ता. १५ मार्च स. १७५१ रोजीं गेंड्याच्या माळावर दमाजीचा पुरता पराभव करून त्याचा गोट लुटून आणला, ही बातमी नानासाहेबास निजामाचे राज्यांत कृष्णाकाठीं समजली, तेव्हां त्याच्या डोक्यांत वरील कारभारीमंडळींच्या कर्तृत्वासंबंधानें चक्क उजेड पडला; आणि लगेच पुरंदरे मंडळींचीं उत्पन्नें वगैरे व्यवस्था करून देण्याचें त्यानें मनांत आणिलें; आणि स. १७५१ च्या पावसाळ्यांत तो प्रकार तडीस नेला. त्या सालच्या विजयादशमीपूर्वीं सर्व संशयाची निवृत्ति होऊन एकंदर कारभार सुरळीत चालूं लागला.

सदाशिवरावास कोल्हापुरची पेशवाई मिळावी, ही खटपट सुद्धां केवळ रामचंद्रबाबाची नव्हती. तो डाव महादोबा पुरंदऱ्यानेंच सुचविलेला होता. [ राजवाडे शकावली ११७ ]. ताराबाईची खटपट संभाजीस आपणाकडे वळविण्याची होतीच. त्याला उपाय म्हणून हा पेशवेगिरीचा उपक्रम पुरंदरे व रामचंद्रबाबा यांनीं योजिलेला असून, खरोखर त्यांत दौलतीचा फायदाहि होता. संभाजीची पेशवेगिरी म्हणजे जवळ जवळ रामराजाच्याच तोडीची होती. दोघेही पेशव्यांचे हातीं कारभार देऊनच चालणारे होते. रामराजाकडे जशी ताराबाई तशी संभाजीकडे जिजाबाई होती. त्यांत या सासवासुनांचें

जास्त वांकडें असल्यामुळें जिजाबाईला सदाशिवराव कारभारी पुरवला, पण ताराबाईची मुळींच ताबेदारी नको होती. सातारा कोल्हापुर हीं दोन राज्यें पृथक् राहिल्यानें मराठशाहीचें नुकसान किती होतें; आणि त्यामुळें ताराबाईसारख्या उपद्व्यापी मंडळीचें कसें फावतें ही गोष्ट कारभारी मंडळीस चांगली ठाऊक होती. दोन राज्यास एक धनी करूं नये, अशी शाहूची स्पष्ट लेखी आज्ञा असल्यामुळें, निदान पेशवेगिरी तरी एका हातांत आल्यानें मुख्य कार्यभाग उरकणारा असल्यामुळें पुरंदरे चिटणीस वगैरे जाणत्या मुत्सद्यांचा हा नवीन व्यूह फार चांगला होता; परंतु हा डाव म्हणजे आपलें घर फोडण्याचा उपक्रम होय, असें बहुधा गोपिकाबाईच्या सांगण्यावरून नानासाहेबाच्या मनानें घेतलें; आणि कांहीं दिवस तो प्रकार तसाच तहकूब राहिला. मागाहून नानासाहेबाच्या मनांतील संशयाची निवृत्ति झाल्यावर संभाजीची भेट घेऊन त्यानें स्वतःच त्याची पेशवेगिरी संपादिली, ही गोष्ट पुढें सांगण्यांत येईल. स. १७५१ तील ताराबाईच्या भयंकर कारस्थानाची नानासाहेबास प्रथम चांगली अटकळ नव्हती, पण भागानगरच्या स्वारींत असतां दमाजी गायकवाडानें जो एकदम दंगा उसळून दिला, त्याच्या योगानें पेशवा खडबडून जागा झाला; मुत्सद्दी मंडळीच्या सल्ल्याकडे आपण दुर्लक्ष केलें, याचा त्यास पश्चात्तापही झाला असेल. त्या वेळच्या त्याच्या पत्रांतील मजकुरावरून त्याच्या मनाची तारांबळ चांगली व्यक्त होते. 'संभाजीराजे यांजकडे आईसाहेबीं राजकारण केलें. त्यांनीं तयार होऊन यावें, प्रधान यांचें पारिपत्य करावें. ते निघाले तों, जिजाबाईनीं या कामांत पडूं नये, म्हणोन माघारें नेलें.' [ धा. रा. च. ]

रामचंद्रबाबाचा प्रभाव फार दिवस टिकला नाहीं. नानासाहेबानें सदाशिवरावास त्याजपासून फोडून आपल्या बाजूस वळविलें. 'मोहिमेस पैसा रामचंद्रबाबा देईनात. मग नाना व भाऊ एक होऊन चऱ्होलीस भेटले. बाबाची मसलत वाईट यामुळें पुढें त्याजशीं विटले. बाबा पुण्यास आल्यावर मार्च १७५१ च्या सुमारास त्याचीं कारस्थानें सर्व नानास कळलीं. चोरचौकी

बसली. पुढें नानाबरोबर बाबा उगीच सिंहस्थसालीं हिंडत होते. नंतर स्वारीस निराळेच पाठविले, परंतु विश्वास मध्यमच होता. ( भा. व. श. पृ. २५, व रा. श. ११७ ). रामचंद्रबाबास पेशवे प्रथम इतके चिकटूं लागले, त्याचें कारण बाबाचें द्रव्य. दहा पांच वर्षें राणोजी शिंद्याचा कारभार करून रामचंद्रबाबानें धनसंचय चांगला केला होता. होळकरांचा चंद्रचूड व रामचंद्रबाबा ह्यांची हातोटी बहुधा सारखीच होती. त्यांतही मल्हारराव सावध व स्वार्थास दक्ष होता, तसा राणोजी किंवा त्याचे मुलगे नव्हते; तथापि राणोजीच्या मुलांस बाबाच्या कारभाराची खडानूखडा बातमी असल्यामुळें, त्यास कारभारांतून काढल्याशिवाय आपली दौलत सांवरणार नाहीं, असा शिंदेबंधूंचा ग्रह होऊन त्यांनीं बाबास कारभारांतून काढण्याचा हट्टच धरिला. परंतु मल्हारराव पाताळयंत्री, त्याचा मुलगा खंडेराव विशेष कर्तृत्ववान् नसून, शिंदेबंधूंची एकी व करामत अद्वितीय होती. शिंदे-होळकरांचा वावर एकाच क्षेत्रांत उत्तरेस असल्यामुळें, शिंद्याचा फायदा तें होळकराचें नुकसान, असा प्रकार व्यवहारांत होऊं लागल्यामुळें उभयतांत चुरस वाढून त्यास द्वेषाचें स्वरूप प्राप्त झालें. ह्या चुरशींत रामचंद्रबाबा मल्हाररावाचा पक्षपात दाखवी. मल्हाररावाचा कारभारी गंगाधर यशवंत व बाबा ह्यांचा स्नेह होता. बाबानें संपत्ति मिळवून पुण्यांत विस्तृत जागा घेऊन सात मजली वाडा बांधिला. देवस्थानें, घांट, दानधर्म वगैरे कामीं मोठमोठे खर्च करून सर्व हिंदुस्थानात बाबानें आपलें नांव केलें. या दानशौर्याचें रसभरित वर्णन जिवबादादा बक्षीचे चरित्रांत आहे. [ पृ. ३१ ] परंतु हा बडेजाव शिंदेबंधूंस अपमानास्पद वाटून, जयाप्पानें हट्टास पेटून स. १७५० च्या उन्हाळ्यांत पुण्यास असतां पेशव्याचे मार्फत रामचंद्रबाबास आपल्या कारभारावरून साफ दूर केलें. हा प्रकार मल्हाररावास मुळींच रुचला नाहीं. रामचंद्रबाबास कारभारांत ठेवण्याविषयीं त्याचा फार आग्रह होता. पुढें सदाशिवरावाचे मार्फत रामचंद्रबाबास पेशव्याचा कारभार कांहीं काळ मिळाला. स. १७५० च्या

मून महिन्यांत शिंदे-होळकरांची समजूत केल्याचा रोजनिशींत उल्लेख आहे तो या संबंधाचा असावा. पुढें जुलई महिन्यांत पेशव्यानें शिंदे होळकरांची रवानगी दिल्लीच्या कामगिरीवर केली. या दोन सरदारांचें मःकडे ही उत्तरेंतील कारभाराची गुरुकिल्ली असून, त्याची स्पष्टता पुढें त्या प्रकरणांत होईल. उज्जैन व इंदूर या उभयतांच्या राजधान्या संनिकट व उभयतांचे हितसंबंध एकाच क्षेत्रांत, ही गोष्ट ध्यानांत ठेवून त्या वेळच्या घडामोडी पाहिल्या पाहिजेत.

पेशव्यास द्रव्याची अडचण असल्यामुळें त्यानें रामचंद्रबाबास कांहीं दिवस हाताशीं धरिलें. सदाशिवरावास एकदां सदतीस लाख रुपये मिळाल्यावर ज्यास्त प्राप्ति होईना तेव्हां उभय बंधूंनीं बाबांस हळू हळू दूर केलें; तथापि द्रव्य म्हणजे सत्ता ही गोष्ट ध्यानांत ठेवून त्यास थोडाबहुत आपल्या लगामीं ठेविलें. पेशव्याचें कर्ज वारण्याची युक्ति म्हणून मोठमोठ्या सरदारांवर पट्टी बसविण्याची सूचना रामचंद्र-बाबाची होय. बाबा पुढें दोन तीन वर्षें जिवंत होता. ' लष्कराहून देऊसेस गेले. तेथून पंढरीचे यात्रेस गेले. तेथें कांहीं कटकट झाली. तेथून २८ जुलई १७५४ रोजीं पुण्यास घरीं आले. [ पु. रो. पृ. १०९ ] नंतर ता. ४ ऑक्टोबर रोजीं दहा घटका रात्रीं काळ जाला. सात दिवस ज्वराची व्यथा जाली. चार दिवस बोलत होते, तीन दिवस बोलले नाहींत. दोन प्रहर रात्रीं ओंकारेश्वराजवळ दहन केलें. बायको द्वारकाबाईनीं सहगमन केलें. पंतप्रधान, भाऊ वगैरे समस्त मंडळी समागमें गेली होती. उजेडावयास घरास आले.' [ पु. रो. पृ. ११४ ]. ' रामचंद्र मल्हारांनीं लोकांवर कर्जपट्टी घातली होती. तीन वर्षें कारभार करून गणपतीच्या मागें त्यांचा वाडा होता, तेथें मयत झाले. लक्ष्मणपंत म्हणून कोणी गृहस्थ नांदत होते, त्यांची जागा घेऊन घर सात मजली बांधलें होतें. दत्तकपुत्र सदाशिवराव रामचंद्र यास नवी सरदारी दिली. ' [ का. सं. प. १५, प. श. १२२ ]. अशा अनेक पुरुषांची करामत राष्ट्रोद्योगाचे कामीं

उपयोगांत आली असून त्यांच्या हकीकती खुलासेवार मिळत नाहींत, ही मोठ शोचनीय होय.

पुरंदरे घरीं बसल्यावर ता. १२ फेब्रुवारी स. १७५१ रोजीं पेशव्यानें अनूबाईचा जांवई व चिमाजी आपाची पहिली बायको रखमाबाई हिचा भाऊ, त्रिंबक विश्वनाथ पेठे, यास पुण्यांतील कारभारावर नेमिलें. पुढें पुरंदऱ्यांची व पेशव्याची गोडी झाल्यावर, पेठे यांस पेशव्यानें साताऱ्यास ताराबाईंचे बंदोबस्तास ठेविलें. रामचंद्रबाबा घरीं बसल्यावर, पूर्वीच्या मंडळीस पुन: कामें सांगण्याचा उपक्रम पेशव्यानें केला. हा उपक्रम स. १७५१ च्या पावसाळ्यांत दमाजी गायकवाडाच्या प्रकरणानंतर झाला. ' महादोबा बाबाचा सरंजाम व सरदारी करून दिल्ही. चाकरी सर्वोत्कृष्ट झाली, तेव्हां कृपा करून दिल्हे. ( १ ऑगस्ट १७५१, भा. व. श. पृ. २४ ). आश्विन शु० ३ बुधवारीं ( ११-९-१७५१ ) पहांटे दिवस उगवतां महादोबा नानाकडे भाऊकडे जाऊन आले. तिसरे प्रहरीं बोलावून नेलें. सदरेस कारभारास बसले होते. बाबाची समजूत जाली. अगोदर आठ चार दिवस मध्यस्थी होत होती. रोज मजकुरीं एकत्र झाले.' पुढें ता. १७ रोजीं ' प्रधानपंत संध्याकाळच्या प्रहर दिवसास महादोबाचे येथें गेले. मध्यरात्रीं फिरून आपल्या वाड्यांत आले. दुसऱ्या दिवशीं दसऱ्यास ( १८।९ ) श्रीमंतांबरोबर महादोबाही शिलंगणास गेले. वस्त्रें दिल्हीं [ पु. रो. ७१ ] सरदारी देऊन पुणें देशचा सुभा, पुत्र नीळकंठ महादेव याचें नांवें करून, त्यांस स्वारीबरोबर घेऊन गेले ( का. सं. श. पृ. १२ ). आषाढ शु० १० गुरवारीं ( ९.७.१७५२ ) अवशीचे अकरा घटका रात्रीस प्रधान मुहूर्तकरून स्वारीस निघून त्रिंबक विश्वनाथाचे घरीं बारावे घटकेस येऊन राहिले. धरून निघतेसमयीं मुहूर्त चांगला झाला. दिवस उगवून भाऊ, दादा, व रामचंद्रबाबासह सासवडास महादोबाचे समजाविशीस गेले. महादोबांनीं चार हजार फौज ठेवावी, सुरत अठ्ठाविशींत पांच लाखांचा मुलूख वसुली सरंजाम द्यावा, महीपलीकडे साडेतीन लाखांचा

द्यावा, पुणें देशची मुतालकी पुरंदर देखील पुत्र निळोबास द्यावी. पूर्वी चाळीस हजारांचा सरंजाम माळव्यांत दिला आहे, आणीक साठ हजारांचा देशीं व गंगथडीस द्यावा. त्रिंबक सदाशिव यांस व धोंडो मल्हारास सरंजाम द्यावे, असे करारमदार झाले आहेत' [पु. रो. ८१, ८३ ]. यांपैकीं कांहीं गोष्टी पुढें महिना पंधरा दिवसांत अमलांत आल्या. 'महादोबास समजावून आणिलें. त्यांनीं आमचे मनास अनुकूल चालावें, दुराग्रह तिळमात्र कोणेविशीं न करावा. आम्हीं सर्वप्रकारें त्यांवर कृपा करून त्यांचे स्वरूपाप्रमाणें चाकरी घ्यावी. गुदस्तांही याच प्रकारें करार होऊन बरोबर नेलें, परंतु नीट चालले नाहीं. यंदां विचारावर आले आहेतसें दिसतें. परिणाम ईश्वर उत्तम लावूं.' ता. १९ जुलई स. १७५२ [का. सं. प. या. ले. ३८३ ] येणेंप्रमाणें पुरंदऱ्यांची पेशव्याची गोडी झाली; आणि पुढें त्यांनीं चांगलीच कामें केलीं.

ताराबाई, प्रतिनिधि वगैरे विरोधकांकडून जसा पेशव्यास त्रास पोंचत होता, तसाच सदाशिवराव, पुरंदरे मंडळी, रामचंद्रबाबा वगैरे स्वपक्षांतील कारभारी मंडळीसुद्धां रुसवे करून कशी वागत होती, हें वरील प्रकरणावरून ध्यानीं येईल. राज्यचालकाचा मार्ग कंटकमय असून प्रत्येकाच्या मनाजोगतें करणें किती अवघड असतें, याची यावरून कल्पना होते. अनेक लहान थोर मंडळी राष्ट्रकार्यांत वावरत असून प्रत्येकाच्या अवगुणावर पांघरूण घालून गुणाचा तेवढा उपयोग करून घेण्याचें नाजूक काम पेशवा शांतपणें करीत होता. मराठे, प्रभु, सारस्वत, देशस्थ, कऱ्हाडे, कोंकणस्थ अशी सर्व जातींची मंडळी नानासाहेबाचे कारभारांत होती, हेंही येथें निदर्शनास येईलच. ज्यांचीं नांवें हल्लीं प्रसिद्ध नसून, जे मराठशाहीच्या उद्योगांत संविभागी होते अशीं किती तरी कुटुंबें व पुरुष असतील. कोंकणांतून ब्राह्मण जसे घांटावर येऊं लागले, तसेंच शेणवई व प्रभुसुद्धां पुष्कळसे आले; आणि ज्यास आपण मराठशाही म्हणतों, त्यांत सर्व जातींचे इसम आपापल्यापरी खपले आहेत. प्रत्येक घराण्याचे पदरीं सर्व जातींच्या

मंडळींचा समावेश असून, त्यामुळेंच राज्याचें गाडें समतोल राहत असे. प्रतिनिधींच्या पदरीं जाखी म्हणून पेशव्यांचे स्नेही शेणवई कारभारी पांच पिढ्यापावेतों होते, त्यांनीं त्या दोन कुटुंबाचा स्नेह ठेवण्यास पुष्कळ मदत केली. [ भा. इ. सं. मं. सं. वृ. १८३६ ].

७. रामराजास सोडविण्याचे प्रयत्न.—रामराजा कैद झाल्यावर पुढें काय प्रकार घडले, याचा खालील पत्रावरून अंदाज करतां येतो. त्यास ताराबाईनें अटकेंत ठेविलें, त्या वेळचें हें पत्र आहे. ( खं ६–५५३ ) 'गडकरी यांणीं राजश्रीस खलबतखान्यांत आणिलें. त्या दिवशीं आई-साहेबांनीं तिसरे प्रहरपर्यंत उपवास केला. निदान राजश्रीच्यानें निराळा फड काढावयाचें अवसान न होय. राजश्रींनीं जाऊन मातु:श्रींच्या पायांवर डोई ठेविली. भोजन पंक्तीस केलें. पुराणकास काढावा ( हें ) सुप्रयुक्त. होईल तर बरें, नाहींतर जबरदस्तीनें करावे, असेंही गडकरी बोलत. परंतु राजश्री नेटून सांगत नाहींत. म्हातारीजीस खंती लागेल म्हणून भितात, राजश्रींची प्रकृत स्वामीस विदित आहेच. लागी माणूस जवळ नाहीं. ऐशास पांचसात मातबर खालून वरते घ्यावे, राजश्रींस राजश्रीप्रमाणें नेट द्यावें, आईसाहेबांस आईसाहेबांप्रमाणें दमदार करावी; आणि स्वामीचे ( पेशव्याचे ) लक्षा-प्रमाणें यांणीं मनसबा सिद्धीस न्यावा. पुराणिकांनीं जीवभय घेतलें आहे, त्याजमुळें आईसाहेबही निकर्ष करणार, त्यांचें भय तूर्त वारावें. हर कसें करून रावत्याखालें घालून खालीं आणावी, असा विचार केला आहे. आई-साहेबांनीं स्वामींसही ( पेशव्यास ) आणखी पत्र पाठविलें आहे, त्याचें उत्तर आल्यावर काय करणें तें करूं म्हणतात. खरें आहे, कीं उगाच बाहणा करून दिवसगतीवर घालतात न कळे ! आईसाहेबाशीं लटकें लाडें हर-प्रकारें बोलोन गुंतला हात मोकळा करावा. राजश्री एक दिवस उपवास करते अगर निष्ठुर दाखविते, तर गडकरी यांसही बोलावयास जागा होता. तें अवसान, एकटा पडला आहे, त्यामुळें न होय, यास्तव दिवसगत लागते. सांप्रत दोघांचौघांस वरते घेऊन नेटून लवकर करावयाचा विचार केला

आहे. स्वामीचें पुण्य समर्थ आहे. राजश्रीचे मतें मातुःश्रीनें समजून सवलतीनें करावें असें आहे. तें तर होत नाहीं. यांची तर भ्रांत फिटत नाहीं. उगीच माणसासमागमें राजश्रीस, सांगून पाठवावें, तर तो काय जाऊन सांगेल नकळे. तरी सांगोन पाठवितों. परंतु नेट नाहीं.'

रामराजाची कैद हा राज्यकारभार स्वहस्तीं घेण्याचा ताराबाईचा डाव होता. साताऱ्यास नाना पुरंदरे मोठ्या शिताफीनें सर्व गोष्टी करीत असल्या-मुळें हा डाव फसला. एका दमाजी गायकवाडाशिवाय ताराबाईस दुसरा बलवान् सरदार कोणीच सामील झाला नाहीं. दमाजीचा डाव फसला तेव्हां तर ताराबाईचा बंडावा मोडल्यासारखाच झाला. भारतवर्ष शका-वलींतील या वेळची हकीकत नाना पुरंदऱ्यानेंच लिहिल्यासारखी दिसते, ती अशी. 'आईसाहेबांनीं रामराजास किल्ल्यावर चंपाषष्ठीचे भोजनास नेलें, कैद केलें. आम्हीं खालीं राहिलों. तेव्हां नानासाहेबीं आज्ञा करून आम्हां-कडून किल्ल्याभोंवत्या चौक्या बसविल्या. मार्गशीर्षापासून फाल्गुन वा॥ ६ (७–३–१७५१) पावेतों मोर्चेबंदी रात्रंदिवस झुंजभांडणें करून राहिलों. तों दमाजीनें खानदेशांत दंगा मांडला; म्हणोन नानांनीं पारपत्यास बापूजी बाजीराव व बळवंतराव गणपतराव रवाना केले. त्यांचें यांचें झुंज जालें, हे मोडले. गायकवाड पाठीं लागत जेजुरी मोरगांवाकडून साताऱ्या-कडे चालला. आम्हांस वर्तमान साताऱ्यास कळल्यावर सारी फौज घेऊन बळवंतराव व बापू बाजीराव यांस नाझऱ्यावर येऊन मिळून, दम फिरून सर्व लोकांचें समाधान दिलासा देऊन गायकवाडामागें लागून, गायकवाड म्हसवे व वेत्रातीरीं राहिला होता. आम्ही फौज घेऊन वडुथावरून गायक-वाडावर गेलों. झुंज झालें. गायकवाड मोडून गेड्या पावता शहर साताऱ्यांत घातला. लष्कर डेरे दांडे सर्व लुटून आणिलें. निशाण नौबत बापूजीची व बळवंतरावाची गेली होती, ती फिरोन आणिली. गायक-

१. हें पत्र पेशव्यास त्याचे हस्तकानें सातारा किल्ल्यावरून स. १७५१ च्या आरंभीं लिहिलेलें दिसतें.

बुडास लुटून फस्त केला. नानासाहेब साताऱ्यास आले. दमाजी भेटला. कहाप्रमाणें न वर्ते म्हणून लुटला गेला. बाबाचा (महादोबा पुरंदरे याचा) सरंजाम व सरदारी हे करून दिल्हे. बाकी बाबा घरीं बसले तर बाबाचे आम्ही. आमची चाकरी सर्वोत्कृष्ट झाली. तेव्हां बाबावर कृपा करून करार करून दिल्हे. ' रामराजाची सुटका मात्र ताराबाईच्या मृत्यूपर्यंत झालीच नाहीं.

ताराबाई व पेशवा यांमधील तंट्यांतले पेशव्याच्या बाजूचे कागदपत्र जसे मुबलक सांपडतात, तसे ताराबाई किंवा तिच्या पक्षांतील यमाजी शिवदेव वगैरेंचें म्हणणें काय, तें समजण्यास फारसें साधन नाहीं. तसा एक कागद ताराबाईच्या पक्षांतील कोणींतरी पेशव्यास स. १७५० च्या अखेरीस लिहिलेला आहे, तो पहा.—

( शाहूनें ) कै० वास केल्यावर तुम्ही असा डौल घातलात कीं, सर्वाध्यक्षता आपली. आमचे तर्फेचें माणसानें राजाजवळ एकांतीं बसूं देखील नये. रात्रीं दिवसा तुमची चौकी. ते प्रसंगी जे जे तुमचे पक्षीं लागले ते वांचत चालले. असें दिसों लागतांच वडूथचे तळावर रामाजी बाबाजवळून तुम्हांस सांगितलें कीं, ऐसें न करावें. बाबांनींही सांगितलेंच असेल. परंतु आपण बहुमान मात्र बाबाशीं करीत गेलेत. ते गोष्टीचीही आम्ही गमच खादली. तदोत्तर, सातारियासी दाखल होतांच आम्ही शिवाजी हरि, देवराव, बाबूजी नाईक यांचा अभिमान धरिला तुम्हीं जे माणूस आम्हांकडे आलें, तें मोडीतच चाललेस. तथापि आम्हीं, शिवाजी हरि केवळ तुमचा ग्रामकंटक व लबाड ऐसें जाणून, त्याचा अभिमान सोडिला. देवरायास पोटास मात्र देवविलें. नाइकास कर्णाटक द्यावें, नाहींतर पाचासाताचा सरंजाम द्यावा. तेव्हां तुम्ही बाबांनीं मिळोन कर्नाटक मस्त हस्ती जहाली, फकिराचे दारीं बांधिला, म्हणजे दौलतीची फजिती केली. अखेर कर्णाट काढिलें. तेव्हां सरंजामही न दिला. याप्रकारें ज्या ज्यानीं मुख्यत्वें आमचा पक्ष मनांत आणिला ते सर्वस्वें बुडालें. या प्रसंगामुळें फारच

आम्हांला राग येऊन आम्ही रुसून बाहेर आलों. ते प्रसंगीं तुम्ही, बाबांनीं आपले जागा विचार करून आम्हांपासून इमान तुम्हास देविलें. तुम्हीही शपथ केली कीं, सहसा स्वामीचे हिताविशीं मजपासून कायावाचामनें अंतर होणार नाहीं, त्या दिवसापासून तुम्ही कोणेप्रकारें चाललेस हें मी जाणतों. मी कसा चालतों हें तुम्ही जाणत असाल. सांप्रतकाळीं नानाप्रकारें लोक सांगतात, तें एकीकडे ठेवून, तुम्हांजवळून पुरतें अंतर पडेल तेव्हां आपणही अंतर करावें. इतक्यांत, तुम्हींही सर्वप्रकारें, आमचेपक्षीं हें भाऊंनीं बाबांनीं सांगितलें. तदनुरूप तुम्ही गडकरीयांस भरंवसा पुरवून राजे आईसाहेबांस खालीं आणावयाचा विचार केला. चौकी मारली. एका दों दिवशीं खालीं उतरून सुरळीत चालावें, दुर्लौकिक उभयपक्षींचा वारावा, तो विचार टाकून बाबा रुसून घरास गेले. हें ऐकतांच सुस्त पडलेत. माणसें देखील पळवूं लागलेत. हें कांहीं तुमचे इमानास योग्य नाहीं. [ खं. ६ ले. २७८ ].

रामराजांत बिलकुल करामत नाहीं, असें पाहून ताराबाईस मोठा त्वेष उत्पन्न होई, आणि आवेशाच्या भरांत 'तूं खरा नव्हस खोटा आहेस,' असे उद्गार सर्वांचे देखत तिच्या तोंडांतून वारंवार निघत, तेव्हां हळू हळू त्यांचा प्रसार जनवार्तेंत झाला. 'तूं राजबीजाचा नव्हस, खरोखरच उचल्या आहेस,' असें ताराबाई त्याची वारंवार निर्भर्त्सना करतांना त्यास म्हणे. अर्थात् रामराजाचा तोतया उत्पन्न झाला. 'लटका राजा राजमाचीस ठेविला होता. तो साताऱ्यास रामराजाकडे पाठविला होता. तो लबाड, त्याजला डाग देऊन डावे हाताची करंगळी तोडून, पांच पाट काढून, त्याजला बाहेर घातला. त्याजबरोबर गोसावी होता, त्याचे कान कापले. तोतयानें सांगितलें, मी अहीर रायाचा, माझें नांव संताजी, बापाचें नांव संभाजी अहीरराव. मजला यशवंतराव प्रभूंनीं व आणख्यांनीं भर देऊन राजा म्हण, म्हणून सांगितलें.' [ पु. रो. पृ. ६७-१५ जुलई १७५१ ].

---

१ ता. २५ डिसेंबर १७५० रोजीं महादोबा पुरंदरे रुसून घरीं बसल्यावर लवकरच हा कागद लिहिलेला आहे.

ताराबाई रागीट असल्यानें संतापांत वाटेल तें बोलत असे. शिवाय वार्धक्यानेंही तिच्या स्वभावांत फरक पडला होता. शाहूला ती थोडीबहुत वचकत असे; पण आतां आजास नातू शिकवी, अशी सर्व मंडळीसंबंधानें स्थिति होती. रामराजाच्या नाकर्तेपणाचा तिला पराकाष्ठेचा क्रोध आला. त्या भरांत तिनें किल्ल्यावर रामराजाचे फार हाल केले. त्यांत त्यास सोडविण्याचा प्रयत्न पेशवे करीत, त्यामुळें तर ती ज्यास्तच चिडे. साताऱ्च्या किल्ल्यावर म्हणजे प्रत्यक्ष छत्रपतीवर तोफा सोडून त्यांस कबजांत आणण्याचा प्रयत्न पेशव्यांस करतां येईना. कोल्हापुरच्या संभाजीकडेही ताराबाईचीं कारस्थानें चालू होतीं; परंतु त्यांत कांहीं तथ्य नव्हतें. पेशव्यांनीं इचलकरंजीकरांचे दोन सरदार हरिराम व मानाजी पायगुंडे यांस तीन हजार फौजेनिशीं स. १७५० च्या पावसाळ्यांत वारणेच्या तीरीं छावणी करून बंदोबस्तास ठेऊन दिलें होतें. [ इच० इ० पृ. ६९ ] पेशव्यास न जुमानतां साताराभोंवतालच्या प्रदेशांत करडा अंमल बसवून ताराबाई वसूल घेई. पण या पलीकडे अधिक उपद्रव ती पेशव्यांस देऊं शकली नाहीं. उलटपक्षीं रामराजास बोध करून पेशव्यांनींच त्याला सर्वस्वी वश करून घेतलें. "अमुक सरंजाम मला द्या, तेवढा घेऊन, तुम्ही जें जें कराल त्याला रुकार देईन, राज्याचा कारभार तुम्हीं वाटेल तसा करावा," असा लेख त्यानें पेशव्यास लिहून दिला. [सदर पृ. ७२].

रामराजा सलुख्यानें ताब्यांत येईना, तेव्हां फौज आणून लढून किल्ला ताब्यांत घ्यावा, असाही विचार आरंभीच कित्येकांनीं सुचविला; पण प्रत्यक्ष धन्याशीं असा युद्धप्रसंग करण्याचें गोविंदराव व त्यांचे बंधू यांचे मानस झालें नाहीं. युक्तीनें मर्जी ठिकाणीं आणून काम करणें तें करावें. त्यावरून नानासाहेबाचे मनांत गोविंदराव चिटणिससंबंधानेंही संशय उत्पन्न झाला कीं, हे सुद्धां बहुधा ताराबाईस मिळाले. या संबंधांत गोविंदरावास पेशव्यानें लिहिलेलें पत्र वाचण्यालायक आहे. तें असें: —

'अलीकडे सर्व दरबारचे मुत्सद्दी एकप्रकारचें जाणून सर्वप्रकारें तुम्हांसच हातीं धरून, बरा वाईट सवाल जाब तुमचे हातून केला. तुम्हीं यथाशक्ति आमचे कार्यास न चुकलेस. गतवर्षी रामाजीपंतांनीं भर देऊन सकवारबाई तुमचे केवळ पाठीसच लाविली, ते प्रसंगीं तुमचें दरबारीं कांहीं चालेना; तथापि तुम्हांमुळें सकवारबाईचा दावा, सर्व ब्राह्मणांचा पेंच कबूल करून, तुमचीं मुलें माणसें पुण्यास आणूस ठेविलीं. तुम्हांस रक्षावयास फौज दिली. तुम्हांमुळें आम्हांवर सकवारबाईनीं इतराजी, त्यांचा काळ होय तों कशी केली, हें तुम्हांस स्मरण असेलच. तुम्ही यमाजी-पंताचे पेंचामुळें, सकवारबाईचे पेंचामुळें, गडकरी सर्वप्रकारें आपले विचारांत घेऊन आमचा आश्रय केलात. आम्हीही तोच विचार शेवटपावेतों निभावला. तोंपावेतों आमचे चित्तांत तुमचेठायीं ममतेस अंतर नव्हतें. ज्याप्रमाणें बाबांचे (महादोबा पुरंदरे) चित्तात तुमचा पक्ष त्याचप्रकारें आमचे चित्तात. कां कीं तुमची बाबाचे ठायीं निष्ठा तशीच आमचे ठायीं. तदोत्तर राजश्री स्वामींनीं तुम्हांस कीं त्यांस लिहून जवाबसे तें करावें, तेंही न करतां उफराटें, राज्यभारास युक्त, आम्हांस संमत, तुमचें हित ऐसा विचार अवलंबिला असतां, टाकून लांबणीवर घालून बसलेत, तुम्हांस काय म्हणावे ! बाबूजी नाईक, देवराव यांचा दरबारीं आम्हीं अभिमान धरिला, वेडेपणें अथवा शहाणपणें तेवढेंच तुम्हीं व बाबांनीं तटीं लावून राज्य बुडविलेंत, या शहाणपणास काय म्हणावे ! कलयुगांत खावंद तों वेडेच असतात, परंतु कार्यकर्ते शहाणे असतात, ऐसें ऐकत होतों, तेंही येथें विपरीत दिसून आलें. अद्यापही दुराग्रह टाकाल, विचारावर ध्याल, तर आमचा लौकिक राहील, राज्य वाचेल. येणेंप्रमाणे केलिया तुमचेंही बरें होईल. या उपरी मनापासून आईसाहेबांस समजावून, भरंवसा पुरवून, खालीं आणावी. नानानी तुम्हीं मिळोन राज्यकार्य चालवावें, आज नासर-जंग मेला, अशा प्रसंगांत तों मोठासा मनसबा केला पाहिजे. बाबा रागीट उठोन गेले. ( २५ डिसेंबर १७५० ), त्यास आमचा लौकिक मात्र

आहला. परंतु योडक्याच मजकुरावर आज एक वर्ष दुराग्रह वाढवून या थरास आणिलें. आतां तरी विचार करून, समयसूचकता कराल तर सर्व कुशल होईल. नाहींतर ईश्वरप्रमाण. आशीर्वाद. '' आंतील उल्लेखावरून हें पत्र स. १७५१ जानेवारीच्या आरंभींच लिहिलेलें आहे. [ खं. ६ ले. २४३ ].

रामराजास अटकेंत ठेवल्यावर पेशव्यांनीं काय काय प्रयत्न चालविले तें डिसेंबर १७५० च्या खालील पत्रावरून दिसून येतें. हें पत्र ( का. सं प. या. १८४ ) सदाशिवरावानें त्रिंबकनाना पुरंदरे यास साताऱ्यास लिहिलें. ' दाभाड्याकडील कारभार निर्गमांत न ये. मनसुब्यास तोड पडेना. तुम्हीं सर्वप्रकारें[1] राजश्री स्वामीचें लक्ष आपलेवरी कायम राही ते गोष्ट करणें. त्यांत अंतर पडूं न देणें. वर्तमान लिहिणें तें पुण्याकडे लिहित जाणें. आम्ही पंढरपुरापलीकडे आलों. पांचसहा दिवशीं तीर्थरूपांजवळ पोंचतों. साताऱियाचें बंड मोडलें पाहिजे. मूळ दाभाडे. तेथे कांहींच होईना, करीनात, मनासही न ये, संशयच वाढतात. यास्तव जाऊन नीट करून होईल तें लेहून पाठवूं. कान्होजीबावाजवळ मातुःश्रींचे भाव निघाले व राजश्रींचा निरोप वगैरे सर्व लिहिले तें कळलें. तुम्ही बोलतां ऐशास हा डौल कामाचाच नाहीं. मातुश्रींस नीट सांगून राजश्री सोडावे लागतील. त्याचें पुण्याहून लिहून पाठवूं त्याप्रमाणें करणें. मुख्य राजश्रींचा लगाम पुरता राहे तें करणें; हें काम तुमचे हातीं आहे. हजारो भौते नें खर्च वेच करून, वरतीं आपलीं मायेंचीं माणसें पाठवून लगाम राखणें. वरचेवर सर्वां मुत्सद्दियांचे भाव लिहिणें. मजबद्दल संदेह तुम्हांस वाटतो. ईश्वरी जुलूम आहे, असे न करणें.'

थोड्याच वेळांत गायकवाड साताऱ्यावर येऊन त्याचा पराभव झाला. तरी रामराजाची सुटका नाहींच झाली. गायकवाडाचा बंदोबस्त केल्यावर, 'मातुःश्रींनीं व राजश्रींनीं खालीं यावें, ये विशींचा प्रेत्न बहुता प्रकारें केला. त्यांहीं जे जे मुद्दे घातले तेही मान्य केले असतां, त्यांजकडून मानसिंग

1. ताराबाईचा भाचा कान्होजी मोहिते ( पहा सं. १ ले. १३९ ).

जाधव व आम्हांकडील मध्यस्थ महादाजी निंबाळकर व घोंडो गोविंद आले गेले. आम्हांकडील मध्यस्तांस गडावरी न घेतलें; आपलेकडील मध्यस्तांसही न घेतलें. आईसाहेब वसवासी फार; लोक व गडकरी यांचे चित्तांत आमचें सूत बनो न द्यावें. त्यांचें मनांत मातु:श्री व पेशवे एक झाल्यावर आम्हांस कोण विचारतो ! याजकरितां गडकरी यास नरम करावयाचा विचार केला आहे. होईल वृत्त तें लेहून पाठवूं. ' [ २२ मे १७५१ का. सं. पया. ले. ३५४ ]. ' ताराबाईशीं बिघाड पडल्यामुळें त्यांनीं नानाप्रकारें पेच केले. ज्यांशीं आम्ही गोड न बोललों, ते त्याचे लगामी; ज्यांशीं गोड बोललों, तोही त्यांनीं लटका लावून आपले लगामी लाविला. कोठें ताळ राहिला नाहीं. यास्तव आम्हीं कबूल केलें कीं, दादोबास प्रतिनिधि द्यावी. त्यांनीं सर्व कारभार करावा. गुजराथ कर्नाटकाची व्यवस्था आम्हीं केल्याप्रमाणें चालावी. त्यांनीं कबूल केलें; परंतु खालीं उतरल्यावाचून, भेट झाल्यावांचून जनांत नीट दिसत नाहीं, संशय तुटत नाहीं. यास्तव बहुतांप्रकारें आग्रह करितों. परंतु खालीं उतरतांच राजा पळून जाईल, अगर आम्हीं मागती राजास हातीं घरून आपणास मुरदाड करतील हा संशय मानून संकटांत आहेत. भोंवतीं भलताच गुरें वळवितो. पोटास एक पैसा येत नाहीं. सोनें रुपें मोडून खावें, येथपावेतों आलें. यास्तव मातबर मराठे मध्यस्थ घेऊन उतरावें, ऐसा करार झाला आहे. उतरलीं तर उत्तमः नाहींतर एका खाशानें दहा हजार फौजेनिशीं येथें असलें पाहिजे. मुरारजी घोरपडे व निजाम यांजकडे राजकारणें करितात. सर्व संभाळलें पाहिजे. गृहकलह कठिण आहे. तद्विषयीं कसें करावें! तुम्हांकडे मल्हारबाकडे देखील राजकारणें करितात ऐसें ऐकितों. त्यांस तुम्हांशीं राजकारण केल्यास काय होणें! परंतु यत्नास चुकत नाहीं. ' [ का. सं. पया. ३५३ ] हे पत्र नानासाहेबानें शिंद्यांस लिहिलेलें असून वरच्याच पत्राच्या वेळचें आहे. साताऱ्याची तजवीज सर्व नाना पुरंदरे याजकडे होती, तेथील राजकारणें व खटपटी यांची

माहिती हा पुरंदरे वारंवार पुण्यास नानास व सदाशिवरावास लिहून कळवीत असे. 'तुम्हीं बहुत सावधतेनें सर्व कामें करावयाचा काल आहे' असें लिहून सदाशिवराव लिहितो 'आमचीच रवानगी सातऱ्यास करावयाचा विचार आहे' (का. स. पया. १७३). तारीख ११ जून स. १७६१ रोजीं पेशवा ताराबाईजवळील आपला कारभारी दिनकर महादेव यास लिहितो. 'राजश्रीस अटकाव गडावर जाहला, यासाठीं इतके दिवस भांडलों. ज्यांनीं अटकाव केला, त्याचे दावेदार झालों. सर्व मातब्बरांचा डौल एकीकडे. एक आमचा मात्र निश्चय कीं, भांडून अथवा सलूखानें राजा सुटावा. ज्याचे चाकर म्हणविलें, त्यासाठीं मेहेनत करावी. मग जो बूज करून कृपा करील तेच विशेष. या अर्थे लाखों रुपये खाऊन आपले मनसुबे बुडवून, राजा सुटावा, या थरास आणिलें. सर्व बाईसाहेबांचे पक्षीं मिळाले होते एक आम्ही मात्र राजश्रींच्या पक्षींचे जाणून आमचे पारिपत्यास सर्व राज्यांतील सरदार प्रेरिले. गायकवाड तो सर्व देश लुटीत सातार्‍यासच आला. यामुळे भागानगर व कर्नाटकचीं कामें अफ्तर जाहली. इतके पदार्थ, राजश्रींचे सुटकेचे उपयोगास लागलों, यास्तव प्राप्त झालें. आतां गडावर सर्वाध्यक्षता राजश्रींची जाहलियाउपर आमचे मनोरथ बाकी राहिले नाहींत. मतलबाचे यादीवर करार त्यांनीं संतोषेंकरून देणें उचित. यद्यपि न दिल्हे तरी आम्ही त्यासाठीं आड यावें असें नाहीं, जेंव्हां खालीं येतील तेंव्हां सर्व सेवकाच्या रीती व आमचे स्थितीची तुलना करितील. तेंव्हां जें त्याचे खावंदगिरीस व कदरदानीस उचित तेंच करतील. राजाना वर बसविले होतें, यास्तव किल्ल्याशीं भांडत होतों. आता राज्याचा अखत्यार परिच्छिन्न जाहला असला, तर एके दिवसांत आमची फौज उठोन येईल. खाऊन बसावयाचे प्रयोजन काय! परतु सांगोल्याहून राजे गेले ते समयीं चि. नाना व चि. भाऊंनीं अर्ज राजश्रींस केला होता कीं, गडावर न जावें; परंतु आमचा अविश्वास यामुळें गेले. शेवटीं कर्मभोग, अपकीर्ति येथपावेतों जाहली. आतां राजे वर राहिले, आमचे फौजेस उठवून

लाविले, तरी मागती अनेक कल्पना व्हावयास अंतर होणार नाहीं. करवीरकरांकडील वगैरे पेंच बहुत आहेत. खावंद लोकांनीं जे हल्लीं तेथें मंत्र सागणार असतील, त्यांसीं दीर्घ विचारून जें करणें तें करावें. सर्वोत्तम पक्ष हाच कीं तिळमात्र संशय न धरतां राजश्रीनीं खालीं यावें. दिल्ली, इराण, तुराणपासून रामेश्वरापावेतों दुर्लौकिक जाहला आहे, तो दूर करावा. कारभाराचा अर्थ तर, जोरावारीने आजपर्यंत कोठेंही कारभार शेवटास गेले नाहींत. सर्व योग खावंदाची रजावंदी राखावी, हेच आमची इच्छा. खावंद आपले आवडीनें कारभार घेतील तेव्हांच करू कारभार करिता बहुताचा दावा पदरीं पडतो, तो दावा कशास पाहिजे! खावंदानी दिल्हे दौलतींत कारभार बहुत आहेत. नवा तोतया लबाडी करील यास्तव ठेविला, त्यास जिवें न मारावे, वरकड खात्रेस येईल तेथ ठेवावा, आमचा गुंता तिळमात्र नाहीं. खावंदानीं सुखरूप राज्य करावें. याप्रकारें बोलोन हवालदारास समजोन सांगोन खालीं प्रतिपदेस ( १३-६-१७५१ ) येत तें करणें. वेरझारेवर काम पडल्यास अनेक विघ्नं उपस्थित होतात. यास्तव रंग भरून त्याची निशा करून खालीं येत, आम्ही श्रम केलियाचें सार्थक होय तें करणे.' [ खं, ३-१३६ ]
या पत्रावरून पेशव्याच्या भावना चांगल्या व्यक्त होतात कारभाराचें ओझें पेशव्यानीं आपमतलबाने आपल्या शिरावर घेतलें, कीं जें काम दुसरा कोणी अंगावर घेईना, ते प्रसंग येत गेले, त्याप्रमाणें स्वतः करून राष्ट्रसेवा यथाशक्ति केली, याजबद्दलचा निर्णय ज्याचा त्याने करावा हें चांगले.

ताराबाईसंबंधानेही नानासाहेबाचा भाव किती आदरपूर्ण होता, हें खालील पत्रावरून दिसून येतें. हेंही पत्र वरच्याच काळचें असावें. हें सखो महादेव म्हणून ताराबाईचा कारभारी होता, त्यास लिहिलेले आहे. कदाचित् हा दिनकर महादेवाचा भाऊच असेल.

'तुम्हीं पत्र पाठविलें तें पावून संतोष जाहला. तुमचा समज आजच असा आहे असें नाहीं. पूर्वीपासून आहे. वरकड जें करतां तें बरेंच. त्याचा विषय

फार थोडा; परंतु मातुश्री बोलवीत नाहींत, कामकाज सांगत नाहींत, हें लिहिलें, हें तरी फारच चांगलें. असें या मागें कधीं जाहलें नाहीं. मुख्य मातुश्रीचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावी, त्यांचे मर्जीस विरुद्ध न पडे असें असावें. तें तुम्हीं आज लिहिलेवरून कळलें. याउपर काय म्हणावें ! खर्च-वेंच जसा मातुःश्री आज्ञा करतील तो करावा. मातुःश्रीस एखादा भीड घालतो, आपण समजून सांगावें, आज्ञेप्रमाणें वर्तणूक करावी. मातुःश्रीस संसार अगर सर्व विषय कळतो; तो तुम्हांस कळावयासी बहुत जन्म पाहिजेत. सारांश, मातुश्रीचे आज्ञेचा प्रकार, अगर मातुःश्रींनीं खर्चवेंच केला तरी उत्तम आहे. ते जें करितात तें समजून करितात. तुम्हांस मात्र समजत नाहीं, इतकाच अर्थ. जसें मातुःश्री सांगतील तसें करीत जाणें, म्हणजे लक्षजोड आम्हांस तुम्हीं दिली. वरकड संसार तुम्ही आपले तर्फेनें अधिक उणें समजोन करणें, हें आम्हांसच धार्जिणें नाहीं, तुम्हांस तरी हे प्राप्त कसें असावें, तें श्रुत नाहीं. जें चालतें तें बरेंच आहे. मातुश्री बोलावीत नाहींत, हें मात्र सर्वार्थी वाईट समजून, त्यांचे आज्ञेचा अर्थ समजोन वर्तणूक करणें.' [खं. ६ ले. २४२] ताराबाईच्या कोठीचें सामान आणणारे बैल कोणा अधिकाऱ्यानें अटकाविले, त्याचा निषेध करून पेशव्यानें ते लगेच सोडून दिले. ता. १० डिसेंबर स. १७५०. [ खं. ६-२१६ ]

८. ताराबाईशीं पेशव्याचा समेट—( स. १७५१ अखेर ).—ताराबाईनें वाटेल तितका त्रास दिला व कारस्थानें केलीं तरी नानासाहेबानें तिची कधीं सहसा अवज्ञा केली नाहीं. गायकवाडाचा बंदोबस्त केल्यावर पुनः पेशव्यानें ताराबाईचें मन वळविण्याचा प्रयत्न चालविला. तिचा मात्र फणफणाट यत्किंचित् कमी झाला नव्हता. ३ मे स. १७५१ च्या पत्रांतील तिची वृत्ति पाहण्याजोगी आहे. 'तुम्हीं फौजेसुद्धां येऊन परिघ घातला आहे, तो उठवून तुम्हीं स्वस्थळास जावें. तदनंतर जें बोलणें तें सांगोन, हरकोणी आपले तर्फेनें पाठवून द्यावा. त्यांसी जाबसाल करावा तो केला जाईल.' [ इ. सं. ऐ. टि. भा. १ ले ३५ ]. नुसतीं मनगटें चावण्या-

पलीकडे तिची करामत राहिली नव्हती. महाराजांस तिनें अटकेंत ठेविलें, ही गोष्ट सर्वांसच दुःसह वाटूं लागली. प्रतिनिधि, सचिव यांनाही तिचा वीट आला. शाहूनें ठरविलें काय, आणि एका वर्षांचे आंत प्रकार झाला काय, याची सर्वांस तळमळ लागली. 'महाराजांचे ठायीं पराक्रम, मनसवा, धैर्य, आगेजणी वगैरे गुण बहुत दिवस बाहेर लघुसहवासीं राहण्यानें, आले नाहींत, यामुळें आईसाहेबांचे अनाचार सारखे चालू राहणार, असें पाहून साताऱ्यानजीक दहा पांच हजार फौज दादोपंत वाघे[1] याच्या हाताखालीं चंदनवंदन किल्ल्याखालीं ठेवून दिली,' तेव्हां ताराबाईचें राजकारण बहुतेक बंदच झालें. तथापि तिचा उपद्व्याप चालूच होता. हात चालेल तेथें मामला अगर महाल विल्हेस लावावा, वसुलीस हुजरे आपले पाठवावे, कोणी मातबर कारभारी आढळल्यास संग्रह करावा, चिटणीस वगैरे जुन्या मंडळीचा द्वेष करून जवळ पुराणिक व बाबाजी जाधव, व चिटणिसी लिहिण्यास चिटणिसांकडील कारकून मोरो शिवदेव थिटे, यांचे हातें काम चालवूं लागली. इतराजींतील लोकांस बेड्या घालाव्या, डोचकीं मारावीं, खजिना जवाहीर मोडून लोकांस द्यावें, आपलें करणें सिद्धीस जात नाहीं याचा विचारच नाहींसा झाला. इकडे पेशव्यानें आंतून अनेक इसमांच्या मार्फत ताराबाईशीं लेखी सलूख करावा, असा घाट रचिला. तेव्हां चिंतो अनंत देवस्थळे व मोरो शिवदेव थिटे यांजबरोबर आपल्या अटी लेखी देऊन त्यांस ताराबाईनें पेशव्याकडे पुण्यास बोलणेंकरितां पाठविलें; आणि तुमचे विचाराबाहेर आपण चालणार नाहीं, असें कबूल केलें. ताराबाईनें दिलेलीं कलमें व त्याजवर पेशव्याचे जबाब असा हा तह दोन चार महिने घाटत होता. [ खं. ६ ले. २७६ चा कागद ह्याच तहाचा होय ] 'मतलबाचे यादीवर करार त्यांणीं संतोषें करून देणें उचित' असें वाक्य ११ जून स. १७५१ च्या पत्रांत [ खं. ३. १३६ ] आहे, ती याद हीच असावी. त्यावरून ह्याच दोन चार महिन्यांतला हा तह असावा.

---

१ याचाच मलगा पराशर दादाजी पानपतावर होता.

या तहांतील कलमांचा गोषवारा:—

तह श्री. मा. आईसाहेब यांशी रा. नाना पेशवे यांनीं करून दिल्हा. हस्ताक्षर मोरो शिवदेव थिटे कलम मखलासी खुद्द पेशवे यांचे हातची.

१ हुजूर मामल्याचा ऐवज शाहूचे कारकीर्दीप्रमाणें देऊन एकनिष्ठेनें सेवा करावी.

उ. मागील पैका मुदतीनें घ्यावा. साहेब खालीं आल्यावर पूर्वीप्रमाणें चालेल.

२ यमाजी शिवदेव वस्तभावसुद्धां हुजूर आणून स्वाधीन करावे.

उ. जामीन द्यावा, मुतालकी न सांगावी. कबूल असल्यास सोडून पाठवूं.

३ विष्णु विश्वनाथ व रामाजी केशव यांजपासून सेवा वाटली तर घेऊं नाहीं तर निरोप देऊं त्यांनीं सरकारचा हिशेब वारून द्यावा.

उ. वरकडाप्रमाणें यांजवरही कृपा करावी.

४ हुजूरचे खासगीचे महाल व गांव दुसऱ्यास दिले असतील ते परत करावें.

उ. राजेश्रीचे सनदेशिवाय जें जाहलें असेल तें न चालावें.

५ पंतप्रतिनिधींचे गड, ठाणीं व वस्तभाव हुजूर आणून द्यावी.

उ. राजेश्रीचे सनदेशिवाय जें गेलें असेल तें सर्व नीट करून द्यावें.

६ दाभाडे व गायकवाड मुलेंबाळेंसुद्धां हुजूर आणून द्यावें.

उ. साहेबांचे सनदेप्रमाणें सर्वांनीं वर्तावें. तें न करतां कलहवृद्धी केली. कलहांत ईश्वरें यशच दिल्हे; परंतु एक साल मात्र गेलें, पदरचे तीस लाख खाऊन पंचवीस लाखांची रोख निशा केली. निम्मी गुजराथ सनदेप्रमाणें दिल्यावर, सेवकाचा तिळमात्र गुंता नाहीं. साहेबांचें येणें खालीं होतांच उमाबाईस साहेबांकडे पाठवूं.

---

१ दाभाडे व गायकवाड मे १७५१ त कैद झाले; आणि ताराबाई ११ आक्टोबरास किल्ल्याखालीं आली. अर्थात् त्या दरम्यानचा हा तह असला पाहिजे.

७ किल्ले सिंहगड साहेबीं दिल्हा तो करार असे.

उ. उत्तम.

८ निम्मे गुजराथ साहेबीं कृपाळु होऊन तुम्हांस दिली. सरकारचा ऐवज निम्मे तुम्ही इकडेस द्यावा.

उ. अम्मल बसल्यावर देऊं. तूर्त तीस चाळीस पदरचे मान खादले. गुजराथेंतील एक पैका आला नाहीं.

९ हुजूरचे कारभारी गोविंदराव, यशवंतराव वगैरे तुम्हांकडे गेले आहेत, ते हुजूर पाठवावे.

उ. सर्व कारभाऱ्यांचे पूर्व गुणदोष एकीकडे ठेवून सर्वांपासून सेवा घ्यावी. वर्षा दोन वर्षां जो लबाडी करील त्यास दूर करावें. सेवकाचें आड नाहीं.

१०. हुजूरचे कारभारांत पेशजी चिरंजीवांचे कारकीर्दीस तुमचे विद्यमानें जो कारभार होत होता, त्याप्रमाणें तुमचे हातें घेतला जाईल; आणि जो हुजूरून होत होता, त्याजमध्यें तुम्हीं चित्त घालूं नये.

उ. थोरले महाराजांनीं कैलासवास केल्यावर साहेबीं सर्वां सेवकांपेक्षां सेवकावरच कृपा विशेष करून, सर्व अखत्यार दिला, इमानप्रमाण दिलें. आतां जी मर्जी असेल तें प्रमाण, दुराग्रह नाहीं.

११. किल्ले सातारा वगैरेचे तनख्याचे गांव लष्करचे लोकांनीं लुटून नेले ते भरून द्यावे.

उ. गनिमी लष्करची लूट येणें कळतच आहे. हवालदाराचे समजाविशीं करावयाची ती केली जाईल. [ खं. ६-२७६ ]

हा करार केवळ सवालजबाबाच्या स्वरूपाचा आहे. तो कायम होऊन उभयतांनीं पाळला, असें मुळींच नाहीं. रामराजास सोडविण्याचे पेशव्याचे इलाज व पेशव्याकडून कारभार काढण्याचे ताराबाईचे प्रयत्न स. १७५१ अखेर जोरानें व पुढील सालीं थोड्याबहुत अंशानें चालू होते. महाराजांस

अटकेंतून सोडण्यासंबंधानें किल्ल्यावरील रक्षक लोकही बरेच अनुकूल झाले. तेथील हवालदार आनंदराव जाधव ताराबाईस अनुकूल होता, त्याची सर्वांनीं निर्भर्त्सना करतांच, तोही महाराजांस खालीं आणण्याच्या उद्योगास लागला, त्यावरून ताराबाईनें हवालदारास खलबतास म्हणून बोलावून त्याचा शिरच्छेद करविला, लोक सरदार वगैरे फार मारले. [ १६ जुलई स. १७५१, खं. ६ ले. ५०० व धा. रा. च. ] परंतु यामुळें चाललेल्या वाटाघाटींत फरक पडला नाहीं. कराराअन्वयें महादाजी निंबाळकर, धोंडो गोविंद वकील व दिनकर महादेव ऐसे पेशव्यांनीं किल्ल्यावर पाठविले. बोलणीं होऊन ता. १३ आक्टोबर १७५१ रोजीं दोनप्रहरीं ताराबाई रामराजास घेऊन किल्ल्याखालीं उतरून फत्तेसिंग-बावाचे हवेलींत येऊन राहिली. ( पु. ऐ. पृ. ७२. ) पुढें महाराजांसह पुण्यास आली. परंतु महाराजांचें नांव काढूं नये, आपल्याच विचारें सर्व चालावें, आपणही प्रधानांचे विचाराबाहेर चालणार नाहीं, असें बोलणें होऊन, प्रधानांनींही मतलब साधावा हें मनांत आणून, आईसाहेबांची मर्यादा रक्षून मेजवान्या वगैरे केल्या. महाराजांनीं स्वतंत्र राहून राज्यभार चालवावा हा विचार करून बोलून पाहिलें, तें मर्जीस न मानें. [ धा. रा. च. ] तेव्हां त्रिंबक विश्वनाथ पेठे यास बरावर देऊन पेशव्यानें त्याची सातान्यास रवानगी करून दिली. किल्ल्यावरची हवा मानवत नाहीं; म्हणून फत्तेसिंग भोसल्यांचा वाडा लगत तयार करून तेथें राहिली. त्रिंबक सदाशिव पुरंदरे पोटदुखीच्या व्यथेनें आजारी पडून आणि बायको वगैरे वारल्यामुळें घरीं पुरंदरास गेला असावा. म्हणून त्याचे जागीं पेठ्यांची नेमणूक झाली. यावेळीं गोविंदराव चिटणीसही सातारचे कारभारास कंटाळून पुण्यास राहिला. रामराव शिवाजी व लक्ष्मणराव गोविंद हे दोन लहान मुलगे सातान्यास चिटणिशीवर राहिले.

ताराबाईशीं समेट चालू असताच, महाराजास सोडवून त्याजकडून राज्यकारभार चालविण्याची शिकस्त पेशव्यानें करून पाहिली, आणि

शेवटीं तो नाद त्यानें नाइलाजानें सोडून दिला. स. १७५१ ता. २७ जून रोजीं नानासाहेब लिहितो. ' रा. स्वामी आईसाहेबांचे हातून सुटले, यास्तव तेथील फौज काढिली असे. कांहीं दिवशीं सुमुहूर्तें खालीं येणार. गुजराथेंतील ठाणीं मुलूख हवालीं करावा, मग सोडावें, असा करार शपथ-पूर्वक दमाजी गायकवाडांनीं केला, यास्तव फौज देऊन विठ्ठल शिवदेव रवाना केले. बोलल्याप्रमाणें ( दमाजी ) वर्तले तर उत्तम, नाहीं तर जबरदस्तीनें घेतच आहो.' [ खं. ३–ले. ३८५ ]. परंतु रामराजाची सुटका वरप्रमाणें झाली नाहीं. [ खं. ६ - ले. २३९ ] तथापि त्याच्या नादास लागण्यांत आपणासही फायदा नाहीं, अशी ताराबाईची खात्री झालेली दिसते [ खं. ६ ले. २३२ ]. लष्कर पाठवून जबरदस्तीनें काढून न्यावा, अशीही खटपट झाली. बळवंतराव गणपत मेहेंदळे यास बहुधा त्याजकरितां सातान्यास पाठविलें. ता. १९ डिसेंबर १७५१ रोजीं सदाशिवराव बळवंतरावास लिहितो. ' याच्यानें राजे खालीं किती दिवसांत उतरतात, किंवा आम्ही लिहितों, याची नाना पुरंदऱ्यास लबाडीच वाटून उगेंच राहतां तेंही लिहिणें. ताराबाईनें बंड उभें केलें तें मोडून उतरावें, हरएक, मनसुबा बावानानांनीं एक होऊन करावा, असे बोलले होते. बरकड खावंद आहेत. चित्तास येईल तें करतात. नानांनीं माझा संदेह बाळगूं नये. " [ खं. ६ ले. २३४ ].

स. १७५१ च्या नोव्हेंबर डिसेंबरात निजामानें पुण्यावर चाल करून पेशव्याची तारांबळ उडविली, त्या वेळीं नानासाहेबानें रामराजाचा नाद सोडून ताराबाईसच थोडेंबहुत मिळवून घेतल्यासारखें दिसतें. पेशव्याचे मदतीस ताराबाईनें जगजीवन ऊ० दादोबा प्रतिनिधीस पाठविलें आणि ' आर्विधांचा पराजय करून तुम्ही हुजूर येणें;' म्हणून पेशव्यास कळविलें. त्यावर पेशव्यानें ताराबाईस खालील जबाब पाठविला. ' प्रतिनिधीबरोबर फौज नाहीं; व आपल्याजवळही या समयांत मातबर मनुष्य असले पाहिजेत. याजकरितां प्रतिनिधीस हुजूर नेऊन तेथील बंदोबस्त करावा, सेवकास

शामिल व्हावें; म्हणून सर्व सरदारांस पत्रें पाठविलीं, तीं उत्तम आहेत. साहेबांचा पुण्यप्रताप सेवकाचे मस्तकीं असतां, कोणेविशीं मोगलांचा डर धरीत नाहीं. जें होणें तें धन्याचे प्रतापें करून होईल.' [ डिसेंबर २१– स. १७५१ खं. ६ ले. २३५ ]. प्रतिनिधीस ताराबाईनें पेशव्याचें मदतीस म्हणून पाठविला असेल, पण वेळेवर तो निजामासच शामील होणार नाहीं कशावरून ! अशी पेशव्यासही भीति होतीच.

ताराबाई आणि नानासाहेब यांचा लेखी करार होऊन उभयतांचा सलूख झाला. रामराजाशींही पेशव्याचें बोलणें होऊन संशयनिवृत्ति झाली. तरीं पुढें पेशव्यास अनेक प्रसंगीं त्यांच्या कृतीचा संशय येत असे. त्याचा एक मासला येणेंप्रमाणें आहे:—

'राजश्री बाळाजी पंडित प्रधान यांसी पत्राचें उत्तर जे. 'राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापति व सेनाखासखेल पुण्याहून [१७ नोव्हेंबर १७५१ रोजीं ] पळोन गेले, ते सातारा आले असतील. येथें आल्यामुळें तुम्हांस साहेबीं निमे गुजराथ दिली; व त्यांनीं तुम्हांशीं करार केला, त्यांत येथील आस्था करून केल्या करारांत अंतर पाडतील व साहेबही त्यांचें अगत्य धरतील म्हणून तुम्हांस संशय जाहला आहे, म्हणून हुजूर विदित जाहलें. ऐशियास सेनापति व सेनाखासखेल हुजूर आले नाहींत, कदाचित् आले असते, तथापि तुमचे नुकसानाचा प्रकार सहसा न घडतां, तुम्हांस येथील संशय होतात, याकरितां बेलभंडार पाठविला. अद्यापवर संशय धरितां हे गोष्टी न आणणें. साहेबांची कृपा अंत:करणापासून तुम्हांवरी जाहली, कांहीं किल्मिष राहिलें नाहीं. तुमचें न्यून तेंच पूर्ण करावे, हेंच आवश्यक जाणून शत्रूचा उपमर्द तुमचे हातून करवावा. त्याचे साहि यास राज्यांतील सरदार अनुकूल व्हावे; म्हणून आज्ञापत्रें व हुजरे रवाना केले, मागाहून वरचेवर आज्ञापत्रें व कारकून रवाना केलें. रात्रंदिवस तुमचे साहित्याचीच तर्तूद होत असते. याउपरी येथील कोणे गोष्टींविशीं संशय न धरितां निःसंशय होऊन शत्रूचा पराजय करणें. सेनापति पळाले, त्याचे कांहीं संशय धराल

तर, जर धरणें कोठेंही गेलें तथापि निंमे गुजराथ तुम्हांस दिली, व त्यांनीं पैका कबूल केला तो त्यांस सुटतो असें नाहीं. त्यास ताकीद करून देविला जाईल.' [ २५-११-१७५१ शा. म. रो. ११५ ] याच मासल्याचें तारीख २६ नोव्हेंबरास नानासाहेबानें ताराबाईस लिहिलेलें पत्र आहे. ' रा. यशवंतराव दाभाडे सेनापति व सेनाखासखेल बाबूराव दाभाडे सातान्यास आले नाहींत. तुम्हीं किमपि संशय न धरणें. तुम्हांस निंमे गुजराथ दिल्ही ते दिल्ही. शत्रू आला त्याच्या पराभवास्तव व सरदारांस सामील व्हावयाविशीं पत्रें हुजरे पाठविले आहेत. म्हणोन आज्ञा. त्यास सेनापति हुजूर जाते, तऱ्ही साहेब ताकीदच करतील.' [ खं. ६-२३२. ] त्रिंबकराव पेठ्यानें तजविजीनें ताराबाईस खूष राखून आपला मतलब साधिला. किल्ल्यावरचे पूर्वींचे लोक हळू हळू दूर करून आणि ताराबाईनें दिलेलीं बाक्षिसें वगैरे परत घेऊन, नवीन इसम दाखल केले. सिंदखेडकर बाबाजी जाधव यास तिच्या कारभारांतून काढिलें. देवस्थळे, थिटे वगैरे मंडळींस इनामें इत्यादि देऊन आपल्या पक्षांत आणिलें; आणि हलके हलके रामराजास ताराबाईच्या कैचींतून काढण्याचा त्याचा विचार होता. परंतु रामराजाचीच तयारी नसल्यामुळें तूर्त ताराबाईच्याच सल्ल्यानें सनदापत्रें वगैरे कारभार चालूं लागला; आणि तिची मर्जी राखून पेठ्यानें बंदोबस्त केला. आपणास पाहिजे ते देतात व आज्ञेंत चालतात असें पाहून, ताराबाईनें बाहेरचीं कारस्थानें थोडीबहुत सोडून दिलीं. प्रधानपंतही वरचेवर मसलतीस व दर्शनास येऊं लागले. स. १७५१-५२ त निजामानें स्वारी केली असतां, त्याचा बंदोबस्त केल्याबद्दल ताराबाईनें मार्च १७५२ च्या एका पत्रांत पेशव्याचें अभिनंदन केलें आहे. (भा. व. पु १ ऐ. प. या. ले. ६१ ).

सातान्यास चालचलाऊ बंदोबस्त होतांच नानासाहेबानें बाह्य कारभार हातीं घेतला. ताराबाईस खूष ठेवण्याकरितां मोठमोठ्या घडामोडींची बातमी तो तिला कळवीत असे. [ पहा, २८ ऑगस्ट १७५२ चें

नाना०चें पत्र इ. सं. ऐ. टि. भाग ६ ले. ८ ]. परंतु ताराबाईचा स्वभावच खोडसाळ व उपद्यापी असल्यामुळें, कसाही मनधरणी करणारा असला तरी त्याच्याशीं तिचें जमत नसे. म्हणूनच शाहू व संभाजी यांनीं तिला सदैव प्रतिबंधांतच ठेविलें. पण तशी गोष्ट पेशव्यास शक्य असूनही लोकलज्जेस्तव करतां येत नव्हती; आणि रामराजांत कर्तृत्व नसल्यामुळें, ताराबाईशीं झोंबी करण्याचा पेशव्यास एकसारखा प्रसंग येऊन, त्याचेवर स्वामिद्रोहाचा आरोपही आला. ता. ३१ मे १७५२ रोजीं पेशवा चिटणीसास लिहितो:—

'साहेबांशीं राजकारण करून, त्यांचे संशय दूर करून जसें प्रशस्त वाटे तसें राज्य करीत, दुर्लौकिक दिल्ली पावेतो न होय ऐसें हरएक तजविजीनें करणें. आमचा अर्थ तरी, जें खावंदानें दिल्हें तें खाऊन, चाकरीस हजर राहून जें काम सांगतील व आपल्यानें होईल तें करूं. आईसाहेबांनीं सुखरूप आपले खातेरेस येईल, तसे कार्यभाग करावे. या विचारें बोलून वसवास दूर होय ऐसें करणें. नच होय तर आम्ही व आमच्या पक्षींचे जे मनापासून असतील ते, उदासरीतीनें हरामखोरी न करितां, आपलें सांभाळून, आम्हांसहवर्तमान राहतील. ज्याची जे क्रिया असेल तसें फल होईल. आमचा अर्थ तर दोन वर्षे कर्जदार जाहलों. आतां आम्हांस दरबारचे तेलाभिठाच्या कारभाराचा उत्साह नाहीं.' [ खं. ६ ले. २५६ ] यावरून राज्यकारभाराची विवंचना पेशव्यास किती जाचत होती आणि त्यांत त्याचा कांहीं स्वार्थ साधत होता कीं काय ह्याची स्पष्टता होते.

प्रतिनिधीला पेशव्यांनीं ताराबाईचे पक्षांतून बहुतेक फोडलेंच होतें. त्याचा मुतालिक यमाजी, त्याजवरही ताराबाईची इतराजी झाली होती. कारण दमाजी गायकवाडाची पेशव्यांनीं खोड मोडिल्यावर त्यांजपुढें समोर विरोध करण्यास सहसा कोणी धजले नाहींत. पेशव्यांनीं प्रतिनिधीस कर्नाटकांत कामगिरीवर पाठवून युक्तीनें तोंडघशीं पाडिलें. 'दादोबा प्रतिनिधि सावनूरच्या मोगलांपासून खंडणी घ्यावयास गेले होते. त्याचें

मदतीस नारायण व्यंकटेश घोरपडे यास रवाना केलें. प्रयोजन कीं मोगलांसही चार गोष्टी सांगोन दादोबांस तोंडघशीं पाडावें. तूर्त दादोबाचा आमचा थोडासा स्नेहही आहे. आम्हीच सावनूरच्या मोगलांस सांगून व आपली फौज दुतर्फा डौल दाखवून फशीं पाडलें, हें दादोबास ठाऊक नाहीं. कागद आमचे कोणास दाखवीत न जाणें.' [ का. सं. प. या. ले. ३८४ ] २५ मे १७५२ रोजीं हें पत्र रघुनाथरावानें जयाजी शिंद्यांस लिहिलेलें आहे. अशा कपटवर्तनानेंच पेशव्याच्या कारभारावर पुष्कळसे लोक त्यावेळीं रुष्ट झाले असले पाहिजेत. याच सुमारास यमाजी शिवदेव साताऱ्यास गेला होता. 'यकार नामक किन्हईहून साताऱ्यास गेले आहेत. त्यांचे बंधु सुटोन सातारां आले.' जून ता. २७ स. १७५२ खं. ३ ले. ३९५ ]. परंतु यमाजी दंगेखोर आहे अशी पुढें ताराबाईचीही खात्री झाली. सिलिमकर देशमुखास ताराबाईचें आज्ञापत्र ता २९ जानेवारी स. १७५४ चें आहे तें असें. 'यमाजी शिवदेवांनीं जावळीप्रांतें फौज पाठवून दंगा केला आहे, त्यांचें पारिपत्य करणें साहेबांस आवश्यक जाणून तुम्हांस आज्ञापत्र सादर असे. तुम्ही, कंक, मालुसरे, खोपडे व जेधे ऐसे एकत्र होऊन, समस्त सरदारास सामील होऊन गनिमांस धुडावून देणें' [ ख. १७ ले. ४१ ].

ताराबाईचे खेळ चालूच होते. दादोबा व यमाजी आपल्या उपयोगीं पडत नाहींत असे पाहून तिने बाबूजी नाइकास साताऱ्यास आणून त्याला प्रतिनिधि पद देण्याचें कबूल केलें. 'हजार पांचशें जमाव करून ते प्रतिनिधीच्या वाड्यांत उतरले; आणि हुजूरचीं पथकें घेऊन प्रतिनिधीचा तालुका घ्यावयास गेले, तों जगजीवनराव ऊ० दादोबा चालून आले. तांदुळवाडीनजीक लढाई मातबर झाली. नायकास जखमा लागल्या. पळून शहरात येऊन राहिले. पिच्छावर प्रतिनिधि येतांच, आपलें करणें सिद्धीस जावयाचें नाही समजोन बारामतीस निघोन गेले. नायकाचा व यमाजीचा झगडा पुढें वर्ष सहामहिने चालूच होता. [ शा. म. रो. २३४,

२४३, २४४ ]. पेशव्यांचे विरुद्ध वागण्यांत नायकांचा हेतु कर्नाटकाबद्दल सूड घेण्याचा दिसतो मात्र तो फारसा दूरदृष्टीचा नव्हता.

ता. २५ जानेवारी १७५३ रोजीं पेशवा लिहितो. [का. सं. प. या. १४] ' बाबूजीनाईक सातान्यास जाउन आईसाहेबांचे विचारांत मिळाले. आमचा अपकर्ष इच्छितात. उपद्व्याप करितात आमच्या सरदारांकडे येऊन बुद्धिभेद करून त्यांस सातान्यास न्यावे या विचारास आले होते. परंतु सरदार गेले नाहींत. नाईक माघारे गेले. त्याचेविशीं आमचे चित्तांत तो कांहीं नव्हतें. त्यांहीं होऊन गडबड मांडिली आहे. ते आपले कर्मानुरूप फळ पावतील. वरकड आईसाहेबांचा विचार तरी आमचें न्यून पाहतात. सरदारांशीं भेद, मोगलाईत राजकारणें करितात कोणेंप्रकारे आमचें वाईट व्हावें या विचारांत आहेत. ईश्वरच आमच्या बऱ्यावर असल्यास त्यांणीं इच्छून होणें काय! आपले आशीर्वादेंकरून सर्व शत्रु शमता पावान जो लाभ होणें तो होईल.

रघूजी भोसल्याकडेही ताराबाईचें संधान होतें. परंतु तो धूर्त व समयज्ञ, तिच्या नादीं थोडाच लागणार! स. १७५२ त जानोजी भोसळे पुण्याकडे येणार असें ऐकून, ताराबाईनें रामराजा व सातारा यांचा बंदोबस्त बाबूराव जाधवास सांगून आपण पुण्यास प्रयाण केलें. जानोजीबरोबर त्याचा भाऊ बिंबाजीही असून, त्या बिंबाजीस मोहित्यांकडील सोयरिकी केल्यामुळें तो ताराबाईचा आप्त लागत होता. पुण्यास ताराबाईची उत्कृष्ट व्यवस्था ठेवून तिजकडून पेशव्यानें पूर्वीचा करार कायम करून घेतला. 'मात्र वचनाप्रमाणें चालेन अशी जेजुरीस जाऊन देवासमक्ष पेशव्याने शपथ घ्यावी अशी तिनें अट घातली. पेशव्यानें उलट अट घातली कीं बाबूराव जाधवास ताराबाईनें नोकरींत ठेवूं नये ' उभयतांनीं या अटी कबूल केल्या. ता. १४ सेप्टेंबर स. १७५२ रोजीं जेजुरीस ताराबाईसमक्ष पेशव्यानें शपथ घेतली. रामराजा ताराबाईच्या अटकेंतच राहिला, परंतु इफ् म्हणतो, हीच गोष्ट पेशव्यांस हवी होती. जेजुरीच्या ह्या भेटींतच ताराबाईनें कळविलें कीं ' हा राजा सत्य नाहीं. संभाजी महाराजांस आणून तख्तावर बसवावें. राजा

अस्सल नाहीं म्हणोन आईसाहेबांनीं साफच सांगितलें. आईसाहेबांचे मनांतील किलाफ दूर होऊन यांचे मनोदयानुरूप राज्य कारभार करावासा आहला. उभयपक्षीं विकल्प उठोन निःशैल्य जहालें. याउपरींचे मनसुबे होणें ते करवीरनिवासी आल्यावर पुण्यांत होतील. हे राजा अस्सल नव्हे, म्हणून मराठे यांजपाशीं शपथपूर्वक सांगितले.' [ खं. ६ ले. २५७ ]. या वेळेपासून उभयतांनीं रामराजाचा नाद सोडून संभाजीस आणण्याचा विचार चालविला. तथापि ताराबाईची धुसपुस आणि पेशव्याच्या व तिच्या तक्रारी सारख्या चालू होत्या. खालील १५-५-१७५८ चें पत्र पहा. नानासाहेब ताराबाईस लिहितो. [ इ. स. पे. द. मा. ले. ८ ].

'साहेबीं प्रथम मजला वचन दिलें कीं सर्व प्रकारें तुमचा विश्वास, तुम्हीं नातवापेक्षां साहेबांस अधिक. असें असतां साहेबीं गायकवाडास हुजूर आणिलें; रामदासपंतास कागदपत्र लिहिले. बापूजी नाइकास नेलें. यमाजीपंताचें पारिपत्य योजिलें. रात्रंदिवस सेवकास विरोध पडे ऐसीं राजकारणें होत जातात. मोंगल केवळ हिंदु राज्याचा शत्रु, त्यास देखील अनुसंधानें होत असतां, सेवकच वांकडे वर्ततात हा दोष साहेबीं आज्ञापत्रीं लिहून सर्वांशीं बोलतात.' नानासाहेबानें जबरदस्त आरोप केले त्यांजवर ताराबाईचा जबाब किती लंगडा आहे पहाः— 'साहेबाची तुमचे ठायीं पूर्ण कृपा, म्हणूनच पुण्यास साहेबांची स्वारी झाली होती, कीं येणेंकरून तुम्हास संतोष व्हावा आणि साहेबीं प्रारंभापासून घडत आलें, त्याची निव्वळ आज्ञा करावी. चित्तांतील आशय निष्प्रांजल आज्ञा कर्तव्य ते करावी, ऐसें साहेबांस दिसून आलें. ये निमित्त श्रीशिखर-यात्रेच्या उद्देशेंकरून स्वारी झाली तेव्हांच दर्शन घेऊन किल्ले सातारियावर मुक्काम झाला. त्यानंतर तुमचे विचारें वे. शा. नारायणबोवा विद्यमानी असतां किल्ल्याहून खालतें येणें झालें. तुम्हांकडून मध्यस्थीस महादाजी निंबाळकर व दिनकर महादेव नेहमीं हुजूर होते. साहेबांचा हेतु कीं तुम्हांस दर्शनांतीं आज्ञा कर्तव्य ते करून, राज्याचा बंदोबस्त करावा. हेंच धनी यांचें

मानस. तों तुमचा दर्शनास यावयाचा योग आजपर्यंत घडून न आला. दिवसें दिवस विक्षेपावरच गोष्टी पडल्या. आतांही या क्षण पावेतों साहेबांचे वचन जें प्रारंभीं दिधलें आहे तेंच प्रमाण आहे. तुम्हीही साहेबांस आपल्या आराध्यदेवतेच्या दूर्वा व बेलभंडार क्रियापुरःसर दिल्या आहेत, त्याचें स्मरण असों देणें. राज्यकारभाराचा अखत्यार तुम्हांवरच आहे. तुम्हांपेक्षां दुसरा सेवक उपयोगी सांप्रतकालीं कोण ? सर्व राज्यकारभाराचें कामकाज तुमचेच हातें व्यावें हेंच साहेबांचें मानस. एतदर्थी चित्तांत किमपि संशय न धरणें.' या उपर नानासाहेब लिहितो, 'वडुथावर सेवक दोन वेळां आला, परंतु कृपा न केली. समीपवर्ती यांनीं संशय घातले, तेच साहेबांचे मनांत आले. पुढें कोणे भरंवशावर यावें कळतच आहे. मन औदार्यें करून संशय टाकून कृपा केलीया सर्व गोष्टी उत्तम होतील." यासही ताराबाईचा जबाब असाच उडवाउडवीचा आहे.

शेवटीं शेवटीं ताराबाईची व पेशव्याची बरीच गोडी झालेली दिसते. ता. २३ जून स. १७५८ चें ताराबाईचें पेशव्यास आज्ञापत्र येणेंप्रमाणें आहे. 'चिरंजीव शाहूबावा यांसी कैलासवास जाहलिया नंतर, साहेबांत व तुम्हांत कितेकांनीं नानाप्रकारें विकल्प घालून राज्यांत बखेडे केले, येविशीं सदाशिव दीक्षित ठकार यांणीं श्रमसाहस करून साहेबांचें व तुमचें एक लक्ष करून बंदोबस्त केला, त्यावरून राज्योपयोगी मनुष्य ऐसें जाणून इनामगांव पंधरा सहस्र रुपयांचें द्यावें व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें चालवावें." [ खं. ११-ले. ११३ ].

९. कोल्हापुर गादीसंबंधानें पेशव्याचे उद्देशः—अशी ही उभय-पक्षीं भानगड उभयतांच्या अखेरपर्यंत चालली होती. नानासाहेबाच्या मनांत आरंभापासूनच संभाजीला सातारचे राज्यावर आणून आपसांतील दुही मोडावी हा विचार किती प्रबल होता हें मागें सांगितलेंच आहे. शाहूनें तो अमलांत आणिला नाहीं, त्यामुळें नानासा०चा नाइलाज झाला. पुढें रामराजाचे अंगीं कर्तृत्व नाहीं हें दिसून येतांच, आणि ताराबाईच्या

कारस्थानांनीं भंडावून सोडलें तेव्हां, राज्याला कोणी लायक धनी असावा, तरच त्याच्या हुकमतीखालीं मराठशाहीचा कारभार सुरळीत चालेल अशी पेशव्याची खात्री होऊन तसा प्रयत्न करण्याचे प्रसंग त्यानें वायां जाऊं दिले नाहींत. सदाशिवरावास पेशवाई देण्याचा संभाजीनें बेत केला, तेव्हां गृहकलहामुळें पेशव्यास ती गोष्ट लगेच कबूल करतां आली नाहीं. तरी, पुढें त्यानें स्वतःच संभाजीची समजूत करून त्याचीही पेशवाई आपल्याच नांवानें मिळविली. कारण पेशवाईसाठींच दोघे भाऊ झगडूं लागले असते तर, दोघां छत्रपतींच्या भांडणांत ही एक नवीन ज्यास्त भर पडून तींत मराठशाहीचीच इतिश्री झाली असती. तेव्हां नानासा०नें सामोपचारानें सदाशिवरावाची व ताराबाईची समजूत काढिली; आणि स. १७५४ च्या कर्नाटकस्वारींत जातांना व परत येतांच नानासा०नें कोल्हापुरास जाऊन संभाजीची गांठ घेतली. संभाजीची समजूत काढणें त्यास भाग होतें. कारण रामराजाइतकाच त्याचाही सातारच्या गादीवर हक्क होता; परंतु हीं राज्यें एक करण्यास संभाजीचा व विशेषतः त्याची बायको जिजाबाई इचा विरोध मोठा होता. ताराबाईचा जाच त्यांस नको होता, आणि सातान्यास चाललेली रामराजाची हालत त्यांस पूर्ण अवगत होती. परंतु नानासाहेबानें ही दुही मोडण्याचा उद्देश आपल्या दृष्टीपुढें ठेवलेलाच होता. वरील भेटींत संभाजी व त्याच्या राण्या याजशीं नम्रतेनें व आदरानें वागून, सर्वांची मर्जी पेशव्यानें किती सुप्रसन्न करून घेतली हें खालील वर्णनावरून व्यक्त होईल:—

'सन खंमस खमसैन, शके १६७६, राज्याभिषेक श. ८१ सालीं श्रींचें व शंभुछत्रपतीचें दर्शन घेण्याचा बेत पुणें मुक्कामीं ठरवून बाळाजीराव व सदाशिवराव फौजेसुद्धां पुण्याहून निघाल्यावर, विनंतीपत्रें देऊन महाराजांकडे वकील पुढें पाठविले. नंतर महाराज खाशा महालच्या स्वाऱ्यांसह पन्हाळ्याहून करवीरास आले. प्रधानांची स्वारी कऱ्हाडाहून निघून कोल्हापुर नजीक पंचगंगेवर राहिली. दुसरे दिवशीं महाराजांची स्वारी हत्तीच्या अंबारींत बसून पंचगंगेच्या अलीकडे कोस दोन कोसांवर आपल्या डेऱ्यांत दाखल झाल्यावर

प्रधानाकडील तोफखाना सुरू झाला. पंडित प्रधान महाराजांच्या डेऱ्या नजीक आल्यावर पायउतारा होऊन डेऱ्याच्या दरवाज्यांत हात जोडून हातांवर रुमाल घालून महाराजांच्या सदरेनजीक येतांच, सरकारांनीं प्रधानांचे अंगावर भरगची चादर प्रतिनिधीकडून घातल्यावर दोनही हातांवरील रुमाल काढून महाराजांचे पायांवर मस्तक ठेवून नंतर जोहार केल्यावर, बसावें म्हणून आज्ञा झाल्यावर, प्रधानांनीं मर्यादेप्रमाणें बसून, आपलेकडील सरदार मानकरी यांजकडून सरकारास जोहार करवून दर्शनें करविलीं. नंतर महाराजांची स्वारी हौद्यांत जाल्यावर बाळाजीराव व सदाशिवराव उभयतांहीं खवासखान्यांत बसून हातांत मोर्चेलें घेऊन उडवीत असतां स्वारी करवीरीं आली. [ का. सं. प. या. ले. ४०८ ] — महाराजांची स्वारी चालती होतांच पंडित प्रधान यांचे फौजेनें दोनही बाजूंस फेर धरून पद्धती अन्वयें मुजरे केले. महाराजांची स्वारी शहरांत येऊन पोंचल्यावर पंडित प्रधान यांणीं डेऱ्यांत जाण्याविषयीं महाराजांची आज्ञा घेऊन श्रीचें दर्शन करून पंडित प्रधान आपले डेऱ्यास आले.

---

१ हा काळ जानेवारी १७५४ असावा. मोडकरुत को. इ उत्तरार्ध भाग १ ले. ७, खरेकृत इचल० इ० पृ ७८ पुरंदरे रो० ( खं ६ पृ. १०६ वर खालील उल्लेख आहे. ' ज्येष्ठ शु॥ १४ सोमवार शके १६७६ भावनाम सं. [ ३ जून १७५४ ] रोजीं बाळाजीराव प्रधान व भाऊ कर्नाटकची स्वारी करून गजसिंह व मिरज घेऊन संभाजीराजे यांची भेट घेऊन, जेजुरी व थेऊर करून, पर्वतीस जाऊन, तेथें दहा घटका रात्र टाळून अकरावे घटकेस घरास दाखल झाले. ' ) १६ मे पासून २३ मे पावेतो पेशव्याचा मुक्काम मिरजेजवळ होता असें रोजनिशीवरून दिसतें. ह्याचवेळीं १८ मेला यशवंतराव दाभाडे मरण पावला. पुण्याहून कर्नाटकांत जातांना व पुनः परत येतांना अशा दोन भेटी पेशव्यानें संभाजीच्या घेतल्या असें दिसतें. स. १७५४ च्या जानेवारींत पेशवा कोल्हापुरच्या बाजूस गेल्याचा रोजनिशींत उल्लेख नाहीं. ही तफावत सोडविली पाहिजे.

पंडित प्रधानांचे डेरे रंकाळ्यानजीक बागेंत शेतवडींत दिले होते; आणि सरदार लोक व मानकरी लोक यांचे डेरे पद्धतीप्रमाणें फौजेसुद्धां पंचगंगा किनारेनीं झाले होते. पंडित प्रधान यांचा फौजेसुद्धां करवीरीं मुक्काम वीस पंचवीस दिवस झाला. ते समयीं महाराज सरकारांत पंडित प्रधान यांणीं विनंती करून सदाशिवराव चिमणाजीस प्रधानपद देऊन वस्त्रें दिलीं. त्यावेळीं महाराज सरकारांतून किल्ले पारगड, भवानगड, वल्लभगड, भिवगड व सामानगड दिल्हे. पैकीं चार गड पंडित प्रधान यांच्या हुकमांत वागले. किल्ले सामानगडकरी हे पंडित प्रधानांचे हुकमांत वागले नाहींत.

नंतर सावनूर मुक्कामाहून कूच होऊन पंडित प्रधान फौजेसुद्धां परत निघून महाराज सरकारचे सरहद्दीस येऊन पोंचल्यावर महाराज सरकारांत विनंती करून श्री. स. सौ. सं. जिजाबाईची खासा स्वारी सरंजाम-सुद्धां करवीराहून निघाली. तेव्हां पंडित प्रधानाची स्वारीही दरकूच जात होती. ते समयीं कऱ्हाडानजीक श्रीकृष्णातीरीं उतरल्यावर पुढें एक दोन मुक्कामावर वळवाचा पर्जन्य अकालीं फार पडला. त्या मुक्कामास जिजाबाईसाहेब यांच्या खास स्वारीच्या डेऱ्यापुरती जमिनींतील भिजलेली माती कामाठी यांजकडून पंडित प्रधान याहीं काढवून कोरडी जमीन करवून डेरे दिले; आणि स्वारीचे ताटाची तयारी होईपर्यंत पंडित प्रधान डेऱ्यात राहून, आज्ञा घेऊन आपल्या डेऱ्यास गेले. पुढें दरकूच होऊन स्वारी पुणें मुक्कामीं दाखल झाल्यावर दररोज स्वारीचे दर्शनास पंडित प्रधान येत होते; आणि पंडित प्रधान यांचे कुटुंबाच्या स्वाऱ्या दररोज स्वारीचें दर्शनास येऊन, खाशी ताटें होईपर्यंत राहून, स्वारीचें सुख झाल्यावर, आपल्या हातांनीं स्वारीच्या पायांची सेवा करून आज्ञा घेऊन आपल्या वाड्यास जावें, असा नेम, स्वारी पुणेंमुक्कामीं असेपर्यंत होता. पुणें मुक्कामीं पं. प्र. नीं आपल्या दौलतीचें सर्व ऐश्वर्य दाखवून स्वारीची मर्जी संतोषित केली. नंतर जिजाबाईसा०ची स्वारी करवीरास येण्यास

निघाली, ते समयीं पं. प्र. नीं आपलेकडील सरदार फौजेसुद्धां स्वारी-समागमें दिल्यावर स्वारीचें कूच होऊन मजल दरमजल करवीरास दाखल झाल्यावर पं. प्र. कडील सरदारांस सरकारांतून वस्त्रें देऊन परत जाण्यास आज्ञा झाली.' [मोडक कृ. को. इ. उत्तरार्ध भा. १ च्या शेवटीं ले. ७].

सगळ्या अडचणी दूर होण्यास कोल्हापुर–सातारा येथील राज्यें एक करून, त्यांजवर एकच हुशार छत्रपति असावा, अशी नानासाहेबाची अखेर पर्यंत दृढ समजूत होती; आणि संधि येई तेव्हां आपल्या हयातींत त्यानें हा उद्देश तडीस नेण्याच्या शक्य तितक्या युक्त्या केल्या. ह्या गोष्टीस ताराबाईची संमति असती तर ती सिद्ध होऊं शकली असती. रामराजा इतका नेभळा निघेल, अशी त्यास आरंभीं मुळींच कल्पना नव्हती. संभाजी व जिजाबाई यांच्याशीं त्यानें प्रेम संपादिलें होतें, आणि रामराजास काढून दुसरा हुशार इसम गादीवर आणण्याचे त्याचे प्रयत्न चालूच होते. छत्रपति आपली हुकमत यथायोग्य गाजविणारा असेल, तरच नोकरासही जोर येऊन राज्यकारभार व्यवस्थित चालतो, उलटपक्षीं यजमान कर्तृत्ववान् नसला म्हणजे उपद्व्यापी लोकांचा सुकाळ होऊन बजबजपुरी माजते, हा प्रकार शाहूच्या शेवटच्या दहा वर्षांत व रामराजाच्या अकरा वर्षांत नानासाहेबानें पूर्णपणें ओळखिला होता. राज्यापहार करून त्यास ज्यास्त कांहीं साध्य करावयाचें नव्हतें, परिस्थितीनें जो राज्यकारभार अंगावर आला, तो त्यानें कसाबसा रेंटीत नेला, इतकेंच म्हणतां येतें. हा राज्यभार रेंटतांना त्याच्या हातून चुका झाल्या नसतील असें नाहीं; पण त्या चुका त्या परिस्थितींत कशा टाळतां आल्या असत्या हें सांगतां येत नाहीं. पानपतचा संग्राम यशस्वी होऊन नानासाहेब आणखी कांहीं काल वाचतां तर राज्यकारभारांतले हे घोटाळे त्यानें कदाचित् मिटविले असते. हा संग्राम ऐन रंगांत असतांच ता. १८ डिसेंबर १७६० रोजीं संभाजी वारला. तेव्हां दत्तक घेऊन राज्य चालविण्याची परवानगी नानासाहेबानें जिजाबाईस लगेच दिली, हें खालील पत्रावरून

उघड होते. संभाजी मरण पावला, त्याच्या दुसऱ्या दिवसाचें हें पत्र आहे. "सेवेशीं विज्ञापना:—येथील वर्तमान तागाईत चंद्र १० जमादिलावल पर्यंत यथास्थित असे विशेष, संभाजी राजे समाप्त जाहल्याचें वर्तमान येथें आल्यावर श्री तीर्थ विसाजी नारायण व सदाशिव अवधूत यांस जिजाबाईकडे रवाना केले. त्याजबरोबर महादाजी भोसले मुंगीकर याचा धाकटा भाऊ उमाजी त्यास बरोबर घ्यावा; आणि तेथें जाऊन त्यास राजा करावा; कारभार जिजाबाईने करावा; पनाळा, रांगणा याप्रमाणें किल्ले द्यावे; वरकड बंदोबस्त जो करणें तो सर्वत्रांनीं करावा; आणि ताराबाई-प्रमाणें खर्च नेमून द्यावा, त्याप्रमाणें खाऊन स्वस्थ राहावे; याप्रमाणें कबूल केल्यास उत्तम. नाहीं तर जप्ती करावी. ज्या किल्ल्यावर जिजाबाई असेल त्या किल्ल्याभोंवता वेढा घालून बसावें याप्रमाणें जाहलें वर्तमान लिहिलें असे. मागाहून होईल तें लिहून पाठवूं. सेवेसीं कळावें. हे विज्ञापना." [ता. १९-१२-१७६०][इ. सं. ऐ. टि. भा. २ पृ. २२]

'संभाजीची स्वारी कसबे वडगाव येथे होती. तेथे प्रकृति जड जाहली. यामुळें निकडीनें करवीरास निघाले. टापेनजीक माळावर कैलासवास केला. संभापुर नांव ठेविलें, गांव वसविला. मार्गशीर्ष शु. १५ मंदवार दोनप्रहरीं कैलासवास केला.' [भा. व. पु. १ प. या. ले. ३१]. याच दिवशीं छ १० जमादिलावल आहे. वरील पत्रावरून इतकाच आशय पेशव्याचा दिसतो कीं, जिजाबाईच्या हातांत कारभार असूं नये. बायकांनीं राज्यें चालविण्याचें तत्त्व प्राच्य देशांत नव्हतें, आणि ताराबाईचा अनुभव तर नानासाहेबास चांगलाच माहीत होता. अर्थात् राज्य खालसा करण्याचा पेशव्याचा विचार होता हे रा. खऱ्यांचें प्रतिपादन योग्य दिसत नाहीं. (इचल. इ. पृ. ८७-८९). शिवाय दोनही राज्यें एक करण्याचा पेशव्याचा विचार कायम असून स्वतः ताराबाई, जिजाबाई वगैरे मंडळींचा विचार घेण्यास त्यास तेव्हां अवकाश नव्हता. या प्रश्नाचा विचार एकंदर परिस्थिति लक्षांत घेऊन केला पाहिजे. संभाजी

वारला, त्या वेळीं पानपतची अंगावर आलेली बाजू सांवरण्याकरितां पेशवा उत्तरेस जात होता. पुढें १४ जानेवारीस पानपतचा निकाल लागून, पेशव्याचा होतकरू मुलगा गारद झाला, आणि सदाशिवराव, जनकोजी वगैरे अनेक मंडळी जिवंत आहेत कीं गेली, याचा पत्ता मिळण्यांतच दोन तीन महिने गेले. ह्या अवधींत गुद्द पेशव्याचीं शरीर व मन हीं अस्वस्थ झालीं. आसन्नस्थितींतच पेशवा मार्च अखेरीस माळव्यांतून परत निघाला तों ३ जूनला पुण्यास पोंचला. त्यापूर्वीच दत्तकानें सर्वांचें जिजाबाईस संतापून गेल्याचें वर्तमान त्यास कळलें. गोदावरीचे सुमारे आल्यावर 'दादांचे, गोपिकाबाईचे व ताराबाईचे विचारें राजा बसवावयाचा अगर न बसवावयाचा विचार जो करतील त्याप्रमाणें ताराबाईचे विचारें करावें (रा. खं. १ ले. २८९) म्हणोन सिद्धांत साताऱ्यासंबंधानें ठरला; आणि आईसाहेबांचा विचार घेण्याकरितां माधवराव व नाना पुरंदरे यांस साताऱ्यास रवाना केलें.' हा विचार जरी सातारच्या गादीसंबंधानेंच होता, तरी कोल्हापुरचा व हा प्रश्न एकदम सोडविण्याचा पेशव्याचा हेतु निर्विवाद होता. महादाजी राजे भोसले मुंगीकर याचा भाऊ उमाजी यास जिजाबाईने मांडीवर घेऊन राज्य करावें, असा सिद्धांत कोल्हापुरसंबंधानें नानासाहेबानें अगोदरच कळविला होता. २५ मे १७६१ रोजीं माधवराव साताऱ्यास पोंचला. आईसाहेबांचे मर्जीचा विचार पाहिला तों त्यांचे चित्तांत दुसरा दत्तक करावयाचा नाहीं, रामराजासच बाहेर काढावा असा आग्रह दिसला. तेव्हा माधवराव निघोन पुण्यास गेले. (धा. रा. च. पृ. २९). पुढें नानासाहेब ता. २३ जून रोजीं वारला, तेव्हां कारभारांत अनेक घोटाळे होऊन सातारा कोल्हापुरच्या राज्यांचे प्रश्न तसेच भिजत राहिले. ता. ९ नोव्हेंबर १७६१ रोजीं ताराबाई वारली. नंतर माधवरावास स्वस्थता प्राप्त होतांच त्यानें हे प्रश्न विल्हेस लाविले. शके १६८४ च्या विजयादशमीस (१७-९-१७६२) शहाजी भोसले खानवटकराचा

पुत्र जिजाबाईनें दत्तक घेऊन नांव शिवाजीराजे ठेवून कोल्हापुरच्या गादीवर बसविलें. ( भा. व. पु. १ प. या. ले. ३१ ). तसेंच पुढील ता. २८ मार्च १७६३ रोजीं रामराजास सातारा किल्ल्यावरून खालीं शाहूनगरांत आणून माधवरावानें सिंहासनावर बसविलें, त्या वेळीं ब्राह्मणांस इनामें दिल्याचा उल्लेख ( शा. म. रो. ले. ९९ यांत ) आहे. सारांश, सातारा व कोल्हापुरचीं राज्यें कायमचींच निराळीं राहिलीं. जिजाबाई व नानासाहेब यांचा घरोबा किती होता, याचा उल्लेख तिनेंच नानासाहेबास पाठविलेल्या एका पत्रांत केला आहे. हें पत्र ता. ९ जून १७६१ चें आहे. ‘ आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ठ होऊन लेखनार्थ कळला. तेथें लिहिलें जे, साहेबांचा पडदा सेवकासी नव्हता, म्हणून लिहिलें तें खरें. आपल्याशीं पडदा स्वप्नींही नाहीं. कै. स्वामींची ममता अकृत्रिम असतां, साहेबीं वियोग केला, उचित नाहीं, म्हणोन लिहिलें तें प्रमाणच आहे. आपण बंधुच आहेत. परंतु राजश्रीच्या आज्ञेनुरूप चार गोष्टी तुम्हांप्रति बोलाव्यासें होतें. आपण दूर राहिलां. समेटी[1] साहेबांपासून घडेल न घडेल; हें आपण जाणतात. प्रत्ययासही येईल. येथील अर्थ आपल्या शिवाय नसल्यास, आपण इतका संदेह घेऊन ल्याहावें, सर्वप्रकारें करून आपल्या ममतेचीं आहों. रा. शेषोनारायण यांसही मागाहून पाठवून देत आहों. - पुण्यशील अनुबाईसही येणेंविशीं पत्रें गेलींच होतीं. कळलें पाहिजे. जाणिजे. ’ ( का. सं. प. या. ३३५ ) ह्या पत्रानंतर दोन आठवड्यांनींच पेशवा मरण पावला. संभाजीस ८ बायका होत्या; पैकीं जिजाबाई चवथी, शिंद्याकडची. वाडीकर सावंताकडील शेवटची कुसाबाई नवऱ्याचे मरणसमयीं गरोदर होती, ती प्रसूत होऊन मुलगा झाला, अशी खोटीच बातमी जिजाबाईनें उठविली होती; परंतु ती खरी नसून तिला मुलगी झाली होती.

---

1. समेट म्हणजे दोन राज्यें एक करणें कीं काय ?

ताराबाईप्रमाणेंच जिजाबाईही मोठी कर्तृत्ववान् असून तिच्या प्रयत्नानेंच कोल्हापूरचें राज्य टिकून भरभराटीस आलें. दोघीही रागीट व हट्टी होत्या. परंतु ताराबाई केवळ उपद्व्यापी असून, तिचा उपयोग राज्याचे कामीं मुळींच झाला नाहीं. जिजाबाई धोरण राखून व प्रसंग पाहून वागणारी असल्यामुळें तिच्यापुढें पेशव्यांसही नमावेंच लागलें. रयतेवर जिजाबाईचा अंमल करडा असून, ती आपलें म्हणणें खरें करून दाखवीत असे. हिंमत, धोरण, कुलाभिमान, दृढनिश्चय हे जिजाबाईचे गुण वर्णनीय होते. तिनें शंभुछत्रपतीच्या समाधीवर ब्राह्मणांकडून सक्तीनें रुद्राभिषेक करविले, आणि शंकराचार्य नको म्हणत असतांही, समाधीच्या आवारांत ब्राह्मणभोजनें करविलीं. पेशव्यांच्या तर्फेचा कारभारी आपल्या राज्यात ठेवण्याचें तिनें साफ नाकारिलें[1]. जिजाबाई स. १७७२ च्या फेब्रुवारींत मरण पावली. सातारच्या कुळांत ताराबाई व पूर्वीच्या कुळांत दीपाबाई व जिजाबाई, कोल्हापुर वंशांत जिजाबाई, फलटणची सगुणाबाई निंबाळकर, तसेंच पुढील काळांतल्या अहल्याबाई व बायजाबाई इत्यादि स्त्रियांची चरित्रें पाहिलीं म्हणजें, त्या स्वराज्याच्या काळात मराठे, ब्राह्मण वगैरे सर्व जातींमध्यें पुरुषांप्रमाणेंच स्त्रियाही पराक्रमी निघत होत्या, असें निःसंशय दिसून येतें.

---

१. ( इच. इ. पृ. ११० )

# प्रकरण एकविसावें.

## दमाजी गायकवाड व पेशवा



१. दाभाडे व गायकवाड यांचे गुजराथेंतील हितसंबंधः—(स. १७५० पावेतों.) गुजराथप्रांतांतील मराठ्यांच्या व्यवहारांची हकीकत पूर्वी येऊन गेली आहे, तीच पुढें चालविली पाहिजे. यशवंतराव दाभाड्याची नालायकी, व गायकवाड–दाभाड्यांचा बेबनाव ह्यांच्या योगानें गुजराथेंतील मराठ्यांचा कारभार इतर प्रांताप्रमाणें सुरळीत चालेना. उमाबाई दाभाडे जिवंत होती तोपर्यंत शाहूची मर्जी संभाळून ती पेशव्यांशीं बाणेदारपणें वागत होती, म्हणून पेशव्यांचाही जोर तिच्या कारभारांत विशेष चालला नाहीं. दमाजी गायकवाड मोठा कर्तृत्ववान् होता; परंतु मुसलमानी अंमलदारांचा जाच, दाभाड्यांचा कर्जबाजारीपणा व पेशव्यांची पकड ह्या तिहींच्या कचाटींतून त्यास आपला निभाव लावावयाचा होता. त्या धामधुमीच्या काळांत मुलुखगिरीस दोन रुपये खर्च करावे, तेव्हां पुष्कळदां एक रुपयाची उपज होई. त्यांत दाभाड्याचे तंत्रानें चालावें लागल्यामुळें त्यास स्वतंत्र उद्योग करतां येईल. शाहूच्या उत्तरावस्थेंत हळू हळू मुख्य सत्ता पेशव्याचे हातांत येत चालली, तेव्हां दाभाड्यास बाजूस सारून दमाजीस जवळ करण्याचा पेशव्याचा प्रयत्न होता. त्या दोघांचें

रहस्य असें कधींच नव्हतें. इतर सरदारांची स्वातंत्र्येच्छा दमाजीच्या ठिकाणींही होतीच; परंतु पेशव्यांशीं उघड वैर करून गोत्यांत न येता आपला हेतु परभारें साधण्याचा दमाजीचा प्रयत्न होता. या विरोधी प्रयत्नांची जुळणी कांहीं कालपर्यंत गोविंदराव चिटणिसानें सिद्धीस नेली, हें पुढे कांहीं पत्रव्यवहार द्यावयाचा आहे, त्यावरून ध्यानीं येईल. शाहूच्या पश्चात् ताराबाईच्या कारस्थानामुळें, दमाजीनें प्रकरण निकोपास गेलें रघूजीप्रमाणें दमाजी लगेच सातान्यास आला नसता तर, त्याचीही समजूत पेशव्यानें युक्तीनें घातली असती, परंतु पेशवा बाहेर असतांच दमाजी पुण्यावर चाल करून आल्यामुळें, त्याला कडाला तोडणें पेशव्यास भाग पडलें; आणि त्यास कैचींत आणून निंमी गुजराथ त्याजकडून कबूल करवून, मराठशाहीच्या पुढील उद्योगांत पेशव्यानें दमाजीस सामील करून घेतलें. तदुत्तर दमाजी राष्ट्रीय कामांत मनापासून खपत होता, हें ध्यानांत ठेवणें अवश्य आहे.

स. १७४६ त दमाजीनें सातान्यास शाहू छत्रपतीस भेटून गोविंदराव चिटणिसाच्या मार्फत आपली कांहीं तरी व्यवस्था लावून घेतली असावी. स. १७४६ च्या ता. १९ जुलईचें खालील पत्र दमाजीनें गोविंदरावास पाठविलें. ' सातारा मुक्कामीं सर्व बोलणें जालेंच आहे. चिरंजीव मुलास आधार मिळून आपलाच आहे. त्यास आपले जवळ ठेवून बरदास्त ठेवावी. करारप्रमाणें नेमणूक चालवीन; व पागा आली तरी बंदोबस्त राहील. खासा आला असतां पंचवीस हजार, पागेस एकवीस हजार व कारकुनास पाच हजार, एकूण एकावन हजार देत जाऊं. यास अंतर करणार नाहीं. आपले असामीवर कारकून पाठवावा. दरबारचें कामकाजाचें बोलणें सर्व आपणाकडे मनमोकळेपणानें ही सरदारी आपली समजून जें करणें तें करावें. मी आपल्याशीं शपथपूर्वक अंतर करणार नाहीं. चिरंजीव आपल्यास मजकूर समजावितील त्यावरून ध्यानांत येईल. ' [ खं. ६ ले. १७८ ].

या पत्रांतील भानगड काय प्रकरणाची असावी, याचा अंदाज होत नाहीं. गोविंदराव चिटणीस गुजराथेंत आपली पागा ठेवून मुलूखगिरी करणार होता, असें दिसतें. कांहीं असलें तरी दाभाडयाची ब्याद उडवून द्यावी, असा त्यांत उद्देश असला पाहिजे. बाजीरावाच्या हयातींत दाभाडयाच्या कुटुंबावर शाहूचें अत्यंत प्रेम होतें; परंतु पुढें पुढें यशवंतरावाच्या बेहोषपणामुळें तें ओहटत गेलें. 'दमाजीनें गुजराथेंतच राहावें. इकडे सेनापतीस खर्चाची ओढ पडावी. पैका खर्चाचा लौकर देऊं नये. हुजूरून महाराजांच्या वराती सेनापतींवर होत, त्यांनीं त्या गायकवाडावर पाठवाव्या. गायकवाडानें त्या मानूं नयेत. ऐसे बखेडे होऊं लागले.' ( दा. इ. ) नानासाहेबास पेशवेगिरी मिळाल्यावर या बखेडयांची तडजोड करणें ओघास आलें. गायकवाडास काढून दुसरा सुभा गुजराथेवर नेमण्याची तयारी करून यशवंतराव खानदेशांत गेला. तेथें दमाजीनें गुजराथेंतून येऊन यशवंतरावाचे कर्जाची व हुजूरच्या वरातांची व्यवस्था लाविली. तेव्हा यशवंतराव परत तळेगांवीं गेला; परंतु दमाजीनें याचा वचपा निराळे रीतीनें काढण्यास सुरवात केली. यशवंतरावाची आई उमाबाई व थोरली बायको अंबिकाबाई या सासवासुनांचें वांकडें होतें; म्हणून अंबिकाबाई आपला मुलगा त्रिंबकराव सेनाखासखेल यास घेऊन चांदखेड येथें स्वतंत्र राहत असे. तेथें जाऊन दमाजीनें त्यास भेटून सुचविलें कीं, तुम्हीं गुजराथेंत येऊन आपला अंमल करावा, आम्हीं पेशव्याचे मार्फत खटपट करून त्रिंबकरावास गुजराथेंत पाठविण्याविषयीं महाराजांची परवानगी आणितों. ती गोष्ट कबूल करून गंगास्नानाचे निमित्तानें नाशकास जावयाचें म्हणून अंबिकाबाई मुलासह खानदेशांत आली. उमाबाईस ही गोष्ट कळताच ती लगेच यशवंतरावास घेऊन साताऱ्यास महाराजाकडे धावली. महाराजांस उमाबाईचें अगत्य अतोनात असल्यामुळें त्यांनी अंबिकाबाईस सणसणीत पत्र लिहून आपणाजवळ साताऱ्यास आणिलें. आणि तिला सासूचे आज्ञेंत राहण्याची निक्षून आज्ञा

केली. येणेंप्रमाणें दमाजी गायकवाड व पेशवे यांनीं संगनमतानें केलेला व्यूह साफ ढांसळला. पेशव्यानें बहुत खटपट केली; पण महाराजांपुढें उपाय चालला नाहीं. दमाजी गायकवाडावर महाराजांचा फारसा लोभ नव्हता, म्हणून पेशव्याचे व चिटणिसाचे लगामीं राहून आपला हेतु साध्य करण्याचा त्याचा उद्योग चालू होता. त्या उद्योगांतलें वर सांगितलेलें पत्र असलें पाहिजे.

दमाजी गायकवाडास गुजराथेंतही पुष्कळच प्रतिस्पर्धी होते. पेशव्याच्या मदतीनें मारवाडच्या अभयसिंगाची त्यानें वाट लाविली; बाडे व धारचा पवार यांनीं गुजराथेवर स्वारी केली असतां त्यांजबरोबर लढून त्यांस गुजराथेंतून काढून दिलें. सन १७४४ त बाबूजी नाईक बारामतीकरानें पंनास हजार फौजेनिशीं गुजराथेवर येऊन सोनगड जाळून लुटून फस्त केलें. सोनगडावर बसुलिंगदेव किल्लेदार होता, त्यानें लढाई करून बाबूजीनायकाशीं तह ठरविला. याशिवाय बादशहाकडून त्याजवर अनेक मुसलमानांचे हल्ले येत त्यांचा प्रतिकार दमाजीस करावा लागे तो वेगळाच. सारांश नानाशत्रूंस व नानाकारस्थानांस तोंड देतां देतां दमाजीस पुरेवाट झाली; पण या झगड्यांत त्यास हुशारी प्राप्त होऊन हाताखालीं भरंवशाचीं चार चांगलीं माणसें जमा झालीं. दमाजी लहान असतां देवजी तापकीर व महादाजी गोविंद काकिर्डेकर हे सर्व कारभार करीत. दमाजी मोठा झाल्यावर त्याचें व या कारभाऱ्यांचें पटलें नाहीं; तेव्हां त्यांस रजा देऊन माधवराव निंबाजी शिवणीकर यास त्यानें कारभारावर आणिलें; आणि तो मरण पावल्यावर रामचंद्र बळवंत यास त्यानें आपला कारभार दिला. रघूजी भोसल्याचा नागपूर वऱ्हाडांतील उद्योग व दमाजीचा गुजराथेंतील उद्योग यांत व त्या दोन पुरुषांच्या कर्तबगारींत पुष्कळसें साम्य आहे.

दाभाड्यास बाजूस सारण्याचा प्रयत्न दमाजी व पेशवे आपापल्यापरी करीत असतां स. १७४७ च्या अखेरीस निजामुल्मुल्क सुरतेवर स्वारी

करतो, असें वर्तमान आलें. स. १७४८ च्या आरंभीं पेशव्यांनीं निजामावर स्वारी करून, मार्चांत नासिरजंग व रामदासपंत यांचा पराभव करून त्याजकडून आसुंबरीचा तह करून घेतला. [ पहा मागें पृ. ११८] हें युद्ध इकडे चालू असतांच, निजाम गुजराथेंत उतरतो, अशी दाभाड्यास भीति पडली असून त्याच्या व दमाजीच्या तर्फेनें गोविंदराव चिटणीस पेशव्याशीं वाटाघाट करीत होता. खालील पत्र स. १७४८ च्या मार्चांत सदाशिवरावानें पुण्याहून धोंडो मल्हार पुरंदऱ्यास सातारा येथें लिहिलेले आहे. "गोविंदराव तीर्थरूपांजवळ ( पेशव्या जवळ ) बोलत होते कीं, नबाब सुरतेस जातो. दाभाडयांचें साहित्य आपण करावें. तेव्हां निंमे गुजराथ द्यावी; म्हणजे साहित्य करूं म्हणाले. त्यास गोविंदराव आम्हांजवळ ( सदाशिवरावाजवळ ) बोलिले, लक्ष रुपये रोख व चार पांच धावेतो परगणे जहाले तरी पेशव्यांनीं मान्य करून साहित्य करावें. त्यास आम्ही म्हणालों कीं, पांच लाख रोख व पांच लक्षांचे परगणे द्यावे. ही गोष्ट चिटणीस उमाबाईजवळ बोलले. ती मुलकाची गोष्ट मान्य करीना; पैका देऊं म्हणाली. पेशव्याचें उत्तर तर निंमे गुजराथ घेऊं तरच साह्य करूं असें आलें. नबाब सुरतेकडे जाता तर दाभाडे कबूल जाले असते. आतां नबाब सुरतेवर जात नाहीं. याजकरितां तो प्रसंग शिथिल पडला.' [का. सं. पत्रा. ९२] 'तीर्थरूपांकडून उत्तर आलें कीं, या गोष्टी तोंडच्या नाहींत. मुलूखगिरी बुडवून नबाबाचा तह मोडा, तेव्हां हें कर्म करावें, या गोष्टीस आपलें स्वहितही पाहिलें पाहिजे. निंमे गुजराथ देतील तर करूं म्हणोन लिहून आलें आहे,' असें पुनः सदाशिवराव पुरंदऱ्यास लिहितो. [ कित्ता १३२ ] ता. २१ मे १७४८ रोजीं निजाम मरण पावला; आणि त्याची भीति तूर्त दूर झाली. सारांश, दाभाड्यास व गायकवाडास बुडवून कोणत्या तरी उपायानें निंमी गुजराथ हस्तगत करावयाची अशा पेशव्याचा पक्का निश्चय स. १७२७ पासूनच झाला होता, असें वरील पत्रावरून व शा. म. रो. १५६ वरून सिद्ध होतें. स. १७४७ च्या एप्रिलांत नानासाहेबाची व शाहूची पूर्ण गोडी

होऊन, वडील मुलाप्रमाणें शाहूनें पेशव्यास कुल अखत्यार देण्याची जशी सुरुवात केली, तशी एक एक प्रकरण जोरानें, निश्चयानें व थोडयाबहुत स्वार्थदृष्टीनें निकालांत आणण्याची पेशव्याने पण इकडे सुरुवात केली; त्या काळांतलाच निमी गुजराथ हस्तगत करण्याचा हा त्याचा डाव होता, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

गुजराथेंतील वसूल ठरावाप्रमाणें येत नसल्यामुळें दाभाडे व दमाजी गायकवाड यांच्या मागें चपती लावण्याचें काम नानासाहेबानें सुरू केलें. 'गुजराथ व सुरत अष्टाविशींतील सरकारी अंमल उगवावा म्हणून महाराजांनीं प्रधानपंतास आज्ञा केली.' [ शा. म. च ८३ ], आणि या आज्ञेनुसार स. १७५० त पेशव्यांनीं कांहीं अंमल वसूलही केला. [खं. ६-२१५, २०८ व २१४]. ही आज्ञा शाहूची कीं रामराजाची याचा बोध होत नाहीं. शाहू आसन्नमरण असतां सकवारबाईनें सरदारांस पत्रें पाठवून साताऱ्यास बोलाविलें, त्यावेळीं दाभाडे किंवा गायकवाड कोणीच आले नाहींत. त्या उभयतांचा त्या वेळीं बहुधा कज्जाच चालला होता. दाभाडयाचें कर्जदारी धरणें धरून बसले होते; आणि दमाजी त्यांची समजूत घालीत होता. पुढें शाहूच्या पश्चात् साताऱ्यास सर्व बंदोबस्त पेशव्यानें केला; आणि सर्व सरदाराची समजूत होऊन ते आपापल्या कामावर गेलेले पाहून दमाजीस साताऱ्यास येण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. इकडे आपला गुजराथ प्रांत आपल्याकडून पेशवे काढून घेणार, अर्धी गुजराथ आपण घेऊन अर्धी गायकवाडास देणार, हा व्यूह उमाबाईस व यशवंतरावास कळतांच त्यांच्या तळव्याची आग मस्तकास गेली. शाहूचा उगीच आधार होता, तोही आतां नष्ट झाला, अशा स्थितींत त्यांनी आकाशपाताळ एक करून सोडिलें; आणि शेवटचा आधार म्हणून ताराबाईकडे धाव घेतली. स. १७५० च्या पावसाळ्यांत उमाबाईच्या व तिच्या भेटी झाल्या. मराठ्यांचें राज्य ब्राह्मणांनीं बळकाविलें, अशी ओरड सुरू करून त्या दोघींनीं पेशव्याचे विरुद्ध कारस्थान रचिलें. प्रतिनिधीचा व

त्याच्या मुतालिकाचा पेशव्यांनीं योग्य बंदोबस्त वेळींच केल्यामुळें त्यांचा या कारस्थानांत भाग राहिला नाहीं. स. १७५० च्या ता. १ ऑक्टोबर रोजीं ताराबाई पेशव्यावर रुसून शंभुमहादेवाचे दर्शनास म्हणून पुणें सोडून निघून गेली. त्या संधींस तिची व उमाबाईची कोठें तरी गांठ पडली. तेव्हां बाटाघाट होऊन त्यांजकडून ता. २० ऑक्टोबर रोजीं दाभाड्याचा कारभारी यादोमहादेव निरगुडे, गुजराथेच्या शिष्टाईसाठीं पुण्यास पेशव्याचे भेटीस आला. पेशव्यानें त्यास साफ जबाब दिला कीं, 'आम्हांस ( गुजराथेवर ) अंमलच करणें;' आणि त्या कारभाऱ्याच्या देखत नवीन कमावीसदार नेमून त्यास वस्त्रें देऊन वसुलासाठीं गुजराथेंत रवाना केलें. 'यादोपंत उठोन गेले. वस्त्रें देत होते, घेतलीं नाहींत.' [ पु. रो. पृ. ५८ ]. दाभाड्यांचा हा कारभारी पुढें पुण्यांतच १७५१ च्या २५ जानेवारीस मरण पावला. कारभाऱ्यास पेशव्यानें धुडकावून लावल्यावर, उमाबाईनें स्वतः २२ नोव्हेंबर रोजीं आळंदी येथें पेशव्याची भेट घेतली. त्या भेटींत बहुधा पेशव्यांनीं तिची कांहींच दाद घेतली नाहीं. त्यानंतर दोन दिवसांनीं चंपाषष्ठीस ताराबाईनें रामराजास सातारा किल्ल्यावर कैद केलें; आणि लगेच दमाजी गायकवाडास पत्र पाठवून ताबडतोब गुजराथेंतून बोलाविलें. उमाबाईनेंही दमाजींस येण्याविषयीं भर दिली असली पाहिजे; परंतु तिच्या हालचालीवर पेशव्यांची नजर असून, ता. ३ जानेवारी १७५१ रोजीं पेशवा घोडनदीवर गेला, तेव्हां त्याजबरोबर उमाबाई, तिची सून अंबिकाबाई, अंबिकाबाईचा मुलगा त्रिंबकराव सेनाखासखेल, व दमाजीचा मुलगा सयाजीराव असे होते. [ पु. रो. ६० ] यमाजी शिवदेवही पेशव्याबरोबरच होता. परंतु त्याचा भाऊ अंताजी व प्रतिनिधि दादोबा साताऱ्यावर ताराबाईकडे गेले; व ताराबाईचा बंडावा फैलावत चालला असें पाहून पेशव्यानें यमाजीस फेब्रुवारीचे आरंभीं पुनः कैद करून सावनई किल्ल्यावर पाठविलें. [ पु. रो. ६१ ].

**२ दमाजीची पुण्यावर चाल व कैद** (स. १७५१) — या पुढची गायकवाडाच्या प्रकरणाची हकीकत अस्सल कागदांवरून चांगली उपलब्ध होते. भारतवर्ष शकावलींत नाना पुरंदऱ्यानें थोडक्यांत तिचा गोषवारा सुसंगत दिला आहे तो मागें पृ. २६८ वर दिलाच आहे.[1]

गायकवाडास मदत करण्याकरितां ताराबाईनेंही आपल्याकडून पुष्कळ तयारी केली. ९ मार्च १७५१ची तिची शेखमिरा यास खालील आज्ञा आहे. ‘ तुम्ही एकनिष्ठ आहां. तरी तमाम हुजूरातचे सरदार एक टोळी करून रा. दमाजी गायकवाडास सामील होऊन कामकाज केलियानें मनोदयानुरूप साहेब उर्जित करितील. ’ [ ३.६७ ]. ता. २५ फेब्रुवारीस पेशव्याच्या दोघां सरदारांचें व गायकवाडाचें युद्ध झालें, त्यांत सरदारांचा चांगलाच पराभव झाला. ‘ निशाणाचा व नगाऱ्याचा वगैरे दोन चार हत्ती पाडाव झाले. अब्दागीर, पालख्या, घोडीं, गेलीं. रंभाजी पांढरे व दत्ताजी भापकर पडले. शहाजी भापकरास जखमा आहेत. खंडोजी माणकराचा लेक दादजी पडला. गायकवाडाकडील जगजीवन पवाराच्या निशाणाचा हत्ती बोंध्यानीं आणिला. ता. ७ मार्च रोजीं गायकवाड अजबोट्यावर आलाशी खबर आली. तेच रोजीं संध्याकाळीं पुणें पळालें. पहांटे मा. राधाबाई व काशीबाई सिंहगडास गेली. ता. ८ रोजीं गायकवाड कैंदरावर आला; बापूजी बाजीरावाची फौज लोणीधामणीवर आली. ता. ९ रोजीं गायकवाडाचा मुक्काम झाला. यशवंतराव दाभाडे इंदुरीहून कैंदरावर गायकवाडापाशीं आले. ता. १० रोजीं निंबगांवावर मुक्काम केला. ता. ११ रोजीं पारगांवावर मुक्काम झाला. पुण्यांत बाबा फडणीस व महादोबा पुरंदरे आपले घरीं असतां उभयतांनीं विचार करून गायकवाडास चिठ्ठी पाठविली, त्यावरून तो पुण्यास न येतां साताऱ्यास गेला. ता. १२ रोजीं

१ या प्रकरणासंबंधीं खालील कागद महत्त्वाचे आहेत. का. सं. प. या. ले. १६८, १७२; राजवाडे सं. ३ ले. ६७, ३७९, ३८१, ३८५, ३९३; रा. सं. ६ ले. २२०, २२१, २२७, २२८, २२९, २३२.

त्रिंबकराव पेठे पुण्यांतून फौजेंत गेले. रात्रीं नाना पुरंदरे सातारची फौज घेऊन पुण्यास आले. महादाजीपंताची भेट घेऊन बुधवारीं ता. १३ रोजीं सकाळचे गायकवाडाचे मागें गेले. नाझऱ्यास जेजुरीनजीक बळवंतराव मेहेंदळे व बापूजी बाजी रेठरेकर यांस येऊन मिळाले. सर्वांस दिलासा देऊन व समाधान करून, फौज जमवून गायकवाडाचे पाठीमागें [ खं. २ पृ. ११६] वडुथावरून गेले. ता १५ रोजीं शुक्रवारीं वेण्येजवळ यांचे त्यांचें झुंज झालें. गायकवाडांनीं यांजला पहिल्यानें मार्गें सारिलें. मग यांनीं लगट करून गायकवाडाचा मोड केला. त्याचे बुणगे सर्व लुटले. घोडीं, उंट, पालख्या, बैल, ढोरें, डेरे, राहुट्या आणिल्या. गायकवाड व सेनापति खडी फौज घेऊन सातारा शहरांत गेले. महादऱ्यांत जाऊन राहिले. पुण्यास खबर ता. १६ मार्च रोजीं आली. तोफा केल्या. विठ्ठल शिवदेवाचे बंधु अंबाजी शिवदेव पडले. फिरंगोजी पवार, हणमंतराव निंबाळकराकडील व प्रतिनिधीकडील गोपाळराव खांडेकर यांनीं व बापूजी खंडो यांनीं झुंज केलें, फत्ते झाली.' [ पु. रो. ६३ ]. या बनावाचें वर्तमान पेशव्यास निजामकोंडयावर ता. २९ मार्च रोजीं कळलें; आणि लगेच त्यानें सरदारांस उत्तेजनाचीं पत्रें लिहिलीं. 'लेखनार्थ श्रवणें संतोष जाला. मोठी गोष्ट जाली. शाबास तुमची लोकांची. बरी केली. सारे एकदिल होऊन गायकवाडास जाऊं न देणें. जोर पोंचल्यास लुटून नेस्तनाबूद करणें. जोंपर्यंत गायकवाडाचा वारापाणी झाला नाहीं, तोंपर्यंत फौज न फोडणें. आमचा मोगलांचा सलुख झाला. इकडील सर्व खुसे उरकले; आम्ही मजल दरमजल येत असों. गायकवाड जाऊं न पावे तें करणें. तुम्हीं सर्वांचीं समाधानें करणें. बाजी तुम्ही सावरली. जी गोष्ट तुमचे वडिलांचे वडिलांस योग्य तें तुम्हीं केलें. या उपर बहुत सावधतेनें जरब देणें. मळमळीत न करणें.' [ का. सं. प. या. १६८, १७२; खं. ६-२२० ] ता. २ एप्रिलचें वर्तमान. 'गायकवाड संकटांत आहेत. भोंवतीं वीस हजार फौज श्रीमंतांची आहे. पाणी दाणा वगैरे जाऊं देत

राहीत. ताराबाई वगैरे सभोंवारचा प्रदेश श्रीमंतांचे फौजेनें उद्ध्वस्त केला. गायकवाडास कोणाची कुमक पोंचत नाहीं. आईसाहेबही वरचेवरच गोष्टी सांगतात, आणून फसविलें ऐसें जालें.' [ खं. ३-३८१ ].ता. २१ मार्चेचीं पत्रें २ एप्रिल रोजीं पेशव्यांस पोंचलीं. निजामाशीं नानासाहेबाचा पेंच पडला असेल, अशा समजुतीवर साताऱ्च्या मंडळींनीं गायकवाडाशीं तहाचें बोलणें चालविलें; 'परंतु निजामाचें प्रकरण यशस्वी करून आम्ही लौकरच येतों; गायकवाडास निरोप दिला नसेल, वर तसाच अडकवून धरावा. दम धरून त्याचें कबिलावाड बंद करून शर्मिंदा करणें. आम्ही येऊन पावतों. त्याजपासून दोनच गोष्टींचा निकाल करून घेणें आहे.' असें नानासाहेबानें ३ एप्रिल रोजीं साताऱ्यास कळविलें [ खं. ६-२२१ ] 'ता. २३ मार्च रोजीं ताराबाईकडील बऱ्हाणजी मोहिते,फरादखान, जाधव यांशीं व पेशव्याकडील मानाजी पायगुडे वगैरेशीं झुंज झालें. परस्परें जखमी जालें. ता. २४ एप्रिल रोजीं नानासाहेब फौजेसुद्धां साताऱ्यास दाखल झाला. दुसरे दिवशीं येवतेश्वरावर फौजा पाठवून आईसाहेबांची व गायकवाडाची चौकी होती ती उधळली. गायकवाड महादऱ्यांत होता त्याजवर मारा केला. हजारबाराशें गायकवाड मरावयास उभा राहिला. श्रीमंत व भाऊ यांनीं भारी फौजेनिशीं चालोन घेतलें गायकवाडाचा परिणाम लागेना, तेव्हां त्याजकडून भेटीचा मजकूर जाला. मग सटवोजी जाधव ( पिलाजींचा मुलगा ), जानोजी ढमढेरे, सिधोजी राऊत, नाना पुरंदरे, रामचंद्र बाबा यांस पाठविलें. गायकवाड भेटीस आला. भेटून गोटांस गेला. दुसरे रोजीं यांनीं सांगोन पाठविलें कीं, गोटाशेजारीं वेण्येवर येऊन राहा. त्यावरून तो वेण्येवर दक्षिणतीरीं राहिला. श्रीमंत उत्तरतीरीं राहिले. गायकवाडाबरोबर सेनापतिही आले होते. पंचवीस लक्ष रु. व निंमे गुजराथ वांटणी मागितली. गायकवाडानें म्हटलें, उमाबाई धणी आहेत, त्यांजशीं जें बोलणें तें बोला. उमाबाईकडे गायकवाडांनीं जाऊन शिक्केकटार पुढें ठेविली. ता ३० एप्रिल रोजीं सकाळींच

श्रीमंतांनीं फौजा पाठवून गायकवाड लुटला. त्यानें स्नान केलें होतें. तयार नव्हता. तहाची वाटाघाट चालू असतां पेशव्याच्या वचनावर विश्वास ठेवून तो स्वस्थ होता. पेशव्यानें वचन मोडून एकाएकीं हल्ला केला, तेव्हां 'कोणी धरूं नका, सुखरूप लुटूं द्या,' असें गायकवाडानें आपल्या लोकांस सांगितलें. गोट लुटून विठ्ठल शिवदेवानें गायकवाड दोघे भाऊ[1] आपल्या डेऱ्यास नेले. मानाजी पायगुड्यानें सेनापतीस आपल्या डेऱ्यांत नेलें. गायकवाड पायउताराच गेले. अवघ्यावर चौक्या बसविल्या. गायकवाड तिघे भाऊ एकत्र केले. सेनापतीबरोबर त्याची आई उमाबाई व बायको अंबिकाबाई यांस एकत्र केलें. तेव्हां निरुपाय होऊन दाभाडयांनीं अवघी गुजराथ पेशव्याच्या हवालीं केली. त्याप्रमाणें गायकवाडांनींही देवविली. त्रिवर्ग गायकवाड पुण्यास पाठविले. ता. ११ मे रोजीं पुण्यास आले. मुजुमदाराचे समोर आवजी कवडयाच्या वाडयांत ठेविले. भौंवती चौक्या ठेविल्या. ( गुजराथेंतील ) ठाणीं हातांत आलियावरी सोडावें, याजकरितां अटकेत ठेविले आहेत. गायकवाडाचा वडील पुत्र सयाजी, पेशव्याबरोबर उमाबाईपाशीं होता, तो येतांना मंगळवेढ्यांत पाठविला. पुढें ता. ७ जून रोजीं त्यासही आणून दमाजीपाशीं ठेविलें. त्याचे दुसरे दोघे मुलगे आई-साहेबापाशीं साताऱ्यावर आहेत. [ पु. रो. पृ. ६४–६५ ] ता. १६ मे रोजीं सेनापति व त्याचा मुलगा व बाया यांस इंद्रोजी कदम यानें पुण्यास आणून मल्हारजी होळकराच्या वाडयांत ठेविलें. 'गायकवाडांस व दाभाड्यांस शिधापाणी सरकारांतून देतात. श्रीमंत पंतप्रधान ताराबाईचें राजकारण मनास आणावयास साताऱ्यास राहिले होते. परंतु ताराबाई गडाखालीं येईना; व राजश्रीस पाठवीना. तेव्हां हे कूच करून २२ मे रोजीं सवा घटकेस पुण्यास आले. लगेच त्यानें महादाजीपंत

[ १. टीप—दमाजीचे जयसिंग व खंडेराव हे दोघे भाऊ व मुलगे चार—सयाजी, फत्तेसिंग, मानाजी व गोविंदराव. [ सं. २ पृ. ११२–११३, पुं. रो. पृ. ६१, व ६–२२८ ].

बावास बोलावून भेट घेतली. ता. ३ जून रोजीं नानासाहेब सिंहगडास जाऊन किल्ल्याची पाहणी करून आला. ता. ३ जुलई रोजीं पिलाजी व ता. ६ जुलई रोजीं बापूजी भीवराव रेठरेकर वारले. [पु. रो.] ता. १० जून रोजीं पेशवा शिंद्यास लिहितो. 'येथील वर्तमान तरी वरकड सर्व राज्य आमचे लक्षाशिवाय नाहीं. मातुश्री चढीं लागलीं आहेत. त्यास गडावरी दोन फळया, राजश्री निराळे, मातुश्री निराळीं, प्रस्तुत राजश्रींचें प्राबल्य आहे. बहुधा उतरतील. श्रीकृपें लवकरच राज्याचें कल्याण, दुष्ट दुर्बुद्धीनें राज्यांत बखेडा करतात, त्यांचीं काळीं तोंडें होऊन, राज्य स्वस्थ होईल.' [का. सं. प. या. ३६४ ].

पेशव्यास आज वर्षभर पैशाची अडचण भारी होती, 'गुजराथेंतून पैसा येणें दिसत नाहीं.' [ ३–१५४ ] असें पेशवा म्हणत होता. इकडे दमाजीस नरम करून त्याजकडून आपणास फायदेशीर असा करार करून घेण्याचा उद्योग पेशव्यानें चालविला होता. त्यानें दमाजीस पुण्यास अटकेंत ठेविलें होतें; परंतु ही अटक नजरबंदीपलीकडे नव्हती. दमाजी-पेक्षां दाभाड्यावर पेशव्याचा रोष ज्यास्त होता; आणि निमी गुजराथ हस्तगत करून ताराबाईचें कारस्थान मोडण्याचा त्याचा प्रयत्न होता. ता. २७ जून रोजीं पेशवा लिहितो. 'रा. स्वामी, आईसाहेबांचे हातून सुटले, यास्तव तेथील फौज काढिली असे. कांहीं दिवशीं सुमुहूर्ते खालींही येणार. गुजराथेंतील ठाणीं मुलूख हवालीं करावा, मग सोडावें, असा करार दमाजीनें शपथपूर्वक केला. यास्तव विठ्ठल शिवदेव फौजेसह गुजराथेंत रवाना केले. बोलल्याप्रमाणें वर्तले तर उत्तम, नाहींतर स्वामींचे आशीर्वादें जबर-दस्तीनें घेतच आहों.' [खं.३.३८५]. ह्या वळचीं आपली धांदल पेशव्यानें शिंदेहोळकरांस लिहिली आहे ती अशी. 'आम्हीं गायकवाडाचें पारिपत्य केलें, त्यांत आम्ही बेइमानी, दगाबाजी केली, असें नानाप्रकारें लोकांनीं दर्शविलें; परंतु ईश्वर साक्ष आहे. मोठमोठे मराठे, मोठे कारभारी यांणीं त्याचें घर बुडविलें. आम्हांशीं कबूल करून मागती चौथे दिवशीं

फिरावें, यामुळें बंदीखाने, गड सर्वही प्राप्त, त्याचे कर्मानुरूप झालें. एतद्विषयीं विस्तार काय ! परंतु आईसाहेबांशीं विरुद्ध वाढलें. त्यांचें मतें आम्हांस सर्वप्रकारें मोडावें, रामदासपंताचे पुतण्यास पेशवाई द्यावी, त्यांनीं आम्हांस बुडवावें, दाभाडे, प्रतिनिधि, रघूजीबाबा सर्वांनीं त्यास मिळावें, ऐसा पूर्णभाव. ( स. १७५१ च्या ) पावसाळां हीं राजकारणें शपथपूर्वक बाटलीं ' [ का. सं. प. या. १६१ ].

३. गायकवाडपेशव्यांमध्यें गुजराथची निमेंनिम वांटणीः—( फेब्रुवारी स. १७५२ ). दमाजी गायकवाडाबरोबर पुणें येथें गुजराथेची वाटाघाट पुष्कळ चालली; परंतु तो बऱ्या बोलानें पेशव्यास दाद देईना. या वेळीं तो कैदेंत असा नव्हता; आणि पेशव्याचे विरुद्ध त्याचीं कारस्थानें थोडीबहुत दाभाड्याकडे व ताराबाईकडे चालूंच होतीं. तेव्हां जबरदस्तीनें त्यास वठणीस आणण्याचें पेशव्यानें ठरवून ता. १९ जुलई रोजी सक्तीचा निर्बंध केला, त्या वेळची दमाजीची गोविंदराव चिटणिसास गेलेलीं पत्रें वाचण्यालायक आहेत. २४ जुलईचें पत्रांत खालील मजकूर आहे. ' महाराज विद्यमान असतां आपण आमची रवानगी गुजराथ प्रांतीं केली म्हणून आलों. चि. फत्तेसिंग, मानाजी व गोविंदराव यांस आपले घरीं ठेवून बरदास्त करून सर्वप्रकारें सांभाळ केला; आणि सरकारचे देण्याचा हवाला घेतला. प्रतिबंधांतून मुक्त करविलें. ते रुपये आपल्यास पाठविण्याविशीं चिरंजीवाकडून लिहून आलें. त्याची तजवीज करून पाठवूं. चिरंजीवास मोकळें केलें, हा उपकार विसरणार नाहीं. आपल्याकडे एकंदर सालीना एकावन हजार रुपये देत जाऊं. यास श्रीकुळस्वामीची शपथ असे. आमचे सरदारीची चिंता आपल्यास आहे. ' [ खं. ६ ले. २२८ ]. हें पत्र नवसरी मुक्कामाहून लिहिलेलें असून, पुरंदरे रोजनिशींत ' श्रावण शु. ८ स ( १९ जुलई ) गायकवाडास निर्बंध पेशव्यांनीं फार केला, त्याचें मनुष्य त्याजवळ राहूं दिलें नाहीं. आपलींच माणसें चाकरीस दिलीं;' आणि मार्गशीर्ष शु. ७ स (१४–११–१७५१) दमाजी गायकवाडास चिंतो गणेश

देशपांडे याच्या वाडयांतून काढून लोहगडावर ठेवावयास रवाना केलें.' असे उल्लेख आहेत, त्यावरून स्वतः दमाजी गुजराथेंत गेलेला दिसत नाहीं. जून महिन्यांतच विठ्ठल शिवदेवास गुजराथेंतील प्रांत कबजांत घेण्याकरितां पेशव्यानें रवाना केलें होतें. त्याजबरोबरच दमाजीचा भाऊ जयसिंग यास पाठविण्याचा विचार होता; परंतु तो कोरीगडावर कैदेंत असतांच मरण पावला. तेव्हां विठ्ठल शिवदेव प्रथम एकटाच पुढें गेला. मागाहून २१ ऑक्टोबर १७५१ रोजीं रघुनाथरावाची रवानगी गुजराथेंत झाली, त्याजबरोबर खंडेराव व सयाजी गायकवाड यांस कैदेंतून सोडून बहुमानाचीं वस्त्रें देऊन पेशव्यानें पाठविलें, असें दिसतें. [ खं. २ पृ. १२२; भा. व शा. पृ. २७] मागाहून दमाजीसही मोकळा करून त्यास पेशव्यानें ता. १५ फेब्रुवारी रोजीं गुजराथेंत रघुनाथरावाकडे रवाना केलें. १४ नोव्हेंबरपासून सुमारें अडीच महिने दमाजी लोहगडावर कैदेंत होता. पेशवा ११ फेब्रुवारी १७५२ रोजीं लिहितो, 'चि. दादाजवळ वीस पंचवीस हजार फौज देऊन गुजराथेस पोट भरावयास रवाना केलें. गैरहंगाम, पोटास नाहीं, ठाणीं बळकट, जितकें होईल तितकें करतील.' [का. सं. प. या. ३६३, ३५५] एप्रिलांत रघुनाथराव गुजराथेंत असून लवकरच परत येणार होता. [खं. ६ ले. २४९, २५१ ].

ता. ३० जुलईच्या पत्रांत दमाजी लिहितो, 'आम्ही आपला निरोप घेऊन आल्यानंतर महाराजांनीं त्रिवर्ग मुलांस वाड्यांत नेऊन ऐवज मागितला. न मिळे तरी, धनी देऊन, मुदत करून, जाणें; नाहीं तरी, किल्ल्याखालीं उतरावयाची रजा होणार नाहीं अशी आज्ञा जाहली. ते समयीं कोणी कामदार जिमा न घेत. हें आपण पाहून मुलें स्वाधीन घेऊन घरीं आणिलीं. बरदास्त फार ठेविली, म्हणून मुलांनीं लिहिल्यावरून कळलें. रावसाहेब, मी तुमचा उपकार विसरणार नाहीं, व ऐवजही सोईसोईनें पाठवीन. प्रसंगीं माझी आबरू आपण राखिली, त्यास मी शपथेप्रमाणें चालवीन.' [खं. ६ ले. २२९] याच मजकुराचें ले. २२७चें ऑगस्ट २२चें

आणखी एक पत्र आहे. दमाजी पुण्यास असतांना सातान्यास त्याच्या मुलांस महाराजांकडून पैशाचा तगादा होत होता; म्हणजे ताराबाईचें अंतःकरण दमाजीविषयीं फारसें अनुकूळ नसावें, असें दिसतें. तसेंच सेनाखासखेल ही पदवी दाभाड्याचे भावास असतां दमाजीनेंही ती वरील पत्रांत स्वतःस वापरली आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे.

दमाजीकडून गुजराथचा निकाल लवकर होत नाहीं, असें पाहून पेशव्यानें त्यास व त्याचा कारभारी रामचंद्र बसवंत[1] यास १४ नोव्हेंबर रोजीं लोहगड किल्ल्यावर बंदोबस्तांत ठेविलें. [ पु. रो. पृ. ७२]; 'आणि खंडेराव गायकवाड वगैरेस सिंहगडास पाठविलें. गोविंदराव व फत्तेसिंगराव या उभयतांस आईसाहेबांनीं सातान्यास आपलेजवळ ठेविलें. या कठिण प्रसंगांत रामचंद्र बसवंताचा चुलत बंधु बाळाजी यमाजी गुजराथेंत होता, त्यानें गायकवाडांच्या तर्फेतील तिकडील मंडळी जमवून, दमाजीचा चुलत बंधु केदारजी गायकवाड यास पुढारपण देऊन, सोनगडीं लोक जमवून मुलकाचा अंमल सुरळीत चालविला.' [ का. सं. गा. हकीकत पृ. ४३-व खं. १ ले ८ ] पुढें रामचंद्र बसवंतही वेष पालटून लोहगडावरून पळून सोनगडच्या फौजेस सामील झाला. वसईहून पेशव्याचे हुकुमानें शंकराजी केशव फडके यानें गुजराथेवर स्वारी केली असतां वरील फौजेनें फडक्यास मोडून परत फिरविलें. ' गुजराथचा अंमल बसतां दिसत नाहीं. रुपये गुंतोन पडले, ' असे नोव्हेंबरांत हिंगणे लिहितो, ( खं. ६.२३३ ) परंतु लवकरच रामचंद्रबाबा वगैरेंच्या मध्यस्थीनें दमाजीची समजूत होऊन त्यानें पेशव्याशीं सलूख केला. सेनापति व सेनाखासखेल हीं दोन पदें राजसनदी दाभाड्याकडे होतीं, त्यास सरंजाम, गुजराथ वगैरे मुलूख होता. पैकीं सेनाखासखेलीचें पद व निंमी गुजराथ पेशव्यानें गायकवाडास करार करून दिली. तसेंच पूर्वी जिंकलेला व पुढें

---

१ हा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण आडनांव कुडत्रेकर असून याचें घराणें बडोद्यास अद्याप पावेतों ( १९२१ ) असामदार होतें.

जिंकावयाचा गुजराथचा प्रदेश होईल, त्यापैकीं निमा भाग दमाजीनें पेशव्यास लेखी करारानें कबूल करून दिला. तसेंच त्यानें मुक्ततेपूर्वी १५ लक्ष रुपये पहिल्या खंडणीचे दिले, जरूर पडेल तेव्हां दहा हजार फौज घेऊन चाकरीस यावें, दाभाड्यानें त्याचे मुतालकीबद्दल पांच लाख पंचवीस हजार व छत्रपतींचे खर्चास मामुलीप्रमाणें रकम द्यावी, आणि इतःपर गायकवाडानें पेशव्यांचे लक्षांत वागावें, असा करार दमाजीनें मान्य करून स्वदस्तूरच्या लेखानें पेशव्यांस लिहून दिला. गुजराथेंतील महालांच्या वाटणीचा तपशील उपलब्ध आहे, (खं. ६ ले. २७९) त्यावर मिति ता. ३० मार्च १७५२ ही तारीख आहे. २७,७३००० चे महाल गायकवाडास मिळून २८३४९१८ रकमेचे महाल पेशव्यांस मिळाले. "आम्हांसमागमें फौज सरंजाम द्यावा, आम्ही जाऊन कराराप्रमाणें अमलांत आणून देऊं," असें दमाजीनें कळविल्यावरून त्यास लोहगडावरून व वरकड मंडळी जागां जागां अटकेंत होतीं तेथून, त्या सर्वांस पुण्यास आणून गुजराथेंत बंदोबस्तानें पाठविलें. बरोबर कारभारी सखाराम भगवंत होते. २७ मार्च १७५२ च्या पत्रांत नानासाहेब लिहितो, "दमाजीनें चिरंजीव दादाचे हवालीं डभई, पारनेरा केला. मुलखाची वांटणी होत आहे. सामोपचाराचें काम विल्हे लागलें. येणेंकरून सरकार काम होऊन गायकवाडांचें बरें झालें, मुलखाचें व आपल्या सेनेचें रक्षण झालें" असा या प्रकरणावर नानासाहेबाचा अभिप्राय आहे, (खं० ३ ले. ३९३). डफ म्हणतो, दमाजीनें एक लाख रुपये रामचंद्रबाबा व सदाशिवरावांस भरले, तेव्हां वरप्रमाणें सुरळीत व्यवस्था झाली.

गुजराथेंतून कांहींच उत्पन्न येत नाहीं, अशी कैक वर्षे तक्रार होती. यास कारण तेथील कारभाराची अनेक कारणांनीं झालेली अव्यवस्था होय. ही अव्यवस्था मोडून राज्यकारभार सुरळीत चालूं देणें हेंच पेशव्याचें मुख्य काम असून, राज्य आहे तेथे एकतंत्री व्यवस्थाही पाहिजेच. दाभाड्याचे संबंधानें गायकवाडाचीही तक्रार होतीच. त्याच्या संबंधीं

गुजराथ प्रांत संभाळण्याचा मगदूर नव्हताच. गायकवाड दमाजीचे अंगीं ती करामत होती; परंतु दाभाड्याचे भानगडींत पेशव्याची हुकमत चुकेल तर चुकवावी, अशा इरायानें, ताराबाईचे तर्फेनें त्यानें डाव टाकिला, तो अंगावर येतांच, निंमी गुजराथ घेण्याचा फार दिवसांचा म्हणजे स. १७२८ पासूनचा पेशव्याचा आग्रह कबूल करून दमाजीनें मोठ्या धूर्ततेनें ही भानगड कायमची मिटवून घेतली. करारप्रमाणें चालण्यांत दमाजी हयगय करील; म्हणून रघुनाथरावास गुजराथेंत फौजेसह पाठवून पेशव्यानें करारांतील महाल कबजांत घेतले; आणि इतर सरदारांप्रमाणें गायकवाडासही त्यानें मराठशाहीच्या उद्योगांत पूर्णपणें सामील करून घेतलें. रघुनाथराव परत आल्यावर दमाजी मागें गुजराथेंत राहिला ( का. सं. या. हकीकत पृ. ४४–४५ ). ता. २३ जून स. १७५२ रोजीं तो पुण्यास आला. ( खं. ३ ले. ३९५ ) 'तेव्हां पेशवा नानासाहेब, सदाशिवराव व रघुनाथराव यांसह संगमापर्यंत सामोरा गेला; भेटोन त्याजला घेऊन येऊन सयाजी गुजर याच्या वाड्यांत राहवयास जागा दिली.' [ पु. रो. पृ. ७९ ] इतउत्तर दमाजी व पेशवा यांचा स्नेह फार उत्तम प्रकारचा असून सिंदखेड, पानपत वगैरे सर्व महत्त्वाच्या मोहिमांत इतर सरदारांप्रमाणेंच दमाजीही विभागी होता. स. १७५२ च्या पावसाळ्यांत तो पुण्यास आला असतांच सुरत अमदाबाद वगैरे काबीज करण्याचा बेत ठरून, 'त्या कामीं पेशवे व गायकवाडांनीं पुढें चार पांच वर्षें करून मेहनत केली. गायकवाडाचे हिशेब व अडचणी पेशवा निवारीत होता' [ ना. रो. ले. १७९, १८० ].

४. मराठशाहीच्या उद्योगांत दमाजीचा संविभाग, अमदाबाद व पानिपत:— निजाम, ताराबाई, दाभाडे, गायकवाड वगैरेंचीं प्रकरणें विल्हेस लावल्यावर स. १७५२ च्या पावसाळ्यांत पुढील उद्योगाची दिशा पेशव्यानें सरदारांशीं व मुत्सद्यांशीं वाटाघाट करून ठरविली. त्या वेळची पेशव्याची उमेद का. सं. प. या. ले. १४ वरून चांगली व्यक्त होते.

तदनुसार ज्या मुलूखगिऱ्या सुरू झाल्या, त्या पानपतापावेतों चालूच होत्या. ह्या मुलूखगिरींत गुजराथ व उत्तर हिंदुस्थान यांचा पृथक् विभाग न करतां ती सर्व कामगिरी पेशव्यानें एका रघुनाथरावाकडे सोंपिली. ह्याचे परिणाम काय झाले, तें पुढें निदर्शनास येईल. तूर्त अमदाबाद काबीज करण्याचा विचार ठरून, ता. १० डिसेंबर स. १७५२ रोजीं रघुनाथराव पुणें सोडून गुजराथेंत निघाला; आणि त्यानंतर एकाच आठवड्यानें स्वतः पेशवा कर्नाटकाकडे वळला. (खं. २ पृ. १२८) 'आम्ही बालाघाट उतरून फरदापुरचे घाटानें अमदाबादेस जाणार, त्यासाठीं लाख दोन लाख ऐवज तयार करून भेटीस यावें,' असें १७ डिसेंबरच्या पत्रांत रघुनाथराव, दीक्षितास लिहितो. [ ख. ३–४१५ ] मंगळवार ता. १३ फेब्रुवारीस रघुनाथराव, दमाजी वगैरे फौजा घेऊन अमदाबादेस पोंचले. जवानमर्दखान बाबी[1] हा मोगलांचा अधिकारी अमदाबादेस होता, मराठे आले तेव्हां तो बाहेर पालनपुराकडे होता, तो त्वरेनें परत आला, तेव्हां मराठे मोगलांचें युद्ध चालू झालें. उभयपक्षांनीं कसून काम केलें. विठ्ठल शिवदेव विंचूरकर व नारोशंकर हे दोघे रघुनाथरावाच्या हाताखालीं असून अमदाबाद काबीज करण्यांत जिवापाड मेहनत करीत होते. नारोशंकराचे हाताखालीं आरब पलटण होती, तिनें चांगलाच पराक्रम केला. ता. २४ फेब्रुवारीपासून १६ मार्चपर्यंत निकराचा सामना सुरू होता. मराठ्याकडील धनाजी थोरात व शहाजी चौधरी ठार झाले. पुढें आपला निभाव लागत नाहीं, असें पाहून जवानमर्दखानानें तहाचें बोलणें लाविलें. पट्टण, वडनगर, राधनपुर, विजापुर आणि साबरमती व बुनास नद्यांचे मधील कांहीं प्रदेश खानास जहागीर म्हणून देण्यांत आला; आणि ता. २५ एप्रिल स. १७५३ रोजीं अमदाबादचा कबजा मराठ्यांस मिळाला. ( मा. व. ग. पृ. २९ ) वरील जहागिरीपैकीं बहुतेक प्रदेश पुढें लवकरच दमाजीनें

---

१ कमालुद्दीनखान तो हाच काय (?) पुढें दमाजीचें पत्र आहे तें पहा. ( इं. सं. ऐ. टि. भा. १ ले. ५३ ).

हस्तगत केले, ते अद्यापि गायकवाडाकडे चालतात. द्वारकासुद्धां गुजराथ काठेवाडचे प्रांत याच वेळीं हस्तगत झाले [का.स.प.या. २७]

अमदाबाद येथें पेशव्यानीं आपल्या तर्फेनें श्रीपतराव[1] बापूजी यास सुभ्याचे कारभारावर नेमिलें. हा श्रीपतराव पुरंदरचा राहणारा असून पुरंदरे व सखाराम भगवंत वगैरे मंडळींच्या वशिल्यानें पुढें आला. पेशवे आरले मुतालिक, असा शिक्का छत्रपतींनीं त्यास करून दिलेला होता, तो श्रीपतरावाजवळ असे. ( पु. रो. पृ. ५८, ६८, ६९, ७९ ). एप्रिल सन १७५३ त पेशव्यांनीं अमदाबादेच्या कारभारासंबंधीं, श्रीपतरावास सनदा करून दिल्या, [ ना. रो. ६३, ६५, २७२ ), त्यांतील विस्तृत तपशील पाहिला म्हणजे जिंकलेल्या शहरांत काय काय तजविजी करीत, त्याची कल्पना होते. अमदाबादची व्यवस्था आटोपल्यावर मे महिन्यांत बडोदें येथें रघुनाथरावानें दमाजीचा निरोप प्रेमानें घेतला. रघुनाथरावाबरोबर दत्ताजी शिंदेही अमदाबादच्या लढाईत होता असें दिसतें. ( डफ ) कारण बडोद्याहून दत्ताजीसह रघुनाथराव हिंदुस्थानचे मोहिमेस जाण्याकरितां जून महिन्यांत थालनेरास आला.

श्रीपतराव बापूजी स. १७५६ त परत पुण्यास गेला, तेव्हां खंबायतकर नबाब मोमीनखान याच्या मदतीनें मोगलांनीं तें शहर पुन: काबीज केलें, तेव्हां रामचंद्रबाबाचा मुलगा सदाशिव रामचंद्र यास पेशव्यांनीं स.१७५६ त गायकवाडाचे मदतीस पाठविलें. स. १७५६ त दमाजी बराच पेंचांत होता. 'प्रांतांत बखेडा मोंगलांचा. विशेषात्कारें घवलकें, नडियाद घेऊन ठाणीं बसविलीं. हुजूर फौजेचें जाणें जरूर त्या प्रांतीं आहे.' [७ नोव्हेंबर १७५६, खं. १ ले. १२१ ]. हीच फौज सदाशिव रामचंद्राची असावी. १२ जुलई १७५७ रोजीं रघुनाथराव लिहितो, 'गुजराथेचा मजकूर थोडकाच आहे. दोन चार हजार फौज सदाशिव रामचंद्राचे कुमकेस पाठविली, तरी काम होई ऐसें आहे.' [ १-७१ ] ता. ११ ऑक्टोबर

---

१. हा जातीचा ब्राह्मणच कीं काय ?

१७५७ त अमदाबाद हस्तगत झाली नव्हती. त्या तारखेचें खालील पत्र दमाजीनें पेशव्यास लिहिलेलें वाचण्यालायक आहे. 'साहेबांचे कृपावलोकनें-करून आनंदमय असो. साहेबीं कृपापत्र पाठविलें तें मस्तकीं वंदून, अक्षरशः विलोकन करून समाधान पावलों. पत्रीं मजकूर कीं अमदाबाद घेतलें, ऐसें परस्पर वर्तमान ऐकिलें. परंतु तुमचें कोणाचें पत्र नाहीं. मोमीनखान याचें उत्तम प्रकारें पारिपत्य करून, म्हणून आज्ञा. ऐशीयासी येथें नित्यानीं लढाई होते. तें शहर घेतल्यांतच येतें. कां कीं इतकी झोटधरणी होते. याप्रमाणें कोणीं लिहिलें असेल. आम्हांस तों साहेबाचे पत्र जयसूचक जैसें सुरांस संकटीं अंतरिक्षवाणी कल्याणदायक, तेणेंप्रमाणें साहेबांचें लेखनयुक्त आम्हांस, आतां शहर घ्यावयासी दिवस गत लागतेसें नाहीं. साहस श्रम करून जीवित्व देंचू. चरणपरायण हाच धर्म.' ह्यावरून दमाजी पेशव्याशीं किती अनुरक्त होता. हें सिद्ध होतें. सदाशिव रामचंद्राचे मदतीस आणखी फौज पेशव्याकडून आल्यावर, दमाजीराव फौजसुद्धां सहाय होऊन, अमदाबाद, वर्षभर मोर्चे लावून, खंबायतकरापासून स. १७५७ त घेतली. नंतर दुभागां अंमल सुरळीत चालूं लागला. [ गा. इ. पृ. ४५ व भा. व श. ३५ ]. लगेच दमाजी शिंदखेडच्या मोहिमेंत दाखल झाला.

पानपतावर मराठ्यांचा पराभव झाल्यामुळें गुजराथेंत किती बंडाळी माजली; आणि तिचें निर्मूलन दमाजी किती हिंमतीनें करीत होता, याचें वर्णन त्यानेंच ७ जून १७६१ च्या पत्रांत रघुनाथरावास लिहून कळविलें, त्यांत खालील मजकूर आहे. या वेळीं पेशवा नानासाहेब आसन्नमरण होता. 'आम्ही वैशाख शु. २ ( ६ मे ) बडोद्यास दाखल झालों. चि. खंडेराव हिंमतबहादरही आले. हिंदुस्थानचे गर्दीमुळें इकडील अविंध, कैवर्तक व प्रवासी सर्व बहकून गेले. खंबायतकर मोगलानें अतिशय लोक गावें मारिलीं. आपाजी गणेश खंबायतेस गेले, त्यांची दाद

लागूं दिली नाहीं. पुढें ते अमदाबादच्या बंदोबस्तास गेले. खंडेरावास पेटलाद, नडियाद वगैरे महालांचे बंदोबस्तास रवाना केलें. गोविंदरावास खंबायतेवर फौज देऊन पाठविलें, त्यांनीं तारापुरावर जाऊन गांव मारिला तेव्हां दहशत बसली. साहेबांचे प्रतापें नक्ष जाहला. मोगल वहावर आला आहे. इकडचा बंदोबस्त करून रसदा घेऊन पुण्याचा ओढा वारूं. साहेबीं कृपावंत होऊन सावकारांचें समाधान करावें. कमालुद्दीनखान व खंबायतकर मोगल उगीच सरकारचे महाल खाऊन, शल्य होतात. तेव्हां चित्तांत आहे कीं, दसरा झाल्यावर फौजा पाठवून निर्मूल करावें. कमालुद्दीनखानास श्री. भाऊसाहेबांनीं व रावसाहेबांनीं उदंड पत्रें लिहिलीं कीं, फौजा घेऊन चाकरीस यावें. परंतु येणें न जालें प्रत्युत्तरेंही सुदीं न लिहिलीं. याकरितां पारिपत्य केलिया दहा पंधरा लाखांचा मुलूख सुटतो. आपले विजय-प्रतापें पारिपत्य व्हावयास उशीर नाहीं. भडोचकरांनींही दंगा बहुत उभारला, त्याचा समाचार चि. गोविंदरावांनीं घेतला. गोपाळ गोविंद जंबुसरेस होते, त्यांनीं सर्व निवेदन केलेंच असेल. निरंतर कृपापत्रीं आनंद-वृद्धि करावयास लेखकास आज्ञा व्हावी. चरणदर्शन होईल तो सुदीन. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. ( इ. से. ऐ. टि. भा. १ ले. ५३ ). या पत्रावरून अनेक वादग्रस्त मुद्यांचें निराकरण होतें. पानपताच्या पराभवामुळें मराठे सरदारांची हिंमत बिलकूल खचली नव्हती. दमाजी, पेशव्यांशीं यत्किंचित् कुचराई करीत नव्हता. पानपतावरही त्यानें शक्य तितकी राष्ट्रसेवा केली होती. इतर सरदारांच्या मानानें दमाजीची कौटुंबिक एकीही अद्वितीय होती. त्याचे भाऊ व मुलगे सर्वच मोठे कर्तृत्ववान् असून एका जुटीनें वागत होते. तेव्हां स. १७३२ पासून स. १७६७ पर्यंतच्या पस्तीस वर्षांच्या अत्यंत संकटमय व धामधुमीच्या काळांत बाणेदारपणानें उद्योग व राष्ट्रसेवा करून आपली छाप मराठमंडळावर बसविणारा हा पुरुष, रघूजी भोसले किंवा मल्हारजी जाधव

यांअपेक्षां तर पुष्कळ वरचढ दिसतोच, परंतु कित्येक बाबतींत शिंदे-होळकरांपेक्षांही तो वरचढ म्हणावा लागेल. मल्हारराव होळकरापेक्षां दमाजीची दानत फार चांगली असून शिंदेबंधूपेक्षां त्याची धूर्तता व दूरदृष्टि ज्यास्त होती, असें दिसून येतें. या पराक्रमी व्यक्तीची व त्याच्या विस्तृत कुटुंबाची भरपूर हकीकत प्रसिद्ध नसावी, हें शोचनीय होय.

५. दाभाडे सेनापतीची समाप्तिः—गायकवाडाचे प्रकरणाशीं दाभाड्याचाही निकट संबंध असल्यामुळें तें प्रकरण सुद्धां येथेंच उरकून टाकणें युक्त आहे. दाभाड्यांचें व दमाजीचें अंतर्याम शुद्ध नव्हतें. दमाजी वरकरणीं ममत्व दाखवितो,परंतु आंतून पेशव्यास मिळून आपणास बुडवितो, अशी उमाबाईची बालंबाल खात्री होती. का. सं. तील दाभाडे व गायकवाड यांचीं प्रकरणें वाचलीं म्हणजे निरनिराळ्या पक्षांच्या अंतःकरणांत काय काय भावना होत्या, तें दिसून येतें. दमाजी धूर्त होता, परंतु त्यास कपटी म्हणतां येत नाहीं. अनेकांच्या स्वार्थांत त्याची स्थिति कींव करण्याजोगीच होती. आपल्या सरदारीचा अपहार दमाजी करतो, असें उमाबाईस वाटे. ताराबाईस मिळून हा आपला पाडाव करतो, असें पेशव्यास वाटे; आणि हा आपणास मनापासून साह्य करीत नाहीं, असें ताराबाईस वाटे. सातार्‍यास आल्यावर त्यानें एकंदर परिस्थिति पूर्णपणें ओळखिली, आणि ताराबाईचा नाद सोडून आपल्या बचावाचा विचार तो पाहूं लागला. पेशव्याशीं विरोध करण्यांत आपलें व राज्याचें नुकसान झाल्याशिवाय राहणार नाहीं, अशी त्याची खात्री झालेली दिसते पेशव्याविरुद्ध जाण्याचें व्यक्तिशः दमाजीला कारण नव्हतें. ताराबाईनें सेनापतीस आपल्या मदतीस बोलाविलें; आणि सेनापतीसच पुढें करून दमाजी सातार्‍यावर आला. महिना पंधरादिवसांच्या झगड्यांत उभयपक्षांची हानि झालेली त्यास दिसली, तेव्हां लढण्याच्या नादांत न पडतां तोडजोडीनें तो

पेशव्याशीं पुढील ठराव जुळवूं लागला. परंतु त्यास पूर्णपणें कबजांत आणिल्याशिवाय आपणास सोइस्कर असा ठराव होणार नाहीं, असें पेशव्यास वाटून, तद्दाची वाटाघाट चालू असतांच पेशव्यानें आपली फौज एकदम गायकवाडावर पाठविली. या वचनभंगामुळें दमाजीच्या व इतर सरदारांच्या मनांत पेशव्याबद्दलचा आदर एकदम कमी झाला; आणि नानासाहेबासंबंधानें पुढें अनेक सरदार साशंक होत, त्याचें कारण हा वचनभंग होय. पेशव्यानें आपणास कपटानें पकडलें हें दमाजी कधींही विसरला नाहीं. ता. ३० एप्रिल १७५१ रोजीं गायकवाडाबरोबरच पेशव्यानें दाभाड्यांस पकडिलें; आणि लगेच त्याजकडून गुजराथेची सोडचिठ्ठी घेऊन ती छत्रपतीच्या राजसनदेनें पुरी करून घेतली. ता. ७ मे १७५१ रोजीं दाभाडे यास पत्र पाठविलें कीं, 'गुजराथ प्रांत निमे स्वामींनीं सालमजकुरीं आम्हांस देविला, तो तुम्ही गर्गशाखालीं घालून हवालीं केला नाहीं. त्याबद्दल रुपये पंचवीस लाख तुम्हांकडे येणें, त्याबद्दल तुमचा निमे हिस्सा लावून दिला, तो आम्हीं कबूल केला. तो,पंचवीस लाख रुपये फिटले म्हणजे परत देऊं' अशारीतीनें नाम मात्र सेनापतीकडे ठेवून पेशव्यानें त्याचें सर्वस्व हरण केलें. यांत पेशव्याचा मतलब, दाभाड्याची नालायकी व राज्याचें हित इत्यादि सर्व कांहीं हेतूंचा मिलाफ आहे. ता. १६ मे रोजीं दाभाड्याचीं सर्व मंडळी पुण्यास आणून होळकराचे वाड्यांत नानासाहेबानें नजर कैदेंत ठेविली. त्या ठिकाणीं ती सर्व मंडळी बायापुरुष नोव्हेंबरपर्यंत होती. ता. २९ जुलई स. १७५१ रोजीं पेशवा येऊरास गेला, त्याजबरोबर उमाबाईही गेली होती. यावेळीं पुण्यांतच गायकवाड व दाभाडे यांच्याशीं पृथक्पणें पेशव्याचा डाव चालू होता; आणि ते दोघेही आपआपल्यापरी पेशव्याच्या अपहारापासून शक्य तितका आपला बचाव करीत होते. तारीख १६ नोव्हेंबर रोजीं यशवंतराव दाभाडे व त्याचा भाऊ, पुण्यांतून पळून गेले तेणेंकरून

पुनः बंडाचा प्रसार होतो कीं काय अशी पेशव्यास धास्ती पडली. ताराबाई व रामराजे यांनीं त्यांस पळवून आपल्याकडे नेलें असेल, असा पेशव्यास संशय आला; आणि तशी त्यानें उभयतांस पत्रें लिहिलीं. त्या पत्रांचा उल्लेख मागें पृ. २८३ वर आलाच आहे. आपणावर विनाकारण बालंट घेतल्याबद्दल ताराबाईस व रामराजास पेशव्याचा फार राग आला; परंतु दाभाडे कोठें गेले याचा पत्ता लागला नाहीं. १९ फेब्रुवारी १७५२ रोजीं पेशवा शिंद्यास लिहितो. 'ताराबाई हजार मनसबे राजकारणें घाटितात. करवीरकरांस आणावें ऐसेंही म्हणतात. अम्हांवरही कृपा दाखवितात. मळमळीत आहे. येथें या कलहामुळें बाहेरील घरांतील फौज फार मिळाली. देश लुटला, पोटास नाहीं. तिकडून ऐवज येईसें करणें. घरांत बाहेर सर्व भरंवसा तुमचा आहे.' [ का. सं. प. या. ले. २६३ ]. ता. १३ एप्रिल स. १७५२ रोजीं दाभाडे पेशव्याच्या भेटीस आला, आणि विश्वासराव व त्रिंबकराव पेठे यांनीं सामोरें जाऊन त्यास पेशव्याकडे आणिलें असा उल्लेख पु. रो. त आहे. अर्थात् ही सन्मानाची भेट होण्यापूर्वी दाभाड्याचें प्रकरण पेशव्यानें निकालास लावलें असें होतें. दाभाडे बंधू पळून गेल्यावर उमाबाई व अंबिकाबाई यांस पेशव्यानें सिंहगडावर बंदोबस्तांत ठेविलें. तेथून (पुढें चन्होळीवर)उमाबाईची व पेशव्याची भेट होऊन ( मा. व. श. २७ ) १४ फेब्रुवारी स. १७५२ रोजीं त्यांस पुनः पुण्यास आणिलें. त्यानंतर एक दोन महिने आणखी तेथें वाटाघाट झाली. ५ एप्रिल रोजीं पेशव्यानें या बायांची भेट घेतली. तेव्हां उभयपक्षांची गोडी झाली असावी. 'पेशव्याकडील बोलणार येऊन सांद घातला की, 'गायकवाड तुमचे पदरीं आहेत, त्याप्रमाणें तुमची चाकरी करतील. तुम्ही त्यांची तगेरी हल्लीं करूं नये; व राज्यांत बखेडाही करूं नये. रामराजाला अनुकूल होऊं नये. आमचे विचारें चालावें. तुमचे खर्चास दरसाल पन्नास हजार रुपये गायकवाड देत जातील. शिवाय

खानदेश बागलाण वगैरे मोकासे तुमचे तुम्हांकडे चालवूं. तुमचे कर्जाचा फडशाही गायकवाडाकडून करवून देऊं.' याप्रमाणें बोलणें ऐकून सेनापतींनीं विचार केला कीं, आपले धनी रामराजे पेशव्याचे कैदेंत आहेत. त्यापेक्षां यांची गोष्ट न ऐकल्यास आपला परिणाम लागत नाहीं. हें समजून तह ठरवून सेनापति पुण्यास आले. त्याजकडून वस्त्रें देवून पेशव्यानें गायकवाडास गुजराथेंत रवाना केले. दाभाड्याचा सरंजाम जप्त केलेला होता. तो ता. २ नोव्हेंबर १७५२ रोजीं नानासाहेबानें मोकळा करून दिला [ ना. सा. रो. ले. ६१ ] तथापि गायकवाड व सेनापति यांचे चित्तांतील विकल्प तुटले नाहींत. [ का. सं. दा. ह. ]. ता. १२ मे रोजीं यशवंतराव सेनापतीचें पुण्यास लग्न झालें. मुलगी पेशव्यांचे शेजारची शितोळे देशमुख याची. या लग्नाचे वेळीं दाभाडे व पेशवे यांची चांगली गोडी झाली होती, असें अनुमान होतें. तथापि पेशव्यास दाभाड्याची मोठी भीति वाटत असे. पुढें उमाबाई वृद्ध होऊन आजारी झाली तेव्हां उपचाराकरितां पेशव्यानें तिला तळेगांवाहून पुण्यास आणिलें, ( ११ सेप्टेंबर १७५३ ). त्यानंतर दोन महिन्यानीं २८ नोव्हेंबर रोजीं नडगेमोडीपाशीं डेरे देऊन राहिली होती, तेथें वारली. सेनापति जवळ होते. ( पु. रो. ). सेनापती हुजूर राहिल्यास बखेडा करतील याजकरितां पेशवे त्यास कर्नाटक स्वारींत घेऊन गेले. त्या स्वारींत दगदग होऊन परत येतानां कृष्णातीरीं मिरजेजवळ यशवंतराव दाभाडे मरण पावला. ( १८ मे १७५४ पु. रो. ) मराठशाहींत अनेक पराक्रमी स्त्रिया निपजल्या त्यांजमध्यें उमाबाईंची गणना अवश्य केली पाहिजे. यशवंतरावही बाणेदार होता; परंतु व्यसनामुळें तो त्या वेळच्या मंडळींत पुढें आला नाहीं. त्याच्या मृत्यूबरोबर सेनापतीच्या घराण्याचें राष्ट्रीय महत्त्व संपलें. अंबिकाबाईचे पोटीं झालेला यशवंतरावाचा मुलगा त्रिंबकराव, हा पुढें सेनापति पदाचा अधिकारी झाला, परंतु त्या पदाचें महत्त्व मात्र त्यास प्राप्त

झालें नाहीं. तो बहुधा नानासाहेब पेशव्याच्याच तंत्रानें वागत असे. हा त्रिंबकराव वेरूळ घृष्णेश्वरीं (घुसुणेश्वरी) स. १७६६चे सुमारास मृत्यु पावला.

स. १७५१ च्या एप्रिलांत दाभाडे-गायकवाडांस काबीज करून, वर्ष अखेरीस उभयतांचीं प्रकरणें मिटविल्याबरोबर, पेशव्यांचें वर्चस्व कारभारांत भक्कम झालें, म्हणजे शाहूच्या मृत्यूनंतर दोन वर्षांचे आंत सर्व प्रतिपक्षीयांना सामदामदंडभेदांच्या उपायांनीं जाग्यावर बसवून नानासाहेबानें प्रधानपदाची सांगता केली. ताराबाई व रामराजे यांना बाहेरचा आधार राहिला नाहीं, त्यामुळें पेशवे सांगतील तें निमूटपणें ऐकण्यापलीकडे दुसरा मार्ग त्यांस उरला नाहीं; आणि क्वचित् प्रसंगीं जरी त्यांनीं वेळीं अवेळीं पेशव्यास त्रास देण्यास कमी केलें नाहीं, तरी साताऱ्याच्या किल्ल्यावरून 'प्रधानपंत यांस आज्ञा केली ऐसीजे,' अशा शब्दांनीं पेशव्यांच्या मागणीस रुकार देण्यापलीकडे त्यांचें ज्यास्त महत्त्व इतउत्तर राज्यांत राहिलें नाहीं. रामराजांत कर्तृत्व नाहीं. असें दिसून येतांच ताराबाईचे ताब्यांतून त्यास सोडविण्याची खटपटही नानासाहेबानें सोडून दिली. दमाजी गायकवाडाची दक्षिणेवर स्वारी हा पेशव्याच्या विरुद्ध कारस्थानांतील शेवटचा प्रसंग होय. त्या प्रसंगांत दमाजीस जय मिळाला असता तरी पुढील परिणाम फारसा भिन्न झाला नसता; पेशव्यास आणखी वर्ष सहा महिने त्रास व खर्च पोंचला असता इतकेंच. कारण गुजराथ सोडून मराठशाहीचा कारभार हांकण्यास दमाजी कधींच आला नसता; आणि ताराबाईच्या अविश्वासी हुकमतींत वावरण्यास कोणासच इच्छा झाली नसती. प्रतिनिधि वगैरे दुसरे कोणी सरदार दमाजीस सामील झाले नाहींत, म्हणून त्याचा प्रयत्न लगेच फसला. बाकी, रस्त्यांतील प्रदेश जाळीत लुटीत जेव्हां दमाजी जोरानें चालून आला, तेव्हां थोडे दिवस लोकांची पांचावर धारण बसली. प्रत्यक्ष पेशव्याच्या बायकांनीसुद्धां पुण्याहून सिंहगडास पलायन केलें. अशा उपक्रमानें दमाजीनें आरंभीं

दहशत मात्र चांगली बसविली; म्हणूनच त्यांचा पाडाव केल्याबद्दल पेशवेपक्षास तितकी कृतकृत्यता वाटली. दमाजीच्या परिणामानें ' आपण म्हणूं तें सिद्ध करूं ' ही धमक पेशव्यानें व्यक्त केली. कैक वर्षे भिजत पडलेलें अर्धी गुजराथ घेण्याचें घोंगडें एकदाचें संपविलें; आणि विरोध करणाऱ्या सरदारांनीं इतउत्तर पेशव्यांपासून काय अपेक्षा ठेवावी याचा धडाही सर्वांस शिकविला. दाभाडे व गायकवाड मुख्य सरकारच्या हुकूम धाब्यावर बसवून गुजराथेंत वाटेल तसा कारभार करते तर, मराठशाहीचे तेव्हांच तुकडे पडते असा अनुभव आला असता. हा अनिष्ट प्रकार पेशव्याचे मनांत होऊं द्यावयाचा नव्हता. बाकी पेशव्यास गुजराथेंत प्रत्यक्ष जाऊन राहवयाचें नव्हतें, आणि तसा प्रकार पुढें बनलाही नाहीं. पेशव्यानें आपल्या मनांतील भाव खं. ३ ले. १३३त उत्कृष्ट व्यक्त केले असून, हा लेख मागें पृ. २७५ वर देण्यांत आलाच आहे. ताराबाईच्या व गायकवाडाच्या बंडाव्यामुळें पेशव्यास दोन वर्षांचा खो बसला: नासिरजंग मेल्याबरोबर निजामशाहीचा निकाल करण्याची चालून आलेली संधि फुकट गेली, येणेंकरून निजामशाहींत बुसीचा हात शिरकला, त्यास काढण्यांत आणखी कित्येक वर्षें अर्धीच फुकट गेलीं. गाजीउद्दीनला निजामीवर आणण्याचें कारस्थान एक वर्षानें लांबणीवर पडलें; आणि शिंदेहोळकरांच्या उत्तरेंतील उद्योगास पेशव्याचें पाठबळ वेळेवर न मिळून, पर्यायानें पानिपतचा प्रसंग ओढवला. असे एक ना दोन अनेक बरेवाईट परिणाम ऐतिहासिकदृष्ट्या या दोन वर्षांतील दुहीच्या झगड्याचा विचार करितांना मनांत उद्भवतात. मार्मिक अभ्यासेच्छूंनीं त्यांचा ज्यास्त विचार करणें जरूर आहे.

---

# गायकवाड घराणें.


नंदाजी
केरोजी
१ दमाजी समशेरबहादर मृ. १७२१
झिंगोजी
कान्होजी
हरजी
२ पिलाजी द. १७२१–३२
पिलाजी द.
मालोजी
महिमाजी
गुजोजी
यशवंतराव
३ दमाजीबोवा स. १७३२–६७
खंडेराव
आनंदराव
प्रतापराव
सयाजी
काळूजी
जयसिंह
केदारजी
४–८ गोविंदराव १७६८–७३ व १७९३-१८००
५ सयाजीराव स. १७७१–७८
६ फत्तेसिंह १७७८-८९
७ मानाजी १७८९-९३
मुरार
रामराव
जयसिंह
मल्हारराव कडीचे
काळूजीराव
गणजीराव
भिकाजीराव
काशीराव
गोपाळराव ऊर्फ सयाजी (द.)
९ आनंदराव १८००–१८१९
फत्तेसिंह मुतालिक १८०६-१८१८
१० सयाजीराव १८१९–१८४७
११ गणतराव १८४७–५६
१२ खंडेराव १८५६–७०
१३ मल्हारराव १८७०–७५
१४ सयाजीराव द. १८७५—प्रस्तुत

# प्रकरण बाविसावें.

## निजामशाहीचा अपकर्ष.

( स. १७४८–१७६१ ).



१. निजामुल्मुल्क, नासिरजंग व मुज्फरजंग यांचे मृत्यु.
२. रामदासपंताशीं पेशव्याचें राजकारण ( स. १७५१ ).
३. पेशवेनिजामांचा बिघाड ( ऑक्टोबर १७५१ ).
४. घोडनदीचें युद्ध व सिंगव्याचा तह
( नोव्हेंबर–जानेवारी १७५१–५२ ).
५. गाजीउद्दीनचा खून व भालकीचा तह ( नोव्हेंबर १७५२ ).
६. निजामशाहींत पेशव्यांचे वर्चस्व.
७. निजामशाहींतील प्रमुख व्यक्ति,
सय्यदलष्कर व शहानवाजखान.
८. निजामाचे दरबारीं पेशवा व फ्रेंच यांची स्पर्धा.
९. सिंधखेडची लढाई ( ऑगस्ट १७५७–जानेवारी २–१७५८ ).
१०. शहानवाजखान व हैदरजंग यांचे खून ( मे स. १७५८ ).
११. बुसीचें प्रयाण ( जुलई स. १७५८ ).
१२. मुज्फरखान गारदी व सदाशिवरावाचे खुनाचा
प्रयत्न ( ऑक्टोबर स. १७५९ )
१३. उदगीरची मोहीम ( जानेवारी–मार्च स. १७६० ).
१४. दौलताबाद काबीज ( ८ एप्रिल, स. १७६० ).

**१ निजामुल्मुल्क, नासिरजंग व मुज्फरजंग यांचे मृत्यु.**— मराठ्यांच्या इतिहासांतलें कायमच्या भानगडीचें प्रकरण निजामाचें होय.

परिस्थितिभेदानें त्यास भिन्न स्वरूप येत गेलें. महाराष्ट्रांतील पूर्व बाजूचा भाग निजामाचे ताब्यांत होता; आणि तो, बादशहाचा दक्षिणेंतील प्रतिनिधि असल्यामुळें, बादशहा कायम आहे, तोंपर्यंत या प्रतिनिधीस नाहींसा करणें शक्य नव्हतें. तरी चौथाईच्या वगैरे निमित्तांनीं मराठ्यांनीं त्यास बहुतेक घेरलेंच होतें. दक्षिणेस कर्नाटकावर मराठे व निजाम दोघेही आपला हक्क सांगत होते. स. १७४१ त मराठ्यांनीं त्या प्रांतीं स्वारी करून चंदासाहेबास पकडून आणिलें. तो पुढे दहा वर्षे साताऱ्यासच कैदेंत होता. मराठ्यांचे हे वर्चस्व उलथून पाडण्यासाठीं निजामानें स. १७४२-४३ त कर्नाटकावर स्वारी करून तिकडे आपला अंमल बसविला. त्यानंतर शाहूछत्रपतींची वृद्धावस्था होऊन बाबूजी नायकानें उपद्व्याप आरंभिल्यामुळें पेशव्यांना कर्नाटकावर शह बसवितां आला नाहीं. स. १७४७ त सदाशिवरावानें कर्नाटकावर स्वारी केली; परंतु त्यापासून म्हणण्यासारखी निष्पत्ति झाली नाहीं. इकडे निजाम व त्याचे मुलगे यांजमध्यें बखेडे चालून त्यांतच शेवटीं निजाम चिंकिलीजखान असोफजा, कुलसलतनत, मुलगा नासिरजंग याशीं सोंपून ता. ११ मे स. १७४८ रोजीं औरंगाबाद येथें मरण पावला. त्या वेळीं त्याचे वय ७७ वर्षांचें होतें[1]. निजामाच्या अगोदर एकच महिना दिल्लीचा महंमदशहा मरण पावला होता.

---

१. निजामाचें हें वय व मृत्यूची तारीख बिनचूक होय. त्याचा जन्म ११ ऑगस्ट स. १६७१ ( जुन्या पंचांगपद्धतीनें ३० जुलई ) चा असून मनूशी ( Storia de Mogor vol. IV 140n ) व मासिरुल-उमरा ( III 837-847 ) यांनीं हीच जन्म तिथि नक्की ठरविली आहे. मासिरुल-उमराचा लेखक पूर्वी निजामशाहीत दिवाण होता. निजामाचें वय १०४ वर्षांचें होतें, ही गप्प मूळ ऑर्मनें उठविली, व डफनें बिनतपासानें उद्धृत केली मृत्यूची तारीख ही वरचीच बरोबर आहे ( रा. खं. ८ ले. १७४ पृ २०२ ).

## आलमशेख—समर्कंदचा.[१]

**(left branch)**

ख्वाजा आबीद
मृ. ३०-१-१६८७

मीर शहाबुद्दीन ऊ. गाजीउद्दीन फिरोजजंग
ज. १६४९ मृ. ८-१२-१७१०

चीनकिलीचखान निज़ामुल्मुल्क, असोफजा
ज. ११-८-१६७१ मृ. २१-५-१७४८

**(right branch)**

मीरबहुद्दीन

महंमद अमीनखान ' वजीर मृ. ' १७२१
१६८७ त २५ वर्षांचा असतां हिंदुस्थानांत आला.

कमरुद्दीनखान वजीर १७३९-१७४८
अब्दालीशीं सरहिंदच्या लढाईंत मृ. एप्रिल १७४८

Children of कमरुद्दीनखान:

- मुलगी
- इंतिजामुद्दौला ऊ. खानखानन वजीर १७५४ ( Duff 77. Husband of the aunt of Mir shahabuddin. )
- मीरमन्नू ऊ. मुइनुल्मुल्क मृ. १७५४ घोड्यावरून पडून.
  - मुलगी—मीरशहाबुद्दीन

Children of चीनकिलीचखान निज़ामुल्मुल्क:

- गाजीउद्दीन थोरला, फिरोजजंग. मृ. १६-१० १७५२
  - मीरशहाबुद्दीन ऊ. गाजीउद्दीन धाकटा=मीरमन्नूचा जांवई. इमादुल्मुल्क, अमीरुल-उमरा. यानें दोन बादशहांस ठार मारिलें, अब्दालीच्या धाकानें पळून दक्षिणेंत आला, तो सन १७९० त सुरतेस असतां ग. ज. नें नेमणूक करून मक्केस पाठविलें. तेथें मरण पावला.
- मुलगी
  - मुज्फरजंग मृ. जाने. १७५१.
- नासीरजंग मृ. ५-१२-१७५०.
- मुलगी [लग्न मीरमन्नू. तिला मदत अलिनावेग. संदीपवेग लाहोरचा सुभा व त्यास मदत. कायस्थ लक्ष्मीनारायण II १४७.
- सलाबतजंग पदच्यु. १० ७-१७६२.
- निजामअली मृ. ६-८-१८०३.
- बसालतजंग (महंमद शरीफ)
- मीरमोगल
  - (नासीरजंग धाकटा) मा. व. प. या. २

निजामाच्या घराण्याची वंशावळ मराठ्यांचे इतिहासास अत्यंत जरूरीची असल्यामुळें, ती येथें मुद्दाम विस्तृत दिली आहे. शिवाजीच्या वेळेपासून पानिपत पावेतों दिल्लींतील व दक्षिणेंतील नानाप्रकारच्या घडामोडी समजण्यास या वंशावळीचा उपयोग अतिशय आहे.

निजामाच्या मुलांत गाजीउद्दीन व नासिरजंग हे दोघे एका बायकोचे व बाकीचे सर्व दुसऱ्या बायकोचे मुलगे. मुलीचा मुलगा मुज्फरजंग हा हुशार व आजाचा लाडका होता. पहिले दोघे व दुसऱ्या भावांतील निजामली हे त्यांतल्यात्यांत हुशार होते. बापाचे मरणसमयीं गाजीउद्दीन दिल्लीस कारभारावर असून नासिरजंग संनिध होता; परंतु त्यानें अनेकवेळां बापाचे विरुद्ध बंडावा केला असल्यामुळें, आपल्या पश्चात् मुज्फरजंगास निजामी मिळावी, अशी व्यवस्था मयत निजामानें ठरवून तिला बादशहाची मंजुरीही मिळविली होती. निजामाचे मरणसमयीं मुज्फरजंग विजापुरचे सुभ्यावर होता, तेव्हां नासिरजंगानें लगेच फौजेंतील सरदार अनुकूल करून त्यांच्या मदतीनें निजामी हस्तगत केली. तेव्हांपासून निजामीवर खालील पुरुष झाले, ते ध्यानांत ठेविल्यानें पुढील हकीकती स्पष्ट होतील.

१ नासिरजंग जून स. १७४८—ता. ५ डिसेंबर १७५०

२ मुज्फरजंग डिसेंबर—जानेवारी १७५१.

३ सलाबतजंग जानेवारी स. १७५१—ता. १० जुलई स. १७६२.

४ निजामली—१०—७-१७६२—ता. ६ ऑगस्ट स. १८०३.

स. १७५७ पासून सलाबतच्या वेळेसच निजामली बहुतेक कारभार पाहूं लागला.

रघूजी भोसल्यानें कर्नाटकचा नबाब सफ्दर अली याच्या चिथावणीवरून चंदासाहेबास कैद करून सातान्यास ठेविलें होतें. चंदासाहेब सुटेल तर आपला कारभार घेईल, हा सफ्दर अलीस धाक होता. त्यामुळें तो दरसाल मराठ्यांची कर्नाटकांतील खंडणी आपण होऊन चुकती करून देत असे.

मराठ्यांची मर्जी प्रसन्न न राखावी तर ते चंदासाहेबास सोडून देतील, हीच त्याला काळजी होती. पुढें सफ्दरअली ( स. १७४२ त ) मारला गेला; आणि अन्वरुद्दीन कर्नाटकचा नबाब झाला, [ एप्रिल, १७४४ ] तेव्हां मराठ्यांस खंडणी येईनाशी झाली, आणि चंदासाहेबास कैदेंत ठेवण्यापासून मराठ्यांस लभ्यांश राहिला नाहीं. फ्रेंच लोकांच्या मनांत चंदासाहेबास बंधमुक्त करून अर्काटच्या नबाबगिरीवर स्थापावें, असें फार होतें, पण मुक्ततेचा दंड कोणाकडूनच पटेना पुढें स. १७४८ त नासिरजंगानें निजामशाही हस्तगत करून मुज्फरजंगास घालवून दिलें, तेव्हां मराठ्यांची मदत मिळविण्याकरितां मुज्फरजंग सातान्यास आला. तेथें कैदेंत असलेल्या चंदासाहेबाची त्यानें गांठ घेतली. तेथें या दोघांच्या कानगोष्टी होऊन दोघांनीं मिळून मराठ्यांच्या मदतीनें आपलाले हक्क मिळविण्याचा बेत ठरविला. शत्रूंशीं गोडी करून आपला कार्यभाग साधणें चंदासाहेबास प्रथम आवडलें नाहीं. त्यानें ही हकीकत पांडिचरी येथें डुप्ले यास कळविली. चंदासाहेबाची बायको पांडिचरीस होती, तिच्या मार्फत कारस्थान चालवून डुप्लेनें चंदासाहेबास कळविलें कीं, तुम्ही हरउपायानें आपली सुटका मात्र करून घ्या, मराठ्यांची मदत घेण्याची गोष्ट कबूल करूं नका, सात लाख रुपये दंड भरण्याची जामीनगिरी डुप्लेनें पत्करिली, ती मराठ्यांनीं कबूल करून त्यास बंधमुक्त केलें, आणि तीन हजार स्वार बंदोबस्तास देऊन स्वदेशीं रवाना केलें. [ १७४८ ] रस्त्यानें फौज जमवीत व शत्रूंचा पाडाव करीत चंदासाहेब पांडिचरीस येऊन डुप्ले यास भेटला; आणि तेथें कांहीं मुलूख फ्रेंचांस कायमचा तोडून देऊन त्यांची मदत त्यानें स्वीकारिली. मुज्फरजंगही तीस हजार फौजेसह येऊन त्यास मिळाला. दोघांनीं मिळून प्रथम कर्नाटक काबीज करण्याकरितां अन्वरुद्दीनवर चाल केली. त्यावेळीं फ्रेंच फौजेचा मुख्य 'डोटिल' नावाचा इसम होता. ऑगस्ट ता. ३ स. १७४९ रोजीं डोटिलनें अंबूर येथें अन्वरुद्दीनशीं सामना केला; परंतु त्यांत डोटिल यास जखमा लागून त्याचे लोक परत

फिरले. तेव्हां कोटिलच्या हाताखालीं बुसी नामक एक अंमलदार होता. त्यानें परत फिरणाऱ्या लोकांस धीर देऊन पुन: लढाईस आणिलें, तेव्हां निकराचा सामना होऊन अन्वरुद्दीन पडला, त्याचा मुलगा माफूझखान चंदासाहेबाचे हातात सांपडला व दुसरा मुलगा महंमदअली पळून जाऊन त्रिचनापल्ली बळकावून बसला. लगेच चंदासाहेब व मुज्फरजंग अर्काट येथें गेले, तेथें मुज्फरजंगानें दक्षिणची सुभेदारी व चंदासाहेबानें अर्काटची नबाबगिरी धारण केली. नंतर उभयतांनीं पांडिचरीस जाऊन डुप्लेचे आभार मानिले. त्यास यावेळीं मराठ्याची मदत होती. दक्षिणच्या कारभारात फ्रेंच सत्तेचा शिरकाव करण्याची संधि मिळालेली पाहून डुप्ले यास कृतार्थता वाटली.[1]

मृत्यूपूर्वीं दोन तीन वर्षे निजामानें पेशव्याशीं बहुधा गोडीच ठेविली होती. पिलाजी जाधव मराठ्यांच्या तर्फेनें निजामाजवळ होता. नासिरजंग बापाविरुद्ध मराठ्यांची मदत मागत होता. मराठ्यांनीं गडगडा व जीवधन हे निजामाचे किल्ले घेतल्यामुळें नासिरजंग मराठ्यांवर चालून येत आहे, अशी आफवा १७४८ च्या ऑक्टोबरांत आली होती. [ खं. ३ ले. ३७२ ]. आम्ही सर्वप्रकारें श्रेय इच्छित असता नासिरजंग एकाएकीं पुढें आले; गरीब रयतलोक पळाली. आम्हावर दबाव दिल्हा. माघारेही गेले. याप्रमाणें करणें हें स्नेहाचे रीतीस बरें दिसत नाहीं. किल्ला आमच्या नबाबांनीं घेतला. एकाएकीं पुढे येऊन दबावही नबाबांनींच दाखविला. सांप्रतही स्नेहाविशीं पुरता आदर दिसत नाहीं. तर वरकडाप्रमाणें केवळ आमची हेळसांड करावी, हें त्यास उत्तम नाहीं.' असें ता. ३१ जानेवारी रोजीं पेशवा पिलाजी जाधवास लिहितो [ खं. ६.

---

१ या प्रकरणांतील मराठ्यांच्या बाजूचे लेख उपलब्ध नाहींत, ही खेदाची गोष्ट होय. या काळच्या इंग्रजफ्रेंचांच्या उलाढाली मुद्दाम ध्यानांत ठेविल्या पाहिजेत. त्या ब्रिटिश रियासत पृ. ५०८–५९४ यांत सांगितल्या आहेत.

ले. १८५ व १८६ ]. या वेळीं नानासाहेब पेशवा मेवाड्यांत स्वारीस होता, पुढें निजाम मरण पावल्यावर त्याच्या वारसांच्या भांडणाचा फायदा घेण्यास पेशव्यास संधि चांगली होती, परंतु त्याच वेळेस शाहूछत्रपतीची आसन्नमरण स्थिति होऊन मराठशाहींत दोन तीन वर्षें बरीच अस्वस्थता व बंडाळी माजली, तेणेंकरून हें निजामाचें प्रकरण ज्यास्तच लांबत जाऊन त्रासदायक झालें.

मुज्फरजंग व चंदासाहेब यांचा बंडावा वाढत चाललेला पाहून, नासिरजंगानें प्रथमतः त्यांजवर चालून जाण्याचा बेत केला; त्यासाठीं त्यानें पेशव्याशीं सख्य जोडिलें. पेशव्यांचे तर्फेनें बापूजी महादेव हिंगणे यानें नासिरजंगाची भेट घेतली, त्यावेळचें वर्णन ता. ७ फेब्रुवारी १७४९ च्या पत्रांत त्यानें लिहिलें आहे तें असें. ' नबाब नासिरजंगास आम्ही आल्याचें कळतांच त्यांणीं गुलाम महंमदखां नामें सरदार पाठविला. जाऊन भेटलों. बहुतसा आदर केला. बोलून बहुतच कुशळ. पादशहाची चाकरी करावी; वजीर इत्यादिकांशीं स्नेह असावा; श्रीमंत स्वामींशीं नित्यानीं स्नेह वृद्धिंगत व्हावा, आम्हीं प्रसंगोचीत पादशहाकडील कोन्शा व वजिराकडील स्नेहाच्या समर्पक गोष्टी सांगितल्या, त्यावरून बहुत संतोष जाहला. दक्षणी रायांचा इतका भरवंसा नव्हता जे, इतका कुशळ आहे. अखेर आसफजाचा पुत्र आहे. पादशहाचे पिलास पोहूं शिकवावें लागत नाहीं. तुम्ही एवढा सरदार हातास आणिला. ईश्वर तुम्हास सलामत राखो.' [ रा. खं. ६ ले १९२ ].

मुज्फरजंग व चंदासाहेब यांचा बंडावा मोडल्याशिवाय नासिरजंगास स्वस्थता नव्हती. कर्नाटकची व्यवस्था लावून मुज्फरजंग निजामशाही हस्तगत करण्याकरितां चालून येणार होता. सबब नासिरजंगानें त्वरा करून मुज्फरजंगावर कर्नाटकांत चालून जाण्याची जंगी तयारी केली. त्यानें प्रथम रघूजी भोसल्याशीं संगनमत करून त्याची मदत मिळविली.[1]

---

१ रघुजीचा मुलगा जानोजी दहा हजार फौज घेऊन नासिरजंगास मिळाला.

त्याप्रमाणें मुरारराव घोरपडे, म्हैसूरचा राजा; आणि कडाप्पा, कर्नूळ, सावनूर येथील नबाब यांचें साह्य मिळालें; आणि अन्वरुद्दीनचा मुलगा महंमदअली व मद्रासचे इंग्रज यांनीही त्याचाच पक्ष स्वीकारिला. येणेंप्रमाणें कर्नाटकांत दोन प्रबळ पक्ष उत्पन्न झाले. या वेळीं म्हणजे १७५० त निजामशाही साफ बुडविण्याची उत्कृष्ट संधि पेशव्यास आली होती, परंतु शाहूच्या मरणामुळें मराठमंडळास हालचाल करतां आली नाहीं, रघूजी भोसले १७५० च्या सेप्टेंबरांत पुण्याहून पेशव्याकडून वस्त्रें घेऊन बाहेर पडला, तो लगेच नासिरजंगास जाऊन मिळाला. प्रचंड फौजेनिशीं नासिरजंग कर्नाटकांत उतरतांच मुजफ्फरजंग व चंदासाहेब फिके पडले. नासिरजंगानें मुजफ्फरजंगास पकडून सक्त कैदेंत ठेविलें, त्याबरोबर नासिरचा वचक सर्वत्र बसला, आणि त्यानें महंमदअलीस अर्काटचा नबाब नेमिलें. ही व्यवस्था मोडण्याचा प्रयत्न डुप्लेनें चालविला. त्यानें बुसी यास पाठवून जिंजीचा मजबूद किल्ला काबीज केला, त्यामुळें नासिरजंगास दहशत बसली. बुसीचें नांवही या वेळेपासून दक्षिणच्या कारस्थानांत पुढें येऊं लागलें. त्याचा जन्म १७१८ तला असून तो बरेच दिवस इकडे येऊन वावरत होता. ता. ५ डिसेंबर स. १७५० रोजीं नासिरजंगाची व फ्रेंचांची लढाई होऊन नासिरजंग मारला गेला; त्याबरोबर फ्रेंचांनीं बुसीस मुजफ्फरजंगाकडे पाठवून त्यास सुभेदारीच्या पदावर बसविलें. नंतर पांडिचरीस जाऊन मुजफ्फरजंगानें स्वतः फ्रेंचगव्हर्नर डुप्ले याचे उपकार मानिले. ता. ७ जानेवारी स. १७५१ रोजीं बुसीस बरोबर घेऊन मुजफ्फरजंग पांडिचरीहून परत निघाला. निजामाचे बाजूस यावेळीं रामदासपंत हा हुशार इसम व्यवस्था पाहत असून त्याचें व पेशव्याचें सूत होतें. आलेल्या संधीचा उपयोग करण्याकरितां पेशव्यानें आपल्या वकिलास पुढील कर्तव्य लिहिलें ते येणेंप्रमाणें:—

' नासिरजंगास पठाण व फिरंगी यांणीं लढाईचे गडबडींत दंगा करून मारिलें. वर्तमान खरें आहे, याचा विचार आमचे मनांत येणेंप्रमाणें

आहे. तुमची सय्यद लष्करखानाशीं निखालसता असेल तर एकांतीं जाऊन बोलावें कीं, खानाची आमची मैत्री, ये प्रसंगीं खानांनीं सर्वप्रकारें आमचे पदरीं पडावें; औरंगाबाद व बऱ्हाणपुर दोनही सुभे आमचे हवालीं करावे. शहरांतील खजाना सर्व आमचे हवालीं करून कर्जपरिहार होय तें करावें. आपलें सर्व प्रकारें जहागीर मनसब घेऊन आमचे हातून आपलें बरें करून घ्यावे, हा उत्तम पक्ष. दुसरा प्रकार नासरजंगाचे लेक अथवा भाऊ यास उभे करून आम्हांस कर्जपरिहारार्थ व फौजेचे एक वर्षाचे बेगमीस ऐवज देऊन आम्हांस सामील करून घ्यावें. आम्ही चाळीस हजार फौजेनिशीं सिद्ध आहों. नीट मुजफरजंगावर चाल देतों. येणेंप्रमाणें ऐकिल्यास यांचे आमचे मित्रत्वाचें सार्थक, त्यांचेंही ऊर्जित, यांत कांहीं बेइमानी त्यांचे पदरीं येत नाहीं. इतकेंही न करीत तर आम्हांस ईश्वर बुद्धि देईल तें आम्ही करूं. त्यांची आमची मैत्री मात्र व्यर्थ होईल. ये प्रसंगीं आमचें कार्य व आपलें ऊर्जित करून घ्यावयाचा समय आहे. खानाची आमची क्रिया आहे कीं, हरएक प्रसंगीं आमचे कार्यास त्यांनीं व त्यांचे कार्यास आम्हीं न चुकावें. एकांतीं साफ बोलणें ' ( रा. खं ३ ले. ३७२ A ). वासुदेव दीक्षित पेशव्याचा वकील औरंगाबादचा अंमलदार सय्यद लष्करखान याजपाशीं होता, त्यास हें पत्र पेशव्यानें तारीख २६ डिसेंबर स. १७५० रोजीं लिहिलें आहे.

या पत्राचा जबाब ता. ३१ डिसेंबर रोजी पेशव्यास दीक्षितानें लिहिला तो असाः–' खानाची भेट घेतली. एकांतीं पत्रार्थ सांगितला. ऐकोन उत्तर दिल्हें कीं, यजमानाचें विपरीत वर्तमान आल्यावरी अत्यंत फिकिरींत होतों. त्यास हें पत्र आलें, येणेंकरून चित्तास समाधान झालें. सर्व आश्रय तुमचाच आहे. दोन मतलब लिहिले. ' ( पुढें पत्र फाटून गेलें आहे. ) ता. ८ जानेवारी १७५१ रोजीं पेशवा पुनः दीक्षितास लिहितो. उत्तम पक्ष, फिरोजजंगास ( गाजीउद्दीन फिरोजजंग–निजाआचा वडील मुलगा ) स्थापावें. तो न येई तर नासरजंगाचा लेक

स्थापावा. तेंही न होय तर आमचेंच कार्य मातबर करावें. यांत तिळमात्र निमकहरामी होणार नाहीं. खानाचे मतें मनसबा आम्हीं लिहिला, त्याप्रमाणेंच करावा असें आहे.' [ खं. ३ ले. ३७४ ]. 'फिरोजजंग आले तरी बरें, नाहींतर आम्हीं एकले श्रीकृपेनें पारिपत्यास समर्थ आहों. खजाना जमा करावा. तूर्त पंचवीस तीस आम्हांस द्यावा. आपण बाहेर निघावें. इकडे हे पठाण मातले कोणी वर्षभरा आटोपणार नाहीं. रोग नवा आहे तोंच दूर केला पाहिजे. खानास योग्यता मोठी. नासरजंग मेले तर फिरोजजंगाचें नांव घ्यावें. आम्हांस त्यास एक विचार करावें. आमचें कर्ज फेडावें, म्हणजे सरदार बोलावतों. गंगातीरावर येऊन भेटावें. सुलतानजीचा लेक ( जानबा निंबाळकर ) हाताखालीं घ्यावा. तिळमात्र दोष पदरीं न येतां दिल्ली, लाहोर, मुलतान पावेतों लौकिक खानाचा होईल कीं खानांनीं प्रधानास मेळवून घेऊन नबाबाच्या दौलतीचें नांव राखिलें. जो जवानमर्द आहे त्यानें दोष येत नाहीं, ऐसा समय पाहून आपलें कार्य, मित्रकार्य संपादून कीर्तीस पात्र व्हावें उचित असे. [ले. ३७४[1] व ३९९].

याप्रमाणें सय्यद लष्करखानाबरोबर नानासाहेबानें पुढील उपक्रमाचे विचार चालविले होते. त्यापासून लभ्यांश निष्पन्न होण्यापूर्वींच म्हणजे जानेवारी १७५१ च्या अखेरीस मुजफ्फरजंगही मारला गेला.

ता. १२ फेब्रुवारी १७५१ च्या पत्रांत रामदासपंतानें खालील हकीकत कळविली आहे. 'पठाणास मारून घेतल्यावर मुज्फरजंगास तीर लागला. डोल्यांतच शांत जाहले. परंतु पंत मजकुरानीं त्यांजला उठून बसवून लोकांत ऐसें जाणवलें कीं जिवंत आहे. सर्व लोकांस हिंमत देऊन डेरे दाखल जाहल्यावर प्रगट केलें व सलाबतजंगास मुबारकबाद दिली. त्यास सलाबतजंगांनीं यांजला बोलावून बहुत समाधान केलें व बहादुरीचा खतबा दिला; व काम दिवाणीचें याजवर बहाल राखिलें. यांचा हेतु होता

1 दोनही एकच आहेत.

कीं धनी कदरदान गेला असतां, काय मामला करावा, परंतु त्यांचा हेत बहुत पाहिला, उपाय नाहीं.' [ रा. खं. ३ ले. ३७७ A ].

२. रामदासपंताशीं पेशव्याचें राजकारण ( स. १७५१ ).—रामदासपंत हा शिकाकोल ब्राह्मण, नासिरजंगापाशीं नोकरींत होता. नासिरजंग कर्नाटकांत उतरला तेव्हां त्याचा पाडाव करण्याच्या बुद्धीनें डुप्लेनें रामदासपंतास फोडून त्याचे मार्फत नासिरजंगास नाहींसा करण्याची खटपट चालविली. ती सिद्धीस जाऊन कडप्याचा नबाब महंमदखान यानें नासिरजंगास गोळी घालून कपटानें ठार मारिलें. अशा कृत्यानें रामदास पुढें आला. डुप्लेनें त्यास राजा रघुनाथदास अशी पदवी व मुजफरजंगाची प्रधानकी देवविली. अशी याची पूर्व पीठिका ग्रँट् डफनें दिली आहे. अब्दुल्‌रहिमान ऊर्फ हैदरजंग हाही इसम डुप्लेच्या उपयोगीं यावेळीं पडला. तो बुसीचा दुभाषा व वकील म्हणून होता. त्याचा बाप ख्वाजा कलंदरखान म्हणून मच्छलीबंदराच्या मामल्यावर होता. 'त्याजबरोबर नऊ दहा लक्षांची तकरीर निघाली. वाजपूस व्हावी तों खान मारनिल्हे पळोन फ्रेंचांचे आश्रयास पांडिचरीस गेले. पुढें निजामुल्मुल्क व नासिरजंग दोघेही वारल्यावर कलंदरखान मुसाबुसी समागमें हैदराबादेस आले. दोनएक महिने जाल्यावर मृत्युपावले. त्यांचा पुत्र पांदिचरीस कित्येक वर्षें राहून फ्रेंच भाषा उत्कृष्ट शिकला तो मुसाबुसीजवळ कुल यख्त्यारी. त्यांस सीहजारी मनसब व नौबत निशाण व कलंदरखान हैदरजंग हा किताब दिधला.' [ रा. खं. १ ले २१ ]. रामदासाशीं डुप्लेचें एकंदर कारस्थान या अब्दुल रहिमानाचे मार्फत असे. नासिरजंग मरण पावतांच बुसी व रामदासपंत यांनीं मुज्फरजंगास निजामी दिली, परंतु त्याचाही अल्पावकाशांत म्हणजे जानेवारी स. १७५१ त लढाईंत अंत झाला. तेव्हां पुनरपि वरील दोघांनीं सलाबतजंग यास निजामी दिली; आणि बुसीच्या हाताखालील फ्रेंचांच्या मदतीनें सलाबतजंग कर्नाटकांतून दक्षिणेंत निजामीवर येऊं लागला. तेव्हां ता. २९ जानेवारी स. १७५१ रोजीं

पेशवा पुणें सोडून बाहेर पडला, व त्यानें १२ फेब्रुवारीस औरंगा-बादेस शह देऊन सय्यद लष्करखानापासून सत्रा लक्ष रुपये खंडणी घेतली आणि जप्ति उठविली. सत्रा खेरीज जप्तीचा वसूल आला. (पु. रो. पृ. ६१). यावेळीं "औरंगाबाद व बऱ्हाणपुर हे निजामाचे दोन सुभे फौज पाठवून पेशव्यानें जप्तींत ठेविले. ते काबीज करण्याचाच पेशव्याचा घाट होता. पुढें" सलाबतजंग येतो असें ऐकून, त्यास अडविण्या-करितां म्हणून पेशवा दक्षिणेस कृष्णाकांठी गेला. ता. २० जानेवारीस पेशव्यास त्याचा वकील लिहितो 'प्रस्तुत रामदासपंताचा बहुत उत्कर्ष जाला. मुख्याची कृपा बहुत, हें वर्तमान आपणास विदित जालेंच असेल. माझा त्यांचा बहुत स्नेह. एकजीव व दोन शरीरें, म्हटलें पाहिजे. मजला त्यांहीं बहुत लिहिलें आहे कीं सैन्यास येणें, म्यां उत्तर लिहिलें कीं मजला केशवरावजीची चाकरी टाकणें नाहीं. हें वतन आहे. तुम्हीं खडकीस आलियावर येईन. रामदासपंत बहुत उदार गृहस्थ आहे.' [खं. ३ ले. ३७५] 'यानंतर फिरोजजंग बहादूर यांणीं दक्षिणेंत यावयाची तयारी केली. जागां जागां कागद पाठविले. कित्येक उमराव सांगातें तैनात होतात. आपले लोकांस हुजरांत ठेवितात. पहावें होऊन येईल तें खरें. पंतप्रधानांची उमेद त्यांस बहुतशी आहे. वकिलांनीं त्यांची खातरजमा बहुतशी केली आहे.' अशी खबर पेशव्यास ता. १२ फेब्रुवारी रोजीं लिहिलेली आहे. [ किता ३७५ A ] निजामुलमुल्कच्या मृत्यूनंतर पुढील दोन तीन वर्षांत निजामशाहींत नानाप्रकारच्या भानगडी उपस्थित होऊन त्यांत पेशव्यानें मराठशाहीच्या तर्फेनें आपली बाजू कसकशी सांवरीत नेली हें वरील अनेक पत्रांवरून चांगलें व्यक्त होईल. ग्रँट डफची हकीकत एकदेशीय असल्यामुळें खरा प्रकार समजण्यास या नवीन कागदपत्रांचा चांगला उपयोग होतो. याचवेळीं ताराबाईचें कारस्थान रामदासपंताकडे होतें, तें मोडून घरांतील कारस्थानास जोर यावा म्हणून, पेशवा सलाबतजंगाला

अडविण्याकरितां फेब्रुवारींत रायचूरकडे कृष्णाकांठीं पोंचला. ता. २१ फेब्रुवारीच्या पत्रांत ( खं. ३ ले. ३७७ ) खालील मजकूर आहे:—

'श्रीमंतांची मर्जी माघारे फिरावयाची होती, परंतु लांब आले. ये प्रांतीचे पाळेगार तमाम येऊन भेटले. घासदाणे, खंडण्या तमाम मुलखांत घेत, भागानगर डावें टाकून कडप्याचे सुमारें निजामलीकडे जावें हा हेत धरला आहे. त्याची पूर्तता जाहल्यावर त्यांस समागमें घेऊन औरंगाबादे-जवळ मंगेचे कांठीं येऊन रहावें हा विचार आहे.' त्यानंतर ३ मार्चच्या पत्रांत ( ले. ३७८ ) असाच मजकूर आहे. पुढें निजाम सलाबतजंग व पेशवा जवळ जवळ येऊन जानोजी निंबाळकरामार्फत उभयतांचा करार झाला, तो ता. २३ मार्च स. १७५१ च्या पत्रांत ( ३८० ) दिलेला आहे, तो असा:—'श्रीमंत पंतप्रधान फौजेसहवर्तमान रघूजी भोसले व फत्तेसिंह भोसले यांचे फौजेसुद्धां हैदराबादेपुढें सात मजला, ताम्राचे फौजेशीं सात-कोशींचे तजविजीनें पानगळानजीक पांच रोज मुक्काम केला. ताम्रा-समागमेंही वीस हजार फौज फिरंगीसुद्धां आहेत. सेवेशीं जानोजी निंबाळकर दरम्यान येऊन सतरा लक्षांवर मुकदमा चुकला. पैकीं दोन लक्ष नक्त दिले. तीन लक्षांची वरात भागानगरावर व बाकीची वरात औरंगाबाद बऱ्हाणपुर यांजवर देविली आहे. जसी खानदेश वगैरे कूळ मोकळी करावी ऐसा निश्चय जाला. ताम्रही भागानगरास आज उद्यां कुच करून जाणार. श्रीमंतही कृष्णातीर धरून सप्तऋषीस जाणार. दमाजी गायकवाड हे प्रांतीं गेला म्हणोन वर्तमान श्रीमंतांस विदित जालें आहे, यामुळें जातात.' हाच मजकूर खुद्द पेशव्यानें दीक्षितास लिहिला आहे. ( ले. ५२४ ). 'तीन लाख रुपये बऱ्हाणपुरच्या मुभ्याकडून घेऊन मोगलाई मुलखांत बसविलेली जप्ती उठवावी.' असें पत्र पेशव्यानें ता. २८ मार्च १७५१ रोजीं आपल्या अंमलदारास लिहिलें. [ ना. सा. रो. ले. ५२ ]. गायकवाडाच्या भानगडीमुळें घशांत आलेले दोन सुभे पेशव्यास पचविता आले नाहींत. 'मोगलांकडील तह उरकून दरमजल कऱ्हाडयानजीक आलों.

पुढें गायकवाडाचे पारिपत्यास जलद जाऊन पोंचावें ऐसें आहे. ईश्वर कृपाच करील.' त्यानंतर ले. ५३५ त नबाबाचे जवळ राहणाऱ्या गृहस्थाचा उल्लेख आहे तो बहुधा बुसीचा असावा. फ्रेंचांचा शिरकाव निजामाचे कारस्थानांत झाला हा प्रकार पेशव्यास जाचक वाटला असें दिसतें.

यावेळीं निजामाकडे रामदासपंताची चलती विशेष होती. दीक्षित वगैरे मंडळींच्या मार्फत रामदासास आपल्या बाजूस वळवून घेण्याचा पेशव्याचा प्रयत्न असावा. दीक्षिताचा हस्तक रामदासाची तारीफ करतो ती अशी, 'राजा रघुनाथदासजीची कृपा आम्हांवर बहुत. या ऊर्जित दशेमध्यें आम्हांशीं स्नेह केला ऐसा कोणाशीं केला नसेल. त्याचे थोरीस अंतर नाहीं. पेषकारी पादशाही व मुतसद्दीगिरी बऱ्हाणपुर दोनही चिरंजीव उत्तम राऊजींचे नांवें, व मुशरफी व खजानचीगिरी, वकिली, दडारीपरसाई हे चिरंजीव अच्युतरायाचे नांवें करून, दोन इनायतनामे पाठवून दिले. दखलकार जाहलों. सुभेदार वगैरे सर्व, त्यांची कृपा आह्मांवर जाणून खुशामत करितात ईश्वर त्यांजला बहुसाल करो. आतां भगवान या गृहस्थांस कांहीं दिवस विराजीत ठेवो, कीं आमचे श्रमाचा परिहार करतील. सैन्य भागानगराहून चालले ह्मणजे औरंगाबादेस येईल, ह्मणजे मीही तेथें येईन,' ता. ९ एप्रिल स. १७५१. [३ ले. १८२] उत्तमराव व अच्युतराव हे दोघे रामदासाचे मुलगे किंवा पुतणे वगैरे असावे. एकंदरींत रामदासाचा कारभार औट घटकेचाच व्हावयाचा होता हें वरील पत्रांतील मजकुरावरून सहज ध्यानांत येण्याजोगें आहे. तो मोठा धाडसी असून थापा देण्यांत निपुण होता. ता. १४ जुलईस पेशवा दीक्षितास लिहितो, 'दिल्लीकडून गाजुद्दीनखान न आले, पातशहाचें कृपापत्र आलें, तर पंधरा लक्षांची जहागीर देऊं ऐसें मागें ते बोलले होते. आम्ही अवश्य म्हणून म्हणत होतों. शेवटास नेणें नव्हतें, यास्तव मोघमच मजकूर ठेविला. सांप्रत गाजुद्दीनखान राहिले, यास्तव आमचें प्रयोजन नाहीं ऐसें मनांत आणून, उडवाउडव करीत असतील तर करोत. रामदासपंतास वरीदारीं

पेंच बहुत आहेत. आम्हीं उदासीनपण दाखविल्यास कांहीं तरी भारी पडेलच. आम्हांस तो मोठमोठ्या नफ्याचा भरंवसा त्यापासून आहे. राजश्री जानबाचे बोलण्यांत फारच मजकूर होता. रामदासपंतांनीं करारच केला आहे कीं तुमचें कर्ज फिटोन, तुमचे हातून मोहरांची दक्षणा वांटवितो. वडिलांचे इतिफाकानें, सासुभ्यांचा यथास्थित बंदोबस्त, जो थोरले नबाबांस न जाहला, तो करितो. हे सर्व आशय तुम्हीं बोलत जाणे. आमचे मनांत त्यांशीं स्नेह करावा, सर्व प्रकारें त्यांचें साहित्य करावें हेंच आहे.' [ ले. ३८७ ]. ' सर्वप्रकारें आम्हांस रामदासपंताचे स्नेहाचा भरंवसा आहे. त्यांचा आमचे ठिकाणीं निष्ठापूर्वक स्नेह व आमची कृपा त्यांचेठायीं असतां, वरकडांच्यानें काय होणार ! गायकवाडाचे प्रसंगीं त्यांनीं कुमक पाठविली येणेंकरून वचनप्रामाणिकतेचा पुढें फार भरंवसा धरिला आहे.' [ ता. १५ ऑगस्ट १७५१ खं. ३. ले. ३८९ ]' परंतु ता. २० ऑगस्टच्या पत्रांत पेशव्याच्या मनांत रामदासासंबंधानें संशय उपस्थित झालेला दिसतो. ' मुखें नम्र बोलतात, परंतु बऱ्हाणपुरांत फौज ठेवितात म्हणून लिहिलें. बहुत उत्तम जाहलें. श्रीकृपेनें येथेंही सेनासिद्धता लवकरच होईल. आम्हीं त्यांशीं पूर्वीं स्नेहच केला. आतांही स्नेह वर्धमान व्हावा हेंच इच्छितों. आमचा निश्चय हाच सांगत जावा कीं, तुम्हीं सर्वप्रकारें एकनिष्ठा धरीत असतां आम्हांस कलह इच्छा नाहीं. गायकवाडावर जातां, आपण फौज कुमकेस पाठविली, तेणेंकरून बहुत भरंवसा धरितों. ऐसें प्रकारें गोड बोलून संशय दूर होत तें करणें. [ ले. ३९० ता. २० ऑगस्ट १७५१. ] हे संशय दूर न होतां वाढतच गेले आणि लवकरच निजाम पेशव्यांचें युद्ध सुरू झालें. रामदासपंताचे सांगण्यावरून जानोजी निंबाळकर ता. २७ आगस्ट रोजीं बोलणें करण्याकरितां पेशव्याचे भेटीस पुण्यास आला. [ पु. रो. ७१ ]. परंतु त्या भेटींत महत्त्वाचें कांहीं घडलें असें दिसत नाहीं.

१ यावरून ताराबाईची पत रामदासपंताकडे बिलकूल नव्हती हें उघड होतें.

वास्तविक या प्रसंगीं निजाम व मराठे यांचीच चुरस लागली होती असें नाहीं. त्यांच्या तंट्यांत इंग्रज व फ्रेंच यांचा शिरकाव झाला होता. मुजफ्फरजंगाचे ठिकाणीं सलाबतजंग दाखल झाला, तरी फ्रेंचांचें वजन कमी झालें नाहीं. इंग्रजांनीं कर्नाटकांत महंमदअलीचा पक्ष घेतला, तेव्हां डुप्लेनें चंदासाहेबास मदत करून त्रिचनापल्ली काबीज करण्यास पाठविलें. परंतु इंग्रजांनीं क्लाइव्हचे हाताखालीं फौज देऊन त्याजकडून अर्काटवर हल्ला करविला. तो हल्ला यशस्वी न होतां, उलट क्लाइव्ह अर्काटचे वेढ्यांत घेरला गेला. हे प्रकार इंग्रजांचे इतिहासांत तपशिलानें वर्णिले जातात. त्याच वेळीं पेशवे-निजामांची चुरस इकडे दक्षिणेंत वाढत होती, आणि गाजीउद्दीनाचें व पेशव्याचें बोलणें शिंदेहोळकरांमार्फत चाललें असून गाजीउद्दीनास आणून दक्षिणचा बंदोबस्त करवावा असा नानासाहेबाचा उद्देश होता, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. खालील विस्तृत पत्र पेशव्यानें होळकरांस ११ जून १७५१ रोजीं लिहिलेलें आहे. [का. सं. प. या. ३५८]

३ पेशवे-निजामाचा बिघाड ( ऑक्टोबर १७५१ ): —' नबाब गाजुद्दीनखान फिरोजजंग बाजदबरसाद दक्षिणेस यावयाची तजवीज करीलसें दिसतें. फिरोजजंग आसोफजाचे पुत्र खरेच, परंतु बहुत दिवस दिल्लीस राहिले. मुत्सद्देगिरीचेंच काम केलें. शिपाइगिरी सरदारीचें काम त्यांस पडलें नाहीं. प्रस्तुत ते सरदारीचे व बहादुरीचे कामाची हिंमत करणार. त्यास आम्ही सलाबतजंगाशीं जहागिरीची बोली लाविली आहे. तेही आम्हाशीं बोलतात. परंतु गाजुद्दीखानाचे येण्याची गरमी असती तर चित्तानुरूप हेही आम्हांशीं बोलते. परंतु गाजुद्दीनखान येण्याची ढील, यामुळें इकडील निवटलें नाहीं. तुम्ही गाजुद्दीनखानाकडे वचनास गुंतलां, आम्ही सलाबतजंगाकडे गुंतलों, येणेंकरून दोहोंकडेही फार फार अवघड होऊन बेइमानीचा शब्दारोप येईल. यास ही गोष्ट सर्वथा कार्याची नाहीं. प्रस्तुत तुम्हीं वचनास न गुंतावें. जर सलाबतजंग कार्य करून न देत, तर यांजकडील बोली तोडून गाजुद्दीनकडे बोली लावून कार्य करून घ्यावें लागेल.

त्यांस, इकडील प्रकार निवटला नाहीं तोंपर्यंत तुम्ही गाजुद्दीनखानाशीं वचनास न गुंतावें. आमचे मतें यांजशीं वचनप्रमाण झालें आहे. यांनींच जहागीर दिली तर तों यांसच राखावें. दुसरापक्ष न करावा. यांनीं लबाडी केली, नीट न देत, तर यांसीं इमान उजवलें. आम्हांवर तर शब्द नाहीं. ऐसे जावसाल जानोजी निंबाळकर मध्यस्थ आहेत त्या हातीं जावसाल करावे. मग सुखरूप गाजुद्दिनास आणून यांचें पारिपत्य करावें व त्यांपासून मातबरच पैका मुलूख घेणें तो घ्यावा. या गोष्टीचा स्पष्टार्थ श्रावण भाद्रपद अखेर कळेल, तदनुरूप जें कर्तव्य तें करावें. जर केवळ त्यांचें राजकारण तुम्हीं टाकिलें, ते नाउमेद होऊन घरीं बसले, म्हणजे यांसही आमची गरज पडणार नाहीं. त्यास कांहीं दिवस धातुपोषण बोलावें. यांजपासून आपलें कार्य साधावें. हे ताळ्यावर नच येत तर त्यांशीं शपथपूर्वक बोलून मग त्यांस आणावें. ऐसा कोरगारीनें मनसबा केल्यावांचून प्रामाणिकता रहाणार नाहीं. आम्हीं यांसी सलूख केला, तुम्हीं त्यांशीं इमान केलें, म्हणजे महा अप्रामाणिकतेचें कारण होणार. बहुत लौकिक फटकळ होणार. यास्तव त्यांचें भय यांस पडे, कार्य यांजपासून होय ऐसें करावें. हे ताळ्यावर नच येत तर आपलें इमान उगवलें. तुम्हीं दसरियापावेतों राजकारण राखावयाचे रीतीनें बोलणें. इतक्यांत यांसी बोली पाहून स्पष्ट निश्चय करून तुम्हांस कळवूं. तदनुरूप जें कर्तव्य तें करणें, सलाबतजंग थोड्या दिवसांत औरंगाबादेस दाखल होतील. जानबा जाऊन जावसाल करून येत तों उबार आहे.' या पत्रावरून पेशव्यांच्या उद्देशाची चांगली कल्पना होते. त्यास निजामाकडून जहागीर मिळवावयाची होती. सलाबतजंगाकडून ती मिळाली नाहीं, तेव्हां गाजुद्दीनखानास आणण्याचा निश्चय पुढें कायम झाला. सलाबतजंग कर्नाटकांतून परत आला तो जून १७५१ त औरंगाबादेस पोंचला.

नानासाहेबास आशा होती कीं, सलाबतजंगाचे मार्फत आपला कार्यभाग साधेल. औरंगाबादचा अधिकारी सय्यद लष्करखान व दिवाण रामदास हे

बहुधा पेशव्याच्या बाजूचे दिसत होते. ता. १२ जुलई १७५१ रोजी पेशवा दीक्षितास लिहितो, 'गाजुद्दीनखान वडील आणि पादशाही सनेदसह वर्तमान, येतात. त्यांचे साहित्याविषयीं पादशहांनीं शिंदे होळकरांस पुष्कळ सांगितलें. आह्मांसही लिहिलें आहे. सय्यद लष्करखानाचा मनोदय गाजुद्दीनखानाकडेच स्पष्ट दिसत होता. रामदासपंताचेही चित्तापासून विमनस्कता, यामुळेंही तिकडेच अनुकूल मनोदय होता. सर्व प्रजांचें बरें होतें व सरदार ( शिंदे होळकर ) करून येतील तें आम्हांस निभावलेंच पाहिजे. सलाबतजंगासही हेंच योग्य आहे. घरचे घरीं भांडणें सर्वथा योग्य नाहीं. कदाचित् सय्यद लष्करखान फिरंग्यांचे थरावर जातील तर न जावें. फिरंग्यांचें फुलचरीस ( पांडीचरीस )संकट, मग नवें सामान कोठून येणार ! व एक फिरंगी सामानानें काय होतें ? भर देतील परंतु भरंवसा न मानावा.' [ का. सं. प. या. ले. ९ ].

सलाबतजंगांत स्वतःचें कर्तृत्व नव्हतें. तो सर्वस्वी बुसीचे हातांत होता; आणि मराठ्यांची लष्करी सत्ता कमी करून त्या ठिकाणीं आपलें वर्चस्व निजामशाहींत स्थापण्याचा बुसीचा सर्वस्वी उपक्रम होता. तेव्हां पेशवा व बुसी लवकरच वर्दळीस येणार अशीं चिन्हें दिसत असतां, त्यांत भर पडण्यास एक विशिष्ट कारण याच वेळीं झालें ते असें.

उत्तरेंतून पेशव्यांचे खजिनें हरहमेश दक्षिणेंत येत असत. २२ एप्रिल स. १७५१ त एक खजिना औरंगाबादेवरून येत असल्याचा उल्लेख पेश-व्याचे एका पत्रांत आहे [ का. सं. प. या. ले. २ ]. यानंतर नारोशंकर यांजकडून दिल्लीहून बाळाजी महादेव खजाना घेऊन दक्षिणेंत येत होता, तो रामदासपंतानें अब्दुलखैरखान याच्या हस्तें लुटवून घेतला. याजबद्दल पेशव्याचा वकील श्यामजी गोविंद यानें रामदासपंताकडे तक्रार केली असतां, तो उडवा उडवीचे जबाब देऊन, 'काय प्रकार आहे, तपास करितों, खजीना घेतला असल्यास परत करूं,' अशा गप्पा सांगूं लागला. 'परंतु अंतस्थ आशय मनास आणितां, बिघाडाची खुरस्नूर बहुतशी आहे,

फौजेची व लढाईची तयारी होत आहे,' असा प्रकार वकिलानें पाहून तो पेशव्यास लिहून पाठविला. या वेळच्या भानगडी संबंधानें रा. खं. १ ले ३–१४ चीं पत्रें तपशीलवार व वाचण्यालायक आहेत. प्रथम रामदासानें जबाब दिला, ' आम्ही न बोलतां खजाना देत आहों. तीन लाख रुपये तों ब्र्हाणपुरीं देवविलें. राहिले दोन लाख चोवीस हजार, ते उदैक येथें देववितों. तोंडानें देतों म्हणावें आणि देऊं नये हे गोष्ट सहसा घडणार नाहीं. पांच लक्षांचा विषय तो काय ! याज करितां श्रीमंतीं संशय मानावा ऐसें नाहीं. या गोष्टीवरून कलह वाढवावा ऐसें नाहीं. हे गोष्ट अनुचित जाली.' रामदास बुसीचे सल्ल्यानें वागत असल्यामुळें, त्या दोघांनीं हें लढाईचें प्रकरण उपस्थित केलें. वास्तविक निजामाकडील इतर मंडळीची त्यास भर नव्हती. ' येथें शोध करतां राजाजीवर अवघे रुष्ट आहेत. राजाजीस मोठा भरंवसा फिरंगियांचा आहे. कोणे प्रसंगीं काय होईल कळत नाहीं.' ता. १४ ऑक्टोबरास पेशव्याचा वकील औरंगाबादे· वरून लिहितो. ' येथें आज दोन तीन दिवस हुलड झाली आहे कीं, खुदाबंदखान हैदराबादेहून चाळीस हजार खजाना घेऊन येत आहेत त्यास श्रीमंतीं यशवंतराव पवार दहा हजार फौजेनिशीं खुदावंद खानावर पाठविले आहेत. तो खजाना अटकावून आणावा, हे वार्ता येथें दाट राजाजीपावेतों आहे. या वर्तमानावरून कितेकांचा आव गेला आहे. जर हे गोष्ट सत्य असली, खजाना सरकारांत हस्तगत जाला, तर हे सहजच गर्वहत होत आहेत; व येथें लोक म्हणतात कीं दोन महिने श्रीमंतीं असेंच यांस दबकावून राखल्यास हे आपल्या आपण मरतात. यांस मारावें लागतच नाहीं. यांस शिबंदी व खानगी खर्च मिळोन नित्य लक्ष रुपये खर्च आहे. दरमहा तीस लक्ष रुपये पाहिजेत. खजिन्यांत तो पैका नाहीं. हैदराबादचा खजिना आणविला आहे, तितक्यानें बेगमी होत नाहीं. यास्तव यांस या दिवसांत प्रतापाचें दर्शन जालियानें यांचा गर्वहत होईल. राजश्री बाबूजी

१ रामदासपंत.

नायकाकडील वकील राजाजीकडे जाऊन वळवळ करीत आहे. समत्रऋषीवरील मातुश्रीचेही येथें कागदपत्र येतात. जाबसाल जात असतात. राजाजीचे चित्तांत बिघाड करणें हा निश्चय जाला आहे. शहानवाजखान व राजाजीचें एकमत आहे.' लेखांक १३ त निजामाच्या फौजेचा तपशील दिलेला आहे.

सलाबतजंगाचे दरबारीं वरील प्रकार चालला असतां इकडे पेशवा शिंदे होळकरांमार्फत गाजुद्दीन खानाशीं संधान लावीतच होता. ' सय्यद लश्करखान व जानोजी निंबाळकर हे, नबाब फिरोजजंगाचे सेवेंत एकनिष्ठ बहुत दिवस नबाबाचें येणें इकडे व्हावें हें इच्छित होते. हे उभयतां मर्द, प्रामाणिक, मातबर, सर्वांहीं अमीर यांचे लगामी, दहा हजार फौज एकीकडे व हे दोघे बुद्धिवंत एकीकडे, आमचे वडिलांतागाईत परमस्नेही, गतवर्षी मातबर पेंच आम्हांवर पडला तेव्हां बहुतांप्रकारें आमचे कार्यास आले. तोही यांचा उपकार आह्मांवर आहे. यास्तव तुह्मीं नबाब फिरोजजंगास उभयतांविशीं उत्तमप्रकारें सांगून नबाबाचे खास दस्तूरचीं पत्रें उभयतांचे नांवें आश्वासनपूर्वक पाठविणें. त्यांत यांची खातरजमा होईल. हे उभयतां नबाबाचे स्वाधीन झाले असतां, नबाबाचा बहुत नफा आहे. यांस पूर्ण भरंवशाचे नबाबाचें हातचें पत्र जरूर पाठविणें.' [का. सं. प. या. १३४] जानोजी निंबाळकर २७ आगष्ट १७५१ रोजीं पुण्यास आला तो कित्येक महिने तेथेंच होता. [ पु. रो. पृ. ७१ ]. जानोजीसंबंधानें नानासाहेबांचें हें मत किती फिरलें तें पुढें दिसून येईल.

४ घोडनदीचें युद्ध व शिंगव्याचा तह. ( नोव्हेंबर–जानेवारी १७५१–५२):—ता. ४ आक्टोबर १७५१ रोजीं पेशवे फौजेसह स्वारीस निघाले, [ पु. रो. ] नोव्हेंबरांत पेशव्याची उमेद मोठी होती. [ खं. ३ ले. ४०० ] बुसीच्या सल्ल्यावरून रामदासानें पेशव्याच्या हद्दींत घुसून चढावाची लढाई देण्याचा इरादा चालविला. पेशव्यांचा

१ सातारा.

खजाना शेवटीं आला नाहीं तो नाहींच. पेशवे कळस, खडे, वडगांव या गांवांवरून कुकडीस गेले. निजाम कुपटी, केदल, पावळ, नगरावरून कुकडीवर आले. निजाम अशा जोरानें आपल्या अंगावर चालून येईल ही पेशव्याची अटकळ नव्हती. ह्याप्रसंगीं बुशीच्या तोफखान्याची पहिलेचि ओळख मराठयांस पटली. 'ता. २० नोव्हेंबर स. १७५१ बुधवारीं श्रीमंतांनीं पारनेरानजीक मोगलाशी थोडीबहुत लढाई केली. चिमणाबापू शेणवाई ठार पडले. समशेर बहाद्दराच्या घोडीस आल्याची जखम लागली.' [ पु. रो. ७३ ]. 'ता. २१ रोजीं दिवसा झटापट जहाली. रात्रीं ग्रहण लागतेसमयीं मोगलांकडील छापा श्री. नाना स्नानास गेले तेथें आला. गारदी व फिरंग्यांनीं दारू-गोळी, बाण यांचा मार फार दिधला. हे उधळोन निघाले ते समयीं तारांबळ जाहली. माणूस खार्या जाले नाहीं.' पेशव्याच्या पूजेचीं सोन्याचीं भांडीं व देव, मुसलमानांनीं लांबविले. या संग्रामास कुकडीची लढाई म्हणतात. ता. २६ रोजीं पेशवा ताराबाईस लिहितो, 'मोगल जवळ्यापुढें गुणेरियावर कुकडीचे वडेस मुक्कामास आला. सेवकाच्या फौजा मोगलांभोवत्या लागल्या आहेत. नित्य झोटपीट होते. दहा वीस घोडीं, शेंपन्नास बैल आणितात. मोगल दोन कोस चालतो. साहेबांचा पुण्यप्रताप समर्थ आहे. [ खं. ६ ले. २३२ ]. यावरून कुकडीच्या लढाईंत पेशव्याचें नुकसान विशेषसें झालें नाहीं. 'पुण्यांत पळण झाली. दुसरे दिवशीं ग्रहणाचे पौर्णिमेस लढाई होतां पांच हजार फौजेनें चालून महादजी अंबाजी पुरंदरे, दत्ताजी व महादजी शिंदे बारगीर व कोन्हेर त्रिंबक एकबोटे वगैरे अकरा असामींनीं डोलाची अंबारी खालीं केली. सरकार फौजेनें अंबारी लुटली. मोगल शिकस्त जाहला. [ का. सं. शा. १३ ] पुढें मोगलानें रांजणगांव लुटून दाभाड्याचें तळेगांव उद्ध्वस्त केलें. बुधवारीं २७ नोव्हेंबर रोजीं निकराचा सामना झाला. नंदुरबारचा मोगल

१ कुकडी नदी नगर जिल्ह्यांतून वाहत येऊन शिरूरजवळ घोडनदीस मिळते.

पिछाडीस होता, त्याजवर घालवून सारा लुटला. चार हत्ती व पांचसातशें घोडे आणि लोकही मारले. खंडोजी निगडे जखम लागोन ठार पडले. [ पु. रो. ] ह्यावेळींही महादोबा पुरंदरे व दत्ताजी व महादजी शिंदे हजर[1] होते. ता. ९ डिसेंबर रोजीं मांडवगण येथें लढाई झाली, तींत कोन्हेर त्रिंबक एकबोटे यानें विशेष पराक्रम केल्यावरून त्यास 'फाकडे' हा किताब देण्यांत आला. हा गृहस्थ पुरंदरचा राहणारा असून, पुढें सावनूरच्या हल्ल्यांत स. १७५६ च्या मे महिन्यांत मारला गेला. [ Duff. II. 53 ]

युद्ध चालू असतांच आंतून पेशव्यानें निजामाशीं अंतस्थ रीतीनें सलुखाचें बोलणे चालविलेंच होतें. त्यास अनुसरून सदाशिवराव व रामदासपंत यांची भेट कोरेगांव येथें झाली. तितक्यांत (डिसेंबर १७५१) शिवनेर किल्ला निजामाचे कबजांत होता तो मराठ्यांनीं काबीज केल्याचें वर्तमान आलें, तेव्हां तो परत दिल्याशिवाय तह होईना. तो किल्ला घेण्याचे इराद्यानें मोगलफौज नगराकडे चालली. रस्त्यानें मराठ्यांनीं तीस खूबच त्रास दिला. 'मोगल पुण्यावर आल्याचें ऐकून रघूजीभोसल्यानें पैनगंगा व गोदावरी ह्या नद्यांचे दरम्यानच्या निजामाचे मुलखांत खंडणी घेऊन आपली ठाणीं बसविलीं.' [ खं. २ पृ. १२४ ] निजामाचे फौजेस पगार न मिळाल्यानें त्याचे लोक काईल झाले होते. बुसीशिवाय सलाबतजंगाचे दुसरे सल्लागार युद्धाचे विरुद्ध होते. अशी रेंगाळी चालून शेवटीं ता. ७ जानेवारी सन १७५२ रोजीं तह ठरला. शिंगवे परगणे राहुरी येथें सलाबताकडील नानरोटी व रामदासपंताकडील तुळशी येऊन तहाची शपथ कायम झाली. तहाची फलनिष्पत्ति काय ती स्पष्ट समजत नाहीं.

---

१ या लढाईस घोडनदीची लढाई म्हणतात. हींत बापूराव फडणिसाचे पायास तोफेचा गोळा लागला. २ वैराचें बीज नष्ट झालें नाहीं. 'अंतर शुद्ध नाहीं,' असे पेशवाच म्हणतो.

चार लाखांचा मुलूख पेशव्यास मिळाला, असें रा. राजवाडे लिहितात. (खं. १ प्र. पृ. ४०) ह्या वेळच्या एकंदर परिस्थितीची हकीकत पेशव्यानें शिंदे होळकरांस लिहून कळविलेली मुद्देसूद आहे. ती अशीः—ता. २७ मार्च, स. १७५२.

'आशीर्वाद विशेष. मुजफरजंगाकडील पठाणांनीं नासरजंगास भेदून मारिलें. मुजफरजंग औरंगाबादेकडे येऊं लागला तेव्हां आम्हीं जप्ती केली, औरंगाबादेजवळून रुपये ( सतरा लक्ष-? ) घेतले. याजमुळें मोगलानें विषम मानिलें. तेव्हां तुम्ही जयनगरापाशीं होतेस, वारंवार पत्रें पाठविलीं कीं, गाजुद्दीखान इकडे येतील तर उत्तम. तुम्हींही यावें. सासुभे दक्षिण सोडावी; अथवा गाजुद्दीखानास आणून स्थापावें, त्यापासून निदान एखादा तरी सुभा घ्यावा. कर्ज वारून घ्यावें. येणेंप्रमाणें करावें. तेव्हां तुम्ही न आलेत. वजिराचे कामावर गुंतत चाललेस. श्रीइच्छेनें मुजफरजंग व पठाण भांडून मुजफरजंग मेला. आम्ही जवळ गेलों. परंतु मागें ( गायकवाडानें ) बापू भीवराव मोडले, याजमुळें शह पडला. आम्हांजवळ फौज थोडी. सोबत्यांचा भरंवसा नाहीं. उन्हाळा दिवस. जानोजी निंबाळकर तेव्हां केवळ रामदासाचे लेक. त्यांनीं थोड्या बहुतांवर आम्हांस समजावून त्याजवर उपकार करून मजकूर विल्हे लाविला. आम्हांस गायकवाडास जरब देणें जरूर, यास्तव आम्ही दरमजल सातारियाकडे आलों. तुम्ही वजिराचे कामावर मोठी मेहनत, मोठें जोखीम केलें. प्रांतही सुटला. परंतु मनसब्याचा जवा बसवून कांहीं पठाणास देऊन कांहीं आपण घेऊन, रंग भरून माळव्यांत यावें. ते गोष्ट तेथील मुरवतीमुळें न जाहली. एकदेशी मनसबा जाहला. आम्हीं गायकवाडाचें पारिपत्य केलें. तुम्हांस नानाप्रकारें लोकांनीं दर्शविलें कीं,यांनीं बेइमानी, दगाबाजी केली. परंतु ईश्वर साक्ष आहे. मोठमोठे मराठे, मोठे कारभारी, त्यांनीं त्यांचें घर बुडविलें. नाहक चढी लाविले. आम्हांशीं कबूल करून मागतीं चवथे दिवशीं फिरावें,यामुळें बंदीखाने, गड सर्वही प्राप्त त्यांचे कर्मानुरूप आलें. एतद्विषयीं विस्तार

कशास ! परंतु आईसाहेबांशीं विरुद्ध वाटलें. आईसाहेबांचे मतें सर्वप्रकारें आम्हांस मोडावें. रामदासपंताचे पुतण्यास पेशवाई द्यावी, त्यांनीं आम्हांस बुडवावें, दाभाडे यांणीं त्यास मिळावें, प्रतिनिधींनीं त्यास मिळावें, रघूजीबावांनीं त्यांस मिळावें, ऐसा पूर्ण भाव. ( स. १७५१ चा ) पावसाळां हीं राजकारणें शपथपूर्वक घाटलीं. परंतु आईसाहेबांस गडावर एके दिवसांचें खावयास नाहींसें झालें, याजमुळें मात्र बाह्यात्कारें आम्हांशीं सलूख करून खालीं उतरलीं. आम्ही विचार केला कीं, केवळ विरुद्धाचा लौकिक आहे, तो वारावा. मनांत कांहीं तरी असो. जशी आमची क्रिया असेल तसें फळ आम्हांस होईल. जशीं तीं चालतील, तसे आम्ही चालूं. ऐसा सिद्धान्त करून सलूख केला. प्रतिनिधीस प्रतिनिधि करार केला. परंतु आंत सर्वांचे मनसबे बांदून तयार जाले. आम्ही पंचवीस लक्ष कर्ज मात्र नवें करून फौज नवी पंधरा व जुनी चाळीस येणेंप्रमाणें ठेविली. त्याउपर रामदासपंत आले. प्रथम आमची फौज जमा झाली नव्हती. छापा घातला. दुसरें झुंज उत्तम झालें. त्याजवर सलाबत बसली. इत्यादि मजकूर जगविख्यात व इकडील पत्रावरून तुह्मांस अवगत होत गेले. वारंवार लिहिलें कीं, लक्षप्रकारें यावें. वजिराची अब्रू राखिली, व आमची गमावली हें कामाचें नाहीं. तुह्मी दौलतेचे स्तंभ, राज्यांत खेळ फार झाले आहेत, खामखा यावें. जे मेहेनत तुह्मी वजिराचे कामासाठीं केली, ते मेहेनत येथें घेऊन, जलदीनें करतेस तर बहुत लाभ होता. परंतु तेथें कोपामुळें व इर्षेमुळें गुंतून पडला. तुमचें येणें दोन महिनें वाट पाहिली, न जाहलें. शेवटीं जानबा सय्यद लष्करखान केवळ वजीद जाहले कीं खामखा सलूख करावा. तेव्हां सलूख केला. [सिंगव्याचा तह] त्रिंबक एका महिन्यानें द्यावा, ऐसें कबूल केलें. कां कीं, तुह्मांस पत्रें गेलीं आहेत. तुह्मीं याल च, तुह्मीं आल्यावर जें तुमचें विचारें होईल तें करावें; व गुजराथचें काम बुडतें, खर्चास अगदीं नाहीं, मोगलांची आग भारी, सरदार कोणी मनापासून अगदीं मेहनत न

करीत, एक चिरंजीव उभयतांनीं मात्र खटपट करावी, ऐसे अनेक प्रकार घराऊ जाणून सलूख केला, परंतु अंतर शुद्ध नाहीं. आम्हांजवळून रघूजीबावा मोगलांकडे गेले. मोगलांनीं त्यांस जहागीर करार करून क्रिया घेऊन आपलेसें केलें. बाबूजीनाईक यांचें कर्नाटक आम्हीं काढून घेतलें, याजमुळें दुःखी. लटकें फटकें बोलून आशेस लावून दोन वर्षें आम्हीं वोढिलें. परंतु ते या उपर जाणार, आईसाहेबांजवळून कर्नाटक करून घेणार. रामदासपंताजवळून नालबंदीस रुपये घेऊन तिकडे जाणार. ते हे एकत्र होणार. प्रतिनिधिही वाढले. गोविंदरायाचा सरंजाम घेतला. वरकडही किरकोळ कामें केलीं. शेर जाहले. त्यांचींही राजकारणें कीं, नाईक आम्ही एकत्र होतों, कर्नाटकास येतों, रामदासपंतांनीं आणखी फिरंगी गाडदी ठेवावे, खामखा आम्हांवर मनसबा मागती करावा. बाह्यात्कारें सलूख कांहीं दिवस दाखवावा, व मागें जानबा आमचे मित्र पुणियांत तीनें महिने येऊन बसले. नित्य आम्हांस म्हणत कीं 'मोगलांजवळ तुम्ही नवी जागीर मात्र न मागावी, म्हणजे आम्ही त्यांची तुमची पूर्ण निखालसता करून देतों. लहानसान आम्हांस लिहीत कीं 'हें सर्व लटकें. हे एकाएकीं येऊन तुमचीं घरें जाळतात.' आम्हांस वाटे कीं 'लोकआफवेवर काय आहे; जानबा आमचे मित्र आहेत, सहसा आम्हांस फसविणार नाहींत.' शेवटीं जें जहालें तें दृष्टीस पडलें. बहुत लोक म्हणतात कीं, रामदासपंतानें जानबा याच कामासाठीं पाठविले कीं, आम्ही स्नेह मानून गाफील राहावें. आमचा तों दाखवितात कीं, त्यानें लबाडी केली. असो. याचा अंत ईश्वर जाणे. एकदां मात्र तुम्हांस लिहिलें होतें कीं, 'याउपर गाजीउद्दीनखानाचें येणें कामाचें नाहीं, यांचा आमचा स्नेह होत आहे.' परंतु बिघाड झाल्यापासून निरंतर हेंच लिहितों कीं, 'खामखा गाजुद्दीखानास आणावें. बाजिरावा लेक सुभा करून आणिला तर मागें दिल्लीत कुचेष्टे करतील व

१ कारस्थानें.

येथें मोगल मराठे भेटणार नाहींत. गाजुद्दीखान आलिया सुलभ पडेल. मोगल व मराठे मातबर सर्व बऱ्हाणपुरावर येऊन भेटतील. एक फिरंगी गाडदी नवीन फौज मात्र राहील. पठाण कर्नाटकांत बळावले आहेत. महंमदअलीखान त्रिचनापल्लीस बळावला आहे. सर्व गाजुद्दीखानास अनुकूल पडतील. दुसरें, तुम्ही तिकडून गाजुद्दीखान दहा पंधरा हजार, आम्ही इकडून, येणेंप्रमाणें मनसबा उभा राहतांच सर्व कामें होऊन जातील. सारांश, रामदासपंतानें अब्रू घेतली, ही एकदां हरतजवीज करून त्यास पुरती जरब देणें पडल्यावांचून, तुम्हांस कैलासवासीयांनी वाढविलें, व तुम्ही इमानइतबार पावेणों लौकिक केला तो सर्व व्यर्थ. आम्हीही रायांचे वंशीं व्यर्थ जन्म घेतला. याउपरी तुम्ही खासलला त्यास आणावें, अथवा त्यांनीं दस्त करून मागून यावें, तुम्ही खामखां देशास यावें. शपथपूर्वक हा मनसबा करावा तरच उत्तम आहे. मागें यावें यावें हें लिहित गेलों. न आलां. आतां त्यांचा पुढील रंग जाणून सर्व विस्तारें लिहिलें. याउपर याल यांत संशय नाहीं. या पत्राचें उत्तर यथार्थ सत्वर पाठविणें. गुजराथचे कामास फौज गेली. ओकोणें काम होत चाललें. जेव्हां म्हटलें तेव्हां जवळ आहे. याउपर गाजुद्दीखानास पूर्ण भरंवसा देऊन, वजिराशीं लगाम राखून, शेवटीं न तोडितां, दक्षिणेचे कामास उपयोगी पडत तें करून यावें. सर्वस्व वेंचून एकदां रामदासपंत मोडावा. ते आम्हांवर मनसबा करितात यांत संशय नाहीं. तुम्ही हल्लीं लिहिल्याप्रमाणें केलिया, सहजच ते हतप्रभ होऊन, मोठें यश तुम्हांस येणें. याउपर तुम्ही न आलिया मनस्वास वाईट, मनास वाईट, यास्तव मनसबा सिद्ध करून यावें. कदाचित् गाजुद्दीखान नामर्द, फौज न ठेवी, बाहेर न निघे, तर दुसरा कोणी पंधरा हजारांचा धनी आणावा. निदानीं तुम्हीं यावें. येथेंही फौज फार आहे. रामदासपंतास तुम्ही आम्ही एकत्र झाल्यास अगाध नाहीं. रघूजीबावाही येतील. लामही उत्तम होईल. हें सर्व मनन करून उत्तर सत्वर पाठवावें. येथेंही तदूर करीत आहों.

ऐवजाची मात्र मोठी ओढ आहे. तुम्ही आलिया सर्व वारेल. सांप्रत नवें वर्तमान कीं त्रिंबक आम्हीं न दिला, यासाठीं रामदासपंत औरंगाबादेस येणार. मग किल्लाही कदाचित् देणें पडेल. जहागीरीचा जाबसालही त्यांजकडून अद्याप जाहला नाहीं. मोठा लबाड, दगाबाज आहे. सारांश, एकदां त्यास जरब द्यावी तरच सार्थक आहे.' या पत्रावरून एक वर्षांत नानासाहेबानें काय काय उद्योग केले आणि त्यांत त्यास काय निष्पत्ति झाली याची चांगली कल्पना होते. गायकवाड, बाबूजी नाईक, रघूजी भोंसले, रामदासपंत, ताराबाई इत्यादिकांचीं प्रकरणें एकंदर राज्यकारभाराच्या ओघांतून अलग करून एकएकट्या व्यक्तीचा अगर प्रकरणाचा स्वतंत्र खल मासिकांतून व वर्तमानपत्रांतून केल्यानें वादाचा निकाल न होतां, उलट इतिहासाची मात्र हानि होते. अशीं अनेक प्रकरणें या एका पत्रांत सुसंहत रीतीनें गोवलीं गेल्यानें, त्यावरून पेशव्याची व त्यांची कर्तबगारी यांचा आपणास योग्य अंदाज करण्यास सवड होते.

५ गाजीउद्दीनचा खून व भालकीचा तह ( नोव्हेंबर १७५२ ):— शिंगव्याचा तह केवळ तात्पुरता होता. त्यानें निजाम–पेशव्यांचा तंटा न मिटतां उलट वाढतच गेला. रामदासपंतानें बुसीच्या जोरावर पेशव्यास तंबी देण्याचें मनांत योजिलें; आणि पेशव्यानेही त्याच्या प्रतिकाराचा यत्न जोरानें चालविला. गेल्या सालापेक्षां या सालीं म्हणजे १७५२ त पेशव्यांची बाजू पुष्कळ सुधारली होती. गायकवाडाचा बंदोबस्त होऊन ताराबाईही बहुतेक जाग्यावर बसल्यासारखी होती. शिंदे होळकर नानासाहेबाचे मदतीस हिंदुस्थानांतून धावून येण्यास सिद्ध झाले होते. उलटपक्षीं निजामाचे दरबारीं बुसीचें वजन पराकाष्ठेचें वाढलें होतें. वास्तविक तोच तेथील सर्व सूत्रधार होता असें म्हटलें तरी चालेल. स. १७५२ च्या १३ जून रोजीं क्लाइव्हनें

१ [ का. सं. प. या. ले. १६१ ]

त्रिचनापल्लीचा किल्ला घेतला. तोंपर्यंत मुरारराव घोरपडे हा महंमदअल्ली व इंग्रज यांच्या बाजूला होता. पुढें डुप्लेच्या विनवणीवरून तो फ्रेंचांना मिळाला. शिंगव्याचे तहानंतर कांहीं दिवस त्रिंबक किल्ला परत घेण्याची निजामानें खटपट केली. परंतु त्याच्या फौजेस पगार न मिळाल्यानें लोक फार असंतुष्ट झाले होते. तेव्हां पुढील व्यवस्था करण्याकारितां म्हणून निजाम हैदराबादेकडे येऊं लागला. वाटेंत भालकी येथें ता. ७ एप्रिल रोजीं पगार न मिळाल्यामुळें बिथरलेल्या लोकांनीं दिवाण रामदास याचा खून केला. त्यावेळीं सय्यद लष्करखान व शहानवाजखान हे दोन हुषार अंमलदार निजामाचे पदरीं होते. परंतु दोघेही बुसीचा द्वेष करीत आणि त्याचा पाडाव करण्यासाठीं पेशव्याशीं अंतस्थपणें संधान ठेवीत. परंतु बाह्यतः बुसीचें व त्यांचें चांगलें होतें. रामदासपंत मरण पावल्यावर बुसीच्या सल्ल्यानें सलाबतजंगानें सय्यदलष्करखानास दिवाणी दिली आणि शहानवाजखान यास हैदराबादच्या सुभ्यावर नेमिलें. सय्यदलष्करखान हा गाजीउद्दीनचे पक्षाचा होता हें मागें दर्शविलेंच आहे. तसेंच गाजीउद्दीन यानें दिल्लींतून दक्षिणेंत येऊन निजामी स्वीकारण्याविषयीं पेशवा आपल्या सरदारांस व वकिलांस कशी भर देत होता, हेंही मागें सांगण्यांत आलें आहे. ता. ३१ मे १७५२ रोजीं पेशवा शिंदे होळकरांस लिहितो. ' गाजीउद्दीनखान दक्षिणेस यावयाचा हुकूम झाला, येथील गुंता उरकून त्यांचें आगमन दक्षिणेस होय तें करूं, म्हणोन लिहिलें तें कळलें. जेणेंकरून गाजीउद्दीन किंवा सलाबतजंग यांशीं बेइमानी पदरीं न येतां कार्य होय तें करावें लागेल. सलाबतजंग आमचें न ऐकतील तर गाजुद्दीन यांस आणण्याचें जरूर केलें पाहिजे, या डौलानें आपण करावें म्हणजे कार्यही आहे व लौकिकही उत्तम.' [ का. सं. पया. ३९१ ] त्यानंतर ता. १९ जुलईचें पेशव्याचें लिहिणें खालीलप्रमाणें आहे. ' गाजुद्दीखानासह ग्वाल्हेरीस आलेत यास्तव आषाढ शु॥ १३ स (१३ जुलई १७५२) बाहेर निघालों. फौज बोलावूं पाठविली. सलाबतजंगाशीं फिरंग्यांनीं आव फार

भरला आहे. पहावें कितीक जमतात. मल्हारबा व तुम्ही निखालस राहून जो आमचा मनोदय तो करावा. याच गोष्टीवर सिद्ध असावें. सर्वविशीं भरंवसा तुमचा आहे. [ का. सं. पया. ३८३ ]. ता. २६ जुलई रोजीं पेशव्यानें औरंगाबादेस आपल्या वकिलास लिहिलें, 'तेथील सर्व लहान मोठ्या अंमलदारांशीं राजकारणें करून गाजुद्दीखान बऱ्हाणपुरास येतांच साऱ्या शहरामध्यें त्यांची द्वाही फिरवावी; आणि सर्वांनीं त्यांस सामील व्हावें. प्रस्तुत लोक जमा होत आहेत. आठ दहा रोजांत भीमापार होऊं.' [ का. सं. पया. ६ ] त्यानंतर २५ जुलईचें पत्र, ' आपले विद्यमानें गाजुद्दीखान याजला स्नेहाचा संदर्भ लावून भागानगर प्रांत आपणाकडे करून घ्यावा. आम्ही तों सर्वत्र ऐकतों कीं, फिरंगी व खान मिळोन फार झुंजावयाच्या गप्पा मारतात, त्यास पुरता शोध करून जरूर लिहिणें, सय्यद लष्करखान सलाबतजंगाचा निरोप घेऊन आमचे भेटीस येत आहेत. रामदासपंत वारल्यावर त्यांहीं सलाबतजंगाचा पक्ष धरिला आहे. तरी तुम्हीं त्यांस बहुतप्रकारें लिहून पाठवून तो गाजुद्दीनखानाकडे संदर्भ लावीत, आमचे विचाराप्रमाणें वर्तत तें करणें. खान हजरदां आम्हांशीं गाजुद्दीनाचा प्रकार बोलले असतां रामदासपंत मेले म्हणून आयते वेळेस फिरले, तर हें कसें कामास येईल.' [ कां. सं. प. मा. ले. ७, ८, १३ ]. ता. ९ आगस्ट रोजीं गाजुद्दीनखान व शिंदेहोळकर नर्मदेवर येऊन पोंचले.[1] [ का. सं. प. या. ८५ ]. गाजुद्दीनखानाकडून नानाप्रकारचे कार्यभाग, उत्तरदक्षिणचे उरकून घेण्याचा पेशव्याचा उद्देश असून, खान जसजसा दक्षिणेस येऊं लागला, तसतसा पेशवा पुण्याहून उत्तरेकडे हळू हळू जाऊं लागला. भर पावसाळ्यांत बाहेर पडून सर्व ठिकाणच्या मंडळींस व पक्षांस इशारे देत व निरनिराळ्या तजविजी लावीत, पेशवा चालला होता. स्वतःच्या मनांतील थांग कोणास लागूं न देता, धीरानें व शांत-वृत्तीनें सर्व हालचालींची बातमी तो ठेवीत होता. यासंबंधाचीं शिंदे-

१ यावरून शिंदेहोळकरांचा बेमनाव होता, असें ध्वनित होतें.

होळकर, दीक्षित वगैरे मंडळीस गेलेलीं व त्यांजकडून आलेलीं पेशव्याचीं पत्रें त्याच्या धोरणी मुत्सद्देगिरीची साक्ष देतात. अशा कित्येक पत्रांचा उल्लेख वर ठिकठिकाणीं आला असून, खं. ३ ले. ४०५–४२१ हीं पत्रेंही त्याच मतलबाचीं आहेत. ऑगस्टांत सय्यद लष्करखान पेडगांवीं पेशव्याजवळ होता. ( ले. ४०६ ) २१ सप्तेंबरास पेशव्यानें दीक्षितास पैठणास बोलाविलें. २३ सप्तेंबरास पेशवा दीक्षितास लिहितो, 'तुमचे विचारांत जे जे अमीर असतील, त्या सर्वांस सांगून नबाबाचे मुलाजमतीस पाठवून देणें. नबाब फर्दापूरच्या घाटावर आल्यावर सर्वांनीं एकनिष्ठेनें जाऊन हाजीर व्हावें. बऱ्हाणपुराप्रमाणें कोपास जाईल, मग गोड करून घ्यावें, ऐसें न करावें. तुम्हीं अंतस्थ सूचना करणें.' [खं. ३. ले. ४०९ ] यावरून बऱ्हाणपुर येथे गाजुद्दीनच्या बंदोबस्तांत कांहीं उणें पडले असावें. सप्तेंबर ता. २८ रोजीं गाजुद्दीन औरंगाबादेस दाखल झाला. या वेळच्या तमाम गप्पांनीं भरलेलें एक लांबलचक पत्र वाचण्या लायक आहे. [ खं. ३-४३३ ].

इकडे गाजीउद्दीन मराठे सरदारांची मदत घेऊन आपणावर चालून येतो, असें सलाबतजंगास समजतांच, तो सय्यद लष्करखानास आपल्याकडे वळवूं लागला. त्यास खानानें एक चमत्कारिक युक्ति सुचविली. आपण दिवाणगिरीचा राजीनामा देऊन मराठ्यांस जाऊन मिळण्याचें ढोंग करतों; आणि मराठमंडळात वावरून त्यांचीं मनें अंतस्थ रीतीनें बिघडवून ठेवितों. ही युक्ति बुसी व सलाबतजंग यास मान्य होऊन, खान निजामाशीं रुसवा दाखवून जानोजी निंबाळकराकडे करमाळ्यास येऊन राहिला. शहानवाजखानाची नेमणूक दिवाणगिरीवर झाली. गाजीउद्दीन हिंदुस्थानांतून येतांच पेशवा त्यास भेटण्यास जात असतां रस्त्यांत सय्यद लष्करखान, व जानोजी निंबाळकर येऊन पेशव्यास भेटले. [पु. रो. पृ. ८५ ता. १८–८-१७५२] खानानें असें कळविलें कीं, 'सलाबतजंगास बादशहाचीं पत्रें आलीं असून, असा ठराव झाला आहे कीं, गाजीउद्दीन यानें फक्त औरंगाबादेस येऊन

सुभेदारीचा स्वीकार करावा, आणि सलाबतजंगास आपला दुय्यम नेमून परत दिल्लीस जावें.' सय्यद ल. खानाची ही बतावणी पेशव्यानें ओळखून त्याबद्दल गाजीउद्दीन यास पत्रानें कळविलें. त्यावर गाजुद्दीननें पेशव्यास लिहिलें कीं, सय्यद लष्करखान व जानोजी निंबाळकर या दोघांसही पकडून आपल्याजवळ आणावें. त्याप्रमाणें त्यांस आणल्यावर गाजीउद्दीनची व पेशव्यांची भेट शहागड येथें झाली, दोघांच्या फौजांचा मिलाफ झाला. एकंदर जमाव दीड लाखाचा जमला, तेव्हां सलाबतजंगाने गाजीउद्दीनास शरण जाऊन आपला बचाव करण्याचा विचार चालविला. कारण शिंदे होळकरांनीं खानदेशच्या व उत्तर बाजूनें, पेशव्यानें स्वतः नगरच्या बाजूनें व जानोजी भोसल्यानें अलजपूर बाळापुरच्या बाजूनें, अशा रीतीनें पेशव्यानें मोठ्या युक्तीनें चोहोंकडून सलाबतास घेरून टाकिलें. [ रा. खं. १ प्र. पृ. २० ] तेव्हां तो तहाच्या गोष्टी बोलूं लागला. आपणास पेशव्यांनीं मदत केल्याबद्दल वऱ्हाडच्या पश्चिमेकडील तापी व गोदावरी या दोन नद्यांमधील सर्व प्रदेश गाजीनें पेशव्यास देऊं केला; अशारीतीनें सर्व पक्षांची तडजोड होऊन प्रकरणाचा निकाल लागणार इतक्यांत औरंगाबाद येथें निजामअलीच्या आईनें गाजुद्दीनखानास मेजवानीस बोलावून विषान्न घालून ठार मारिलें. [ ऑक्टोबर तारीख १६ स. १७५२ ]. त्याच्याच आदल्या दिवशीं पेशवे व शिंदेहोळकर यांच्या भेटी राक्षसभुवनाजवळ झाल्या. ( पु. रो. पृ. ८६ ) येणेंप्रमाणें फार दिवस घाटत असलेला पेशव्याचा हा मोठा व्यूह एकाएकीं कोसळून पडला. गाजीउद्दीनच्या आगमनासंबंधानें भा. व. श. त खालील मजकूर आहे. ' आश्विनमासीं होळकर, शिंदे, गाजुद्दीनखान मोठे फौजेनिशीं औरंगाबादेस आले. गाजुद्दीनखानापाशीं मसलतगार सैयद हशमतखान व महंमद अन्वरखान होते. त्यांणीं सांगोन पाठविलें कीं, भागानगराहून निंबाळकर व सय्यद लष्करखान आले आहेत. त्यांस निरोप न देतां शहागडावर यावें. आपले आमचे विचारें ठरेल तेव्हां होईल. त्यावरून श्रीमंत कूच करून

निंबाळकर सय्यदलष्करखान सुद्धां शहागडावर गेले. शिंदे होळकर भेटले. मागाहून गाजुद्दीनखान यावे तों औरंगाबादेस मृत्यु पावले.' [ पृ. २८ ] सलाबतजंगासही याचप्रमाणें मारून आपल्या मुलास निजामी मिळवून द्यावी, असा निजामलीच्या आईचा बेत होता. निजामाच्या मृत्यूनंतर त्याच्या ह्या सर्व बायका औरंगाबादेसच राहत असत. गाजीउद्दीन मयत झाल्यावर पेशव्यानें जानोजी व सरलष्करखान ह्यांस निरोप देऊन परत पाठविलें, आणि सलाबतजंगाबरोबर वाटाघाट चालविली. ता. १ नोव्हेंबर रोजीं पेशव्यानें त्याची भेट घेतली; आणि गाजीउद्दीननें कबूल केलेला सर्व प्रदेश त्याजकडून आपणास लिहून घेतला. मात्र रघूजीभोसल्यानें निजामाचें राज्य सोडून वाईनगंगेपलीकडे जावें, ही निजामाची मागणी पेशव्यानें कबूल केली. आणि भोसलेही एकदम निघून गेला. ह्या तहास भालकीचा तह म्हणतात. [ नोव्हेंबर, स. १७५२ ]. येथेंच पेशव्याचा मुक्काम बरेच दिवस होता.

६ निजामशाहींत पेशव्याचें वर्चस्व—ता. ३० नोव्हेंबर स. १७५२ रोजीं पेशव्यानें पुढील खोंचदार पत्र पिलाजी जाधवास लिहिलें. [खं. ६ ले.७२०] 'नबाबांनीं राजश्रीचे जांवयाचे जहागिरीचे मजकुरावरून वाईट मानून तुटता जाबसाल तुम्हांसी केला. जें इच्छतील तें करतील. आम्हांसीं स्नेह चित्तापासून करावा, यासाठीं नबाबांनीं जानबास व खानास पाठविलें. त्यापाशीं किल्ल्यांचा मजकूर नबाबांचे मर्जीप्रमाणें आम्हीं कबूल केला. आमचा स्वार्थ त्यामध्यें कांहीं नाहीं. असें असतां सर्व एकीकडे ठेवून गरमी दाखवूं लागले, तर आम्हांस श्रीकृपेनें काय चिंता आहे. आम्हीं गनीम लोक शिवाजी महाराजांचे शिष्य आहों !' शेवटच्या खोंचदार वाक्यावरून शिवाजीची आठवण बाळाजीस किती जाज्वल्य होती, हें दिसून येतें. त्यानंतर दोन दिवसांनीं म्हणजे ता. २ डिसेंबर १७५२ रोजीं दुसरें पत्र पेशव्यानें पिलाजीला लिहिलें, त्यांतही निजामाशीं तह करण्यासंबंधाची चर्चा मोकळेपणानें केलेली आहे; आणि निजामाशीं आपला

अकृत्रिम स्नेह कायमचा घडावा, अशी इच्छा दर्शविली आहे. [ खं. ६ ले. २७१ ] भालकी येथें तह होऊन निजामाचें प्रकरण उत्तम प्रकारें विल्हेस लागलें; आणि त्यांत मराठ्यांची सरशी झाली, हा प्रकार पेशव्यानें साताऱ्यास छत्रपतीस कळविला, त्याबद्दल राजराजानें पेशव्यास शाबासकी दाखल पत्र २५ डिसेंबर स. १७५२चें लिहिलें. [शा. म. रो. ले. ११६] भालकी येथें स. १७५२च्या डिसेंबरांत निजामाशीं पेशव्याची लढाई झाली; म्हणून पे. श. [राजवाडे खं. २ पृ. १२७] त मजकूर आहे, तो संभवनीय दिसत नाहीं. लढाईतला मजकूर आदल्या वर्षीचा म्हणजे डिसेंबर १७५१ तलाच पुनः घेतलेला दिसतो. सलाबतजंगानें तहाप्रमाणें पेशव्यास जहागीर दिली. तेणेंकरून नगर, खानदेश व पुणें जिल्ह्यापैकीं जुन्नरकडोल वगैरे कित्येक प्रदेश पेशव्यांस मिळाले. ता. २५ नोव्हेंबर रोजीं पेशवे निजाम यांच्या भेटी झाल्या. उभयतांनीं एकमेकांस पोषाख केले. त्यानंतर शिंदे होळकर लगेच हिंदुस्थानांत परत गेले, असें डफ म्हणतो, तें खरें नाहीं. पुढील सक्रांतीस (१३ जानेवारी १७५३) दोघेही सरदार पुण्यांत पेशव्याचे भेटीस समारंभानें आले; आणि ता. २२।२३ जानेवारीस पेशव्यांचा निरोप घेऊन परत हिंदुस्थानास गेले. (पु. रो. ८७). मराठ्यांशीं तह करून बुसी व सलाबतजंग हैदराबादेस गेले, तेव्हांपासून निजामाचें वास्तव्य बहुतेक तेथेंच होऊं लागलें. तह झाल्याची हकीकत दीक्षितास कळवितांना पेशव्यानें खालील उद्गार काढिले आहेत. 'नवाबांनीं फिरंग्यांच्या (बुसीच्या) विद्यमानें आम्हांशीं सल्ला केला, हें दुःख सर्वां अमीरांस होऊन बिघाड करावा, हे इच्छा करितात. परंतु जीव कोणांत आहे! सर्वही निर्माल्य. पदरचा पैका वेंचावा, जातीनें हिंमत धरून करावेंच करावें, हे गोष्ट कालेंकरून कोणांतही राहिली नाहीं.' [ता. २५-१-१७५३, का. सं. प. या. ले. १४]. यावरून मराठ्यांनीं निजामाची केवढी हलाखी केली, त्याचा अंदाज होतो. या वेळीं वास्तविक सर्व दक्षिण नानासाहेबानें सोडविली, असें पर्यायानें म्हणतां येईल.

गाजीउद्दीनास निजामीची सनद बादशहानें दिली, ती केवळ पेशव्याचे शिफारशीवरून दिली. इतकें वजन पेशव्याचें प्रत्यक्ष दिल्लींतसुद्धां बसलें होतें. स. १७५३ च्या मार्चांत अंताजी माणकेश्वर दिल्लीहून लिहितो. 'ज्यास पंतप्रधान निजामीची सनद देण्यास सांगतील, त्यास देऊं. मुख्य सुभेदार स्वामी (पेशवा). ज्याजवर स्वामींची कृपा तो सुभेदार खरा, [भा. व. १ प. या. ले. ५०], असें बादशहाचें कळविणें होतें. म्हणजे दिल्लींतील कारभारांचीं सूत्रें पेशवा हालवीत होता. सलाबतजंगास निजामीची सनद बादशहानें पेशव्याच्याच मागणीवरून दिली. गाजीउद्दीनास आणिल्याचा एवढा परिणाम झाला. सलाबतजंगास काढून गाजीउद्दीनाचे मुलासही निजामी देण्याचा बूट निघालेला होता. अर्थात् पेशव्यानें आपल्या करामतीनें हिंदुपदपातशाहीची एवढी तड पोंचविली.

निजामाच्या दरबारांत बुसीचें प्राबल्य वाढतांच दोन तट उपस्थित झाले. तेणेकरून प्रांतोप्रांतींचे कारभारांत नानाप्रकारची ढवळाढवळ होऊं लागली. अदवानीच्या सुभ्यावर अब्दुल हादीखान यास सलाबतजंगानें नेमिलें, आणि त्याचजागीं रघराजा न्यामदुल्लाखान यास बुसीनें नेमिलें. त्या दोघांचा तंटा वाचण्यालायक आहे. [खं. ३ ले. १४७, जानेवारी १७५२]. सुभेदारीची उघड विक्री होऊं लागली.

भालकीचे तहात निजाम व पेशवे या उभयतांनीं मिळून कर्नाटकांत स्वारी करावी, असा बेत ठरलेला होता. 'सलाबतजंगाचा करार कीं, उभयतां मिळोन कर्नाटक प्रांतांत जावें. हल्लीं कलबुर्ग्यास आहेत. शिपायांचा दंगा फार. लोकांचाही फितूर आहे. सर्वांचे मतें फिरंगी नसावे. मोठा राडा पडला आहे. मोगल तों कर्नाटकांत येतां हिमत नाहीं. श्रीमंतांचा आग्रह कीं, दोन महिने स्वारी कर्नाटक प्रांतांत करावी, थोडा बहुत ऐवज शह देऊन घ्यावा, आणि पुण्यास यावें. आमचें वर्तमान तर चंदावरास रवाना केलें. आजच स्वार होऊन जातो.' असें पेशव्यांचा वकील कृष्णाजी रघुनाथ ता. १८ डिसेंबर १७५२ रोजीं लिहितो.

[खं ३ ले. ४१५]. भालकीहून परभारें पेशवा स. १७५३ च्या जानेवारींत कर्नाटकचे स्वारींत श्रीरंगपट्टण पावेतों जाऊन परत जुलईंत पुण्यास आला.

स. १७५३ सालीं निजाममराठ्यांचे महत्त्वाचे असे कांहींच व्यवहार घडले नाहींत. या सालास उद्देशून रा. राजवाडयांचे तिसरे खंडांत ले. ४३२ व ४३३ व पहिल्या खंडांत ले. १४–२२ इतके कागद उपलब्ध आहेत, त्यांवरून निजामाच्या कारभारांतील घांदल स्पष्ट होते. बुसीनें सलाबतजंगास सर्वस्वीं आपल्या कबजांत आणिलें, हा प्रकार सय्यद लष्करखानास रुचला नाहीं; आणि हरप्रकारें बुसीचा पाडाव करण्याचा खानाचा उद्योग चालूंच होता. बुसीला निजामानें 'गज्फरजंग' हा किताब दिला होता. हिंदुस्थानांतील राजेरजवाडयाशीं बुसीचा पत्रव्यवहार असून निजामाच्या दरबारीं तर तोच सर्व सूत्रें चालवीत होता. मात्र नानासाहेबाच्या अलौकिक मुत्सद्देगिरीपुढें बुसीला नमूनच वागावें लागलें. बुसीची अंतस्थ भूतृष्णा केवढी आहे, हें नानासाहेबाने ओळखून त्याला निजामाच्या दरबारांतून वर्षा दीड वर्षात पिटाळून लाविलें. स. १७५३ च्या प्रारंभास सलाबतजंगानें डुप्लेला कर्नाटकची नबाबगिरी देऊन महंमदअलीला त्या नबाबगिरीवरून काढून टाकिलें. सन १७५३ च्या अखेरीस बुसीनें सलाबतजंगाला अगदींच संपुष्टांत आणिलें होतें. निजामाला हलका करावा, हा बुसीचा बेतच होता. तसाच तो नानासाहेबाचाही बेत होता. या दोघांनी गुप्त तह करून निजामाला पुष्कळच बुडाविलें. तेव्हां निजामानें डुप्लेकडे त्याची तक्रार केली. ती तक्रार डुप्लेनें न ऐकतां अशा तक्रारी आणूं नयेत, अशी वरती आणखी सलाबतास धमकी दिली. तेव्हां निजामाला बुसीची खुशामत करणें भाग पडलें. हे सर्व प्रकार नानासाहेबास आपल्या वकिलामार्फत कळत होते. ( राजवाडे खं. १, ले० १४–२५ व त्याजवरील टीपा पहा ). 'दखण सारी मोकळी करावी,' अशीं वाक्यें १७५०–६० च्या अवधींत महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालीं होतीं. निजामाच्या राज्यांतील मुसलमानांस

देखील हें राज्य बुडतें असें वाटूं लागलें, इतकेंच नव्हे तर तें बुडावें अशीही पुष्कळांस इच्छा झाली. घरांत सलाबतजंगाचा भावांशीं कलह होता. दरबारांत शहानवाजखानासारखे राजद्रोही मुसलमान व जानबा निंबाळकरासारखे दुटप्पी मराठे सरदार वावरत होते. बुशीसारख्या बुभुक्षित परद्वीपस्थाच्या हातांत राज्याचीं मुख्य सूत्रें होतीं. ह्या संधीस निजामाचें राज्य बहुतेक बुडावयाचें, परंतु कांहीं दिवस बुशीला घालवून देण्याची बुद्धि ह्याच वेळेला सलाबतास झाली. नाहींतर नानासाहेब व बुशी या दोघांनीं मिळून निजामाचो राळ उडवून दिली असती. ( राजवाडे खं. १ पृ. ६४ ).

७. निजामशाहींतील प्रमुख व्यक्ती, सय्यदलष्करखान व शहानवाजखान:—स. १७५३ सालापासून निजामपेशव्यांचे संबंध व व्यवहार कसकसे घडत गेले, त्यात कोणकोणत्या व्यक्ती काय उद्देशानें वर्तत होत्या, आणि त्यामुळें उभय राष्ट्रांचीं कारस्थानें कसकशीं बदलत गेलीं, या गोष्टी, एकंदर भानगडींची गुंतागूत सोडवून, सुसंगतरीतीनें नमूद करणें जरूर आहे. या बाबतींत डफनें पुष्कळ प्रसंगीं उडवाउडवी केल्यामुळें संगति लावण्याचें काम बिकट झालें आहे. रा. राजवाड्यांचे खंड १, ३, ६ व का. सं. प. या. यांतील त्या वेळच्या लेखांची संगति जुळवून एकंदर घडामोडींचा मेळ बसवावा लागतो. नवाब सलाबतजंग निजामशाहीचा कारभार करीत होता, परंतु बुशीनें लष्करी जोरावर त्यास सर्वस्वीं ग्रासून टाकिलें होतें. शत्रूंचा पाडाव करण्यापुरती जरी त्यास फ्रेंच पलटणांची व तोफखान्याची मदत पाहिजे होती, तरी त्यांचें दडपण अंगावर पडून, आपली सत्ताही संपुष्टांत येत चालली हें त्यांस दुःसह झालें. त्याचे भाऊ बसालतजंग व निजामअली हे दोघे तुर्त प्रतिबंधांत होते; आणि पुढें स. १७५६ च्या मे महिन्यात जेव्हां सलाबतनें बुशीस काढून दिलें [ खं. ३ ले ४८१ ] तेव्हाच दोघां भावांस प्रतिबंधांतून एकाएकीं बाहेर आणून सलाबतनें, एकास म्ह० निजामअलीस वऱ्हाडचा सुभा व दुसऱ्यास

१७६० बसालतजंगास विजापुर अदवानीचा सुभा दिला. [खं. ३ ले ४७८] तेव्हांपासून पुढें या दोन भावांचा संबंध निजामाचे व्यवहारांत येऊं लागला. निजामाकडील दुसरी प्रमुख व्यक्ति बुसी होय, त्याचा वृत्तांत या वेळच्या कारस्थानांत विशेष महत्त्वाचा आहे हें सांगणें नकोच. बुसीचा दुभाष्या अब्दुल रहिमानखान ऊर्फ हैदरजंग हा मोठा वात्य व कारस्थानी गृहस्थ असून तो बुसीचा पक्ष हरएक अडचणींत सावरून धरीत होता; आणि स. १७५७त कांहीं दिवस त्यास निजामाजवळ मुख्य प्रधानकीचा अधिकारही बुसीच्या सल्ल्यानें प्राप्त झाला होता. 'हैदरजंग गुंड आहे, फावल्यास पुढें येईलही. फिसादीस अंतर करणार नाहीं. केलियास काय होणें ? श्रीकृपेनें फजितच होईल, परंतु मोठें पद योग्य नव्हे.' [खं. ३ ले. ४८४]. शहानवाजखानास प्रधानकीवरून काढून या हैदरजंगास तें पद देण्याच्या भानगडी चालल्या असतां नोव्हेंबर १७५६ चें हें पत्र आहे. याशिवाय निजामाकडील प्रमुख व्यक्ती म्हणजे सय्यद लष्करखान व शहानवाजखान या होत. दोघेही बुसीच्या विरुद्ध असून पेशव्याच्या लोभांतले होते. त्यांत विशेषतः सय्यद लष्करखानाचा व नानासाहेबाचा ऋणानुबंध विशेष होता. स. १७५२ च्या एप्रिलांत रामदासपंताचा खून झाल्यावर हा खान निजामाचा प्रधान झाला. पुढें स. १७५४च्या जानेवारींत बुसीच्या सांगण्यावरून सलाबतानें सय्यद लष्करखानास आपल्या प्रधानकीवरून दूर करून वऱ्हाडच्या सुभेदारीवर नेमिलें; आणि शहानवाजखानास प्रधानपद दिलें. परंतु उत्तरोत्तर निजामाला फ्रेंचांनीं सर्वस्वी ग्रासलेलें पाहून सय्यदलष्करखान अत्यंत उद्विग्न झाला. पुढें त्याची वऱ्हाडची सुभेदारीही काढण्यांत आली, त्यामुळें देशत्याग करून तो मक्केस जाण्याच्या विचारास लागला. 'आम्हांसही खानाचें पत्र, मक्केस जातों, दस्तक व साहित्यही लागेल तें द्यावें, म्हणून आलें. ऐशास, खान दीर्घदर्शी. यांसारखें मनुष्य या जिल्ह्यांतून उदासीनतेनें गेलिया आमचें नुकसान व नबाबाचें बहुतच नुकसान. त्यानें इतकें उदास व्हावें हें योग्य नाहीं. विवेकें करून . नबाबाजवळच राहावें. त्यांजविशीं

नबाबास सांगावयास आम्हीं कधींही अंतर करणार नाहीं. आणि आम्ही सांगितल्यावर नबाबही त्यांचें महत्त्व रक्षूनच चालवितील. हा विचार मनास न ये तर दिल्लीस जावे, तेथें मातबर सेवा करावी. हाही प्रकार चित्तास न ये तर आम्हांजवळ राहावें. हेही दौलत स्नेहाचे. मागें त्यांचीच आहे. असें कोणते संकट पडलें कीं, सर्व सांगतात तें न ऐकतां मक्केस जावें. दोनही पक्षांतुन एकादे पक्षाचा अवलंब करून उदास न व्हावें हें उचित आहे. करूं तर नबाबाचा सर्वाधिकार, नाहीं तर कांहींच न करूं असें म्हटल्यास कसे कार्यास येईल! ते खावंद, हे सेवक खावंदाचे, सेवकाचे अढीने आजपर्यंत कोणाचेंही चाललें कीं काय, याचा विचार खान पुरते जाणतात; तो आपले ध्यानांत आणून ज्यांत आपलें स्वरूप आहे, नबाबाची चाकरी घडे तें करावें. आम्हींही यांचे स्वरूपास अंतर पडे असें कदापि करणार नाहीं. सामोपचार व आपलेकडूनही खानाचें बरें तें करावयास अंतर मागें केलें नाहीं, पुढें करणें नाहीं. परंतु तुटे तों त्यांनींही ताणूं नये. त्यांनीं तोडून गेल्यास शहानवाजखान सुखच मानितील. इतकें असून नच मनास येईल तर सर्व प्रकारें जहाजांचें साहित्य करूं. मुंबईस इंग्रजाकडे साहित्य करून देऊं. जो पक्ष ते अवलंबितील, त्याचें सर्व प्रकारें साहित्य करूं. परंतु त्यांनीं न जावें, समजून राहवें हेंच उत्तम. ता. २४ डिसेंबर १७५४.' [ खं. ३ ले. ४४८ व ४४९ ]. हीं पत्रें नानासाहेब पेशव्यानें औरंगाबादचा वकील वासुदेव दीक्षित यास लिहिलेलीं आहेत. मल्हारपंत नांवाचा सय्यदलष्करखानाचा दिवाण होता, त्यास स. १७५५ च्या फेब्रुवारींत पेशव्यानें दीक्षितासह नगरच्या बाजूस भेटीस बोलाविलें होतें. (खं. ३–४५१ व का. सं. प. या. १६ ). सय्यदलष्करखानास निजामाचा कारभार पाहिजे होता; आणि ही त्याची खटपट स. १७५५ साल्रांत वर्षभर चालू होती. ' बुसी आदिकरून सर्वही येथील अमीर आमची आर्जवें करितात. आपणही आम्हांस अधिकार देण्याबद्दल बुसीस

पत्रें पाठवावीं, ' अशी विनंति खानानें पेशव्यास केली आहे. [ का. सं. प. या. १७, १८ ]. परंतु अशा बाबतींत कोणाच्या म्हणण्यावर किती विश्वास ठेवावा याची पेशव्यास खात्री नव्हती. तेथें ' निजामशाहींत चित्तशुद्धि, सत्यभाषण या गोष्टी नाहींतशाच दिसतात. ' सबब बारकाईनें तपास करून सर्वांचें हृद्गत कळविण्याविषयीं पेशव्यानें दीक्षितास लिहिलें. [ खं. ३-४५७-जुलई १७२५ ]. तपासाअंतीं खानाचे विरुद्धच निजामाचे दरबारीं सर्व प्रकार होता असें आढळून आलें. खानाचे तर्फे कोणाजवळ बोलणेंसुद्धां कामाचें नाहीं, अशी स्थिति स. १७५६ त होती [ खं. ३ ले. ४७७ व ४७९ ]. यानंतर खानाचा उल्लेख फारसा नाहीं. 'कांहीं दिवस त्यास औरंगाबादची सुभेदारी झाली होती, त्यास खान वारले. त्यांस सख्खा भाऊ आहे किंवा नाहीं. लेक तो नाहींच. सर्व द्रव्य नबाबांनीं जप्त करविलें कीं काय ?' असें पेशव्यानें दीक्षितास स. १७५७ च्या मे व जून महिन्यांत विचारलें आहे. अर्थात् त्याचेपूर्वी थोडे दिवस सय्यद लष्करखान मरण पावला. [ खं. ३ ले. ४८८ व ४८९ ].

सय्यदलष्कर व शहानवाज दोघेही वृद्धनिजामाच्या वेळीं तयार झालेले इसम नासिरजंगाजवळ होते. नासिरजंगास निजामानें पकडिलें तेव्हां लढाईंत सय्यद लष्करखानानें नासिरजंगाचा प्राण वांचविला होता. शहानवाजखानानें तर निजामाच्या विरुद्ध उठण्यास नासिरजंगास चांगलीच भर दिली होती; आणि नासिरजंग पकडला गेल्यावर शहानवाज मारलाच गेला असता, पण निजामाच्या फौजेतील त्याच्या एका दोस्तानें त्यास गुप्त वाट दाखवून बाहेर काढून दिलें. पुढें सात वर्षेंपर्यंत तो लपून अज्ञातवासांत होता. त्या अज्ञातवासांत त्यास फुरसत मिळाली तिचा उपयोग त्यानें मुआसिर-उल्-उमराव हा सुंदर ग्रंथ लिहिण्यांत केला. (डफ २-२१).

दुसरी व्यक्ति शहानवाजखान. याचेंही लक्ष पेशव्याच्या बाजूस होतें; आणि फ्रेंचांना काढून देण्याविषयीं तो शिकस्त करीत होता. प्रथम तो नासिरजंगाचे पदरीं असून, फ्रेंचांच्या कृष्णकारस्थानांनींच नासिरजंग

मारला गेला, हा प्रकार कळल्यापासून त्याचा फ्रेंचांच्या विरुद्ध चित्तक्षोभ झाला, तो कधीं शमला नाहीं. हा प्रधानकीवर असता तर, फ्रेंचांचा शिघाव निजामशाहींत झालाच नसता. सलाबतजंगास औरंगाबादेंतून काढून हैदराबादच्या बाजूस ठेवण्याचा प्रयत्न शहानवाजनेंच फारसा चालूं दिला नाहीं. स. १७५४ च्या जानेवारींत त्यास निजामाची प्रधानकी मिळाली. तेव्हांपासून तीन चार वर्षें तो निजामाच्या कारभारांत प्रमुख होता. स. १७५६ तील पेशव्याच्या स्वारीनंतर म्ह. मे महिन्यांत निजामानें बुसीस घालवून दिलें, तेव्हां इंग्रजांची मदत मिळविण्याची पूर्व तयारी शहानवाजने करून ठेविली होती; परंतु त्याच संधीस कलकत्याच्या अंधारकोठडीचा प्रसंग उद्भवल्यामुळें इंग्रजांची मदत निजामास मिळूं शकली नाहीं. पुढें वर्णन करावयाच्या निजामाच्या व्यवहारांत शहा नवाजखानाचें अंग प्रमुख आहे. स. १७५८ चे आरंभीं त्याचा खून झाला.

यांशिवाय निजामाकडील व्यवहारांच्या कागदांत कित्येक व्यक्ती येतात, त्यांची थोडक्यांत स्पष्टता खालीं दाखविणे जरूर आहे.

नसीरजंग ऊ. रुक्नुद्दौला—हा निजामाचा सर्वांत धाकटा मुलगा. मीरमोगल तो हाच. यास धाकटे नासीरजंग असें म्हणत.

मीरमहंमद हुसेनखान—वरील नसीरजंगाचा कारभारी.

ख्वाजा न्यामदुल्लाखान—कांहीं काळ अधवानी प्रांताचा सुभा.

सफसिकतखान—हैदराबादचा सुभा.

अब्दुलहादीखान—अधवानी प्रांताचा कांहीं काळ सुभा.

दिलावरखान—निजामी फौजेंतील सरदार—शिऱ्याचे बंदोबस्तास होता.

हकीम महंमदअली—मराठ्यांशीं बोलणें करणारा निजामाचा वकील.

बाजदलीखान—निजामलीचा कारभारी.

दरगाह कुलीखान—औरंगाबादचा कोतवाल.

मुजफरखान व इब्राहीमखान—हे दोघे गारद्याचे सरदार बुसीचे हाताखालीं तोफखान्याचें काम शिकलेले होते. हे यापुढें

मराठ्यांच्या नोकरींत आले. इब्राहीमखान निजामलीबरोबर राहत असून, फ्रेंचांचा दुष्मन् होता. [ खं. १ ले ८१ पृ, १५७ ].

**विठ्ठल सुंदर**—निजामलीचा दिवाण.

**शमसामजंग**—किंवा शमसामुद्दौला हे सलाबतजंगाचे किताब.

**गझफरजंग**—बुसीचा किताब.

**रायजगन्नाथ**—बुसीचा दप्तरनवीस.

**परशुरामपंत ऊ. परशराम महादेव**—सलाबतजंगाजवळ पेशव्यांचा वकील-मे १७५७ च्या पूर्वी मृत्यु पावलेला. [खं. १पृ. ११५].

**रघुनाथ गणेश**—पेशव्याचा वकील बुसीजवळ.

**जीवनराव केशव व कृष्णाजी त्रिंबक**—पेशव्यांचे वकील शहानवाजखानाजवळ-एकमेकांचे नातेवाईक होते.

**श्यामजी गोविंद**—निजामलीजवळ पेशव्याचा कारभारी.

| | |
|---|---|
| **गणेश संभाजी खांडके**<br>**कचेश्वर त्रिंबक**<br>**भगवंतराव यादव**<br>**अवधूतराव केशव** | पेशव्यांचे कारकून निजामाकडील कामांत असलेले. |

**बाबूराव व यशवंतराव कोन्हेरे**—नागपूरकर भोसल्याचे सरदार.

| | |
|---|---|
| **जानोजी निंबाळकर महाराव, रावरंभा**—<br>**हणमंतराव निंबाळकर** | निजामाचे सरदार. |

निजामाकडील कागदपत्रांत हीं नावे वारंवार येतात; म्हणून मुद्दाम त्यांची स्पष्टता केली आहे. या नांवांच्या यादीवरून नानासाहेबाच्या अमदानींत मराठशाहीच्या उद्योगाचा व्याप केवढा वाढला होता, निरनिराळ्या प्रकरणांत किती लोक कामास लागले होते, कितीकांस राष्ट्रोद्योगाचें शिक्षण मिळत होतें; आणि एकट्या पेशव्याची नजर सारखी चहूंकडे कशी फिरत होती, याची कल्पना वाचकांस करतां येते. स. १७५७ सालच्या मे ते ऑक्टोबर दरम्यानच्या सहा महिन्यांतील ५५ पत्रें [ ले. ६५ - ११९ ]

पहिल्या खंडांत राजवाड्यांनीं छापलीं आहेत पेशव्याच्या पत्रांचे हे जबाब आहेत, म्हणजे जवळ जवळ इतकींच पत्रे या एका प्रकरणांत पेशव्यानें पांच महिन्यांच्या अवधींत लिहिलेलीं आहेत.

शिंगव्याच्या तहानंतर तीन चार वर्षे पावेतों निजामाचा व मराठ्यांचा युद्धप्रसंग झाला नाहीं. उभय पक्षांत धुसपूस व कारस्थानें चालू होतीं, परंतु स. १७५३ पासून १७५६ हीं वर्षे स्वास्थ्यांत गेलीं, असें म्हणण्यास चिंता नाहीं. स. १७५६ च्या पहिल्या चार पांच महिन्यांत, सावनूरच्या हल्ल्यांत निजामाची मराठ्यांस प्रत्यक्ष मदतसुद्धां होती. उभयतांचा उग्र युद्धप्रसंग असा स. १७५७ त झाला. त्यास सिंदखेडची स्वारी असें नांव आहे. ही स्वारी २७ ऑगस्ट स. १७५७ पासून २ जानेवारी स. १७५८ पावेतों चालली. त्यानंतरची निजामावरील स्वारी म्हणजे उदगीरची होय. ती स्वारी डिसेंबर १७५९ पासून मार्च १७६० पावेतों चालून मग पेशव्याच्या फौजा पानपतावर गेल्या. या मुख्य स्वाऱ्या ध्यानांत धरून निजाम-मराठ्यांचे व्यवहार उकलून दाखवावयाचे आहेत.

हे व्यवहार समजण्यासाठीं स. १७५३ ते १७५६ पावेतों निजामाचे स्वतःचे व्यवसाय व मुक्काम कोठें काय होते, हे प्रथम पाहिलें पाहिजे. स. १७५३ च्या आरंभींच बुसी सलाबतास घेऊन हैदराबादेकडे गेला. आपल्याबरोबर कर्नाटकच्या स्वारींत सामील व्हावें, अशी पेशव्यानें निजामास सल्ला दिली होती; परंतु तो त्याप्रमाणें वागला नाहीं. निजामानें हैदराबादेस राहवें, असा बुसीचा आग्रह होता. कारण बहुधा हें ठिकाण किनाऱ्यावरील फ्रेंच सत्तेच्या आटोक्यांत होतें. अशारीतीनें फ्रेंच लोक निजामशाहीचा ग्रास घशांत टाकणार हा प्रकार निजामाच्या इतर मुत्सद्यांस पटणारा नव्हता. या दृष्टीनें पाहतां वरील तीन चार वर्षे म्हणजे फ्रेंचांचा बुसी व निजामाचे मुत्सद्दी यांच्या झगड्याचींच होत. बुसी आपला पाय मजबूद करीत होता, मुत्सद्दी त्यास दूर ठेवीत होते; आणि स्वतः निजाम दोहोंच्या मध्यें लोंबकळत होता; आणि इकडून पेशवा सर्व

पक्षांशीं संधान ठेवून मराठशाहीचा विस्तार होईल तितका करण्यास झटत होता. वर दर्शविलेली सर्व मंडळी या झगड्यांत भाग घेणारी होती. हैदराबादेस गेल्यावर आरंभींच बुसीला एक विघ्न उपस्थित झालें. त्याची प्रकृति एकाएकीं अतिशय बिघडून आरामासाठीं त्यास मच्छलीपट्टणास जावें लागलें. मागें त्याच्या फौजेस पगार वगैरे वेळेवर न मिळून घोटाळे झाले. सय्यद लष्करखान कारभारावर होता. त्यानें व शहानवाजखानानें मिळून फ्रेंचांची फौज हैदराबादेसच राहूं देऊन तिला पगार वगैरे दिला नाहीं, आणि लगेच निजामास औरंगाबादेस आणिलें.

८. निजामाचे दरबारीं पेशवा व फ्रेंच यांची स्पर्धा:—अशारीतीनें फ्रेंचांच्या फौजेची पांगापांग करून, शेवटीं हें अवजड लोढणें गळ्यांतून कायमचें काढून टाकण्याचा सय्यदलष्करखाचा विचार होता. यासंबंधाचें त्या खानाचें एक पत्र डुप्लेच्या हातांत पडलें. तेव्हां डुप्लेनें हा प्रकार तावडतोब बुसीस लिहून कळविला; आणि लगेच त्यास परत निजामाकडे आण्यास सांगितलें. प्रकृति थोडी प्रवास करण्याजोगी होतांच स. १७५३ च्या सेप्टेंबरांत बुसी हैदराबादेस आला. इकडे सय्यदलष्करखानाचें कारस्थान पेशव्यांच्याही विरुद्ध चालू होतें; आणि सेप्टेंबर महिन्यापूर्वीच मराठयांशीं निजामाचें पुनः फाटण्याचा रंग आला होता. ‘ मागील महिन्यांत फार गलबला होता कीं, सल्ला बिघडतो. जानोजी निंबाळकर व हणमंतराव निंबाळकर, व चंद्रसेनाचा लेक असे एकमत झाले. असे मिळोन पेशव्याशीं बिघाड करावा. शिंदेहोळकर वगैरे फितव्यांत आहेत. अवघ्यांचे वकील आले आहेत. होळकराकडे मोगलांकडून वकील गेले आहेत. ’ [ खं. ३ ले. ४३२ व ४३३ ता. २३ सेप्टेंबर ]. बुसी परत येतांच, त्यानें प्रथम पेशव्याच्या वकिलांस गौरवून नानाप्रकारच्या गोड भाषणांनीं व नजर वगैरे पाठवून पेशव्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. यावेळचीं पेशव्याच्या वकिलाचीं पत्रें पहिल्या खंडांत दिलेलीं आहेत. [ खं. १ ले. १४-२५ ]. बुसीनें पेशव्याचे वकिलाची भेट मोठ्या

सन्मानानें घेतली आणि कळविलें कीं, 'गुदस्तां आमचे मार्फतीनें तह झाला, त्याप्रमाणें करार असावा, तुमचे दोस्त ते आमचे दोस्त, आमचे दोस्त ते तुमचे दोस्त. आमचे दुश्मन् ते तुमचे दुश्मन्, तुमचे दुश्मन् ते आमचे दुश्मन्. याप्रमाणें अमलांत आणावे. आम्हीं लोक एकवचनी, जो करार केला तो केलाच, त्यांत तफावत होऊं देणार नाहीं. मोगल लोक काबुची (लबाड) आहेत. पेशव्याचे दौलतेची वृद्धि होते, ही गोष्ट त्यांस खूष लागत नाहीं. वेळ पाहोन दगा करावयास जपतच आहेत. इलाज न चाले, तेव्हां खुशामतीसही हजीर. सालगुदस्त महाराव निंबाळकराहीं मल्हारराव होळकरांस फोडावयाचा मनसबा केला, लेकिन शेवटास न गेला. मग पस्तावोन खुशामतीस लागले. पुढेंही दगाबाजीस चुकणार नाहींत. आम्ही रावप्रधानसाहेबांस जाणतों. त्यांहीं या लोकांस (मोगलांस) नजरेंतच धरावें. रावसाहेबांचा व आमचा निखालस एक विचार असतां दुसऱ्याची गुंजाईष आहे, ऐसें नाहीं. कित्येक उमदे उमदे मनसुबे खातीरख्वाह होतील. तूर्त आम्हीं शहरास [ औरंगाबादेस ] जात आहों. कोणतेही काम करणें, तें रावसाहेबाचे इतिलाशिवाय करणार नाहीं.'[ले. १५-१८] हें पत्र १६ नाव्हेंबरचें शेवटचें आहे. त्यानंतर बुसीची व सलाबताची भेट झाली. सन १७५३ च्या डिसेंबरास बुसी औरंगाबादेस पोंचला, तेव्हां त्यानें आपल्या मनांतील बऱ्यावाइटाची ओळख सय्यद लष्करखानास मुळींच दिली नाहीं. उलट खानच काकुळतीस येऊन बुसीकरितां वाटेल तें करण्यास कबूल झाला. त्याचा फायदा घेऊन बुसीनें आपल्या फौजेच्या खर्चासाठीं दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागूं नये म्हणून निजामाशीं नवीन तह करून उत्तरसरकार नावाचा सालीना ४० लाख उत्पन्नाचा निजामाचा प्रांत आपल्या ताब्यांत फौजेच्या खर्चासाठीं म्हणून घेतला. या प्रांतांत ४७० मैल लांबीचा समुद्रकिनारा व गंजम, चिकाकोल, विजयनगर, विशाखापट्टण, यानान, मच्छलिपट्टण, एलोर, निजामपट्टण हीं मोटमोठीं शहरें आहेत तीं सर्व फ्रेंचांच्या ताब्यांत आलीं. हा तह ता. ४ डिसेंबर

स. १७५३ रोजीं होऊन, [ ग्रि. रि. पृ. ५५१ ] त्यामुळें फ्रेंचांचें वजन व डुप्लेचा लौकिक देशांत अतोनात वाढला. थोडीशी फौज पाठवून बुसीनें हा नवीन प्रदेश लगेच आपल्या ताब्यांत घेतला. पुढें ' सलाबतानें त्वरेनें बाहेर निघावें, हा बुसी यांचा विचार. याजकरितां नबाबानें सखंभट व उमापति जोशी ऐसे पुणतांबेकर चार पांच जोशी मेळवून मुहूर्त पाहिला. सांगितलेले मुहूर्त फार लांब म्हणून १० सफर ( २६ डिसेंबर स. १७५३) शहानवाजखान वगैरेहीं करार केला. मुख्य गोष्ट द्रव्य नाहीं. याजकरितां बाहेर निघणें होत नाहीं. पीलखाना व उंटांस दाणा नाहीं.फाके गुजरतात. दरमहा लाखसवालाख खर्च. याजकरितां बाहेर निघत नाहींत. मुसाबुसी नबाबास बाहेर काढणार ' [ ले. १९ ता. ५ जानेवारी स. १७५४ ]. इतक्यांत त्रिचनापल्ली फ्रेंचांनीं हस्तगत केल्याचें वर्तमान आलें, त्यावरून बुसीनें ' बहुत खुशाली केली. पन्नास पाऊणसें तोफांचे आवाज केले. प्रस्तुत, हजार गाडदी नवे ठेवितात म्हणोन वर्तमान आहे. मछलीबंदरचा माजी कारभारी कलंदरखान याचा मुलगा अब्दुल रहिमखान मुसाबुसीजवळ कुल अखत्यारी. त्यास सहा हजारी मनसब व नौबत निशाण दिधलें. प्रस्तुत, येथें प्राबल्य मुसाबुसीचें आहे. सलाबतजंगास कोणी पुसत नाहीं.' बुसीपुढें आपलें कांहीं चालत नाहींसें पाहून सय्यद लष्करखानानें राजीनामा दिला, तेव्हां त्याचे जागीं शहानवाजखानाची नेमणूक झाली; पण त्यासही बुसीचें वजन खपलें नाहीं. त्याचेंही पेशव्याशीं सूतच होतें. ' ता. २३ डिसेंबर स. १७५३ रोजीं मुसाबुसी सय्यद लष्करखानाचे परामर्शास गेले होते. खान मा।. निल्हे आजाराची सबब करून घरांत आहेत. त्यांचा व शहानवाजखानाचा एक विचार आहे. ' [ ५ जानेवारी स. १७५४ ] पुढें सय्यद लष्करखानास वऱ्हाडचा सुभा सांगितला. [ खं. १ ले. २३ ].

बुसी व डुप्ले हे उभयतां एकमतानें वागून फ्रेंचसत्तेचा पुरस्कार हरतऱ्हेनें दक्षिण हिंदुस्थानांत करीत होते. पुढें स. १७५४ त डुप्लेच्या विरुद्ध फ्रान्सांत काहूर उठून त्यास फ्रेंच सरकारनें परत बोलाविलें; आणि

ता. २ ऑगस्ट १७५४ रोजीं गोदेहू याच्या हवालीं सर्व कारभार करून ता. १४ ऑक्टोबर रोजीं डुप्ले स्वदेशीं निघून गेला. त्यामुळें बुसीची बाजू लंगडी पडत चालली. स. १७५४ च्या एप्रिलांत निजामास घेऊन बुसी हैदराबादेस गेला. तेथें दोन महिने राहून बुसी उत्तरसरकार प्रांतांतील आपल्या नवीन प्रदेशाची व्यवस्था करण्यासाठीं कांहीं दिवस मच्छलीपट्टण-कडे निघून गेला. [ जून १७५४ ] जाण्यापूर्वी निजामानें दरबार भरवून बुसीस आग्रहाची विनंति केली कीं, ' आपण आम्हांस सोडून जाऊं नये. आपल्याशिवाय आमचें क्षणभर चालावयाचें नाहीं. ' [ त्रि रि.पृ.५५२ ] आपल्या नवीन प्रदेशाची व्यवस्था डुप्लेनें फार चांगली केली. विजय-रामराजे नांवाचा एक हुशार गृहस्थ पाहून त्याजला बुसीनें या प्रांताचा कारभार सांगितला; आणि त्याचा वसूल सुरक्षितपणें येण्याची व्यवस्था केली. वसूल बेताचा ठेविला, हिशेब चोख राहिले, कोणावर जुलूम चालविला नाहीं, आणि पूर्वीच्या वतनांस वगैरे हरकत घेतली नाहीं. या व्यवस्थेनें बुसीचें नांव मोठें झालें आणि त्याचा द्रव्यसंचय व बळ हीं वाढत गेलीं. ( डफ व खं. २–६४ ). उत्तर सरकार प्रांताची व्यवस्था करून, गोदेहूचा हुकूम आल्याप्रमाणें बुसी स. १७५४ च्या अखेरीस परत हैदराबादेस आला. तेव्हां गोदेहूच्या कारभारानें फ्रेंचांवरील लोकांचा विश्वास उडालेला बुसीस आढळला. सलाबतजंगानें तर बुसीस बोलून दाखविलें कीं, " इंग्रजांचा लौकिक वाढला असून आम्हांस मदत करण्याचें सामर्थ्य व इच्छा फ्रेंचांस नाहींत. " तथापि जसेंतसें करून बुसीनें निजामाची समजूत केली. शहानवाजखानानें बुसीशीं बाह्यतः सख्य ठेवून सर्व व्यवस्था त्याचे तंत्रानें चालविली; परंतु फ्रेंचांचें वाढतें वजन मुसलमानांस किंवा निजामशाहींतील मराठे सरदारांस मुळींच आवडलें नाहीं. तें कमी करण्यासाठीं सर्वांनीं अंतस्थ प्रयत्न चालविले. याची जाणीव बुसीलाच चांगली होती; म्हणून कसेंही करून इंग्रजांशीं तह करा, अशी आरंभापासूनच बुसीची टोंचणी डुप्लेस होती.

निजामशाहींत सर्व मंडळीस मात्र वाटलें कीं, मोगलाई बुडाली. 'मोगलांचे दौलतीची अखेरी आली. पंतप्रधानांचे तालेबुलंद म्हणून दिवसेंदिवस त्यांचे दौलतीची भरभराट आहे.' एका अवलियानें भविष्य सांगितलें कीं, ' लढाईमध्यें तमाम मोगल मारले गेले. सलाबतजंगास कबरेंत गाडावयास नेलें. शहानवाजखानास जखमा लागल्या. मुसाबुसीचें शीर कापलें. लष्कर गारत झालें पंतप्रधानांचे झेंडे औरंगाबादेंत दाखल झाले. ' [२० फेब्रुवारी १७५४, ले. २५ खं. १ ].

बुसीनें सलाबतजंगास कांहीं थोडे दिवस हैद्राबादेस नेलें तरी स. १७५४ व ५५ हीं दोनही सालें तो बहुतक औरंगाबादेसच होता. स. १७५४ च्या नोव्हेंबर डिसेंबरांत तो शहरांतच होता. [खं. ३–४४७,४४८ ] फेब्रुवारी व जून स. १७५५ त बाहेर नव्हता. [ खं. ३–४५१, ४५५, ४५८ ] सेप्टेंबरांत तो औरंगाबादेस असल्याचे दिसतें. [ खं. ३ ले. ४६२ ] सारांश या दोन सालांत मराठ्यांच्यासंबंधानें निजामाच्या हालचाली महत्त्वाच्या नाहींत; आणि त्या वेळचे कागदही फारसे उपलब्ध नाहींत. स. १७५६ च्या आरंभीं मात्र मराठ्यांच्या सावनूर वरील स्वारींत निजाम व बुसी हे सामील झाले. ती स्वारी संपतांच निजामानें बुसीस आपल्या जवळून काढून दिलें. ' नबाब सलाबतजंग आमच्या मदतीस येऊन पावले. त्यांच्या आमच्या भेटी जाहल्या. मोगलाई कारभार. सुस्त अतिशय. बहुनायकी आहे. ' [ खं. ३ ले. ४७६, २७ एप्रिल १७५६ ] ' नबाब स्नेह घरोबा फारच करतात. शहानवाजखान व मुसाबुसी हमेशा येत असतात. सर्वांनीं परस्परें इमान प्रमाण केलें आहे, त्यामुळें सय्यदलष्करखानचा पक्ष विशेष कोणी करीत नाहीं. ' असं पेशवा २८ एप्रिल स. १७५६ रोजीं लिहितो. [सदर ले. ४७७]. 'सावनूरच्या प्रसंगीं नबाबास आणणें जरूर जाहलें. नबाब एक दिवस फकीर होतो. नाहींतर फिरंगियांस निरोप द्या म्हणून अत्याग्रह करून निरोप दिल्हा. बहुत योग्य सेवक होते. भावांस कारागृहांतून एकाएकीं सोडून, एकास वऱ्हाडचा सुभा, व एकास विजापुर अदवानीचा.

सुभा दिल्हा. आम्ही ( बुसीस ) विरुद्ध दाखवावें तर आमच्या कार्यास ( सावनूरचे लढाईस) आला, त्यासीं विरुद्ध दाखविल्यास दुर्लौकिक होणार.' [ ले. ४७८ ] ' नबाब स्नेह बरोबा फार धरितात. आपण व तिघे भाऊ निखालसपणें आमचे डेऱ्यास एकाएकीं येऊन ममतापूर्वक भाषण करितात. [ बुसीस घालवावयाचा असल्यामुळें स. १७५६ च्या मे महिन्यांत निजाम पेशव्याचीं आर्जवें करीत होता. ] शहानवाजखान व मुसाबुसी हमेशा येत असतात. सय्यद लष्करखानाचा विशेष पक्ष कोणी करीत नाहीं. त्याची व वऱ्हाडची सुभेदारीही काढिली. ' आणि त्या सुभेदारीवर निजामलीची नेमणूक झाली. ता. १० मे स. १७५६ च्या पत्रांत देवाजीपंत वकिलानें पेशव्यास कळविलें, ' फिरंगियांस आज्ञा दिधली कीं, आपले फुलचरीस जाणें. त्यांस अति निकट करून काढलें. फिरंगी कुच करून मल्हारजी होळकरापाशीं उतरले. होळकर लग्नासाठीं पंतप्रधानापासून रजा घेऊन चालले. मुसाबुसी याचा बनाव न बने यास्तव सलाबतजंगांनीं निरोप दिल्हा. त्यांस मच्छलीबंदरीं पाठविलें. तेथून जावयाचें भय, यास्तव पेशव्यांकडून त्यांस पांचशें राऊत पोंहचवावयास दिल्हे. पुढें त्यांणीं सरकारांत चाकरीस यावें असें केलें. फिरंगी मर्द, सरंजाम चांगला, याजकरितां चाकर ठेविलें.' ( सदर ले. ४७८–४८१ ). हें पत्र १८ मेचें आहे. म्हणजे बुसी यास नानासाहेब आपले चाकरीस ठेवणार होता, असें दिसतें. परंतु बुसी कांहीं निजामशाही सोडून दूर गेला नाहीं. ' सलाबतजंगाकडे मुसाबुसी होता, त्यास निरोप दिला, पुढें त्यास पेशव्यानीं चाकरीस ठेवावें, असा करार केला आहे. ' [ २१ मे १७५६, ऐ. लं. सं. भाग १ नंबर ४ पृ. ८ ]. एकाएकीं आपणास अशी रजा मिळालेली पाहून विरुद्ध कारस्थानांचा जोर बुसीचे लक्षांत चांगला आला; आणि लगेच त्यानें पुढील बेत मनांत ठरवून मोठ्या धूर्तपणानें सर्व योजना केली. दोनशें घोडेस्वार व सहाशें पायदळ युरोपियन व पांच हजार एतद्देशीय पायदळ व तोफखाना एवढी जय्यत तयारी जवळ असल्यावर हिंदुस्थानांतील

कोणाही सत्ताधीशास त्यानें दाद दिली नसती. हें सर्व कारस्थान मुज्फरखानाचें आहे, त्यानें आपल्या फौजेंत फितूर केला आहे, आपण शत्रुपक्षाच्या पूर्ण तावडींत सांपडलों आहों, या गोष्टी लक्षांत आणून त्यानें शांतपणें निजामाचा निरोप घेतला व मच्छलिपट्टणास जाण्याचे परवाने मागितले; आणि निघून जाऊन हैदराबाद येथें चारमिनार बंगल्यांत बंदोबस्तानें राहिला. चंद्रसेन जाधवाचा मुलगा रामचंद्र जाधव आणि कर्माळ्याचा जानोजी निंबाळकर रावरंभा यांस सलाबतानें बुसीवर रवाना केलें; परंतु बुसीनें त्यांस फोडून आपल्याकडे वळविलें; आणि मच्छलीपट्टणाहून ज्यास्त मदत लॉ याचे हाताखालीं बुसीला आली, तिला या जाधव निंबाळकरांनीं विरोध केला नाहीं. ऑगस्ट महिन्यांत ही मदत बुसीकडे येऊन पोंचली. [ ब्रि. रि. ५७७ ]

ता. १ सेप्टेंबर १७५६ रोजीं पेशवा लिहितो, ' फिरंगी भागानगरांत चार महालांत ( चारमिनार नांवाच्या ठिकाणांत ) बळावले आहेत. नबाब सलाबतजंग फौज जमवून भागानगरासमीप जाऊन पावले. परस्पर युद्धें फार होतात. नबाब आपली कुमक करावी म्हणोन आम्हांस लिहितात. फिरंगी आमची कुमक करावी म्हणोन आम्हांस लिहितात. दुतर्फाही मध्यस्थ आम्ही. (म्हणजे पेशव्यांचा ओढा दोघांकडेही सारखाच). ' फिरंग्यांनीं भागानगरास न जातां शहरापासून दहा बारा कोसांचें अंतरानें जावें, नबाबाची जिनसी द्यावी, ते न दिल्ही. नवाबांनीं जलदी करून त्यांचे मागें फौज पाठविली, ते न पाठवावयाची होती.' एकूण दोहींकडे अंतराय. तूर्त दोहींकडील पैगाम आम्हांकडे कुमकेविशीं आले आहेत. त्यास औरंगाबादेकडील वर्तमान काय, एतद्विषयीं आपला व सय्यद लष्करखानाचा विचार कसा, तो खानास पुसोन लिहावा. ' असें पेशवा दीक्षितास विचारतो. [ ले. ४८१ ].

स. १७४६ च्या मे महिन्यांत बुसीला काढून दिल्यावर मद्रासकर इंग्रजांकडे शहानवाजखानानें फौजेची मागणी केली. विजयदुर्गची कामगिरी

आटोपल्यावर हें, फ्रेंचांशीं लढण्याचें नवीन काम, क्लाइव्हनें मोठ्या संतोषानें पत्करिलें असतें; परंतु इंग्रजांच्या हातून निजामाची कुमक या वेळीं झाली नाहीं. अर्थात् बुसीचें पारिपत्य आपल्या हातून होत नाहीं, असें पाहून सलाबतजंगानें त्याची समजूत काढून त्यास पुनः आपल्या नोकरींत घेतलें. ( १३ नोव्हेंबर स. १७५६ ले. ४८४ ). मुज्फरखानास आपल्या स्वाधीन करावें अशी बुसीची मागणी होती; परंतु ती निजामानें मान्य केली नाहीं. मात्र बुसीच्या आग्रहास्तव त्यास निजामानें नोकरींतून काढून दिलें. तेव्हां तो पुण्यास खटपट करून पुनः पेशव्याचे नोकरीस राहिला. या हराम-खोरास नोकरींत ठेवूं नये, असा सदाशिवराव भाऊचा आग्रह होता. या एकंदर भानगडींत बुसीचे वर्ष सहा महिने सर्वस्वी फुकट गेले, हें त्याचें मोठे नुकसान झालें.

'नबाबांनीं, पारपत्य नीट न होई यासाठीं फिरंग्याशीं सलूख केला. याजमुळे हैदरजंग ( बुसीचा हस्तक अब्दुलरहमानखान ) चढीं लागून मुज्फरखानास घालवून दिल्हे. ( बुसीस घालविण्याच्या कामीं मुज्फरखानाची खटपट असावी ). पुढें शहानवाजखानास जरब देऊन, दूर करून आपणच दिवाण व्हावें, ऐसा डौल दिसतो; परंतु असल्या प्रसंगीं प्रामाणिक वजनदार शहानवाजच आहे. सांप्रत सय्यद लष्करखानास नवी जहागीर दिल्ही. समाधान केलें. त्यास त्यांचे मतें शहानवाजखान असावे, किंवा हैदरजंग फिरंगीच सर्व व्हावे. ( म्हणजे दोहोंतून एका पक्षानें निजामाचा सर्व कारभार करावा. ) आमचें मत तों शहानवाजखान बरे. हैदरजंगांनीं फिरंगी यांची पूर्ववत् चाकरी करून असावें. मागें सय्यद लष्करखानास दबावून काढलें. आतां शहानवाजखानास काढिलें म्हणजे मोगल मंडळीचा वक्रच उडून गेला. दुसरें, हैदरजंग फिसादी मनुष्य आहे. एतद्विषयीं सय्यद लष्करखानाचा भाव काढून आम्हांस कळवावें.' असें पेशवा दीक्षितास लिहितो. [ ले. ४८४ ].

आतां मात्र निजामाच्या दरबारीं बुसीचें वजन अतोनात वाढलें; आणि या फ्रेंचांस घालवून देण्याचा कांहीं एक इलाज निजामास अगर त्याच्या सल्लागारांस सुचेना. इकडे बुसीस जर पांदिचरीहून चांगली मदत झाली असती, तर इंग्रजावर कलकत्याकडे संकट आलें असतां, मद्रासकरांस फ्रेंचांनीं सहज नाहींसें केलें असतें. हा प्रकार ब्रिटिश रियासतींत स्पष्टपणें वर्णिला आहे. निजामापाशीं सर्व व्यवस्था लाविल्यावर बुसी उत्तरसरकार प्रांतांतील प्रदेश हस्तगत करण्यासाठीं स. १७५६ च्या अखेरीस गेला. त्या वेळीं नवाब सिराजुद्दौल्यानें त्यास आपल्या मदतीस बोलाविलें होतें. इतक्यांत चंद्रनगर इंग्रजांनीं काबीज केल्याचें वर्तमान बुसीला समजलें, त्यावरून इंग्रजांचें ठाणें विशाखापट्टण हें बुसीनें हल्ला करून घेतलें. [ स. १७५६ ]. परंतु उत्तरसरकार प्रांतांतील कामगिरी पुरी करण्यापूर्वींच बुसीला पुनरपि निकडीनें औरंगाबादेस निजामाकडे जावें लागलें. सलाबत-जंगाचे दोघे भाऊ निजामली व बसालतजंग व दिवाण शहानवाजखान या तिघांनीं पेशव्याशीं कारस्थान करून फ्रेंचांस काढून टाकण्याची सिद्धता केली. त्याच वेळीं पेशव्याचे चिथवणीवरून जानोजी भोसल्यानें उत्तरेकडून निजामास अगदीं त्राहि त्राहि करून सोडलें. [खं. १ पृ. ११८ व टीप १४४ ] हा प्रकार पाहून सलाबतजंगानें घाबरून लगेच बुसीस परत बोलाविलें. परंतु तो सप्टेंबर १७५७ पावेतों आला नाहीं. ५७ च्या मे मासांत सलाबतजंग औरंगाबादेस होता. [ खं. १ ले. ६४] जून महिन्यांत सलाबत व निजामली एकत्र होऊन कलबुर्ग्यावर फौजेचा जमाव करून होते. [ खं. २ ले. ४९० ]. त्या वेळीं दीक्षितास एक निजामी सरदार लिहितो. ' आज्ञा जाल्याप्रमाणें येथील सर्व अमीरउमरावांची सल्ला घेतली. शहानवाजखान वगैरे उमराव आपले आज्ञेबाहेर कोणी नाहींत. निजामलीखां हे सलाबतजंगाचे मनांत विपर्यास आणून काय कमजास्त करीत, हा मात्र संशय आहे. तथापि त्यांचा विचार बहुतकरून आपले स्नेहांतील अमीरउमरावांचे मर्जीबाहेर नाहीं.

इकडील उमरावांविशीं खातरजमा असों द्यावी.' [ ३. ४९१] या वेळीं निजाम सलाबतजंगाचा भाऊ निजामली हा ज्यास्त धूर्त असून हळू हळू पुढें येऊं लागला होता, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. पुढें होणाऱ्या शिंद-खेडच्या स्वारींत तोच प्रमुख होता. याचवेळीं शिवनेरचा किल्ला पेशव्यांनीं हस्तगत केला. हा किल्ला व जुन्नर परगणा निजामाचे ताब्यांत असल्यामुळें पुण्यास शत्रूची धास्ती नेहमींच असे. तो किल्ला—म्हणजे शिवछत्रपतीची जन्मभूमि,—आपल्या कबजांत असावा, अशी तजवीज बाळाजी विश्वनाथास स. १७१८ त शाहूनें यादी दिली त्या वेळेपासून चालली होती. किल्ल्यावर महंमद आलमखान हा शूर सरदार असून किल्ला लढून हस्तगत होण्याजोगा नव्हता. सबब उद्धव वीरेश्वर चितळ्याचे विद्यमानें किल्लेदाराशीं बोलणें लावून, त्यास वंशपरंपरेची जहागीर देण्याचें ठरवून किल्ला स. १७५७ चे मे महिन्यांत हस्तगत केला; आणि तेव्हांपासून शिवनेर तालुका स्वतंत्र केला. किल्लेदाराच्या जहागिरीपैकीं बाल्हेगांव त्याजकडे अद्यापि चालत आहे. [ रा. श. पृ. १४३ व भा. व. श. ].

स. १७५७ च्या पावसाळ्यांत मराठ्यांचें व निजामाचें थोडें बहुत फाटत चाललें. बुसीला घालवून दिल्यावर निजामशाहींत शिरकाव करण्याचा पेशव्यानें प्रयत्न केला; परंतु फ्रेंचांस जसें निजामानें आपल्या छातीवर घेतलें, तसें पेशव्यांस घेण्यास तो खुषी नव्हता; आणि दरबारांतही तो प्रकार कोणास रुचला नसता. फ्रेंचांस जसा उत्तरसरकार प्रांत मिळाला, तशी आपल्यास एखादी जहागीर मिळावी, अशी पेशव्याची अपेक्षा होती. 'सरकारांत पंधरा लाखांची जहागीर देण्याचा नबाबांनीं करार केला.' [ खं. १ ले. ६५] 'पंचावित्रालक्षा रुपयांची जहागीर, दोन स्थळें चांगलीं कजा न होतां मोगल देऊन सलूख करीत असले तर बरेंच आहे. हें साधल्यावर पुढें आणखी त्याजपासून घेतलें जाईल. दिवसेंदिवस मोगल क्षीण होत जाईल, त्याप्रमाणें वरचेवर पुढें आणखीही साधलें जाईल. ऐसें करितां मोगलानें अनुसंधान लावून फौज जमा करून बळ धरलें तर आम्हीही

जात आहों. स्वामीच्या तेजःप्रतापें करून मनोदयानुरूप होऊन येईल. जे दिवशीं बाहेर निघालों, तेच दिवशीं चारपांचशें स्वार नगरास पाठविले. त्यांनीं किल्ल्याभोंवतीं चौक्या बसवून रसद बंद केली असे. गंगातीरासही पांचसाशें स्वार पाठविले असत. आमची बातमीची खबर आली आहे. मोगलानें तमाम सरदार मराठे व फिरंगी यांस पत्रें पाठविलीं आहेत; वरचेवर सांडणीस्वार जात आहेत कीं सत्वर येणें. सलाबतजंगानेंही अनुसंधान लावलें आहे.' [ १७३-२३ ऑगष्ट १७५७ ]. नगरचा किल्ला हस्तगत करण्याचा पेशव्याचा विचार बरेच दिवस असावा. 'स्वामींची मर्जी कांहींएक दिवसांपासून कीं, किल्ला अहंमदनगर सरकारांत मागावा, हें शहानवाजखानास कळलें होतें; आणि सांप्रत जीवनराव केशव यांनीं खानास सांगितल्यावरून स्वामींची मर्जी त्यास पुरती कळली. त्यावरून स्वामींची खातर जरूर जाणून किल्ले अहंमदनगर स्वसंतोषें स्वामीचे नजर केला. येथील लोक शब्द लावतील म्हणून सनद करून देतां येत नाहीं. आतांच या गोष्टीची चर्चा न करावी. जहागिरीचे परवाने आल्यानंतर विनंती लिहूं.' असें पेशव्यास वकील लिहितो. हा किल्ला पुढें १७५९ च्या नोव्हेंबरांत कविजंगाकडून कायमचा मिळाला. त्यावरूनच उदगीरचें युद्ध झालें. [ २९ जून १७५७-१. ६८ ]. 'शहानवाजखानाविशीं लिहिलें तें कळलें. ऐशास सर्वप्रकारें त्यांचें अगत्य आहे. दतबा ( शिंदे ) येऊन पोंहचत तों पंधरा दिवस दम धरावा. बावरें होऊं नये. आम्हांस सर्वप्रकारें त्यांची अब्रू राखून आपलें काम कर्तव्य आहे.' [ १५ ऑगस्ट १७५७, खं. ३-४९२ ]. मराठ्यांशीं बिघाड करण्याचा निजामाचा विचार बरेच दिवस असावा. ता. ३१ मे १७५७ च्या पत्रांत पेशव्यास वकील कळवितो, 'फिरंग्यांस मागें बोलावूं पाठविलेंच होतें, व सांप्रतहि पत्र पाठविलें आहे. पहिले पत्राचें उत्तर फिरंग्यांकडून आलें कीं, आम्ही छावणीस तुम्हांपाशींच येतों.' बुसी उत्तरसरकार प्रांतांत होता, त्यास निजामानें तावडतोब परत बोलाविलें. शहानवाजखान पेशव्याची मदत मागत होता,

आणि सलाबत व निजामही फ्रेंचांच्या मदतीनें पेशव्यांचा पाडाव करण्यास उद्युक्त होते. 'पुढें फिरग्यांकडील वर्तमान आलें कीं, ता. २६ ऑगष्ट १७५७ रोजीं विशाखापट्टणहून डेरे बाहेर केले जे इकडे यावें. ३० ऑगस्टला कूच केलें. पुढें कूच दरकूच इकडे येणार.' [ १. ७८ ] २५ सेप्टेंबरपर्यंत बुसी निजामास येऊन मिळाला नव्हता. ( १. ८० ) परंतु २६ सेप्टेंबरास मुसाबुसी व हैदरजंग हैदराबादेस दाखल झाले. [ १. ११४ ] ' जीवनरायाचे मार्फतीनें बसालतजंगांनीं कबूल केलें कीं, पंचवीस लाखांची जहागीर व नगर आम्हास द्यावें, शहानवाजखानास दौलताबाद, अंतूर करार करावें, चहूं लाखांची जहागीर द्यावी; परंतु निजामलीस बोलावितात. वरकड मराठे मुजफरखानास बोलावतात. यावरून कांहीं कपटभाव ऐसेंही वाटतें. तर यथार्थ वर्तमान दरगाह कुलीखानाचे किंवा दुसरे कोणाचे मार्फतीनें काढून जरूर लिहावें, ' असें पेशवा दीक्षितास ११ सप्टेंबरास लिहितो. [ खं. ३. व ४९४ ]. ' भाऊ भाऊ सलाबतजंग बसालतजंग झगडून मरतात. जो कोणी पंतप्रधानाचे अखत्यारीची सुभेदारी काढूं म्हणेल, त्याचे पाठीवाटे काळीज निघेल. ' [ ६. ३५७.] २२ सेप्टेंबरचें वर्तमान. ' नबाब शहरास ( म्ह. औरंगाबादेस ) येतात. श्रीमंतांशीं यांचा विरुद्धाचा विचार नाहीं. यांचे चितांत आपले (दीक्षिताचे) विद्यमानें सलूखच करावयाचा आहे. हरप्रकारें श्रीमंतांची मर्जी रक्षावी हेंच यांचें मानस दिसतें. ' [ ३. ४९५ ] सलाबतजंगानें औरंगाबादेस जाऊं नये, असें पेशव्यानें ठरविलें असावें. कारण २२ सेप्टेंबर स. १७५७ च्या पत्रांत नबाबानें शहरास जाण्याचें कारण व आपली अडचण सांगितली आहे. ' हल्लीं शहरींहून पत्रें नबाबाकडे, श्रीमंतांचा व नबाब सलाबतजंग यांचा दारमदार ठरला, शहानवाजखानास दौलताबाद, अंतूर दोन किल्ले व पाच लाखांची जहागीर दिल्ही, श्रीमंतांसही जहागीर वीस लाखांची दिल्ही, कजा वारला, म्हणून आली आहेत. या उपर पहावें काय विचार करतील ' [ ३. ४९६ ] २२ सेप्टेंबर १७५७.

९. **सिंदखेडची लढाई**—[ ऑगस्ट स. १७५७–ता. २ जानेवारी १७५८ ]. निजामानें पेशव्यास पंचवीस लाखांची जहागीर कबूल केलेली देली नाहीं, त्यामुळें प्रकरण हातघाईवर येऊन उभयतांमध्यें युद्धप्रसंग उपस्थित झाला यास सिंदखेडची मोहीम असें म्हणतात; ही मोहीम ऑगस्ट स. १७५७ त सुरू होऊन २ जानेवारी १७५८ पावेतों चालली. या मोहिमेंत विश्वासराव मुख्य असून त्यास युद्धाचें शिक्षण देण्यास व सांभाळण्यास दत्ताजी शिंदे याची नेमणूक होती. दत्ताजीबरोबर त्याचा तरुण्या जनकोजी विश्वासरावाप्रमाणेंच युद्धकलेचा ओनामा शिकत होता. नानासाहेब बाळाजी व सदाशिवराव मागें राहून मोहिमेचा पाठपुरावा करीत होते. निजामाकडून निजामअली व त्याचे दिवाण विठ्ठल सुंदर हे प्रमुख होते. शहानवाजखान याचें वजन संपुष्टांत येऊन सलाबतजंगाचा कारभार आतां निजामलीच प्रमुखत्वाने पाहत होता. [भा.व.श्च.पृ. ३७, रा. श्च. पृ.१४७] वास्तविक निजाम सलाबतजंग अगदीं कावून गेला होता. शहानवाजखानाचे हातून बुसीस काढून देण्याचें काम सिद्धीस गेलें नाहीं, म्हणून त्याजवर निजामाची मर्जी बिलकूल नव्हती. यास्तव सलाबतजंगानें आपल्या दोघां भावांस बंधमुक्त करून अधिकारापन्न केलें. ते दोघे भाऊ, विठ्ठल सुंदर व इब्राहीमखान गारदी याचा विचार पेशव्याशीं एकवार उघड सामना करून त्यांस नरम करण्याचा होता. बुसी येईपर्यंत असा प्रसंग आणूं नये, अशी सलाबताची इच्छा होती. बुसीला तरी निजामलीचें कारस्थान पसंत नव्हतें. त्याचा हस्तक हैदरजंग यास दिवाणगिरी पाहिजे होती, परंतु निजामलीचाही आपल्याच हातीं कारभार घेण्याचा इरादा असल्यामुळें त्याचें व त्याचें बरें नव्हतें. सेप्टेंबर अखेर बुसी हैदराबादेस येऊन पोंचला आणि बरेच दिवस औरंगाबादेकडे आलाच नाहीं. स.१७५६ त बुसीस लोकांची मदत घेत असतां रामचंद्र जाधवानें त्याजला अडविलें नाहीं, याचा सूड घेण्यासाठीं शहानवाजखानाचे विचारें सलाबतजंगानें जाधवावर स्वारी करून त्याची बहुतेक जहागीर जप्त केली, त्यामुळें जाधवही अंतःकरणांतून

सलाबतच्या विरुद्धच होता. सारांश, निजामली, जाधव वगैरे मंडळींचा एक पक्ष होऊन सलाबतजंग व शहानवाजखान हे बहुतेक असहाय झाले होते. स. १७५७ च्या पावसाळ्यांत सलाबतजंगाची औरंगाबादेस मोठी मेघा उडाली होती फौजेस पगार न मिळाल्यामुळें लोक धरणें धरून बसले होते. बुसीस त्वरेनें बोलाविलें असतां, तो तर आलाच नाहीं. 'फिरंगियांस मागें बोलावूं पाठविलेंच होतें, व सांप्रतही पत्र पाठविलें आहे, जे तुम्ही लौकर येणें. पत्राचें उत्तर आलें जे आम्ही छावणीस तुम्हांपाशींच येतों.' [ खं. १ ले. ६५ पृ. १२२ ]. परंतु बुसी वेळेवर आला नाहीं. 'फौजेनें पैशाचा गिल्ला बहुतच केला,' त्याचा बंदोबस्त शहानवाजचे हातून होईना, तेव्हां खानास दिवाणगिरीवरून काढून बसालतजंगास तें काम देण्याची फौजेने सलाबतजंगास निकड लाविली. ती गोष्ट सलाबतानें नाइलाजास्तव मान्य केली. तेव्हां शहानवाजखान दौलताबदचे किल्ल्यावर जाऊन तेथें बंदोबस्तानें राहूं लागला, आणि पेशव्याचें साह्य त्यानें मागितलें. 'किल्ले दौलताबाद स्वामींनीं शहानवाजखान आपला मित्र जाणून त्यास देणें म्हणून परवानगी पाठविली, याजवरून खान फारच संतोष पावला' ( जून ता. २९ स. १७५७ खं. १ ले ६८ ). 'औरंगाबादेस शहानवाजखान दिवाण मोगलाचा त्याशीं हिशेब कितेबाचा कजा लाविल्यामुळें त्यानें आपली दोन तीन हजार फौज व मालमालियत, कबिलेसुद्धां रात्रौ तयार होऊन उठोन शहरांतून दौलताबादेस गेला. त्याचेच विद्यमानें दौलताबाद ( अगोदरच पेशव्यानीं ) हस्तगत केली होती. तेथे त्याचेच निसबतीचा कोणी होता. पुढे चौक्या बसवून शहानवाजखान काबूंत आणावा, असा नबाबाचा मतलब आहे. [ऐ. ले. सं. भाग १ ले. १० पृ. १७ ऑगस्ट स. १७५७ ). लोकांत समज असा होता कीं, शहानवाजखानानें हा कपटव्यूह मुद्दाम रचिला होता. कदाचित् त्यात पेशव्याचेंही अंग असेल. सलाबतजंग शहानवाजखानाचे भेटीस दौलताबाद किल्ल्यावर आल्याशिवाय राहणार नाहीं. तो आला

म्हणजे त्यास एकदम कैद करून निजामलीस गादीवर बसवावें, असा घाट होता. परंतु सलाबतजंगास कोणी तरी, बहुधा फ्रेंच फौजेंतील इसमांनीं कानमंत्र सांगितला कीं, किल्ल्यावर जाऊं नये. त्यासच भेटीस बोलवावें आणि अपाय होणार नाहीं, असें वचन घ्यावें. सलाबतजंग किल्ल्यावर येत नाहीं, असें पाहून कटवाले ज्यास्तच चेतले. स्वाधीन होण्याविषयीं शहानवाजखानास निरोप गेला, तेव्हां जबाब म्हणून त्यानें किल्ल्यांतून बाहेरच्या वेढा घालणाऱ्या फौजेवर तोफा झाडल्या. बसालतजंगानें निजामलीस आपल्या मदतीस बोलाविलें. तेव्हां शहानवाजखानानें पेशव्याची मदत बोलाविली. प्रसंग हातघाईवर येऊं नये म्हणून सलाबतजंगानें निजामलीस कळविलें, 'तुम्हीं पुढें येऊं नये' परंतु दिवाण शहानवाजखान यानें धन्याची अशी अमर्यादा केलेली निजामलीस खपली नाहीं. त्यानें बसालतजंगाच्या मदतीनें सर्व ठिकाणच्या फौजा गोळा करून दौलताबादेकडे चाल केली. इकडून मराठ्यांच्या फौजाही खानाचे मदतीस येऊं लागल्या. तेव्हां मध्यस्थांचे मार्फत बोलणीं होऊन शहानवाजखान आपल्या धन्यास शरण गेला. इकडे निजामलीनें दिवाणगिरीचा कारभार सर्व आपल्या हातीं घेतला; आणि मराठ्यांशीं लढण्याची तयारी केली. निजामलीचें व सलाबतचें मनांतून बरें नव्हतें; तथापि दिलसफाईचीं बोलणीं होऊन दोघे भाऊ एक झाले; आणि निजामलीस सलाबतानें निजामुल्मुल्क असोफजा असा किताबही दिला. तेव्हां शहानवाजखानाचे मदतीस पेशवे धावून आल्यामुळें निजाममराठ्यांचें प्रकरण हातघाईवर आलें.

वास्तविक सलाबतजंगाचे अंगीं कांहींच कर्तृत्व नव्हतें. पांच सात वर्षांच्या कारभारांत त्याचें अंगीं शहाणपण असें कांहींच उत्पन्न झालें नाहीं. जसा कोणी त्यास नमवील तसा तो नमत असे. बुसीनें त्यास सर्वस्वी ग्रासून टाकिलें होतें. बुसीसारख्या परस्थानें निजामशाही घशांत टाकण्यापेक्षां ती आपणच कां हस्तगत करूं नये, असा पेशव्याचा इरादा होता. दक्षिण मोकळी करणें हें पेशव्याच्या कारभारांतलें एक धोरण

होतें. अशा भावनेमुळेंच ही प्रस्तुतची मोहीम उपस्थित झाली. दुसरें विशिष्ट कारण असें कांहीं घडलें नाहीं. शाहू छत्रपतीच्या मृत्यूपासून पांच सात वर्षे झालीं तरी मराठशाहीच्या उद्दिष्टांतले अनेक भाग अद्यापि तसेच रेंगाळत चालले होते. गेल्या दोन तीन वर्षांत कर्नाटकच्या स्वाऱ्यांत पेशव्यास चांगलें यश येऊन पैसाही मुबलक मिळाला होता. तेणेंकरून उत्तरेंत व दक्षिणेंत पेशव्याच्या सत्तेचा दरारा चांगला बसून हिंदुस्थानांतील कोणत्याही दरबारांत पेशव्याच्या शब्दास हुकमाचा मान मिळूं लागला. तेव्हां बुसीस बाजूस काढून निजामशाहीचें संपुष्ट करण्याचा पेशव्यानें विचार केला; आणि जहागिरीचें निमित्त पुढें केलें. पेशव्याचे वकील निजामशाहींतील प्रत्येक हालचालीची इत्थंभूत बातमी त्यास पुरवीत होते, आणि पेशवा सावधगिरीनें वागून त्या सर्वांस ताकिदी देत होता.[1] जानोजी भोसल्यानें वऱ्हाडातून निजामास खालीं चेपावें आणि पेशव्याचे तोंडावर आणावें असा घाट असून, भोसल्यानेंही आपली कामगिरी यथायोग्य बजाविली. 'पेशजी लिहिल्याप्रमाणें निजामलीचा प्रकार करावयाचें करणें. पंचवीस लाखांची जहागीर सरकारांत द्यावी. नगर द्यावें. शहानवाजखानास तीन लक्षांची जहागीर आणि दौलताबाद व अंतूर दोनही किल्ले करार करावे. इतके मजकूर कबूल केले म्हणून जीवनराव यांणीं लिहिलें, त्यावरून चिरंजीवास व दतबास सलूख करावयाविशीं लिहिलें आहे. सत्वर पंचविसांचे परगणे मात्र चांगले निवडून घ्यावे. भेटावें. सलूख जाहीर करावा. परंतु फौजा जमा करितात. निजामली येणार. इब्राहीमखान झुंजाच्या गप्पा मारतात. त्यास तूर्त सलूख लावून ठेवावा. फौजा जमा जाल्यावर कज्ज्यास उभे रहावें, ऐसा भाव आहे. शुद्ध भाव आहे किंवा काय हा शोध घेऊन लिहावें.' असें पेशव्यानें वकिलास लिहिलें. त्यावरून वकिलाचा जबाब तपशीलवार आला. 'निजामलीचा दिवाण विठ्ठल सुंदर बाळापुरास कर्जवाम मेळवावयास गेला आहे. इब्राहीमखान नानाप्रकारचे विचार

---

१ ह्या स्वारींतलीं तीन महिन्यांचीच ४०-५० पत्रें पहिल्या खंडांत दिलेलीं आहेत.

करीतच आहे, त्याजपाशीं लढाऊ सामान चांगलें होतें. स्वामी ( पेशवे ) ज्यास हातीं धरतील त्यास नमुदांत आणतील हें सर्वांस कळलें आहे. निजामअली गिरणा नदीवर आले. एक दों दिवसांत शहरास दाखल होतील. त्याजसमागमें चार पांच हजार स्वार आहेत. इब्राहीमखान गारदी आहे, त्याजपाशीं अडीच हजार गाडदी व पंचवीस जरब तोफा इतका सरंजाम आहे. सलाबतजंग कारभार करितात. निजामलीचा संकेत आहे कीं, कूच करून गांठ घालावी. परिच्छिन्न दग्याचा विचार आहे. सावध असणें. विठोजी सुंदर दिवाण पांचशें स्वारांनिशीं उद्यां बाळापुराहून येणार. दीडलाख रुपयांचा निकाल करून आणणार. हा काळवर तिघे बंधू समाधानें करून आहेत.' इत्यादि वर्तमान पेशव्यास वकिलानें लिहून पाठविलें. तिकडे हैद्राबादेस मुज्फरखान गारदी यानें बंडाई चालविली होती. 'इब्राहीमखान गाड्यास लाख रुपये दरमहा करून निजामलीनें नोकर ठेविलें. मनसुबा आहे कीं, सर्व बंधूंचे विचारें बारा लाख रुपये नगद ( सालाचा पगार ) कैसे अनुकूल पडतील ! यापेक्षां जहागीर द्यावी. राहतील तरी ठेवावे नाहीं तरी आज्ञा द्यावी.' सप्टेंबर अखेर मुसाबुसी हैद्राबादेस दाखल झाला. ता. ८ ऑक्टोबरच्या पत्रांत वकील पेशव्यास कळवितो कीं, 'सल्ल्याचा रंग दिसत नाहीं. विठ्ठल सुंदर दोन लाख घेऊन आले ते वाटले. कोणास दोन कोणास तीन रुपये देऊन थोडे दिवस समजाविलें आहे. आज निजामअलीपाशीं विठ्ठल सुंदर, इब्राहीमखान वगैरे प्रहराउपर मसलत करीत बसले होते.' 'निजामअलीचे मनास कांहीं नाहीं. हे चौघे मिळून खेळ करूं म्हणतात' एकंदरींत निजामाकडील मंडळींनी मराठयांशीं दोन हात करण्याची तयारी केली. अशीं या प्रसंगाची तपशीलवार पत्रें ता. ८ ऑक्टोबर १७५७ पर्यंतचीं आहेत. त्या पुढचें प्रत्यक्ष लढाईचें वर्णन देणारे कागद उपलब्ध नाहींत. मात्र वरील ४०-५० पत्रें बारकाईनें वाचलीं असतां तत्कालीन मुत्सद्देगिरी व युद्धनीति या विषयांवर चांगला प्रकाश पडतो. खं. ११ तील ले. १०० हें

पत्र ७ सेप्टेंबर १७५७ चें निजामली, विठ्ठल सुंदर व इब्राहीमखान यांच्या संबंधाचें आहे.

११ जिल्हेजीं म्ह. २७ ऑगस्ट स. १७५७ रोजीं विश्वासराव मोगलांवर औरंगाबादेकडे चालून गेला. विश्वासरावाचा जन्म ता २२-७ १७४२ चा. म्हणजे सिंदखेडच्या स्वारींत त्यास १५ वर्षें पुरीं होऊन सोळावें लागलें होतें. अर्थात् राष्ट्रोद्योगाच्या त्या उमेदीच्या काळांत लोकांस पराक्रम करण्यास पाहिजे तेवढें क्षेत्र मोकळें होतें. कुटुंबांतील वडील मंडळीबरोबर प्रत्यक्ष अनुभवाच्या शाळेंत लोकांच्या उद्योगास अल्पवयींच सुरुवात होत असे. शिवाजी, बाजीराव, चिमाजी आपा, नानासाहेब व तत्कुटुंबीय मंडळी, पटवर्धन वगैरे मंडळी, भोसले, शिंदे, होळकर, गायकवाड वगैरेंच्या हकीकतींवरून लहानपणापासूनच पराक्रमक्षेत्राचे दरवाजे खुले होत असत असें दिसतें. ' सध्यां बारा तेरा वर्षांच्या सुमारास पोरें इंग्रजी अक्षरें शिकण्यास लागतात, त्या काळीं प्रांत काबीज करण्यास व संसार चालविण्यास त्याच उमरीचा पुरुष योग्य समजत असत. एकंदर आयुष्यक्रम त्यावेळीं भरीव असून सध्यांचे सारखा पोकळ नव्हता. संसाराची जबाबदारी व जगाचा अनुभव बालवयांतच कळूं लागल्यामुळें त्या वेळचे लोक अल्पवयांत मरूनही प्रस्तुत कालच्या लोकांपेक्षां ज्यास्त दिवस जगत; व सहस्रपटीनें ज्यास्त महत्त्वाचीं कामें करीत. ' [ राजवाडे खं. १ पृ. १४१ ] या मोहिमेंत व पुढें पानपतावर विश्वासरावास मुद्दामच अनुभव मिळविण्यासाठीं पाठविण्यांत आलें होतें.

प्रत्यक्ष या मोहिमेची हकीकत देणारीं त्या वेळचीं पत्रें उपलब्ध नाहींत. कांहीं थोडी हकीकत का. सं. भाऊसाहेबांची बखर या पुस्तकांत आहे. ( पृ. ३६-३८ ) दत्ताजी व जनकोजी शिंदे मारवाडांतील मोहिम आटपून नुकतेच दक्षिणेंत आले होते. या वेळीं जयाप्पाच्या मृत्यूचें विस्मरण त्यांस पाडून त्यांचा गौरव करणें जरूर होतें, म्हणून विश्वासरावास शिंद्याचे हवालीं करून मोहिमेची सर्व व्यवस्था पेशव्यानें त्यासकडेच

सांगितली. 'त्यांनीं नबाबास दबऱ्याकरितां (२२ ऑक्टोबर) औरंगाबादेसच गांठिला. नबाबाजवळ फौज, व्यंकटराव व जानबा निंबाळकर व गोपाळसिंग राजा खंदारकर व इब्राहीमखान गारदी यांची तीस हजार होती. रामचंद्र जाधव मात्र निराळा होता. गनीम भोंवताले उभे राहिले. मोगल बाहेर येईना. तेव्हां दत्ताजी, जनकोजी व विश्वासराव चालोन गेले. निजामली तमाशा पाहत दूर उभा राहिला. जानबावर दत्ताजी, व्यंकटरावावर जनकोजी व वरकडांवर विश्वासराव असे तिहींकडून तिघे उठले. व्यंकटरावाची बहीण जनकोजीस दिली होती. सोयरे झाले तरी जेवणापुरते. क्षात्रधर्मात अंतर करितां येत नाहीं. उभयतांची मोठी मारामार झाली. नागोजी माने म्हसवडकर हे जनकोजीचे साडू, त्यांनीं जनकोजीशीं गांठ घातली; परंतु शिपायांशीं करोलाचें म्हणजे बंदुकी स्वारांचें सामान भारी. करोलाकडून मार देवविला. त्यांत नागोजी माने गोळी लागून ठार झाले. त्याजवर सायंकाळ झाला. व्यंकटराव मेहुणे यांस परम दुःख जाले. मुलें माणसें समागमे होतीं. देहसार्थक केलें. निजामलीनें डेरियास जाऊन दत्ताजी माने यांचें समाधान केलें.'

औरंगाबादेवर चाल करून जातांना विश्वासरावाबरोबर शिंद्यांशिवाय दमाजी गायकवाड, गोविंद हरि, महादोबा पुरंदरे, मोरो बाबूराव फडणीस इत्यादि मंडळी होती. 'औरंगाबादेंत त्रिवर्ग निजामबंधूंचा कोंडमारा झाला, तेव्हां त्यांनीं रामचंद्र जाधवास दहा हजार फौजेनिशीं मालकीहून[1] तांबडतोब मदतीस बोलाविलें. जाधव येत आहे, असें पाहून लगेच त्याजवर विश्वासराव व दत्ताजी शिंदे चालून गेले. रस्त्यांत औरंगाबादचे पूर्वेस सुमारें पंनास मैलांवर सिंदखेडनजीक जाधव व दत्ताजी यांची गांठ पडली. तेव्हां बचावासाठीं जाधव सिंधखेडच्या गढींत आश्रय घेऊन राहिला; तेव्हां ठाण्यास वेढा घालून दत्ताजीनें मोर्चे लाविले. जाधवास सोडविण्यासाठीं निजामलीनें निकड लाविली,

१ बेदरजवळ मांजरेच्या कांठीं.

तरी सलाबतजंग जागचा हालेना. तेव्हां निजामली एकटाच सिंदखेडाकडे चालून आला. इकडे नानासाहेब व सदाशिवराव पुण्याहून निघून नाशकास गंगास्नान करून नगरास येऊन राहिले होते, त्यांनीं गोपाळराव रास्ते व पवार यांस शिंद्याचे मदतीस पाठविलें, त्यांनीं निजामलीस अडवून धरिलें. नित्य युद्धप्रसंग चालू लागले. तेव्हां गोल बांधून सभोंवार तोफांचा आराबा देऊन बाहेर निघाले; दोन कोस झुंजत भांडत सिंदखेडास दाखल जाले, तों खासे नाना व भाऊही येऊन पोंचले. दत्ताजी शिंदे इरेस पडून तमाम हत्याराचा एकच मार दिला. दत्ताजी शिंदे यांनीं डुकर खळीस येतो, तशी इरेनें मारामार केली तों नबाब केवळ हातघाईस आला. दत्ताजीचा पराक्रम पाहून भाऊसाहेबाचे नेत्र संतोष झाले इकडे जाधवराव पाण्याचे तसदीनें जेरीस आला. पुढें पेशवा व निजामली यांनीं सल्ल्याचे सूत्र आरंभिलें. आठ दिवसांत साखरखेडलें येथे सल्ला झाला नबाबानें शिकस्त होऊन पंचवीस लक्षांची जहागीर पेशव्यांस दिली. नलदुर्ग किल्ला या वेळीं पेशव्यांनीं घेतला. ता. २ जानेवारीस आंबेड नजीक सर्व स्वाऱ्या एकत्र झाल्या.' [ भा. व. शकावल्या ] नंतर पेशव्यास घेऊन निजामली औरंगाबादेस आला, तों बुसी नुकताच येऊन सलाबतजंगास सामील झाला होता त्यास पाहून सर्वांचीच पांचांवर धारण बसली. शहानवाजखान निजामास शरण गेला, आणि निजामलीनेंही प्रसंग पाहून बुसीशीं विरोध दाखविला नाहीं.

१० शहानवाजखान व हैदरजंग यांचे खून-( स. १७५८ मे-जुलई). बुसीनेंही मोठ्या धूर्ततेची वागणूक ठेविली. सलाबतजंगास धनी समजून आपला सेवकभाव दाखविला. पेशव्यास अर्ध्या वाटेवर सामोरा जाऊन त्याची भेट घेतली. निजामलीची भेट मोठ्या बंदोबस्तानें घेऊन त्याच्या कपटभावाची ओळख त्यास दिली. बसालतजंगाशीं त्यानें सन्मानाचें वर्तन ठेविलें. शहानवाजखानानें भेटीची इच्छा दर्शविली असतां त्यास बुसीनें हैदरजंगाकडे बोट दाखविलें. कारण शहानवाज आतां दिवाण नसल्यानें

हैदरजंगाचे बरोबरीचाच होता. तेव्हां शहानवाजनें सर्व हकीकत हैदरजंगास सांगितली; आणि फ्रेंचांस काढून देण्याचा आपला उद्देश न सांगतां, सलाबतजंग नेभळा असल्यामुळें आपलें कांहीं चालत नाहीं, असें त्यानें दर्शविलें. हैदरजंग महाकपटी आहे, त्याजवर विश्वास ठेवूं नये, असें अनेकांनीं बजाविलें असतांही शहानवाज सावध राहिला नाहीं. त्याजविरुद्ध हैदरजंगानें बुसीचे कान चांगले भरले होते; परंतु बुसीनें आपल्या उद्देशाची दाद खानास लागूं दिली नाहीं. ह्या प्रसंगीं बुसीनें शहानवाजखानास दिवाणगिरी दिली असती तर सर्व पक्षांचें समाधान झालें असतें. तीन चार वर्षांत त्यानें राज्याच्या वसुलाची व्यवस्था चांगली सुधारली होती; आणि सर्व पक्षांची व इसमांची त्यास चांगली माहिती होती. तसेंच निजामलीचा धाडसी व कावेबाज स्वभाव बुसी पूर्णपणें जाणून होता. आणि शहानवाजखानाशीं कपटभाव लढविण्याचें त्यास यत्किंचित् कारण नव्हतें; परंतु हैदरजंगाचे मनांत स्वतः दिवाणगिरी मिळविण्याचा कावा होता, हें बुसीस उमगलें नाहीं. हैदरजंगानें दौलताबादेचे किल्लेदारास पैसे भरून वश केलें; आणि त्याजकडून किल्ला कबजांत घेऊन शहानवाजखानास कैद केलें. तसेंच निजामलीच्या ताब्यांतले फौजेस लांच भरून तीही हैदरजंगानें आपल्याकडे आणिली. ही फौज इब्राहीमखान गारदी याच्या ताब्यांत होती. हा इब्राहीमखान प्रथम बुसीच्या हाताखालीं पाश्चात्यरीतीचें लष्करी शिक्षण मिळवून तयार झाल्यावर, पुढें बुसीशीं त्याचें पटलें नाहीं म्हणून तो निजामलीचे तैनातीस राहिला होता. दौलताबादचा किल्ला बुसीच्या ताब्यांत गेला, याचें पेशव्यास वाईट वाटलें, आणि तो परत करण्याबद्दल पेशव्यानें बुसीकडे रदबदली चालविली. या रदबदलीस जोर येण्याकरितां पेशवा आपली फौज घेऊन औरंगाबादेनजीक टेहळणीस राहिला. इकडे निजामलीच्या मनांत निजामाची गादी बळकावण्याचें फार असून त्यासाठीं त्यानें पेशव्याची मदत मागितली; आणि आपला उद्देश सिद्धीस गेला तर दौलताबादचा किल्लाही देण्याचें

त्यानें कबूल केलें. या वेळीं प्रत्यक्ष दिवाणगिरीवर बसालतजंग होता; पण त्याच्या अंगीं विशेष कर्तृत्व नव्हतें. त्यांत बसालतचें व निजामलीचें बरें नसल्यामुळें, तो उघडपणें निजामलीचे पक्षास सामील झाला नाहीं. हैदरजंगानें शहानवाजखानास दौलताबादच्या किल्ल्यांत अडकवून ठेविलें, त्याचप्रमाणें निजामलीसही तेथेंच अडकविण्याचा त्याचा इरादा होता; आणि ते दोघेही एकमेकांस ओळखून असास तसे वागत होते. हैदरजंगानें निजामलीस हैदराबादचे सुभ्यावर जाण्यास सुचविलें. ती सूचना बाह्यतः मान्य करून निजामलीनें तिकडे जाण्याची सर्व तयारी केली; आणि हैदरजंग निजामलीची रजा घेण्याकरितां म्हणून त्याच्या तंबूंत आला असतां, निजामलीनें त्याचा एकदम खून करविला. हा प्रकार बाहेर कळला तेव्हां फ्रेंचमंडळीस मोठा संताप चढला. हें सर्व कृत्य शहानवाज-खानानेंच करविलें, अशी त्यांची समजूत झाली; आणि त्या गडबडींत फ्रेंचफौजेंतील एका सुभेदारानें शहानवाजखानाचे तंबूंत जाऊन त्यास व त्याचे मुलास कापून काढिलें. त्याच रात्रीं निजामली पळून बऱ्हाणपुरास गेला. [ ता. ११ मे. १७५८ ]. अशा रीतीनें हा भयंकर प्रकार घडून आल्यावर पेशवाही आपली फौज घेऊन परत पुण्यास आला. निजामलीवर चालून जाण्याची सलाबताची इच्छा होती; परंतु ती बुसीनें मान्य न करितां, उलट सलाबतास घेऊन तो हैदराबादेस आला. [ जून १७५८ ].

या प्रकरणासंबंधानें नागपूरकर भोसल्यांचे बखरींत थोडा निराळा व ज्यास्त तपशील आहे, तो असा. 'नबाब सलाबतजंगांनीं शहानवाजखानाचे साह्यानें निजामलीखानास औरंगाबादेस बोलाविलें. फौजेसुद्धां जाऊन तेथें सर्वत्रांच्या भेटी झाल्या. शहानवाज व निजामली यांची मसलत होऊन, हैदरजंगास कैद करावें, हा विचार ठरून निजामलीनें हैदरजंगास बोलावूं पाठविलें. यावरून पंधरासोळाहजार गारदी समागमें घेऊन नबाब जवळ आले. बाहेर घेरा घालून आपण डेऱ्यांत एकांतास गेले. ते समयीं निजामली-कडील विठ्ठल सुंदर दिवाण, मीर मुसाखान, व रुक्नोद्दौला असे होते.

याप्रसंगीं हैदरजंग याजला जिवें मारिलें. त्याचा एक खिजमतगार होता तोही मारला. भोंवताला घेरा गार्दी यांचा. सबब नबाबाचा एकांत आहे, असें कारण दाखवून एक एक युक्तीचे मार्गानें निघाले. राजेबहादर विठल सुंदर यांनीं कनात कापून त्यांतून नबाबास बाहेर काढून दिलें. ते पाय-उतारा रामचंद्र जाधव यांचे येथें येऊन सर्वांस मिळवून घेऊन बऱ्हाणपुरचे सुमारें निघाले. त्यांचा जमाव ( बऱ्हाणपुरास ) मातबर झाला. तिकडे औरंगाबादेस हैदरजंग मारल्यामुळें मुसाबुसीनें विक्षेप मानून शहानवाज-खानास मारिलें. नंतर बुसीने पाहिलें कीं, शहानवाजखानाचे खातर पंतप्रधान फौजेनिशीं चालून येतील, निजामलीचा जमावही मातबर, हे जमावानिशीं आपणावर येत आहेत. सबब सलाबतजंगास आपले काबूंत घेऊन गोवळकोंड्याचे किल्ल्यावर जाऊन लढाई केली. किल्ला हस्तगत झाला. इतक्यांत सलाबतजंग बुसीचे काबूंतून निघोन पळून गेले, ते तेलिणीचे घरांत लपले. शोध केला पण ठिकाण लागला नाहीं. त्यामुळें मुसाबुसीनें आपला परिणाम शुद्ध नाहीं समजोन, फौज घेऊन मुलकास गेले. इकडे निजामलींनीं हैदराबादेस जाऊन आपला अंमल बसविला.' हैदरजंगानें फौज आणून निजामलीस वेढिलें म्हणून त्याचा खून झाला, असें यावरून निष्पन्न होतें.

११ बुसीचें प्रयाण ( जुलई स. १७५८ ).— सलाबतजंगास घेऊन हैदराबादेस येत असतां रस्त्यांतच ता. १८ जून रोजीं लालीचा हुकूम बुसी यास मिळाला कीं, तुम्हीं निजामाची कामगिरी सोडून ताबडतोब पांडिचरीच्या फौजेस येऊन मिळावें. त्याप्रमाणें, नाहीं म्हणण्याची ही वेळ नाहीं व इंग्रजफ्रेंचांचे युद्धाचा हा आणीबाणीचा प्रसंग आहे, असें जाणून बुसी निजामास सोडून निघून गेला. या गोष्टीनें पेशव्यास बरें वाटलें; परंतु सलाबतजंगास मात्र आपलीं आतां शंभर वर्षें भरलीं, असेंच वाटलें. कांहीं झालें तरी आपण पुनः परत आल्याशिवाय राहणार नाहीं, असें त्यानें बुसीकडून वचन घेऊन मग त्यास रजा दिली.

बुसीस बोलावणें आलें, तेव्हां तो मोठ्या बुचकाळ्यांत पडला. निघून जावें तर निजामाचे दरबारांतील फ्रेंचांचें वजन एकदम नाहींसें होणार. न जावें, तर लालीचा पराभव झाल्यास, आपली तरी हैद्राबादेस धडगत कशी रहावी ? शिवाय हुकूम तोडल्याबद्दल फ्रेंचसरकारचा ठपका येईल तो वेगळाच. हैदराबादेस राहूनच आपल्या देशबांधवांस पैशाची व फौजेची मदत त्यांस चांगली करितां आली असती; परंतु स्वतः थोडीशी फौज घेऊन जाण्यांत फायदा नाहीं, हे तो जाणून होता; तथापि सर्व बाजूंनीं विचार करून तो शेवटीं अर्काट येथें लालीस जाऊन मिळाला. उभयतांचे बाहेरून सख्य होतें; तथापि बुसीजवळ अलोट पैसा आहे, तो सर्व अन्यायानें मिळविलेला आहे, अशी लालीची समजूत होऊन त्यामुळें तो एकसारखा बुसीच्या सल्ल्याचा अव्हेर करीत चालला. लालीच्या व इंग्रजांच्या लढायांत बुसी हजर होताच. स. १७६० च्या जानेवारींत वांदिवाश येथे शेवटची निकराची लढाई झाली, तींत बुसीचा घोडा गोळी लागून पडल्यावर, बुसी इंग्रजांचे हातांत सांपडला. त्यांनीं त्यास स्वदेशीं रवाना केलें. परत गेल्यावर जवळच्या मुबलक पैशावर त्यानें स्वदेशीं पुष्कळ चैन केली. पुढें वीस वर्षांनीं म्हणजे स. १७८१ त फ्रेंच फौज हिंदुस्थानास आली, तिचें आधिपत्य स्वीकारून तो पुनः कर्नाटकांत आला; आणि लवकरच इकडे मरण पावला. हा हिंदुस्थानांतील फ्रेंच सत्तेचा मोठा आधार होता.

बुसीच्या सांगण्यावरून बसालतजंगास दिवाणगिरीचें काम मिळालेलें होतें. सलाबतजंगास हा त्याचा भाऊ चांगला जोडीदार होता; परंतु बुसी निघून गेल्यावर निजामलीचे पक्षास जोर येत गेला. निजामलीनें आपल्या वऱ्हाडच्या सुभ्यावर जाऊन बऱ्हाणपुर शहरावर धाड मारून खूब पैसा जमविला; आणि त्या पैशानें नवीन फौज नोकरीस ठेविली. त्यांत इब्राहिम-खान गारदी पुनः त्यास येऊन मिळाला. निजामलीचें पारडें असें जड होत चाललेलें पाहून बसालतजंगानें जानोजी भोसल्यास चिथवून त्याज-

करून निजामअलीवर स्वारी करविली. त्या स्वारींत इब्राहिमखानाच्या तोफखान्याच्या जोरावर निजामअलीनें जानोजी भोसल्याचा साफ पराभव केला. त्यानंतर पेशव्याच्या सांगणीवरून जानोजीनें निजामअलीशीं तह करून त्याचें सख्य संपादन केलें. इकडे याच वेळीं इंग्रजफ्रेंचांचें युद्ध जोरांत आलें असून निजामाच्या दरबारीं आपलें वजन बसविण्यास इंग्रज उत्सुक झालेले होते. तदनुसार निजामअलीनें इंग्रजांची मदत मागितली; आणि तिकडून फ्रेंचांनीं सलाबतजंगास आपले मदतीस मच्छलीपट्टण येथें बोलाविलें. बुसीच्या आग्रहावरून सलाबतजंग हैदराबाद सोडून मच्छलिपट्टणचे फ्रेंचफौजेस मदत करण्यास गेला. पाठीवर निजामअलीस त्यानें मोकळें ठेविलें, ही गोष्ट त्यास जाचक झाली. इकडे उत्तरसरकारप्रांतांत फ्रेंचांचीं थोडी फौज कॉफ्लान्सचे हाताखालीं होती, ती जिंकून तो प्रांत कबजांत घेतला, म्हणजे फ्रेंचांचा जोर संपला, असें इंग्रजांनीं ठरवून कर्नल फोर्ड यास त्या कामावर पूर्वीच रवाना केलें होतें. कर्नल फोर्डनें स. १७५७ च्या डिसेंबरांत कॉफ्लान्सचा पराभव केला; आणि पुढें सलाबतजंगाची भेट घेऊन फ्रेंचांचे ऐवजीं इंग्रजांची मदत स्वीकारण्याची त्यास भर दिली. तदनुसार सलाबतानें इंग्रजांशीं सख्यभावाचा तह करून (ब्रि. रि. पृ. ५७९) तो स. १७५८ चे अखेरीस परत हैदराबादेस येतो, तों इकडून निजामअली त्याजवर चालून आला, तेव्हां त्यास दिवाणगिरी देऊन सलाबतनें त्याची समजूत काढिली, आणि बसालतजंगास परत अदवानीच्या सुभ्यावर पाठविलें. निजामअलीस दिवाणगिरी देण्यापूर्वी त्यानें इब्राहीमखानास आपले जवळून काढून द्यावें, अशी कबुलायत त्याजपासून सलाबतनें करून घेतली. कारण निजामअलीचा सर्व जोर केवळ इब्राहीमखानाच्या तोफखान्यामुळें होता. दिवाणगिरी मिळविण्याकरितां निजामअलीस ही अट कबूल करणें भाग पडलें. इकडे हा प्रकार पेशव्याचे पथ्यावर पडला. सिंदखेडच्या मोहिमेंत इब्राहीमखानाच्या तोफखान्याचा प्रभाव पेशव्यानें पाहून, तो आपल्या नोकरींत आल्यास आपण पुष्कळ कामें

अल्पावकाशांत सिद्धीस नेऊं, अशी त्याची भावना झाली. स. १७५९ चे अखेरीस इब्राहीमखानास सदाशिवरावानें आपले नोकरींत घेतलें. गारदी म्हणजे गार्ड. फ्रेंचांचीं कवायती पलटणें महाराष्ट्रांत आलीं, त्यांस गारदी हा शब्द लाविला जात असे. इब्राहीमखान पुढें उदगीर व पानपतच्या मोहिमांत पेशव्याबरोबर होता. सारांश, स. १७५७ पासून वीं दोन तीन वर्षें हिंदुस्थानच्या इतिहासांत क्रांतिकारक असून, इंग्रज व फ्रेंच यांजमधील झगडयाच्या निकालावर हिंदुस्थानचें भवितव्य पुष्कळ अंशीं अवलंबून होतें. निजामली हा आपल्या आईप्रमाणेंच खटपटी व महत्त्वाकांक्षी असून त्याचें सूत्र अंतस्थ रीतीनें इंग्रजांकडे होतें. दिवाणगिरीचा कारभार हातीं आल्यावर प्रत्यक्ष निजामी हस्तगत करण्यास त्यास विलंब लागला नाहीं. स. १७६२ ता. ७ जुलई रोजीं त्यानें सलाबतजंगास कैद करून निजामी बळकाविली; आणि पुढें पंधरा महिन्यांनीं म्हणजे १६ सेप्टेंबर स. १७६३ रोजीं त्याचा शिर:च्छेद करविला. सलाबतजंगाचे अंगीं पराक्रम असा कांहींच नव्हता. बुसीच्या आधारावर त्यानें कांहीं वर्षें निभावून नेलीं. निजामलीचा मुख्य सल्लागार विठ्ठल सुंदर होता.

१२. मुज्फरखान गारदी व सदाशिवरावाचे खुनाचा प्रयत्न. (ऑक्टोबर १७५९):—मुज्फरखान गारद्यासंबंधानें थोडी हकीकत येथेंच सांगून ठेवणें इष्ट आहे. बुसीची मदत प्रथम चंदासाहेब व मुज्फरजंग यांनीं घेतली. मुज्फरजंग मेल्यावर बुसीनेंच सलाबतजंगास निजामी देऊन महाराष्ट्रांत आणिलें. त्याच्या हाताखालीं मुज्फरखान तोफखान्याच्या व कवाइती फौजेच्या कामांत उत्तम शिक्षण मिळवून तयार झालेला होता. कवाइती फौजेचा पाश्चात्य धर्तीचा प्रयोग महाराष्ट्रांत लोकांचे नजरेस दाखवून देणारा पहिला गृहस्थ बुसी हा होय. बुसीनें आपल्या हाताखालीं अनेक एतद्देशीय माणसें पाश्चात्य कवाईत शिकवून तयार केलीं. थोडया फौजेनें बहुसंख्याक शत्रूंस जिंकण्याची ही युक्ति महाराष्ट्रीय सरदारांनीं, प्रथम कुकडी नदीवरील लढाईत आणिलेली पाहतांच,

पेशव्यांच्या व इतर सरदारांच्या मनांत तिचा अवलंब करण्याची प्रेरणा उत्पन्न झाली. अर्थात् बुसीनें तयार केलेल्या इसमांस ज्यास्त पगार देऊन फोडून आपल्याकडे आणणें हा सोपा उपायच प्रथम पुष्कळांनीं स्वीकारिला. कुकडीच्या लढाईनंतर कांहीं आगळिकीस्तव मुज्फरखानास बुसीनें काढून दिल्यावर त्यास पेशव्यानें आपल्या नोकरीस ठेविलें. अर्थात् आपणास सोडून गेल्याबद्दल बुसीचे मनांत मुज्फरखानावर अतिशय रोष होता.

हिंदुपदपादशाहीचे मनोरथ तावडतोब सिद्धीस नेण्यास पेशव्यास तोफखान्याची जरूर अतिशय भासूं लागली; आणि कुकडीनदीवरील तोफखान्याचा प्रभाव प्रत्यक्ष पाहिल्यावर त्यानें मुज्फरखानास नोकरीस घेऊन स्वतःचा तोफखाना तयार करविला. पुरंदर तालुक्यात सोनेरी गांवीं पानशे नावाचें देशस्थ घराणें होतें, त्यापैकीं यशवंतराव पानशे साताऱ्यास शाहूमहाराजापाशीं तोफखान्याचा दरोगा होता. त्याचा मुलगा माधवराव यास पेशव्यानें तोफखान्याचा मुख्य अंमलदार नेमून त्याजकरवीं सालोसाल कर्नाटक प्रांतावर स्वाऱ्या करवून तिकडील कार्यभाग सिद्धीस नेण्याचा निश्चय केला. [ धा. रा. च. पृ. ] परंतु मुज्फरखान अगदींच वेळ पडेल तसा वागणारा होता. लालुचीस वश होऊन अगर केवळ लेंहरीखातर पाहिजे त्या पक्षास मिळणें अथवा वाटेल तें करणे याची त्यास क्षिति नव्हती. वास्तविक, बुसीनें तयार केलेलीं अर्धकच्चीं माणसें घेण्यापेक्षां प्रत्यक्ष बुसीलाच आपल्या नोकरींत घेण्याचा विचार पुनः पुनः नानासा.चे मनांत येई. प्रसंगानुसार त्यासंबंधानें उभयताच्या वाटाघाटीसुद्धां होत. परंतु बुसीनें सलाबतजंगास पिंजऱ्यांतल्या पोपटाप्रमाणें वागविलेलें पाहून नानासाहेबास वाटे कीं, बुसीला नोकरीस ठेविला असतां तो आपलीही तशीच अवस्था करील. शिवाय बुसीनें निजामास सोडून पेशव्याकडे येण्याइतकी अवधीच उत्पन्न झाली नाहीं. निजाम व कर्नाटकचे नवाब यांच्यासंबंधानें इंग्रजफ्रेंचांनीं मूळपासूनच विरुद्ध पक्ष उचलिले होते,

तेव्हां निजामाला सोडून एकदम पेशव्याकडे निघून येणें बुसीच्या मनांत असलें तरी शक्य नव्हतें.

पानशांचे घराण्यास तोफखान्याचें शिक्षण मुज्फरखानाकडून मिळालें असण्याचा संभव आहे. नानासाहेबानें ह्या कामासाठीं पानशांस हाताशीं धरिलें. स. १७५३ च्या सप्टेंबरांत मुज्फरखानानें बुसीस पत्र पाठविलें, त्याचा जबाब बुसीकडून घेऊन वकिलानें पेशव्याकडे पाठविला; आणि तो खानास देण्यास बुसीनें लिहिलें ( खं. १ ले. १६ ). यावरून त्यावेळीं मुज्फरखान पेशव्याचे नोकरींत होता, हें सिद्ध आहे. स. १७५४ पावेतों दोन तीन वर्षे त्यानें पेशव्याची नोकरी केली. त्या सालच्या फेब्रुवारींत जुन्नर पेठ्यांतील बेल्हेगांव मुज्फरखानास पेशव्यानें कबिले ठेवावयास दिला. ( ना. सा. रो. २७५ ). पुढें त्या सालच्या २४ ऑक्टोबर पासून १२ एप्रिल स. १७५५ पर्यंत पेशव्याची दुसरी स्वारी झाली, जींत महादजी अंबाजी पुरंदरे मुख्य होता. पुरंदऱ्याबरोबर मुज्फरखान लढाईचे कामावर असून, लोकाच्या हजिरीसंबंधानें दोघांचें भांडण झालें, तेव्हां मुज्फरखान पेशव्याची नोकरी सोडून श्रीरंगपट्टणास गेला, आणि पुढें सावनूरच्या नबाबास मिळाला. तेथें राहून नबाबाचे फौजेस कवाईत शिकवून व तोफा ओतवून त्यानें पेशव्याशीं लढण्याची तयारी केली. त्यास परत द्यावा, अशी मागणी पेशव्यानें सावनूरच्या नबाबाकडे केली. ती त्यानें मान्य केली नाहीं; म्हणून त्याची खोड मोडण्याकरितां स. १७५६ सालीं नानासाहेब व सदाशिवराव मोठ्या तयारीनें सावनूरावर चालून आले. मुज्फरखानाचा पाडाव करण्यासाठींच या वेळीं पेशव्यानें बुसीस आपल्या मदतीस आणिलें. पुढें सावनूरकराचा पाडाव होऊन तह झाला. तदनुसार नबाबानें मुज्फरखानास घालवून दिलें. त्याप्रसंगीं बुसी त्यास आपल्या कबजांत मागत होता. परंतु तो निसटून गेला, आणि पुढें पुण्यास येऊन पेशव्याची विनवणी करून, आणभाक झाल्यावर, पुनः तेथें नोकरीस राहिला. असल्या विश्वासघातकी माणसास नोकरींत घेऊं नये, असें

सदाशिवरावानें पेशव्यास आग्रहानें सांगितलें असतां, नानासाहेबानें तें मानिलें नाहीं. हा दंश मनांत धरूनच पुढें त्यानें सदाशिरावाच्या खुनाचा प्रयत्न केला असावा. स.१७५६चे पावसाळ्यांत मुज्फरखान पुन: पेशव्याचे नोकरींत आला. तेव्हांपासून सुमारें साडेतीन वर्षे तो पेशव्यांचे तर्फेनें निरनिराळ्या मोहिमांत तोफखाना घेऊन कामें करी. सन १७५७ च्या सिंदखेडच्या लढाईत तो हजर होता. ( खं. १ ले १०३ ) तो इब्राहीमखानाचा नातलग असून, त्याजपेक्षां ज्यास्त हुषार असावा असें खालील वाक्यावरून दिसतें. 'बुधीनें ( ? ) मुज्फरखान गाडद्यास चौघटकांत काढून दिलें. त्याजपुढें इब्राहीमखान काय फळ आहे ?' (खं. १ पृ. १८१ ) स. १७५८ च्या १ डिसेंबरांत मुज्फरखानानें जव्हार व त्रिंबककिल्ला जिंकिला. ( ना. सा. रो. १-९८ का. सं. प. या. ले. ९६ ). तेथून परत आल्यावर त्यास कळलें कीं, सदाशिवरावानें इब्राहीमखानास नोकरींत घेतलें, त्यावरून संतापून, अगर अन्य कांहीं कारणानें म्हणजे ६ रबिलावल ता. २८ ऑक्टोबर १७५९ रोजीं पुणें येथें सदाशिवराव गारपिरावर डेऱ्यांत असतां मुज्फरखानाचा जांवई हैदरखान यानें डेऱ्यांत शिरून सदाशिवरावावर हत्यार चालविलें. ( भा. इ. सं. मं. वा. इ. श. १८३५ घडफळेयादी पृ. ३८६ ). जवळच शिलेदार नागोजी गुजर होता, त्यानें खुनी इसमाचा हात धरून सदाशिवरावाचा बचाव केला. मात्र बरचीच्या टोंकाची एक लहानशी जखम पाठींत झाली. हैदरखानास पकडून जरब दाखवितांच आपण हें कृत्य मुज्फरखानाचे सांगीवरून केलें असें म्हणतांच मुज्फरखानास पकडिलें. त्यानेंही तें कबूल केलें. तेव्हां विशेष तपास किंवा चर्चा न करितां दोघांचाही एकदम शिरःच्छेद करण्यांत आला.[२]

---

१. स. १७१७ त शाहूनें बाळाजी विश्वनाथास दिल्लीस जातांना दिलेल्या यादींत त्रिंबक द्यावा असें कलम आहे. तो ताब्यांत घेण्यास ४० वर्षे लागली.

२ [ का. सं. प. या. पृ. ५०७, कार्तिक शु. ९ शके १६८१ ता. ३० १०-१७५९; खं. ३ पृ. १५१; खं. १ टीप २११ ].

'संध्याकाळ समयीं मुजफरखानाचा जांवई भाऊचे डेऱ्यांत येऊन पाठमागून हूल चालविली. ते चुणी लागली. खुनी सांपडला. त्यांनीं नांवें घेतलीं त्यांसुद्धां डोकीं मारिलीं. मुज्फरखानाचें डोकें मारिलें. तपास फारसा केला नाहीं. रामचंद्र नारायण प्रभु म्हणून कोणी त्या मसलतींत होता, त्यासही धरून आणून मरेपर्यंत एका किल्ल्यावर टाकिलें. दोन हजार फौज मुज्फरखानाचें घर कैद करावयास पाठविली, हस्तगत करून माल सरकारांत दाखल करून बायका मुलें सिंहगडावर घातलीं.' ( भाऊ सा० कैफीयत ). या पुस्तकांत या प्रकरणाची हकीकत खुलासेवार दिली असून, त्याजवरील संपादकीय टीप वाचण्यालायक आहे. इब्राहिमखानाचे आगमनानें मुज्फरखानास वाटलें कीं, सदाशिवराव यास आतां आपल्या डोक्यावर बसविणार. तेव्हां चिडून त्यानें खुनाचा प्रयत्न केला. हें कृत्य गोपिकाबाईच्या प्रेरणेनें झालें, असें डफ म्हणतो. रा. राजवाड्यांची टीप ( खं. १ टीप २३१ ) चुकली आहे.

१३. उदगीरची मोहीम. ( जानेवारी–मार्च १७३० ):—उत्तर हिंदुस्थानांतील प्रचंड घडामोडींची कल्पना जरी पेशव्यास यथायोग्य नव्हती, तरी दक्षिण व कर्नाटक या दोन भागांत आपलें स्वामित्व पूर्णपणें स्थापण्याचे पेशव्याचे प्रयत्न बहुतेक अंशांनीं सिद्धीस गेले होते. कदाचित् उत्तरेंतील उद्योग माळवा बुंदेलखंडांच्या पुढें फारसा न वाढवितां, तूर्त दहा वीस वर्षें जिंकिलेल्या मुलखाची व्यवस्था करण्यांतच पेशव्यानें घालविलीं असतीं तर, व्यवस्थित व धिमेपणाच्या कारभारानें स्वतःच्या रयतेवर व शेजारी राज्यकर्त्यांवर त्याची छाप बसून हळू हळू ते सर्व मराठ्यांचे जाळ्यांत सांपडले असते. असाच प्रकार पुढें इंग्रजांनीं केला. शंभर वर्षें पावेतों ते हळू हळू धिमेपणानें आपलें राज्य वाढवीत गेले. जेव्हां जेव्हां त्यांनी एकदम उतावळेपणानें मोठा ग्रास घेण्याचा प्रयत्न केला, तेव्हां तेव्हां त्यास माघारच घ्यावी लागली. परंतु इंग्रजी राज्यकारभारांत जसें बाहेरचें दडपण हिंदुस्थानांतील कारभाऱ्यांवर आहे, तशा प्रकारचें दडपण

पेशव्यांवर नव्हतें. उलट स्वतः पेशवा व त्याचे दोन भाऊ, शिंदे होळकरांसारखे हस्तक, हे जवळ असल्यामुळें पेशव्यानें एकदम सर्व हिंदुस्थानचा ग्रास अटक बंगालपासून रामेश्वरपावेतों घशांत उतरविण्याचा प्रयत्न केला, तोच त्यांस जाचक झाला. असो, निजामास पेशव्यानें बहुतेक नामशेष केलें हा प्रकार प्रस्तुत सांगावयाचा आहे.

स. १७५९ त सलाबतजंग निजामीवर असून कारभार निजामली पाहत होता. बुसी आदल्या वर्षीच त्यास सोडून गेला असून इब्राहीमखान गार्द्यानेंही पेशव्याचे पदरीं नोकरी पत्करिली होती. स. १७५७ चे अखेरीस शिंदखेडची मोहीम झाल्यावर पंचवीस लक्षांचा मुलूख पेशव्यास कबूल करून निजामानें तह केला, तो प्रदेश सर्व अद्यापि त्यांचे हवालीं झाला नव्हता. अहमदनगर व दौलताबाद हे किल्ले म्हणजे पुरातन मुसलमानशाहीच्या राजधान्या, त्याही हस्तगत करण्याचा पेशव्याचा प्रयत्न जोरानें चालू झाला. सलाबतजंगानें उत्तरसरकारप्रांत फ्रेंचांस दिला, आणि तोच प्रांत बुसी निघून गेल्यावर निजामलीनें इंग्रजास देऊन त्यांची मदत घेतली. त्यातलाच प्रकार पेशव्याचाही इकडील प्रदेशासंबंधानें होता. बुसी निघून गेल्यावर पेशव्याची अशी धारणा होती कीं, निजामानें आतां सर्वस्वी आपल्या कबजांत राहवें; बाह्य शत्रु कोणी त्याजवर उठला तर आपण त्याचें निवारण करून निजामाचा बचाव करावा. बुसी निघून गेल्यामुळें ही गोष्ट पेशव्यास ज्यास्त सुलभ वाटली; आणि त्यासाठींच नगर व दौलताबाद हे किल्लेही पेशव्यानें हस्तगत केले. सलाबतजंगास याजबद्दल मोठीशी चाड नव्हती. परंतु त्याचा भाऊ निजामली हा ज्यास्त कारस्थानी असून त्याच्याच हातांत आतां सर्व कारभार होता. पेशव्यावर अवलंबून राहण्यापेक्षां इंग्रज फ्रेंचांसारखे त्रयस्थ सत्ताधीश आपणास बरे अशी निजामलीची भावना असून, स. १७५८–५९ पावेतों मद्रास व बंगाल या दोन भागांत क्लाइव्हच्या उद्योगानें इंग्रजांची सरशी पुष्कळ झाली होती, तेव्हां त्यांच्याशीं निजामलीनें सख्य जोडिलें. हा प्रकार पेशव्यास

बिलकुल आवडला नाहीं, आणि स. १७५९ च्या पावसाळ्यांत नानासाहेब व सदाशिवराव ह्यांनीं निजामास कायमचाच रगडून टाकण्याचा निश्चय ठरवून फौजेची तयारी चालविली, आणि ता. १ ऑक्टोबर रोजीं दसऱ्याच्या मुहूर्तानें गारपिरावर डेरे दिले.

अहमदनगरचें ठाणें प्राचीन मुसलमानी वैभवाची खूण ह्मणून जितकें निजामास पाहिजे होतें, तितकेंच ते पुण्याच्या नजीक महाराष्ट्राला केवळ मध्यवर्ती असल्यानें पेशव्यांलाही पाहिजे होतें. तेथें कविजंग नांवाचा मुसलमान किल्लेदार असून, अन्य उपायानें ठाणें कबजांत येईना तेव्हां या किल्लेदारास लालूच देऊन त्याच्यामार्फत किल्ला हस्तगत करण्याचा पेशव्याचा व सदाशिवरावाचा प्रयत्न बहुत दिवस चालला होता. कविजंगाचें व नबाबाचे वांकडें आलें होते, तेव्हां कविजंगास जहागीर देण्याचा विचार मार्च ३ स. १७५८ पासून असल्याचा उल्लेख आहे. ( ना. सा रो. ९४ ) दौलताबाद हस्तगत करण्यासंबंधानेंही असेच प्रयत्न चालू होते. ( ना. सा रो. १०१, ३२३ ) विसाजी कृष्ण बिनीवाले याने मोठ्या परिश्रमानें सर्व कारस्थान घडवून आणिलें. आणि ता. ९ नोव्हेंबर १७५९ रोजीं नगरचा किल्ला पेशव्याचे हस्तगत जाला. [ १-१४७ ] यावेळीं दरसाल पंनास हजार उत्पन्नाची जहागीर वंश परंपरेने पेशव्यानें कविजंगास लिहून दिली, ती सनद ता. ६ नोव्हेंबरची आहे. [ इ. सं. पे. द. स. प. मा. ले. ५४ ]. 'अहदनामा लेहून मतलबाचीं कलमें करार करून दिलीं आहेत, कीं गोळी न वाजतां किल्ला सरकारचे हवालीं झाल्यावर वंश परंपरेनें चालतील. हे बाबें वसवास न धरावा. राघो तुकदेवाबरोबर बेलभंडार पाठविला आहे. हा घेऊन किल्ला सरकारी लोकांचे हवालीं करणें. तुमचे आमचे दरम्यान ईश्वर आहे'. सनद पोंचल्याबरोबर किल्ला कबजांत आला. म्हणजे जुन्नर, शिवनेर, त्रिंबक-पासून नगर, औरंगाबाद पावेतोंचा, पेशव्यांच्या केवळ राजधानीच्या नजीकचा प्रदेश जो यापूर्वी निजामाचे कबजांत असल्यामुळें त्यास

सहज पुण्यावर चाल करून येतां येत असे, तो सर्व पेशव्यांनीं हस्तगत केला. दौलताबाद काबीज केल्याची मनोरंजक हकीकत स्वतंत्र दिली आहे. लढण्याप्रमाणेंच शिष्टाईनें सुद्धां निरनिराळे कार्यभाग करून घेण्याविषयीं पेशव्याचे अनेक हस्तक कसे वावरत होते हें, नगर, दौलताबाद, त्रिंबक वगैरे ठिकाणांच्या हकीकतींवरून दिसून येतें. तसेंच अटक, कटक, म्हैसूर अशा दूर दूर मर्यादांचा प्रदेश मराठे काबीज करीत असतां, पुण्याच्या शेजारचीं हीं ठिकाणें हस्तगत करण्यास त्यांस किती प्रयास पडले हें ध्यानांत आणिलें म्हणजे विस्मय वाटल्याशिवाय राहत नाहीं.

मोहिमेच्या आरंभींच इब्राहीमखान गारद्यास सदाशिवरावानें निजामलीकडून फोडून आपल्या नोकरींत आणिलें, ही गोष्ट त्यानें १३ जानेवारी १७६० च्या पत्रांत गोविंदपंत बुंदेल्यास कळविली आहे. [ खं. १ लें. १५४ ]. लें. १५८–१५९ त पुन: तोच मजकूर आश्चर्याचें वर्तमान म्हणून बुंदेल्यास धीर येण्याकरितां लिहिलेला आहे. यावरून इब्राहीमखानास नोकरींत घेण्याची वाटाघाट जरी चार सहा महिने चालली असली तरी प्रत्यक्ष तो सदाशिवरावास येऊन मिळाला तो स. १७५९च्या डिसेंबरांत, सदाशिवराव व नानासाहेब विभक्त झाल्यावर मिळाला. तोफखान्याचें काम जाणणारे एक हजार फिरंगी इब्राहीमखानाचे हाताखालीं होते. ‘ भाऊसाहेबीं बहुतांशीं त्याची समजावीश करून, बोली उत्तम प्रकारें केली. सेवेंत ठेविलें. बरा मनुष्य, मातबर कराराचा, यास्तव अगत्य धरून, बक्षीस शिरपाव देऊन, पहिले दिवशीं नक्त खर्चास दहा हजार रु. दिल्हे; आणि समागमें घेऊन उदगीरचे मुक्कामीं मोगलांशीं गांठ घातली.’ [ भा. सा. कै. पृ. ४ ].

मराठ्यांनीं अगदीं नाक्याचीं ठिकाणें हस्तगत केलेलीं पाहून निजामलीनें लगेच लढण्याची तयारी चालविली. मात्र ती अगदींच लंगडी होती. बरेच दिवस वसूल नव्हता. फौजा पगारासाठीं ओरडत होत्या. तथापि अहमदनगर हातचें गेलेलें पाहून उभयतां निजामबंधूंनी पेशव्यांशीं लढण्या-

चाच निश्चय करून हैदराबादेहून बेदर व तेथून लगेच सर्व फौजांसह घारूर गांठलें. त्या वेळीं पेशवेबंधु फौजेची सिद्धता करून अगोदरच डेरेदाखल झाले होते. गारपिरावर असतांच २८ ऑक्टोबर रोजीं सदाशिवरावावर मुज्फरखानानें मारेकरी घातला त्याचा निकाल लागल्यावर लगेच पेशव्यांनीं निजामाच्या रोखें चाल केली. या वर्षी पेशव्यांनीं कर्नाटक, हिंदुस्थान वगैरे ठिकाणच्या कामांकरितां फौजांचा जमाव फार मोठा केला होता. नगरांत ठाणें बसविण्याकरितां पुण्याहून दहा हजार फौज अगोदरच विसाजी कृष्ण बिनीवाले याच्या हाताखालीं पुढें गेली होती. बरेच दिवस बाहेर शह देऊन विसाजीपंत बसला होता. पुढें पेशवे स्वतः चाल करून येणार, अशी खबर लागतांच मागें सांगितल्याप्रमाणें कविजंगास नेमणूक करून देऊन किल्ला विसाजीपंतानें हस्तगत केला. 'त्रिंबक, नगर वगैरे किल्ले घेतले. याउपर मराठ्यांस दबोन राहवें नीट नव्हे, लढोन मरावें, अशा निश्चयानें निजामबंधू निघाले असल्याबद्दल वकिलांचीं पत्रें आलीं.' त्यावरून त्वरेनेंच निघाले. खुद्द पेशव्यानें नगरास जाऊन मुक्काम केला. सदाशिवरावानें पेडगांवचा किल्ला बहादूरगड काबीज करून पूर्वेच्या बाजूस उदगीरकडे चाल केली. उत्तर हिंदुस्थानांतील शिंद्यांची तारांबळ पेशव्यांस कळती तर त्यांनीं निजामाचें प्रकरण मिटतें घेऊन, ताबडतोब हिंदुस्थानाकडेच मोर्चा वळविला असता; परंतु शिंदे व होळकर हे दोन दांडगे सरदार तिकडे असल्यामुळें पेशवे निश्चिंत राहिले. निजामाच्या युद्धाचा उपक्रम सदाशिवरावानें गोविंद बल्लाळास येणेंप्रमाणें लिहिला आहे. 'निजामलीखानांनीं जहागीर दहा लाखांची व दोन किल्ले नगर व परांडा सरकारांत द्यावयाचा करार केला असतां, द्यावयास अनमान करूं लागले. यास्तव डेरेदाखल होऊन फौज जमा केली. दरमजल मोगलांच्या सुमारें उदगीर[1] नजीक आपली फौज मातबर जमा झाली. एक दों दिवशीं गांठ पडेल. निजामाचा भाऊ बसालतजंग फुटोन अदवानीस गेला. इब्राहीमखान सरकारांत येऊन चाकर राहिला.

१. उदगीर पुणें दौंडच्या थेट पूर्वेस सुमारें दोनशें मैल मांजरानदीच्या कांठीं.

हणमंतराव व जानोजी निंबाळकर आपल्यास्या घरीच आहेत. तिगस्तांपेक्षां यंदा मोगल थोडका आहे. येथील मुकदमा सत्वरच फैसल होईल. दादांचे येणेंही त्या प्रांतीं अविलंबेच होईल. ' [ १–१५४ ]. ' यंदा गाडदी बाराहजार आहे. श्रीकृपेनें सत्वरच मोगलांचें पारिपत्य होईल. यंदां दाहीकडे कलह एकदांच प्राप्त आहे. श्रीकृपेनें उत्तमच होईल. ' [ २९ जानेवारी स. १७६०–१–१५८ ]. ' उदगीरचे अलीकडे सहा कोसांवर मोगल आहे. त्यास चौगीर्द फौजा बसवून भाऊसाहेब उतरले आहेत. माघ शु॥० १ व २ [ १९ व २० जानेवारी १७६० ] रोजीं दोन युद्धें जालीं. इब्राहीमखानानें तोंड प्रथम लाविलें. युद्धप्रसंग बराच जाला. मोगलांकडील दोनतीन मातबर सरदार पडले. सरकारच्या फौजा चौगीर्द चालतात. दाणा वैरण त्यांस मिळूं देत नाहींत. त्यांजकडे दाणावैरणीचा आकांत आहे. मराठे कोणी त्यांस सामील जाहले नाहींत. रामचंद्र जाधवराव मात्र त्यांजकडे आहेत. त्यांजपाशीं फौज बाराहजार, दहाहजार गार्दी, व शंभर तोफा आहेत. सरकारी सामान भारी आहे. फौज चाळीस हजार आहे. महिना पंधरा रोजांत गुंता वारला तर फौजा तिकडे येतील. ' [ ३० जानेवारी खं. १ ले. १६० ]. ' बेदरनजीक उदगीर येथें मोगलांची व श्रीमंताची गांठ पडली. तेथें युद्ध झालें; परंतु तें माफक. त्यावर मोगल औशास वाटेस युद्ध होत आला. औशाहून धारूरास वीस कोस येणार, त्यास तीन मुक्काम म्हणजे दहा कोस मोगल आला. धारुरास व्यंकटराव निंबाळकर व आणखी कांहीं मराठे अशी ७।८ हजार फौज जमा झाली. त्यांस सामील करावयाकरितां मोगल चालला असतां, धारुरास गेल्यावर मराठे मिळाले म्हणजे विचार पडेल हें उत्तम नाहीं, असा भाऊसाहेबांनीं मनसुबा करून, रविवार माघ वा॥. २ रोजीं प्रातःकाळीं युद्ध उत्तम करावें, असा सर्वांही निश्चय करून चालले. दोनप्रहरां मोगल मुक्कामास न येतां आवळून राहिला. आम्हांकडील तोफ लागली. दोनप्रहरां युद्ध झालें. त्याजकडील चंडोलें (१) अगदीं मुडावेळा. दहा अकरा हत्ती

१ म्हo दूमदारीचा सरदार धरून आणिला. ' पे. ब. रा. खं. ४ पृ. ५२.०

व पंधरा पावेतों तोफा आणिल्या. सात आठ मातबर सरदार मारिले. प्यादे व गाडदी यांस नीत नाहीं. आम्हांकडील पांचसातजण केशवराव पानशी तोफखान्याचे दरोगे वगैरे ठार व शंभर दीडशें ठार व तीन चारशें जखमी झाले.' [ खं. १ ले १६५ ]. 'मोगल आराबा पिऊन गेले. दादाचे चिलखतावर तीर लागला. विश्वासरावांनीं तिरंदाजी बहुत उत्तम-प्रकारें केली. त्रिवर्ग हत्तीवर स्वार होते.' [ खं. ३ ले. ५३० ]. 'दोन महिने सडे स्वारीनें रात्रंदिवस घोड्यावर जीन ठेवून, समोवत्या फौजा ठेवून विश्वासराव दावघाव पाहत होते. नबाबाच्या मार्गांतील गांवखेडीं सरकारच्या फौजा जाळून लुटून फस्त करीत होत्या. तोफांच्या मारानें मार्गे रेटीत औसा किल्ला येथे नबाब पोंचल्यावर भाऊसाहेब व विश्वासराव यांणीं दोन प्रहरच्या समयांत मोगलांवर हल्ला केला. तोफा बंदुकांचा मार अतिशय केला, तितकाही पिऊन जाऊन त्यांणीं हत्यार लावावें, तों चारणाच्या बैलांची दाटी जाली, त्यामुळें हत्यार न लागलें. मोगल तीन चार दिवस फौजा ठेवून मतंग केला.' [ खं ४ पे. व. पृ. ५२ ].

उदगीरच्या मोहिमेत सदाशिवराव, रघुनाथराव व विश्वासराव असे त्रिवर्ग हजर होते. एकंदर प्रकरणाची कच्ची बातमी वरचेवर पेशव्यास पत्रांनीं कळत होती. 'मध्ये मोगल, उजवे बाजूस भाऊसाहेब व डावे बाजूस दादासाहेब ऐसे दररोज झुंजत चालले. धारूर नजीक आल्यावर त्रिवर्गांहीं मिळून मनसुबा केला कीं, मोगल बळ धरून जबरदस्तीनें मारामारी करून धारुरास पोंचतो, मग हातास येत नाहीं. कुमक पोंचली नाहीं, तों हल्ला करून झुंज द्यावें. अशी मसलत करून तमाम सरदारांस बोलावून रात्रीस सांगितलें कीं, सर्वांनीं हिय्या करून उदईक बळकट झुंज द्यावें. प्रात:काळीं रोजच्याप्रमाणें मोगल गोल करून भोंवता तोफखाना देऊन चालला असतां, पिछाडीचेच तोंडावर घोडे घातले. सर्वच हिंमत धरून हल्ल्यास उठले. तोफेची रंजक एक उडली. उजवीकडून भाऊसाहेब व रावसाहेब व डावेकडून दादासाहेब ऐसे मारामार करीत खाशाचे हौद्यापर्यंत

पोंचले. एक प्रहरपर्यंत उत्तम युद्ध झालें. मोगल कचरला. हिंमत सोडली. आणखी चार घटका दम धरून झुंज दिलें असतें तर गर्दीस मिळवून दिला असता. परतु संध्याकाळ होत आला. बहुत लोक पडले, व जखमी झाले. मोगलानें जवळ येऊन मुकाम केला. यश आलें. बहुत संतोष झाला. श्रीमंतांस खुशालीचें वर्तमान लिहून सांडणीस्वार पाठविलें. श्रीमंत नगराहून आंबेपडदुरावर अगोदरच आले होते. तेथें वर्तमान ऐकून संतोष पावले. सांडणीस्वारास सोन्याचीं कडीं व पेशाख बक्षीस दिले. संध्याकाळीं मोगलांनीं मसलत करून वकील सलूख करण्यास दुसरे दिवशीं पाठविले. त्याजला भाऊसाहेबांनीं कळविलें, क्रोड रुपयांचा मुलूख व दौलताबाद द्यावी. तेव्हां दिवाण विठ्ठल सुंदर याजपाशी शिक्के कटार देऊन यांचे डेऱ्यास पाठविला. त्याजवरून बहुत रदबदली करून साठ लक्षांचा मुलूख व किल्ले व शहरें घेऊन तह केला. मोगलानें सल्ल्यावर घातलें. ( १ ) साठ लाखांची जागीर द्यावी, ( २ ) अशीरगड दौलताबाद किल्ले दोन, आणि ( ३ ) विजापुर बऱ्हाणपुर हीं दोन शहरें. याजप्रमाणें घेऊन सलूख जाहला. [ १–१६५ ]. पुढें दोन वर्षांनीं पुनः निजाम-पेशव्यांचें युद्ध झालें त्यांत रामचंद्र जाधवास निजामाकडून फोडून पुनः मराठशाहीत आणिलें, त्याचें सुंदर वर्णन नारोशंकरचे पत्रांत आहे. [ भा. व. पु १ प. या. ले. २ ].

" मोगलाचीं पत्रें घेऊन गोपाळराव गोविंदास दहा हजार फौज घेऊन दौलताबादेस रवाना केलें; बन्याजी विश्वनाथ बरवे अशीरगड ताब्यांत घेण्यासाठीं व नागोराम विजापुरास पाठविलें. किल्ले हस्तगत झाले म्हणजे निजामल्लीनें इलिचपुरास व सलाबतानें भागानगरास जाऊन रहावें. मराठे निंबाळकर याणीं त्यांजकडे चाकरीस जाऊं नये. याप्रमाणें करार जाला. आपली फौज अद्यापि भोवतालीं आहेत. श्री. नानासाहेबांचे ताले सिकंदर आहेत. त्याकडे वाईट नजरेनें पाहतील त्याचे चूर्ण होईल. मोगलामध्यें जोश तिळतुल्य राहिला नाहीं.' [ भा. सा. कै. पृ. ५।६; खं. १

ले. १६५, १६६ ]. ३ फेब्रुवारीस लढाई झाली. त्यानंतर १९ फेब्रुवारीस लढाईच्या ठिकाणावरूनच बुंदेल्यास वगैरे सदाशिवरावानें पत्रें लिहिलीं. ‘ चिरंजीव दादा त्या प्रांतीं फौजासुद्धां लवकर येतील. इकडे मुलूखस्थळें चांगलीं मिळालीं, परंतु खर्च जाला. तिकडील पेंचामुळें इकडे आटोपावें लागलें. नाहींतरी सारी दक्षिण मोकळी होती.’ नंतर नबाबाच्या भेटी होऊन तो हैदराबादेस गेला व त्रिवर्ग पेशवे आंबेपडदुरावर[1] आले. तेथें सर्वांच्या भेटी झाल्या. ह्या लढाईनें जुन्नर, शिवनेर, त्रिंबक, सालेर, मुल्हेर, नगर, अशीरगड, बऱ्हाणपुर व विजापुर इतकीं ठिकाणें व बासष्ठ लक्षांची जहागीर इतका प्रदेश पेशव्यास मिळून निजाम बहुतेक संपुष्टांत आला. जहागिरींत अंबेड, फुलंबरी, नांदेड व विजापुर हे प्रांत मिळाले. [ खं. १ टी. २४१ व इ. सं. पे. द. स. प. ले. ५५ ]. नगर, दौलताबाद, बऱ्हाणपुर, व विजापुर हीं सर्व ठिकाणें मुसलमानी अमलाची दक्षिणेंतील केवळ राजधान्या असून, त्या मराठ्यांचे हस्तगत झाल्यानें निजामाचें जीवित संपल्यासारखें झालें. पानिपतचा प्रसंग यशस्वी झाला असता तर दक्षिणचा इतिहास पुष्कळ अंशीं बदलला असता. उदगीरचा विजय हा मराठशाहीचा व पेशव्यांचे कर्तबगारीचा कळस होय.

१४ दौलताबाद काबीज—[ तारीख ८ एप्रिल स. १७६० ]. उदगीरच्या लढाईनें निजामाचे नगर, दौलताबाद, अशीरगड वगैरे मोठे किल्ले पेशव्यास मिळावयाचे होते. पैकीं दौलताबाद कबजांत घेण्यास

---

१ पडदूर वऱ्हाडांत अकोल्याच्या दक्षिणेस सुमारें २० मैल. सिंदखेड हें जाधवांचें म्हणून प्रसिद्ध असून तेथेंच रामचंद्र जाधवास दत्ताजी शिंद्यानें स. १७५७ त कोंडिलें होतें. जवळच पूर्णानदीचे कांठीं पडदूर आहे. नगराहून जालनाचे उत्तरेस सिंदखेड असून पूर्णेपलीकडे सातपुड्याचा घाट लागतो. उदगीर, पडदूर व नगर ह्यांचा त्रिकोण होतो. पेशवा नगराहून व सदाशिवराव उदगीराहून येऊन स. १७६० च्या रंगपंचमीस पडदुरावर भेटले.

गोपाळराव पटवर्धन यास पेशव्यानें रवाना केलें; आणि बच्याजीपंत बर्वे यास बऱ्हाणपुरास रवाना केलें. गोपाळरावाशीं गोडीचें बोलणें लावून तेथील किल्लेदारानें दिरंगाई चालविली, तेव्हां नानासाहेबानें प्रथम १८ मार्च रोजीं सामान्य कानउघाडणीचें [ ३-५२६ ] व पुढें खालील खरमरीत पत्र गोपाळरावास लिहिलें. [ ता. १ एप्रिल स. १७६० ] या पत्रावरून लोकांस वागविण्याची नानासाहेबाची रीतही कळून येते. "वारंवार लिहितां कीं हीं स्थळें दुर्घट आहेत. शहास गुंततां येत नाहीं, विचारें कार्यसिद्धी करावी लागत्ये, यास्तव हल्ला राहविली, म्हणोन लिहितां. अपूर्व वाटतें! विचार दूरंदेशी तुम्हांसच कळतें, हें पूर्ण प्रत्ययास येऊन गेलें! परंतु हें राजकारण प्रथम नरम धरिलेंत, रस्त बंद केली, ये गोष्टीची तारीफ चिरंजीव भाऊ वगैरे सर्व शहाणे फार करितात. तुम्हांस स्थळें अवघड वाटतात, परंतु श्रीकृपेनें तृणप्राय आहेत. मल्हारबांनीं घोडप हल्ला करून घेतली, तें स्थळ हल्ला करून यावयाचें होतें? कालच्या मोगलांवर उभयतां चिरंजीवांनीं सफेजंगी केली. एका लढाईत मोगल चक्काचूर केला हें कोणाचे तर्कांत येत होतें? लाखों असाध्य कामें श्रीकृपातेजप्रतापामुळें तृणप्राय आहेत! परंतु करणारासारखें फळ होतें. तुम्ही सरून जलद शिपाई असे जाणून मी तुम्हांला पाठविलें होतें. तुम्हींच आम्हांस विचार लिहिणार इतकें कळलें असतें तर एखादे लहानसहान पथके पाठविले असते. तो प्रथम दिवशींच रस्त बंद करिता. कांहीं द्यावयाचें न बोलता, म्हणजे आज काम जाहलें असतें. तुम्हीं मातबर, तुम्हांस कार्य शास्त्रावांचून आणतां नये, यास्तव तुम्हांस यश यावें म्हणून तुम्हांसच आज्ञा करितों. ते तुम्हीं करीत नाहीं ये गोष्टीस इलाज कोणता करावा? गोपाळरावजी! हे दौलताबाद तुम्हांस दुर्घट वाटते, परंतु दो महिन्यांत सख्तीनें वेढा घालून एक रुपया न देतां घेऊं! का कीं त्याची कुमक कोणीं करीत नाहीं! मोगलानें कुमक केली तर पुनरपि श्रीकृपेनें पन्नासहजार फौज जमा करून अगदीं मोगल दक्षिणेंत होता कीं नव्हतासा करूं! हें मोगल समजले आहेत. तुम्हीं

समजत नाहीं यास इलाज काय करावा ! तुम्हांस बहुत दूरंदेशी समजते. रागेंभरून लिहिलें म्हणोन तुम्हांस राग येईल. परंतु तुम्ही वारंवार आम्हांस विचार लिहितां, यास्तव लिहिणें प्राप्त झालें. या पत्रापूर्वी कार्य जाहलें असेल तर उत्तम आहे. नाहींतर परिच्छिन्न शहरपन्ना घेऊन वेढा बसाविणें. श्रीकृपेनें कार्य होईल. जों जों तुम्ही राजकारणें करितां तों तों काम नासतें. ! याउपर या पत्रावरून जितका राग येईल तितका त्याजवर काढणें. जर कार्य जाहलें असेल तर व्यर्थ राग येऊं न देणें. तुमचा स्वभाव रागीट. यास्तव इतके दिवस सख्त लिहिलें नाहीं. आतां वारंवार तुम्ही विचार लिहूं लागलां, तेव्हां नाइलाज जाणून लिहिलें आहे. हें पत्र कोणास ठाऊक नाहीं. लेंकरादाखल सेवकावर एकांतीं रागें भरल्यास वाईट मानूं नये. " [ ऐ. ले. सं. १–१५ ]

हीं पत्रें पाहिल्यावर गोपाळरावानें जोरानें हल्ला करून दौलताबादचा किल्ला ता. ८ एप्रिल रोजीं हस्तगत केला. " हल्ला करून बाहेरील कोट निकडीनें घेतला. जातीनें बहुत केली. म्हणून वर्तमान श्रवण होऊन संतोष जाहला. " [ ऐ. ले. सं. १–१६ ]. " चैत्रवद्य द्वितीया सोमवारीं हल्ला करून शहरपन्ना घेतला. त्याउपर मोर्चेबंदी केली. मग दोन रोजांनीं फिरोन राजकारण करून किल्लेदारास पस्तीस हजारांची जहागीर व एकलक्ष पंधरा हजार नगद ऐसे करार करून किल्ल्यावर निशाण ता. ८ एप्रिल रोजीं चढलें. फत्ते जाहली. महद्यश जाहलें. भाऊसाहेबांलाही बऱ्हाणपुर शहर हस्तगत जाहलें" [ ऐ.ले.सं.१६ते१८ किल्लेदारास इनाम दिल्याबद्दल नानासाहेबांस राग येऊन गोपाळराव पटवर्धनावर त्याची थोडीशी इतराजी झाली; परंतु पुढें त्याची समजुत करतां करतां पेशव्यास पुरेवाट झाली. [वरील ले. २४ व २७] ' दौलताबाद घेतली तेव्हां श्रीमंत टोंकयास होते. लगेच कूच करून दौलताबादेस गेले. किल्ला पाहून परम संतोष पावले. एवढें दुर्घट स्थळ घेतलें म्हणून गोपाळरावाची फार तारीफ केली. उधोगीरेश्वर यास तेथें किल्लेदार नेमिलें.' [ले.२५]. या किल्ल्याची हकीकत राजवाडे खंड ३ लेखांक ५६७ यांत सविस्तर दिलेली आहे.

# प्रकरण तेविसावें.

## पेशव्याची कर्नाटकांतील करामत.

### स. १७५१-६०.



१. कर्नाटकांतील स्वाऱ्या.

२. सावनूरचा पाडाव, ( मे, १७५६ ).

३. श्रीरंगपट्टणचा वेढा ( मार्च-मे १७५७ ).

४. बळवंतराव मेहेंदळ्याचा उद्योग (मे १७५७ फेब्रुवारी १७५८).

५. पटवर्धन व रास्ते यांची कामगिरी ( स. १७५९ ).

६. पटवर्धन व बिनीवाले यांची कामगिरी ( स. १७६० ).

**१. कर्नाटकांतील स्वाऱ्या.**—नानासाहेब पेशव्याच्या करामतींत कर्नाटकांतील त्याच्या कामगिरीस अग्रस्थान देण्यांत येतें. मराठशाहीचा सामान्य फैलाव जरी त्याच्या दृष्टीसमोर नेहमींच होता, तरी बाजीरावाचा दृष्टिक्षेप जसा सदैव उत्तरेकडे असे तसा नानासाहेबाचा दक्षिणेस होता. राज्यकारभाराच्या दृष्टीनें हें एक व्यंगच होय. एकाच बाजूस दृष्टि देऊन राज्याचें काम भागत नसतें. म्हणून बाजीरावानें दक्षिणेकडे लक्ष न दिल्यानें जसें नुकसान झालें, तसेंच नानासाहेबाच्या उत्तरेकडील कारभारासंबंधानें झालें असें म्हणावें लागतें. पेशवाई मिळाल्याबरोबर विलक्षण तडफ दाखवून तीन चार वर्षांत त्यानें उत्तरेकडील कारस्थानें विल्हेस लाविलीं, त्यावर पुनः स्वतः उत्तरेकडील सफर अशी त्यानें कधीं केला नाहीं. स. १७५२-५३ पर्यंत उत्तरेकडील स्वारी अंगावर घेण्यास त्यास सवड झाली नाहीं असें म्हणतां येईल. परंतु स. १७५३ सालापासून लागोपाठ तीन चार स्वाऱ्या त्यानें स्वतः कर्नाटक व श्रीरंगपट्टणकडे केल्या, त्या ऐवजीं किंवा त्या करूनही नानासाहेबास एखादवेळीं तरी उत्तरेकडे जातां आलें असतें. तो स्वतः उत्तरेकडे जाता तर पुढील कारस्थानांस निराळें वळण लागलें

असतें. उत्तरेंत वावरणाऱ्या सरदारांत बखेडे माजले ते वेळींच बंद झाले असते; रजपूत, जाठ, सुजाउद्दौला व प्रत्यक्ष बादशहाचें कारभारीमंडळ यांजवर दाब बसून मराठ्यांच्या उद्योगास एकवाक्यता आली असती. जी एकवाक्यता कर्नाटकांतील उद्योगास आली, ती उत्तरेंतील उद्योगास आली असती तर पानपतचा प्रसंगच ओढवला नसता, निदान तो प्रसंग फायदेशीरच झाला असता. अंताजी माणकेश्वर व हिंगणें, शिंदे व होळकर इत्यादिकांत वैमनस्यें वाढून मुख्य उद्योगाचा विघाड झाला, तो नानासाहेबास खचित मिटवितां आला असता. परंतु उत्तरेकडील महत्त्वाची कामगारी अदूरदर्शी व भोळसट अशा राघोबावर सोपविली गेली ही नानासाहेबाची अक्षम्य चूक होय असें म्हणणें प्राप्त होतें. नानासाहेबाबरोबर सदाशिवरावावरही याची जबाबदारी येते. कारण हल्लीं सर्व कारभार सदाशिवरावच पाहत होता; आणि सदाशिवराव तर कांहीं कांहीं बाबतींत नानासाहेबापेक्षांही ज्यास्त चाणाक्ष होता. परंतु प्रतिनिधि, बारामतिकर, मेहेंदळे, पुरंदरे, पटवर्धन, घोरपडे मुराराव, इत्यादिकांच्या संसर्गानें व पहिलीच स्वारी त्याची कर्नाटकांत झाली तेव्हांपासून त्यासही कर्नाटकाकडील व्यवहारांचें महत्त्व, वाकबगारी व आवड जशी विशेष होती तशी उत्तरेकडील नव्हती. सदाशिवराव खानदेश वऱ्हाडच्या पलीकडे उत्तरेस किंवा पश्चिमेस एकदांही गेला नव्हता. पानिपतच्या मोहिमेची त्याची स्वारी हीच पहिली व शेवटची होय. यावरून असें म्हणतां येतें कीं अठराव्या शतकांतील हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचें केंद्रस्थान पेशव्यांनीं दक्षिण द्वीपकल्पांत म्हैसूर अर्काटच्या दरम्यान आहे असें ठरविलें. वास्तविक तें केंद्रस्थान दिल्लीच्या बाजूस होतें याची जाणीव त्यांस राहिली नाहीं. कर्नाटकांतील इंग्रज फ्रेंचांचा अवास्तव संचार पाहून पेशव्यांची दिशाभूल झाली; आणि अब्दाली, नजीबखान वगैरे मुसलमान काय उपद्व्याप रचीत होते याजविषयीं त्यांचें थोडें दुर्लक्ष झालें. असो. तर प्रस्तुत आपणांस या कर्नाटकांतील पेशव्याच्या उद्योगाचा विचार कर्तव्य आहे.

द्रव्याच्या अडचणीमुळें पेशवा कसा पेंचांत होता हें मागें सांगितलेंच आहे. द्रव्यसंपादन हेंच कर्नाटक स्वारीचें मुख्य प्रयोजन असून एकदां चटक लागल्यावर पुन: पुनः पेशव्यानें तिकडेच एकसारख्या स्वाऱ्या केल्या. द्रव्यनदीचा ओघ मध्यें न जिरतां पुण्यास यावा, हा जो पेशव्याचा अंतस्थ हेतु तो दक्षिणेंतून चांगला सफल होऊं लागल्यामुळें आणि उत्तरेंत शिंदे, होळकर, बुंदेले यांच्या सारखे खंबीर सरदार पेशव्यास फारशी दाद लागूं देत नसल्यामुळेंच पेशव्यानें उत्तरेंत लक्ष न घालतां दक्षिणेकडे घातलें असें दिसतें. अर्थात् पैशाच्या लोभानें राज्याची नीति बिघडली, मराठ्यांचा स्वभाव लुटारू बनला, आणि शिवाजीच्या वेळची हिंदुपदपादशाहीची नीतीची व धार्मिक आकांक्षा मराठ्यांचे लक्षांतून बहुतेक नाहींशी झाली. राज्याचा अधःपात होण्याचें हें एक विशेष कारण आहे. रामचंद्रबाबा व सदाशिवराव हे दोघे पैसे उकळण्याच्या कामांत पटाईत होते, म्हणूनच त्यांचा आश्रय नानासाहेबानें केला. सदाशिवराव व रघुनाथराव या दोघांच्या राजनीतींतील हें अंतर पुढें ध्यानांत ठेवावें लागेल. कर्नाटकचा प्राथमिक वृत्तान्त व सदाशिवरावाची त्या बाजूची स्वारी यांचे विवेचन पूर्वी येऊन गेलें आहे. शाहूच्या मृत्यूमुळे उडालेल्या घांदलींत कर्नाटकाकडे लक्ष देण्यास स. १७५२ पावेतो पेशव्यास फावलें नाहीं. स. १७५० च्या अखेरीस पेशवा कर्नाटकाकडे निघून गेला होता, परंतु स. १७५१ च्या मार्चांत गायकवाड साताऱ्यावर चालून आल्यामुळें हातचें काम अर्धेंच टाकून पेशव्यास तांतडीनें परत यावें लागलें. पुढें गायकवाड व निजाम यांचीं प्रकरणें मिटविण्यांत स. १७५२ साल गुदरून गेलें; आणि निजामाशीं भालकीचा तह करून स. १७५३ च्या आरंभीं पेशवा परभारें रामचंद्र बाबा व सदाशिवराव यासह कर्नाटकांत गेला. ता. ५।७ जानेवारीस रायचूर-जवळ त्यानें कृष्णेचें दक्षिण तीर गाठलें. प्रथम श्रीरंगपट्टणास जाऊन तेथील खंडणी घेऊन ता. २० मार्च स. १७५३ रोजीं तेथून कूच करून होळेहुनूरे किल्ल्यावर मोर्चे बसवून तो किल्ला सर केला.

१ होळेहुनूर ( उत्तर म्हैसूर प्रांत, सिमोग्याजवळ.)

' त्या मोर्च्यांत सदाशिवराव व रामचंद्रबाबा तीन दिवस बसले होते. नंतर कोन्हेर त्रिंबक एकबोटे यास आज्ञा केली, ते गेले. मागाहून श्रीमंतांजवळून कृष्णा पलंडा व रामजी पवार वगैरे अकरा असामी कोन्हेर पंताजवळ जाऊन किल्ल्यावर चढले. कृष्णाजी गोळी लागून ठार झाला. किल्ला फत्ते झाला. अकरा असामीस बक्षिसें दिल्हीं. पलांडा याचे पुत्रांस पाटिलकी दिली. ' [ का. सं. श. पृ. १३ ]. नंतर धारवाड किल्ला सर करण्यास आले. तेथें मोगल किल्लेदार पृथ्वीसिंह होता; त्याशीं लढाई देऊन सल्ला होऊन ३५ हजार रुपये देऊन त्याजकडील अंमलदार ओलीस घेतला. धारवाडचा किल्ला ता. ११ मे स. १७५३ रोजीं हस्तगत झाल्यावर दुसरे दिवशीं अंमलदारास सोडून दिलें. [ रा. श. खं. २ पृ. १२८ ]. परत येतांना संभाजी महाराजांनीं पूर्वी पेशवाईबद्दल देऊं केलेले तीन किल्ले व खानापुर वगैरे महाल पेशव्यास दिले. [ २४–२५मे ] जून महिन्यांत पेशव्याची स्वारी पुण्यास दाखल झाली. या स्वारीसंबंधानें अस्सल पत्रें फारशीं उपलब्ध नाहींत. खं. ३ ले. ४२४–४२६ व ४२८ यांत थोडे उल्लेख आहेत. फेब्रुवारी ता. ११ रोजीं पेशवा लिहितो, ' किरकोळ कामें कांहीं झालीं. मोठी आशा श्रीरंगपट्टण बिदनूरची आहे.' ता. ९ एप्रिलास तो लिहितो, 'श्रीरंगपट्टणची मामलियत उरकून बिदनुरास आलों.' ता. १४ मेला लिहितो. ' बिदनूरची खंडणी विल्हेस लागली. उपरांतिक सावनूर सोंधे विल्हेस लावून देशीं येऊं. ' या स्वारींत पेशव्यानें अपरंपार द्रव्य आणिलें. प्रथम नानासाहेबाच्या एकंदर स्वाऱ्यांची यादी दिली पाहिजे म्हणजे पुढील विवेचन सुगम होईल.

१ ली, श्रीरंगपट्टण व होळीहुन्नूर स. १७५३ जानेवारी ८-१९ जून.

२ री, बागलकोट, सावनूर, हरिहर इ. स. १७५४ जाने. २–४ जून.

३ री, बेदनूर वगैरे स. १७५४ आक्टोबर २४–१२ एप्रिल १७५५.

४ थी, सावनूर स. १७५५ ऑक्टोबर २०–१९ जुलई १७५६.

५ वी, श्रीरंगपट्टण, स. १७५७ जानेवारी १–१५ जून.

६ वी, बळवंतराव मेहेंदळ्याचा उद्योग, मे १७५७ फेब्रुवारी १७५८.

७ वी, गोपाळराव पटवर्धन व रास्ते–स. १७५९ चा प्रथमार्ध.

८ वी, गोपाळराव पटवर्धन व विसाजीपंत बिनीवाले, स. १७६० एप्रिल–साल अखेर. पानपतचे पेंचामुळें पेशव्यानें यांच्या फौजा परत बोलाविल्या.

वरच्यांपैकीं पहिल्या पांच स्वाऱ्यांत स्वत: पेशवा हजर होता. पेशव्याच्या रोजनिशींतील मुक्काम व शकावल्या यांजवरून वरील तारखा मुक्रर केल्या आहेत. निघण्याचा व परत येण्याचा दिवस बहुधा मुहूर्तावर अवलंबून असे. कृष्णाकांठ लागला म्हणजे स्वारीचें काम सुरूं होई. कृष्णेच्या अलीकडे नेहमींच्या राज्यकारभाराचें काम चालें. वरील तारखा पुणें सोडल्याच्या व पुण्यास दाखल झाल्याच्या असल्यामुळें अर्थात् मध्यंतरींचा सर्वच काळ स्वारींत गेला असें होत नाहीं. महाराष्ट्रांतून कर्नाटकात जाण्याचे निरानिराळे मार्ग इ. सं. ऐ. टि. भा. ३ ले. १७ येथें दिले आहेत.

स. १७४७ च्या स्वारींत सदाशिवरावानें कर्नाटकांतील बराचसा मुलूख काबीज करून सावनूरकर नबाबाचें सुमारें अर्धे राज्य हस्तगत केलें होतें. परंतु त्यांतील वसूल येण्यासाठीं तिकडे सालोसाल फौजा पाठवाव्या लागत. स. १७५३ त पेशव्यानें स्वारी केली तेव्हां कर्नाटकांत इंग्रज फ्रेंचांचें युद्ध सुरू असून म्हैसूरचे राजानें आपली फौज फ्रेंचांचे मदतीस पाठविली होती, त्यामुळें मराठ्यांचें चांगलेच फावलें. त्यांच्या फौजा प्रत्येक गांवांतून आपल्या खंडणीच्या रकमा उगवीत चालल्या. रोकड रकमा मिळतना. तेथें कर्जरोखे लिहून घेत आणि या रोख्यांवर हल्लींच्या हुंड्याप्रमाणें हिंदुस्थानांत पाहिजे तेथें रोख पैसे मिळत. श्रीरंगपट्टण येथें पेशव्याचें आगमन होतांच तेथील दरबारानें भला मोठा दंड देऊन पेशव्यास मार्गस्थ केलें. [ डफ भा. २ पृ. ६४।६५ व ऐ. ले. सं. भा. २ ]

स. १७५४ त पुनः नानासाहेबानें कर्नाटकांत मोहीम केली. ता. १ जानेवारीस पुण्याहून बाहेर पडून पेशवा निघाला तो बागलकोट, कोपल, होसकोट, हरिहर, बेदनूर, सावनूर, वगैरे ठिकाणीं जाऊन ४ जूनला परत पुण्यास आला, असें त्याच्या मुक्कामांवरून दिसतें. यास नानासाहेबाची दुसरी स्वारी म्हणतां येईल. स. १७५३ च्या अखेरीस म्हणजे ९ डिसेंबर [ मार्गशीर्ष शु॥० १४ ] रोजीं माधवरावाचें लग्न शिवाजी बल्लाळ जोशी सोलापुरकर अशीउंबरीच पागेकडे कारकून होता त्याची कन्या रमाबाई इच्याशीं करून समारंभ आटोपल्यावर पेशवा कर्नाटकांत गेला. हरिहर, अंभी[1], बागलकोट व मुंडलगी येथें लढाया होऊन मिरजेस मोर्चे लावून स्वारी परत आली. ह्या स्वारींत जमखिंडी व तेरदाळ हे महाल पेशव्यांनीं घेतले. हरिहर व अंजनीवर लढाई २४ फेब्रुवारी रोजीं झाली. व बागलकोटावरही लढाई झाली. याहून जास्त माहिती या स्वारीची सांपडत नाहीं. स. १७५४ च्या भाद्रपदांत, ऑगस्ट २० रोजीं जगजीवन परशुराम ऊ० दादोबा प्रतिनिधि किन्हई येथें वारला. तेव्हां कृष्णाजी परशुरामाचा नातू भवानराव यास प्रतिनिधि केलें. यासच श्रीनिवास गंगाधर म्हणत. प्रतिनिधींची ही भानगड आटोपल्यावर पेशव्यानें तिसरी स्वारी कर्नाटकांत केली; २४ ऑक्टोबरास नानासा० व सदाशिवराव डेरेदाखल झाले. बरोबर महादाजी पुरंदरे होता. २६ जानेवारी १७५५ रोजीं पुरंदरे स्वारींतून वेगळा होऊन ३० जानेवारीस बेदनुरापर्यंत खंडणी घेऊन परत आला. पेशवा दुसरीं ठाणीं सर करून १२ एप्रिलास पुण्यास दाखल झाला. [खं. २ पृ. १३३] याच स्वारींत तोफखान्यावर असलेला मुजफरखान गारदी व महादोबा पुरंदरे यांचे हाताखालील लोकांच्या हुजिरीवरून वांकडें आलें. मुजफरखान नोकरी सोडून म्हैसुराकडे गेला तो पुढें सावनूरचे नोकरीस राहिला. पुढील सालच्या स्वारींत तो सावनूरतर्फे

---

१ अंजनी ( भा. व. श. )

पेशव्याशीं लढत होता. स. १७५५ तच आंग्रे व पेशवे यांची लढाई होऊन हर्णैचा किल्ला सुवर्णदुर्ग पेशव्यांचे हस्तगत झाला.

२ सावनूरचा पाडाव, (मे १७५६).—गेल्या स्वारींत तोफखान्याचे कामावर पानशांची नेमणूक होऊन तो पुरंदऱ्याबरोबर त्या कामावर होता. तोफखाना हेंच लढण्याचें मुख्य साधन होऊन त्याजवर आपलीं भरंवशाची माणसें तयार असावीं, मुजफरखानासारख्या परकीयावर अवलंबून राहवें लागूं नये, अशी पेशव्याची इच्छा होती. मुजफरखान सावनूरचे नबाबाजवळ चाकरीस राहिला, त्यास बऱ्या बोलानें परत द्यावा अशी पेशव्यानें नबाबाकडे मागणी केली. ती त्यानें अमान्य केल्यामुळें मराठी फौजा एकदम सावनुरवर चालून आल्या. ही नानासाहेबाची चवथी स्वारी स. १७५५ च्या २० ऑक्टोबर पासून १७५६ च्या १९ जुलईपर्यंत चालली. कडाप्पा व कर्नूळ येथील नबाबही सावनूरकरास सामील झाले होते. लढण्याच्या संबंधानें पाहिल्यास हीच सर्वांत मोठी स्वारी होय. मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव, नारोशंकर, जानोजी व मुधोजी भोसले वगैरे मोठमोठे सरदार या स्वारींत होते [ खं. २-१३७ ]. सोंडूरकर गोपाळराव (१) घोरपडे व त्याचा भाऊ गुत्तीकर मुरारराव ह्यानीं प्रथम सावनूरचे नबाबाचा पक्ष घेतला होता. मुराररावास पूर्वीच्या स्वारीपासून आपल्याकडे वळविण्याचा महादोबा पुरंदरे याचा प्रयत्न चालला होता; आणि दोघेही एकमेकांस गोडगोड गौरवाचीं पत्रें लिहून झुलवीत होते. [का. सं. प. या. ले. १३४ ता. १४ एप्रिल स. १७५५]. परंतु स. १७५६ चे स्वारींत मुरारराव सावनूरचेच बाजूस होता.

कर्नाटकांतून सालोसाल पेशव्यास मुबलक पैसा मिळत गेला, तशी त्याची सांपत्तिक स्थिति सुधारून, कर्नाटकाकडेच त्याचें लक्ष वेधलें. लोक लढाईच्या कामांत तयार झाले, तोफखाना निर्माण झाला;

---

१ पुढें यांस मेहेंदळ्यानें पेशव्याकडे आणिलें. [ ऐ. ले. सं. पु. १ सावनूर स्वारी].

जबाबदारीनें कामें करणारे तरुण सरदार पुढें आले, त्यामुळें पेशव्याचाही हुरूप वाढत गेला.

नबाब सलाबतजंगाचा कारभार यावेळीं शहानवाजखान पाहत असून, कर्नाटकच्या स्वारींत निजामानें आपल्याबरोबर यावें अशी फार दिवसापासून पेशव्याची इच्छा होती. उलटपक्षीं सावनूरच्या आपल्याच जातभाईचा पाडाव करणें निजामास भूषणावह नव्हतें. तथापि या प्रसंगीं शहानवाजखानाच्या मध्यस्थीनें निजाम पेशव्याचे मदतीस सावनुरावर आला. सावनूरच्या नबाबास असा वाढूं दिला तर पुढें तो उभयतांसही बाधक होईल अशी पेशव्यानें निजामाची व बुसीची समजूत केली, तेव्हां बुसीसह निजाम सावनुरावर आला[1]. ' नबाबापाशीं वकिलीस परशरामपंत होते त्यांस लिहून नबाबांनीं कुमकेस यावें ऐसें केलें. ते फौजेसुद्धा आले.' [ भा. रा. च. पृ. २३ ].

ता. १ नोव्हेंबर स. १७५५ रोजीं मुरारजी हिंदुराव ममलकत मदार गोपाळराव पटवर्धनास लिहितो. ' राजश्री पंतप्रधान आम्हांस बंधु, तेव्हां त्यांची आस्था आमचेठायीं असणें युक्तच आहे. आम्हांस सकळ प्रकारें त्यांची प्रीतच करणें, यास्तव पुण्यास जावयाची तयारी पेशजी केलीच होती, त्याप्रमाणें तयारी असे. काल रा. पंतप्रधानांचीं व मल्हारराव होळकर यांचीं पत्रें चित्ताप्रमाणें आलीं. रा. अमृतराव [ बळवंतराव मेहेंदळ्याचा कारभारी ] यास पुढें पाठविलें. ते चारपांच रोजांत येतात. बळवंतराव गणपत [ मेहेंदळे ] व आपाजी जाधव, शेट्याजी खराडे [ होळकराचा सरदार ] कृष्णा तीरास यावे, त्यासहित ( आमची ) जावयाची सिद्धता असे. या देशीं आपणाकडील फौज व सरदारांस हरएकविषीं एकचित्त होऊन दुतर्फा कामें होऊन येतसा उद्योग करावा म्हणोन लिहिलें, तर पंतप्रधानांच्या व आमच्या प्रयोजनांत इतर भाव

---

१ ह्या प्रकरणावर कित्येक पत्रें उपलब्ध आहेत. [ सं. ३ ले. ४६९, ४७२, ४७३, ४७६-४७८, ४८१, खरे. ऐ. ले. सं. १ पृ. ६ ले २, ३, ४ इ. ]

काय आहे ? जैसा प्रसंग अवलंबू तैसा सिद्धीस नेऊं यांत संदेह नाहीं.' [ ऐ. ले. सं. १ पृ. ६ ले. २ ]. ता. ७ फेब्रुवारी स. १७५६ त मुधोजी भोसले लिहितो, 'कर्नाटक प्रांतींची मसलत उपस्थित होऊन पंतप्रधान निघाले, कृष्णातीरास आले तों, मुरारराव घोरपडे व दक्षिण प्रांताचे ताम्र व किरात एकत्र होऊन वळ धरिलें. यांशीं झुंजावें हा इत्यर्थ करून चालोन जाणें जरूर जाहलें. बगलकोटचे किल्ल्यास येऊन मोर्चे लावून किल्ला हस्तगत केला. तेथून सावनूर बंकापुरा नजीक आले. अमित्रांशीं गांठ घातली. किल्ल्याचे आसऱ्यामुळें लवकर स्ववश न होय यास्तव शहर चौगीर्द फौजा उतरल्या आहेत.' [ खं. ३ ले. ४६९ ] जानोजी व मुधोजी भोसले दोघेही या स्वारींत पेशव्याचे आग्रहावरून आले होते. उभयतांचा नागपुरच्या दौलतीविषयीं तंटा असून, या स्वारीच्या निमित्तानें या भोसल्यांस पेशव्यानें मराठशाहीच्या समाईक उद्योगांत सामील केलें; आणि फटकून राहण्याची रघूजीच्या वेळची त्यांची खोड नाहींशी केली. सावनूरची लढाई जोरांत चालू झाली. १७ मार्च १७५६ रोजीं एक इसम लिहितो, 'दोन महिने मोर्चे देऊन जाहले. तह कांहीं न ठरे. नबाब आल्यावर तह ठरला तर यशाचे विभागी ते होतात. ऐसें जाणून श्रीमंतांनीं फाल्गुन शु॥ ११ [ १२ मार्च ] शुक्रवारीं हल्ला केला. तेव्हां मुजफरखानाच्या वगैरे तीन चौक्या होत्या त्या जागां जाऊन तीनही टेकड्या हस्तगत केल्या. चारशें गारदी ठार झाले व तीन चारशें जखमी धरून आणिले. कुल साहित्य हस्तगत झालें. आपणाकडील शेसवाशें घोडे पडलें व शेपन्नास माणूस ठार झालें. तेव्हां त्यांचे मोर्चे उठवून आपले कायम केले. याउपरी त्यांसही पराक्रम कळला. त्यास नबावही जवळच आले. अच्छाटे माणूस व गाडदी आपणांकडील फार जायां झाले. मातबर माणसांपैकीं नागोराम भागवत यांस तोंडावर गोळी लागली. जखम हलकी आहे. बळवंतराव गणपत यांचे बरगडीस गोळी लागली. ईश्वरें कृपा केली.

चिंता नाहीं. रत्नाकरपंत वकील यांचे चिरंजीव माणिकराव गोळा लागून ठार झाले.' [खं. ३-४७२] 'तीन दिवसपर्यंत तोफांचा मारा श्रीमंतांनीं केला, तो श्रीहरि जाणे. त्यामुळें सावनुरांतील कुल रयत हैराण जाले. ब्राह्मणांचीं घरें दीडहजार, उदमी मातबर फार; आणि कुल पठाणाचे कबिले. शिवाय बाहेरील रयत आणि फौज त्यामुळें अनर्थ फारच झाला, आणि नाशही बहुतच झाला. हल्लीं रदबदलीस प्रारंभ झाला आहे. तह ठरल्यावर वर्तमान लिहून पाठवूं. [खं. ३ ले. ४७३]. नंतर २७ एप्रिलला पेशवा लिहितो, 'घोरपडे व पठाण यांस सावनुरांत कोंडून जेर केलें आहेत. नवाब सलाबतजंग आमच्या मदतीस येऊन पावले. त्यांच्या आमच्या भेटी झाल्या. मोगलाई कारभार सुरत अतिशय, बहुनायकी आहे.' [सदर ४७६].' सावनुरांत मुरारराव घोरपडे व मुज्फरखान पठाण यांस कोंडले. आतां नबाबाचा तोफखाना सुरू होईल.' २८ एप्रिल. [सदर ४७७]. पुढे बुसीचा उत्कृष्ट तोफखाना सुरू होऊन त्याचा मारा त्यानें सावनुरावर असा केला कीं, मोगल व मराठी फौजेंत त्याची फार वाहवा झाली. त्या वेळीं सावनुरावर त्यानें सवालाख गोळे मारिले, अशी त्या प्रांतीं आख्यायिका आहे. 'स्वामीचे आशीर्वादें त्रिवर्ग शत्रु अतिक्षीण जाहले. दहा लाखांचा मुलूख आला. दहा लाख रुपये करार केले आहेत. येणे कठीण आहे. सर्व कर्जाशीं संबंध आहे. सांप्रत बिदनूर प्रांतीं मुक्काम आहे. मरारराव, मुज्फरखान, सावनूरवाले मिळून विरुद्ध केलें होतें. त्यांस उत्तमप्रकारे हत्यारबंदसुद्धां बाहेर काढिलें. खंडणी अकरा लाख करार केली. मिश्रीकोट, कुंदगोळ व हुबळी हे परगणे निम्म्यांत घेतले. बाकी खंडणी न ये, करितां बंकापूर किल्ला सरकारांत घेतला. तेथून कूच करून तुंगभद्रातीरीं आलों. हरपनहल्ली, चित्रदुर्ग मामलत निल्हे लागली. बिदनूरचा गुंता उरकला. मल्हारबा लग्नाकारितां निरोप घेऊन गेले.' १८ मे १७५६ (खं. ३ ले. ४८१) ता. २१ मे रोजीं गोपाळराव पटवर्धन लिहितो, 'श्रीमंतांनीं

आम्हांस सोंध्यास पाठविलें. बरोबर फौज मल्हारराव रास्ते व तोफखाना वगैरे होते. सोंध्याची खंडणी अडीच लक्ष रोख व साडे पांच लक्षांस मर्दनगड ( फोंडा ) किल्ला येणेंप्रमाणें ठरून किल्ला हातीं येईपर्यंत सोंधेकराचा मेहुणा ओलीस घेतला आहे. यजमानांनीं तुंगभद्रा दक्षिण तीरास जाऊन तमाम खंडण्या घेऊन उत्तर तीरास येऊन बिदनूरची खंडणी घेतली. आतां या प्रांता शिरहट्टीवांचून कोणी संस्थानिक राहिले नाहींत. त्याचें पारिपत्य मागें जातांना करावें, अशी मसलत आहे. समागमें सलाबतजंगही आला आहे. बुसीस त्यांनीं निरोप दिल्हा. यांचा आश्रय झाला म्हणोन, त्यांची व्याधि उठोन गेली. पुढें त्यास आमच्या यजमानांनीं चाकरीस ठेवावें, असा करार झाला आहे. ( ऐ. ले. सं. ले. ३–४,) याच स्वारींत शहापूर, बेळगांव, बागलकोट व मिश्रीकोट वगैरे स्थळें घेतलीं. सावनुरांत विठ्ठल शिवदेवांनीं बहुत पराक्रम केला, सबब त्यास चौघडा, जरीपटका, साहेबनोबत व जरी लगी अशीं राजभूषणें व जवाहीर वगैरे दिल्हें. त्यांस या लढाईंत तलवारीची जखम लागली होती. लढाई आटोपल्यावर तहाचे प्रसंगीं मुरारराव घोरपडे पेशव्याचे पक्षांत आला, ( डफ. २ पृ. ९३) त्याच्याच मध्यस्थीनें वरील तह ठरला. महाल घेतले त्यांची यादी खं. २ पृ. १३८ वर आहे. मुज्फरखान पुनः पेशव्याचे नोकरींत आला.

सावनूरच्या लढाईचा एवढा बडेजाव केलेला आढळतो; परंतु पेशव्या-कडील सरदारांची व फौजेची संख्या पाहिली म्हणजे त्याजबद्दल कौतुक वाटेनासें होतें. त्यांतही निजाम व बुसी मदतीस आले, तेव्हांच सावनूर सर झालें. एवढ्या मोठ्या खटाटोपाचा परिणाम मात्र अल्प होय. सावनूरकराकडे यापुढें फक्त आठ लक्ष उत्पन्नाचा प्रदेश राहिला. दहा वर्षांपूर्वी मराठी स्वराज्याची हद्द कृष्णेवर होती, ती आतां तुंगभद्रेला जाऊन पोंचली.

३. श्रीरंगपट्टणचा वेढा—( मार्च–मे स. १७५७ ).—पांचवी स्वारी श्रीरंपट्टणची होय. ता. १ जानेवारी स. १७५७ रोजीं सदाशिवराव व पेशवा मुज्फरखानाच्या तोफखान्यासह कर्नाटकांत उतरून फिरकोळ खंडण्या घेत श्रीरंगपट्टणार चालून गेले, आणि तेथून मोठी खंडणी वसूल करून ता. १६ मे रोजीं परत फिरून २७ दिवसांत पुण्यास आले. बरोबर फौज साठ हजार होती. मुरारराव घोरपडेही सहा हजार फौजेसह येऊन मिळाला. 'तूर्त काम श्रीरंगपट्टणास आहे.' असें पेशवा ता. ८ मार्च रोजीं लिहितो. येथें म्हैसूरच्या राज्याचा कारभार प्रधान नंदराज पूर्ण सत्तेनें पहात होता. त्याजपाशीं पेशव्यानें बेसुमार खंडणी मागितली. ती माफ किंवा कमी करावी, अशी नंदराजानें विनवणी केली. ती न ऐकतां पेशव्यानें श्रीरंगपट्टणास वेढा बसविला; आणि बातेऱ्यां बांधून तीस तोफांचा मारा सुरू केला. स्वतः सदाशिवराव मोर्च्यांत होता. २७ दिवस मारा झाल्यावर शहर काबीज होण्याच्या बेतास आलें. इतक्यांत एकेदिवशीं श्रीरंगाच्या देवालयाच्या शिखरास तोफेचा गोळा लागून शिखर मोडलें; व मराठ्यांच्या बातेऱ्यांतील एक तोफ फुटून कित्येक गोलंदाज ठार झाले. उभयपक्षीं हा अपशकुन वाटून तहाची तडजोड ठरली. पेशव्यानें छत्तीस लाख खंडणी मागितली. सरकारचे शेटे महादशेट वीरकर[1] मध्यस्थ होते, त्यांचे विद्यमानें चार लाख कमी करून बत्तीस लक्ष घेऊन वेढा उठविण्याचें पेशव्यानें कबूल केलें. पैकीं पांच लाख रोख आले; आणि बाकीच्या फेडीकरितां राज्यांतील चौदा उत्कृष्ट महाल नंदराजानें मराठ्यांकडे लावून दिले. [ पे. ले. सं. भा. २ पृ. ६५३ ]. ८ मे रोजीं पेशवा लिहितो. 'श्रीरंगपट्टणचा मामला विल्हेस लावून शिऱ्यास आलों. पंधरा रोजांत तुंगभद्रा उतरून येतों. सर्व दाटी

---

१ हे वीरकर साताराचे राहणार. यांचा व्यापार मोठा असून ते नेहमीं फौजे-बरोबर असत. धर्मापा, सिदापा, महादशेट वगैरे नांवें प्रसिद्ध आहेत. ( सं. ३ ले. १३८, १५५ व ना. रो. २ पृ. १७४ ). पहा शाहूनगर वर्णन पृ. १३५.

हिंदुस्थानचे मनसुब्यावर आहे. जसा प्रसंग येईल तसें करावें लागेल, [ खं. १ ले. ४८७, ४८८ ]. कर्नाटकच्या नादांत उत्तरेंतील कामें बिनसत चाललीं; आणि तिकडील वेध हळू हळू वाढत चालला.

म्हैसूरकडून घेतलेल्या चौदा परगण्यांत पेशव्यांनीं वसुलाकरितां कमावीसदार नेमून त्यांच्या मदतीस सहा हजार फौज ठेवून पुढें चिनापट्टण व शिरे परगणा घेतला. खं. ६ ले. ३६९ शिरें येथून लिहिलेला आहे. होसकोट, बेंगळूर, बालापुर व कोलार हे परगणे मूळचे शहाजीच्या जहागिरींतले एकास एक लागून होते, ते घेण्याकरितां बळवंतराव मेहेंदळयास मुतालिक म्हणून पेशव्यानें ठेवून दिलें; आणि स्वतः १६ मे रोजीं परत निघून १५ जूनला पुण्यास पोंचला. रस्त्यांत तुंगभद्रा व कृष्णा या नद्यांस पूर आले होते; तेव्हां श्रीमंतांनीं पूजा करून प्रार्थना करितांच नदीदेवतांनीं पेशव्यास व लष्करास उतार दिला अशी आख्यायिका आहे.

शिऱ्याचे ठाणें मराठ्यांनीं घेतल्याबद्दल निजामास फार राग आला. निजामाच्या विजापुरसुभ्यांत तें मोडत असून दक्षिणेकडील मुलखाचा बंदोबस्त करण्यास तें ठाणें फार उत्तम होतें. इकडे पेशव्यांनाही कर्नाटकां-तील मुलूख राखण्यास तें हवेंच होते. श्रीरंगपट्टणपावेतो खंडणीचा मुलूख घेतल्यावर पेशव्यानीं शिरें आपल्या ताब्यांत घेऊन तेथें कायमची फौज ठेवून दिली. स. १७५०त नासिरजंगानें कर्नाटकांत स्वारी केली, तेव्हां-पासून निजामानें या बाजूस कधीं ढुंकून पाहिलें नाहीं. पेशवे शिऱ्यांत आपलें ठाणें बसवूं लागले, तेव्हां निजामानें दिलावरखान नामक सरदार त्याचे संरक्षणार्थ पाठविला; परंतु त्याचें कांहीं चाललें नाहीं. सलाबत जंगानें पंधरा लक्षांची जहागीर पेशव्यास देण्याचें कबूल केलें होतें, त्यापैकीं बारा लाखांचा मुलूख त्यानें नेमून दिला; व बाकींत शिरें घ्यावें म्हणोन परशुरामपंत वकिलामार्फत ठरलें होतें. आपण नसतें घेतलें तर शिऱ्याचें ठाणें मुरारराव घोरपड्यानें घेतलें असतें, अशी सबब पेशव्यानें सांगितली. एकंदरींत उभयतांचा सलूख व स्नेह असतां पेशव्यानें हें ठाणें घेतल्याबद्दल

निजामास फार राग आला; आणि त्याचें म्हणणें वकिलानें खं. १ ले. ६५ ता. ३१ मेच्या पत्रांत पेशव्यास कळविलें आहे. [टीप १४० खंड १ पहा]. कर्नाटकच्या पांच नबाबापैकीं शिऱ्याच्या नबाबाचें राज्य अलीकडे अगदीं मोडकळीस आलें होते; आणि त्याचा बहुतेक भाग कडप्याचे नबाबानें बळकावला होता. या घराण्यांतला शेवटचा नबाब दिलावरखान मरण पावल्यावर त्याचा जांवई मीर फैजुल्लाखान गादीवर आला. पेशव्यानें शिऱ्याचें राज्य घेतलें तेव्हां मीर फैजुल्लास निर्वाहाकरितां थोडीशी जहागीर लावून दिली; आणि शिरें शहर आपल्या कबजांत घेतलें. शिऱ्याचा किल्ला मात्र नबाबाकडे ठेविला होता. ( ऐ. ले. सं. पु. २ पृ. ६५३ ).

सावनूरकर नबाबानें तहांत बेळगावचा किल्ला पेशव्यास देऊं केला होता; पण तेथचा किल्लेदार युसुफ बेग किल्ला स्वाधीन करीना. तेव्हां त्याजवर पेशव्यानें फौज रवाना केली, व किल्लेदारास हुकेरी गांव इनाम देण्याचें कबूल करून पेशव्यानें किल्ला घेतला (३ मे स. १७५७); परंतु तो गांव कोल्हापुरच्या जिजाबाईकडे असल्यामुळें त्याच्या मोबदला दुसरें गांव किल्लेदारास दिलें.

या स्वारींतून गोपाळराव पटवर्धनास बिदनुरावर रवाना करण्यांत आलें होतें. त्यास झालेला हुकूम व त्याची कामगिरी याचें वर्णन उपलब्ध आहे (खं. १ ले. ५६, ५७, ६२–७ मार्च स. १७५७). बिदनुराहून दरसाल दोन हत्ती व चार घोडे पेशव्यास पाठविण्याचा करार होता. त्याप्रमाणें ते पाठविण्याची काळजी गोपाळराव पटवर्धनाने घेतली. (खं. ३ ले १७१, ९ मार्च स. १७५७ ) अशा स्वाऱ्यांतून लोक कसा त्रास देत, त्याचें एक उदाहरण खंड १ ले. ५८ त वाचण्यालायक आहे. स. १७५५ पासून गोपाळराव पटवर्धन हा कर्नाटकांतच सारखा कामगिरीवर असून पुढील पेशव्याच्या कारकीर्दीत त्याच्या कामाचा ज्यास्त विचार करावा लागणार आहे. [ खं. १ पृ. १०० टीप. १२० ] पटवर्धन, मेहेंदळे वगैरे सरदारांनीं हळू हळू पर्जन्यकाळांतही मुलूखगिरी करण्याचा प्रघात घातला.

मराठ्यांच्या फौजा बरसात आली कीं, शेतीच्या कामासाठीं भराभर घरोघर निघून जात, यामुळें लष्करच्या कामाला अत्यंत व्यत्यय येत असे, आणि पुष्कळदां थोडक्याकरितां वर्षोंवर्ष केलेले श्रम फुकट जात. गोपाळराव पटवर्धन व मल्हारराव रास्ते यांस पुढील पावसाळ्यासंबंधानें ७ मार्चास पेशवा लिहितो, 'चिकबाळापुर, शिरें, कडपें, व्यंकटेश पावेतों स्वारी करावी. तुमची सलाबत बहुत पडली आहे. एक वर्ष मेहेनत सांगितल्याप्रमाणें केली पाहिजे. किती लौकिक वाढला, व सरकार कामाचें ओझें तुह्मी उचलिलें, यामुळें आह्मांस बहुत आनंद वाटला. आणखी एक वर्ष खाशा राहिल्यास बहुत काम होईल. हिंदुस्थानांत चिरंजीव दादांनीं दोन छावण्या केल्या. (म्ह. दोन पावसाळे स्वारींतच काढले) दत्तबांनीं तीन केल्या, अंताजी माणकेश्वर वगैरे दोन छावण्या करीतच आहेत; परंतु कर्नाटकांत मागें फत्तेसिंग व रघूजी भोसले यांची झाली. गुदस्तां पर्जन्य अतिवृष्टि जाली; परंतु श्रीकृपेनें निभावून सिरहट्टी व कोपल येथील काम सर करतांच चहूंकडे चौका बसला. जे लोक बहुत काहिली करतील, त्यांस निरोप द्यावा; नंव जे घरास जाऊन आले असतील, ते ठेवावे व एकवर्ष मेहनत करून उपयोगी पडले असतील, त्यांनीं देशास जावें. एकवर्ष तुम्हांस रहावें पडतें, पण खावंदाचे कामासाठीं व आपल्या लौकिकासाठीं प्रयास करणें मर्दासच योग्य आहे. गुदस्तां आग्रह करून, बहुत बुद्धिवाद सांगून तुम्हांस राहविलें, म्हणून यंदा कांहींसें फळास आलें. यंदा राहाच म्हणून आग्रह करणार नाहीं. यंदा सर्वही उत्तमच तुम्हीं केलें.' [ पे. ले. सं. भाग २ पृ. १०१ ]. तोफखान्याची तर्तूद पेशव्यानें चांगल्याप्रकारें केल्यामुळें पावसाळ्यांत सुद्धां काम चालूं लागलें. मात्र घरीं जाण्याचा प्रघात अंगवळणीं पडलेला मोडण्यासाठीं मोठमोठ्या सरदारांचींसुद्धां कशीं आर्जवें करावीं लागत, हें वरील पत्रावरून कळून येतें. मुलूखगिरी यशस्वी होण्यास ती एकसारखी नेटानें चालविली पाहिजे, तिला मध्यें खळ उपयोगीं

नाहीं, हें तत्त्व उत्तरोत्तर मराठे सरदारांस पटून त्याचाच अवलंब पुढें पानपतचे प्रसंगांत करण्यांत आला.

पेशवे पुण्यास येतांच पुढें स. १७५७ सालच्या पावसाळ्यांत निजामाशीं शिंदखेडची मोहीम झाली, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. लागोपाठच्या पांच स्वाऱ्यांत मिळून पेशव्यास पुष्कळ संपत्ती मिळाली; मुलूखगिरीचे हिशेब व व्यवस्था पाहण्यांत पेशवा व सदाशिवराव अत्यंत दक्ष व तरबेज झाले.

४. बळवंतराव मेहेंदळ्याचा कर्नाटकांतील उद्योगः-(मे १७५७ फेब्रुवारी १७५८) बळवंतराव मेहेंदळे यांस स. १७५७ सालच्या स्वारींत पेशव्यानें मागें ठेवून दिलें, तेव्हां त्यानें तिकडे केलेला उद्योग स्वतंत्र स्वारी म्हणून समजण्याची जरूर नाहीं. तत्रापि त्यांत पेशव्याचा भाग नसल्यामुळें व बळवंतरावाचा उद्योगही स्वतंत्र स्वरूपाचा असल्यामुळें त्याचा उल्लेख स्वतंत्रच केला पाहिजे. अर्काट, शिरें, कडपें, कर्नूळ व सावनूर हे पांच नबाब त्या बाजूस बरेच सामर्थ्यवान होते, हें मागें एकवार सांगितलेंच आहे. पैकीं शिरें व सावनूर या दोहोंस पेशव्यांनीं जिंकलेंच. त्या प्रांतींच्या स्वराज्यापैकीं बेंगरूळ म्हैसुरकरांनीं घेतलें होतें आणि त्यावरूनच श्रीरंगपट्टणावर पेशव्यांनीं स्वाऱ्या केल्या. त्याशिवाय शहाजीच्या जहागिरींतला म्हणजे मूळच्या मराठी स्वराज्यांतला बराचसा मुलूख या वेळीं कडप्याच्या नबाबाचे ताब्यांत होता. हा नबाब अलीकडे मराठयांस जुमानीनासा होऊन खंडणी वगैरे कांहीं देईना. तेव्हां त्या नबाबाचें पारिपत्य करणें व अर्काटच्या नबाबापासून खंडणी वसूल करणें, अर्थात् पर्यायानें पूर्वीचें स्वराज्य ताब्यांत आणणें हीं जरूरीचीं कामें बळवंतराव मेहेंदळ्यावर सोंपवून नानासाहेब पेशवा परत आला. मराठयांचा हा डाव पाहून कडप्याच्या नबाबानें पावसाळयांतच सावनूर व कर्नूळ येथील नबाब, मुरारराव घोरपडे व चित्रदुर्गकर वगैरे पाळेगार यांशीं राजकारण लावून त्यांस आपल्याकडे वळवून घेतलें. मद्रासकर इंग्रजांसही त्यानें मदतीस बोलाविलें. सर्वांचा असा बेत झाला कीं, एकवार या मराठयांस सबंध बुडवून

त्यांच्या खंडणीचें जूं कायमचें झुगारून द्यावें; परंतु प्रत्यक्ष लढाई सुरू झाली तेव्हां कडप्याचे नबाबास कोणींच मदत केली नाहीं. भर पावसाळ्यांतच बळवंतरावानें होसकोटें, मुळबागल व कडपनाथ हीं ठाणीं काबीज केलीं. शेवटीं त्या नबाबाचें व बळवंतरावाचें ता. २४ सप्टेंबर १७५७ रोजीं कडप्याजवळ भयंकर युद्ध झालें. त्यांत नबाब मारला जाऊन बळवंतरावास जय मिळाला. हजारों पठाणांची कत्तल झाली. कडपें शहर मराठ्यांनीं हस्तगत करून लुटलें. या लढाईत मराठ्यांचे बाजूस संभाजी घोरपडे नांवाचा मिरज प्रांतांतील नामांकित शिलेदार मारला गेला. मयत नबाबाचा वारस अब्दुल नबीखानही मराठ्यांशीं हिमतीनें लढला, त्याचें अर्धे राज्य बळवंतरावानें घेतलें. मुरारराव घोरपडे कोणत्याच बाजूस न जातां गुत्तीसच स्वस्थ राहिला. अर्काटच्या नबाबाजवळही खंडणीची मागणी बळवंतरावाने पूर्वींच केली होती. नबाब महंमदअलीनें पुष्कळ आढेवेढे घेतले. इंग्रजांनींही मध्यस्थी करून खंडणी माफ करण्याची खटपट केली, परंतु तें सारें निष्फळ होऊन शेवटीं महंमदअलीनें साडेचार लक्ष रुपये खंडणी मराठ्यांस दिली. या कामीं मेहेंदळ्याचा कारभारी अमृतराव शंकर यानें फार चांगलें काम केलें.

बळवंतराव मेहेंदळ्याचा कारभारी अमृतराव शंकर हा पेशव्याचे विश्वासांतील इसम असून, अर्काटचे नबाबाकडून खंडणी वसूल करण्याचे बाबतींत त्याचा संबंध मद्रासकर इंग्रजांशीं आला. जॉन्होन्सर ( फॉरेस्ट ) लिहितो. ' अमृतराव हा पूर्वीं पेशव्याचा चिटणीस असून अलीकडे तें काम आपला भाचा गोविंद शिवराम याजकडे सोंपून तो आतां ( स. १७५९ ) नाना व सदोबा यांचा कारभारी होऊन मुख्य सरदाराची पदवी पावला आहे. दरबारांत त्याचें वजन फार आहे. मुराररावाकडील व कर्नाटकांतील सर्व काम याच्या हातीं आहे; कारण त्या बाजूची सर्व माहिती त्यास चांगली आहे.

मराठे इकडे लढण्यांत गुंतलेले पाहून म्हैसूरच्या नंदराजानें पेशव्यास दिलेले परगणे परत हिसकावून घेतले, आणि तेथें असलेल्या मराठ्यांच्या फौजेस घालवून दिलें. ही मसलत नंदराजास दिंदिगल प्रांताचा सुभेदार हैदरअली यानें दिली होती. या हैदराचा वृत्तान्त पुढें स्वतंत्रतेनें द्यावयाचा आहे. पाश्चात्य युद्धकलेची व्यवस्थित माहिती प्रथम या बाजूस हैदरअलीनेंच घेऊन ती अंमलात आणिली होती. म्हैसूरकरांच्या आगळिकीबद्दल त्यांचें पारिपत्य करण्यास बळवंतराव मेहेंदळ्यास फुरसत सांपडली नाहीं. पावसाळा संपे तों कडप्याचें अर्ध-राज्य हस्तगत करण्यात त्याचा वेळ निघून गेला. या सुमारास बिदनूर संस्थानांत झोटिंगबादशाही सुरू झाली होती. तें संस्थान काबीज करण्याचा नानासाहेबाचा फार दिवसांचा मनोदय सिद्धीस नेण्याचा बळवंतरावास हुकूम आला होता; परंतु तें काम तडीस नेण्यास त्यास सवड आली नाहीं. १७५७च्या पावसाळ्यांत पेशव्यानें महाराष्ट्रांत दोन फौजा तयार केल्या, एक दहा हजारांची विश्वासराव व दत्ताजी शिंदे यांच्या हाताखालीं व दुसरी गोपाळराव पटवर्धन याचे हाताखालीं. या दोन फौजांनीं बळवंतरावाचे मदतीस जाऊन सर्वांनीं मिळून म्हैसुरावर चाल करून नंदराजाची खोड मोडावी आणि पूर्वी केलेला उद्योग कायम करून घ्यावा असा पेशव्याचा संकेत होता. परंतु सप्टेंबर ऑक्टोबरांत शिंदखेडची मोहीम एकाएकी उपस्थित होऊन त्यांत विश्वासरावाची फौज गुंतली, आणि पावसामुळें नोव्हेंबरच्या पूर्वी गोपाळराव पटवर्धनाचे फौजेस कृष्णेवर उतार मिळाला नाहीं. यास्तव नानासाहेबानें बळवंतरावास सुचविलें कीं, 'तुम्ही एकदम बिदनुरावर जाऊन तें ठिकाण हस्तगत करावें. बिदनूरचा राणा व त्याचा मुलगा असे दोघेही नुकतेच मयत झाल्यानें बिदनूर सहज हस्तगत होईल. आणि तितक्या अवधींत गोपाळराव पटवर्धन बळवंतरावाचे मदतीस पोंचल्यावर दोघांनीं मिळून चित्रदुर्ग व मागून श्रीरंगपट्टण यांजवर हल्ले करावे.' (डफ पु. २ पृ. १०५). परंतु कडप्याची मोहीम पुरी करण्यासच बळवंतरावास अवकाश लागला. आणि पुढें निजामाचे बंधूंत वैर उपस्थित

होऊन, बुशी, हैदरजंग, निजामली व शहानवाजखान यांच्या खटपटी सुरू झाल्या. त्यासाठीं निजामाचे बाजूस फौज जमविण्याची पेशव्यास जरूर पडली, म्हणून त्यानें बळवंतरावासच स. १७५८ च्या फेब्रुवारींत फौजेसह तावडतोब परत बोलाविलें. अर्थात् बिदनूर व म्हैसूर या बाजूची मसलत त्यावेळीं साधली असती तर सर्व कर्नाटक मराठयांचे एकतंत्री कक्षेत येऊन हैदरअलीचा उदय होण्याचा संभव नव्हता. परंतु तो योग जुळून आला नाहीं. [ डफ व ऐ. ले. सं. पु. २ पृ. ६५३-६५५ व ६६५ ].

गोपाळराव पटवर्धनाबरोबरच मल्हारराव रास्तेही असे. स. १७५७ चे अखेरीस या दोघांची रवानगी पेशव्यानें कलबुर्ग्यावर केली. ' ती० ( गोपाळ ) रायांस व रास्त्यांस निरोप देऊन कर्नाटकांत रवानगी केली. यजमान येरुळावरून फिरत जाणार. रायांनीं व रास्त्यांनीं मिळोन स्वारींतील कारभार करावा. सरकारचे फडणीस, पोतनीस, चिटणीस वगैरे कारकून दिल्हे. येथील स्थिति एक प्रकारची जाली आहे. उभयतांत ( नानासा. व सदाशिवराव ) चित्त शुद्ध नाहीं. सर्व कारभार थोरले यजमानच करितात [ २८-२-१७५८ ऐ. ले. सं. पु. १ ले. ११ ] यापुढचें ले. १२ चें पत्र ४ एप्रिल स. १७५८ चें त्याच बाजूचें आहे.

५. गोपाळराव पटवर्धन व रास्ते यांची कामगिरी— [ स. १७५९ चा प्रथमार्ध ]—सन १७५८ च्या सालांत गोपाळराव पटवर्धन व रास्ते यांस म्हैसुरावर किंवा कर्नाटकांत उतरण्यास अवकाश मिळाला नाहीं. तें सबंध वर्ष निजामाकडील भानगडींत गेलें. पेशव्यांच्या तीन चार फौजांनीं निजामास कैचींत धरलें होतें. शेवटीं जून महिन्यांत बुशी कायमचा दक्षिणेंतून निघून गेला, तेव्हां पेशव्याची फौज थोडीशी रिकामी झाली, तों पावसाळा आला. याच वर्षी पुढें उत्तरेंत अब्दालीच्या स्वाऱ्यांनीं मराठयांचीं तारांबळ उडवून दिली, तेव्हां कर्नाटकाकडे सहजच थोडेंसें पेशव्याचें दुर्लक्ष झालें. तथापि रास्ते व पटवर्धन यांस

पेशव्यानें स. १७५८ च्या अखेरीस म्हैसुरावर पाठविलें आणि त्यानेंही स. १७५९ त बरेंचसें काम करून दाखविलें. या फौजेनें आधीं पूर्वी जिंकलेल्या चौदा परगण्यांत आपला अंमल पुनः बसविला. नंतर ती आग्नेयीस सावंतीदुर्ग उजवें टाकून बेंगरुळावर जाऊन तिनें त्यास वेढा घातला. याच फौजेपैकीं पायदळाची एक निवडक टोळी कोणास न कळत दाट जंगलांतून पश्चिमेकडे येऊन तिनें चेनापट्टणचा किल्ला अकस्मात् हल्ला करून घेतला. हा किल्ला श्रीरंगपट्टणच्या पूर्वेस चाळीस मैलांवर आहे. या अरिष्टाच्या निरसनार्थ नंदराजानें आपला दळवाई ( दळपति ) चा अधिकार हैदर नाइकास देऊन मराठ्यांवर पाठविलें. हैदरानें बेंगरुळ व श्रीरंगपट्टण यांच्या वाटेवर असलेले दोन किल्ले मादूर व मालवल्ली हे मजबूत बंदोबस्तांत ठेविले, आणि चेनापट्टण काबीज करून तेथें आपलें सर्व सैन्य जमविलें. मादूर पासून चेनापट्टण तेरा मैलांवर आहे. गोपाळरावाबरोबर तोफखाना नव्हता, तो केवळ गनिमी काव्यानें शत्रूस हैराण करी. परंतु हैदराची शिताफी कांहीं वेगळीच होती. एका मजबूत ठिकाणाहून कवाइती पायदळ व तोफखाना बरोबर घेऊन शत्रूस सुगावा लागूं न देतां, बारा बारा कोसांची मजल मारून पहांटेच्या सुमारास पहारे गैरसावध असतां तो मराठ्यांच्या छावणीवर येऊन पडे. अशा या जहांबाज इसमाशीं गोपाळरावानें दोन तीन महिने चांगलाच सामना केला. अशा झटापटीस निकालाचें स्वरूप न आल्यामुळें दोघेही कंटाळून गेले आणि त्यांजमध्यें तहाची वाटाघाट सुरू झाली. त्यांत असें ठरलें कीं रोख बत्तीस लक्ष रुपये घेऊन मराठ्यांनीं चौदा परगण्यांवरचा हक्क सोडावा व प्रांतांतून निघून जावें. त्याप्रमाणें रकमेची भरती करण्याविषयीं हैदरानें नंदराजास निकड लाविली. पण कसे बसे सोळा लाख जमा करून ज्यास्त रक्कम त्यास मिळेना तेव्हां 'तुम्हीच कांहीं युक्ति करून बाकीच्या रकमेची भरती करा' असा हैदरास नंदराजाचा

निरोप आला. तेव्हां मराठ्यांच्या लष्कराबरोबर जे सावकार होते त्यांनीं हैदरच्या सांगण्यावरून सोळा लाखांची भरती जागच्या जागीं करून दिली. तदनुसार रक्कम घेऊन मराठ्यांची फौज म्हैसूरची हद्द सोडून निघून गेली. सावकारांजवळ असलेली पत सत्ताधीशांच्या योग्यतेवर अवलंबून असते. यावरून पहातां हैदरावर मराठे सावकारांचा केवढा विश्वास होता हें वरील प्रकारावरून दिसून येतें. सावकारांनीं एवढीच अट घातली होती कीं, मराठ्यांनीं ते चौदा महाल सोडून दिले म्हणजे ते हैदरानें आपल्या कबजांत ठेवावे, नंदराजाकडे परत देऊं नयेत. हैदरास तरी हेंच पाहिजे होतें. त्यानें लगेच आपली फौज पाठवून त्या परगण्यांत आपला अंमल बसाविला. थोड्याच वेळांत हैदरानें म्हैसूरचें सर्व राज्य आक्रमिलें, त्याचा हा आरंभ होय. गोपाळरावानें हैदराशीं ही जी तडजोड केली ती पेशव्यास पसंत पडली नाहीं. 'हैदरानें तुमचें स्वरूप नेलें.' असा त्यास पेशव्यानें टोमणा मारिला. [ खरे ऐ. ले. सं. पु. १—ले. २४ नोव्हेंबर १७६० ] पण आपण हरलों असें गोपाळराव बिलकूल कबूल करीत नाहीं. 'आम्हांकडून हैदरास चांगली तंबी पोंचल्याशिवाय कांहीं त्यानें आम्हांस खंडणी दिली नाहीं.' हा गोपाळरावाचा जबाब आहे. हैदर कशा प्रकारचा मनुष्य होता याची पारख नानासाहेबास नव्हती. आपला कांहींएक उपाय चालत नाहीं अशी खात्री झाल्याशिवाय खंडणी देणारा मनुष्य हैदर नव्हता. या स्वारी पुरताच विचार केला तर गोपाळरावानें आपला नकशा कायम राखून या प्रकरणांतून अंग काढून घेतलें हें शहाणपणाचें काम त्यानें केलें. अतिप्रसंगाचें धाडस त्यानें केलें असतें तर उत्तरेंतील पानपतच्या संकटाबरोबरच कर्नाटकांतही कदाचित् मराठ्यांच्या सत्तेस धोका आला असता. कारण स. १७५९ च्या अखेरीस निजामाशीं पुनः कटकट सुरू होऊन पुढें उदगीरचा प्रसंग आला आणि त्याचवेळीं उत्तरेंत पानपतचें प्रकरण रंगास चढलें. हे प्रकार ध्यानांत घेतां गोपाळरावाचें कृत्य योग्य म्हणावें

लागतें. ऐश्वर्याच्या भरांत शत्रूस हलकें समजण्याची खोड यावेळीं पेशव्याचे व सदाशिवरावाचे ठिकाणीं थोडीबहुत उद्भवली होती, असें वाटूं लागतें.

म्हसूरचें प्रकरण मिटल्यावर गोपाळराव पूर्वेकडे वळून, दमलचेरीच्या खिंडींत येऊन, इंग्रज व फ्रेंच हे मद्रासेस एकमेकांशीं झगडत होते त्यांजकडून कांहीं लाभ करून घेण्याचा प्रयत्न करूं लागला. पण तेथें त्याची डाळ शिजली नाहीं. फ्रेंचांचा त्यास राग येऊन त्यानें तिरुपतीचें देवालय हस्तगत केलें; आणि पुढील उत्सवाच्या प्रसंगीं देवास होणारी मोठीशी मिळकत पटकावण्याचा त्याचा इरादा होता. परंतु स. १७५९ च्या पावसाळ्यांतच त्यास पुण्याहून बोलावणें आल्याने तो परत गेला. तिरुपतीवर त्यानें जी थोडीशी फौज ठेविली होती तीही पुढें अर्काटच्या नबाबानें काढून दिली. (डफ भा. २-११७) स. १७६० च्या आरंभीं गोपाळराव उदगीरच्या लढाईंत होता. आणि ता. २ एप्रिल स. १७६० रोजीं त्याने दौलताबादचा किल्ला हस्तगत केला, ती हकीकत निजामाचे प्रकरणीं मागे पृ. ४०५ वर स्वतंत्र कलमांत दिली आहे.

हैदर मध्यें आला नसता तर, श्रीरंगपट्टण खास मराठ्यांचे हातीं पडले असतें. मराठ्यांचा व मद्रासकडील इंग्रजांचा निकट संबंध याच वेळीं येता; आणि महाराष्ट्राच्या इतिहासाला निराळें वळण मिळतें. देणेंप्रमाणे हैदरानें दक्षिणेस व अब्दालीनें हिंदुस्थानांत मराठ्यांच्या आड येऊन, इंग्रजांना पुढें येण्यास संधि करून दिली. हैदरअलीनें जो आक्रम म्हैसुरांत केला त्याच्याकडे सर्व मराठे सरदारांचें लक्ष लागून गेलें होतें यांत संशय नाहीं. [ राजवाडे खं. १ पृ. २१८ ] हैदर मध्यें न येता तर इंग्रजांचा रिघांव हिंदुस्थानांत आला नसता, हा तर्क सामान्यतः पटण्याजोगा नाहीं. स. १७६० त हैदरअलीला काबूंत आणण्याकरितां नंदराजानें मराठ्यांची मदत मागितली होती, पण ती त्यांस देतां आली नाहीं. [ इ. सं. पे. टि. भा. २ पृ. २२ ]

६. सन १७६० ची मोहीम:—सन १७६० च्या एप्रिलांत सदाशिवराव पानपताकडे निघून गेल्यानंतर गोपाळराव पटवर्धन व विसाजीपंत बिनीवाले यांस वीस हजार फौजेनिशीं पेशव्यानें कर्नाटकांत पाठविलें. शिऱ्याचें व कडप्याचें अर्धे राज्य गेल्या दोन तीन वर्षांत पेशव्यांनीं जिंकिलें. नवीन जिंकलेल्या प्रदेशाची स्थिरस्थावर करण्यासाठीं कांहीं दिवस पेशव्यास सालोसाल फौजा पाठवाव्या लागत, त्यास अनुसरूनच या फौजेची रवानगी कर्नाटकांत करण्यांत आली होती. ही फौज त्या सालच्या पावसाळ्यांत निरनिराळ्या ठिकाणीं खंडण्या वसूल करीत होती. परंतु लवकरच पानपतावरील पेंच दक्षिणेंत कळल्यामुळें गोपाळरावास पेशव्यानें साल अखेर आपल्याकडे बोलावून घेतलें; आणि विसाजी कृष्णानें फ्रेंचांस मदत करून इंग्रजांचा पाडाव करण्याचा प्रयत्न केला, त्या संबंधाच्या तहाचा मसुदा १७ सेप्टेंबर स. १७६० चा इ. सं. ऐ. टि. भा. ३ पृ. ३ वर दिलेला आहे.स. १७६१ च्या जानेवारींत पानपतचा झगडा निकालास लागला तेव्हां गोपाळराव हा पेशव्याच्या फौजेबरोबर उत्तरेंत जात होता. विसाजीपंत बिनीवाले कांहीं दिवस मागें कर्नाटकांत होता, तोही १७६१ च्या जानेवारींत परत फिरून महाराष्ट्रांत गेला असावा. अर्थात् या प्रकरणाचा संबंध माधवराव पेशव्याच्या राज्यकारभाराशीं येत असल्यामुळें कर्नाटकच्या स्वाऱ्यांची हकीकत येथेंच पुरी करणें इष्ट आहे. तिचा संबंध इतउत्तर हैदराच्या हालचालींशीं विशेष येईल.

---

१. [या दोन स्वाऱ्यांची हकीकत ऐ. के. सं. पु. ११२ च्या आधारें घेतली आहे].

# प्रकरण चोविसावें.

## आंगरे, इंग्रज व पश्चिम किनारा.

१. आंगरे बंधू तुळाजी व मानाजी ( स. १७४१-५२ ).
२. तुळाजी व पेशवे यांचा वैरभाव.
३. आंगऱ्यांस बुडविण्याची तयारी.
४. सुवर्णदुर्ग काबीज ( २२-४-१७५५ ).
५. विजयदुर्गचा पाडाव ( १३ फेब्रुवारी १७५६ ).
६. विजयदुर्गसंबंधीं पेशवे-इंग्रजांचे भांडण.
७. तुळाजीची योग्यता, पेशव्याची अक्षम्य चुकी.
८. हबशावर मोहीम, उंदेरी काबीज (२७ मे १७५८ फे.१७६०
९ प्राइसची वकिलात व राजकीय परिस्थिति;
( स. १७५९ ) ऑगष्ट—ऑक्टोबर ).

**१ आंगरे बंधू तुळाजी व मानाजी ( स. १७४१-५२ ):—** ता. १२ डिसेंबर स. १७४१ रोजीं संभाजी आंगरे मरण पावला ( खं. ३ ले. ३४५ ), तेथपावेतों आंगऱ्यांची हकीकत पूर्वी येऊन गेली आहे. पश्चिम किनाऱ्यावर वावरणाऱ्या इंग्रज व पोर्तुगीझ या दोन सत्तांपैकीं चिमाजीआपानें स. १७३९ त पोर्तुगीझांस उधळून दिल्यावर, एक प्रतिस्पर्धी कमी झाल्यामुळें, इंग्रजांचा मार्ग तितका सुलभ झाला. तथापि तुळाजी आंगऱ्याच्या प्रखर तेजापुढें स. १७५५ पावेतों इंग्रजांस या बाजूस वर डोकें काढतां आलें नाहीं. अर्थात् स. १७४० पासून ५५ पावेतों त्यांचे प्रयत्न मुख्यतः पूर्व किनाऱ्यावर फ्रेंचांचा पाडाव करण्यांत चालले होते. आंगऱ्यांचे घरांत कलह नव्हते, तों पावेतों पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांचें कांहीं एक चाललें नाहीं; समुद्राच्या बाजूनें

मराठी साम्राज्याचा बचाव आंगरे करीत होते. हें बचावाचें साधन पेशव्यानें कसें नाहींसें केलें हें आतां सांगावयाचें आहे.

एकदां एक इंग्रज व्यापारी मुठींत जीव घेऊन तुळाजी आंगऱ्याचे भेटीस गेला, त्यानें त्याचें वर्णन पुढें लिहिल्याप्रमाणें केलें आहे. "तुळाजी निमगोरा, उंच, भव्य, देखणा व अत्यंत रुआबदार होता. पाहिल्याबरोबर मूर्तिमंत शौर्याची कल्पना मनांत येई. त्याची कृतिही रूपास साजेशीच होती. कोणतेंही जहाज त्याच्या तावडींत सांपडलें म्हणजे सहसा सुटून जात नसे. इंग्रज व्यापारी त्याच्या त्रासास इतके कंटाळले कीं, 'देवा कसेंही करून यास आमच्या तावडींत आणून दे,' अशी परमेश्वराची ते करुणा भाकूं लागले. तुळाजीची शक्ति व तयारी परिपूर्ण होती. त्याचीं बंदरें भरभराटींत असून रयत सुखी होती. तीस हजार फौज त्याजपाशीं तयार होती. तोफखान्यावर अनेक कुशल युरोपियन लष्करी व आरमारी कामें करीत होते. त्याच्या आरमारांत साठावर जहाजें असून, शिवाय हत्ती, दारुगोळा व शस्त्रास्त्रें असंख्य होतीं.

मानाजी व तुळाजी या दोन सावत्र बंधूंच्या तंट्यांत आंगऱ्यांच्या घराण्याची आहुति पडली. दोघेही बंधु हुशार होते. परंतु मानाजी नरम वृत्तीचा व तुळाजी कडक स्वभावाचा होता. मानाजीला पेशव्यांनीं सामदामानें आपल्या पक्षांत घेऊन तुळाजीच्या विरुद्ध त्यांनीं आपलें धोरण ठेविलें होतें. अगोदरच आंगरे हे आपणास मुख्य छत्रपतीचे नोकर समजून पेशव्याचे कह्यांत राहण्यास नाखूष असत. तशांत त्याचे घरांत तंटे उद्भवल्यावर पेशव्याचे हातून ते तंटे शमण्याच्या ऐवजीं उलट त्यांनीं मानाजीस हातीं धरल्यानें, तुळाजीसारख्या बाणेदार व हट्टी पुरुषाचें मन सर्वथैव बिथरलें. शाहूनें हे तंटे मिटविण्याची शिकस्त केली. [ पहा खं. ६ ले. १५३ ]. मानाजीस 'वजारतमाब' हा किताब देऊन त्यास कुलाब्याचा अधिकार दिला. आणि तुळाजीस 'सरखेळ' ही पदवी देऊन त्यास सुवर्णदुर्गापासून थेट दक्षिण कोंकण पर्यंतची हद्द वांटून दिली. तथापि

ही तडजोड तुळाजीस पसंत पडली नाहीं आणि त्याच्या क्रूर स्वभावाची त्यांत भर पडून पेशव्याशीं त्याचे संबंध विकोपास जाऊं लागले. शाहूच्या पश्चात् छत्रपति नामशेष होऊन पेशव्याच्या हातांत सर्व सत्ता आल्यावर तुळाजीचें वर्तन अनावर झालें. तो स्वतंत्रपणें वागून पेशव्यांस मुळींच जुमानीनासा झाला. ताराबाईशीं पेशव्याचा तंटा जोरांत असतां तुळाजीनें पेशव्याचे विरुद्ध उचल घेतली, तेव्हां त्यास नरम केल्याशिवाय कारभार चालणें शक्य नाहीं, असा स. १७५०-५२चे दरम्यान पेशव्याचा विचार ठरला. पुण्याच्या छातीवर तुळाजी हें एक कायमचें दडपणच असल्यामुळें तें उडवून देण्याचा त्याचा निश्चयच झाला होता. पेशव्याच्या या वृत्तीमुळें उभयतांत कायमचाच पेंच उत्पन्न झाला. या पेंचांतून सुटण्यासाठीं पेशव्यानें योजलेला उपाय इतका घातुक झाला कीं, त्यांत आंगऱ्यांचीच नव्हे तर त्यांजबरोबर मराठशाहीचीही इतिश्री झाली. आंगऱ्यांस नाहींसे करून पश्चिम किनारा हस्तगत करण्याची आतुरता मुंबईकर इंग्रजांस केवढी होती, हें मागें सांगितलेंच आहे. स. १७५०-५१ त रामाजी महादेवाचे मार्फत पेशव्याकडे ते खटपट करीत होते. परंतु दुसऱ्या अनेक भानगडींमुळें आंगऱ्यांकडील काम स. १७५५ पर्यंत लांबणीवर पडत गेलें. स. १७५५ तही रामाजीपंतास वश करून इंग्रजांनीं घाई केली नसती तर मुद्दाम नानासाहेबानें ही मोहीम एव्हांच अंगावर घेतली नसती. सर्व बाजूंनीं विचार होण्यापूर्वींच रामाजी महादेवानें इंग्रजांचें कारस्थान घडवून आणिलें, आणि नानासाहेबास इंग्रजांची मदत घेण्याची दुर्बुद्धि झाली. वास्तविक इंग्रजांनीं पेशव्यास हातांतल्या बाहुल्याप्रमाणें खेळवून आपला फार काळचा हेतु सिद्धीस नेला. नानासाहेबासारख्या धूर्त पेशव्याला अशी विलक्षण भुरळ पडावी, हें त्याच्या योग्यतेस मोठें लांछन आहे. नानासाहेबानें स. १७५५-५६ त इंग्रजांची मदत घेतली नसती तर, इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत स्थापन झालें नसतें, अशांतला प्रकार नाहीं. मागेंपुढें हिंदुस्थानदेश इंग्रजाच्या हातीं जाणार, हा योग अपरिहार्य होता.

तथापि नानासाहेबाच्याच संबंधानें पाहवयाचें तर त्यानें आंगऱ्यास बुडविलें, ही गोष्ट अत्यंत आत्मघातकी झाली यांत संशय नाहीं.

नानासाहेबाच्या कार्किर्दीचा बहुतेक वृत्तान्त अस्सल कागदपत्रांच्या आधारानें रचिलेला आहे; आणि बहुधा सर्व प्रकरणांचे अस्सल कागद मुबलक प्रसिद्ध झाले आहेत; तथापि आंगऱ्याच्या या प्रकरणावर प्रकाश पाडणारे अस्सल कागद बहुतेक नाहींतच, तेव्हां मुख्य भिस्त इंग्रजांनींच लिहून ठेविलेल्या एकतर्फी हकीकतींवर ठेवावी लागते. ही गोष्ट सूचनार्थ मुद्दाम सांगून ठेवण्यांत येत आहे.

---

१ आंगऱ्यांच्या प्रकरणावर व पश्चिम किनाऱ्यावरील या वेळच्या घडामोडींवर उपलब्ध असलेली माहिती येणे प्रमाणें:—

राजवाडे खं. २ पे. श. पृ. १३३, १३४, १३९, १४०, १५०.
,, ख. ३ ले. ५६८ आंगऱ्याची बखर, ले. ३४४ व ४७५
,, खं ६ ले. १५३, ३३७ व ४५३.
का. सं प. या. ले.१०२ [ता. १०-११-१७५२ ]. दुसरे लेखांक ७६, ८३, ६१, ८४, ३७९, १४६, १४७, हे सन १७५९-६० सालचे उंदेरी हस्तगत केली त्यासंबंधाचे आहेत.
खरे ऐ. ले सं. भा. १ पृ. ७ सुरतसंबंधी. ब्र. च. ले. ३२५
इ. सं. आंगऱ्यांची खबर—विस्तृत व चांगली.
इ. सं. पे. द. स. माहिती पृ. १५२. भा. व. पु. १ प. या. ले. ३९.
भा. व. पु. २ शकावली पृ. ३४.
ना. सा. रो. पु. १ ले ६६, ८०, ८५, ८६.
शा. म. च. ( का. सं. ) पृ ७९, ८०.
धा. रा. म. च. ( का. सं. ) पृ. २१.
मराठे व इंग्रज—पृ. १८. ब्रि. रियासत पृ. ५७२-५७६,
Victor Surridge-Romance of Empire-India p.49-73.
Grant Duff भा. २ पृ. ८०-९९
Forrest's selections-Maratha Series.
वरील यादींत अस्सल कागदपत्र फार थोडे आहेत. बहुतेक लेख बखरीवजा आहेत.

मानाजी आंगरे तरी सर्वस्वी पेशव्यांचे लक्षांत वागत होता, असें मुळींच नाहीं. पेशव्यांची कोंकणप्रांतावर आसक्ति विशेष असून त्यांस जन्मभूमीचा लोभ सुटत नव्हता. परंतु त्या भूमीचें रक्षण करण्याचें सामर्थ्य जें आंगऱ्यांचे हातांत होतें तें पेशव्याचे हातांत नव्हतें म्हणून नानाअन्हेचीं कुलंगडीं करून व छत्रपतींवर आपल्या वजनाचा भार घालून आंगऱ्यांचा उच्छेद करण्याचा पेशव्याचा प्रयत्न सारखा चालला होता. हा प्रयत्न एकप्रकारचा आनुवंशिक होता, एकाच विशिष्ट पेशव्याचा होता असे नाहीं. बाळाजी विश्वनाथास कान्होजीपुढें नाक घांसून शाहूची बाजू सांभाळावी लागली, तेव्हांपासून स. १७५६ त इंग्रजांचे मदतीनें आंगऱ्याचें आरमार पेशव्यानीं साफ बुडविलें तोंपर्यंत, पेशव्याचा हा डाव अव्याहत चालला होता. त्यात पेशव्याच्या पक्षाचे समर्थन करितां येईल, असे मुद्दे सहसा सांपडतच नाहींत. तुळाजी उद्दाम किंबहुना क्रूरही असेल, परंतु तेवढ्याच कारणास्तव राज्याचा मुख्य आधारस्तंभ तोडून टाकण्याचें काम पेशव्यांनीं करणें कसें विहित होईल ! दाभाडे, गायकवाड, भोसले, प्रतिनिधि इत्यादि अनेक विरोधी सरदारांचे तंटे तोडून पेशव्यानीं राज्याची व्यवस्था ठेविली, तशी व्यवस्था आंगऱ्याची करणें शक्य नव्हतें, असे कसे म्हणतां येईल ! मानाजी आंगरे केवळ त्याचा हस्तक; बाजीरावानें मानाजीशीं करार करून त्याची व्यवस्था ठरवून दिली, ती तो पेशवा मरण पावतांच नानासाहेबानें व सदाशिवरावानें झुगारून दिली. त्याबद्दल मानाजी गयावया करून शाहूच्या व पेशव्याच्या पाया पडण्यास सातान्यास आला. ह्या वेळीं पेशवा उत्तरेच्या स्वारींत होता, यावरून हा समय स. १७४२ चा असावा. वसई काबीज केल्यापासून, आंगऱ्यांना साफ उडवून देण्याचा उपक्रम चिमाजी आपा व नानासाहेब यानां ठरविलेला दिसतो. वास्तविक वसई काबीज करण्याचें काम आंगऱ्याचें; पण आंगऱ्यावर पेशव्याचा पूर्ण विश्वास नसल्यामुळे, चिमाजीनें तें आपल्या हातांत घेतलें; आणि त्या योजनेस विरोध करणें आंगऱ्यासही शोभलें नसतें. म्हणून त्या बाबतींत

आंगरे विशेष पुढाकार न घेतां अंग बचावून राहिले. वसईनंतर नवीन आरमार व पाश्चात्य युद्धपद्धति यांचा स्वीकार करण्याचें मुख्य काम सोडून उलट पेशवे आंगऱ्याचे पाठीस लागले, त्या विवंचनेंतच संभाजी आंगरे मरण पावला. लगेच मानाजीनें शाहूकडे धांव घेतली, आणि आपले मुद्दे त्याजपुढें मांडिले. [ इ. सं. पे. द. मा. पृ. १५२ ले. १ ]. ' महाराजांचे किल्ले आज्ञाधारकाचे ( मानाजीचे ) स्वाधीन असतां प्रधानपंतीं घेतले. आमचे बोलीचें रसायन मान्य न करितां चेऊलची देशमुखी देणें म्हणोन सदाशिवपंतीं बोली घातली. तें न बने म्हणोन परस्परांचे आरमाराचा कलह जाहला. पंतांचें भेटीचा योग न बने. त्या उपरांत साहेबांचें आश्वासन पत्र गेलें. शिरसावंदोन पायांजवळ आलों. कृपाळूपणें सर्फराजीची आज्ञा चार किल्ले देववून गौरवावें. राजश्री पंतप्रधानाची व आपली एकवाक्यता करावी. परस्परें प्राचीन तहाप्रमाणें चालावें. न्यूनाधिक करूं नये. राजश्री पंतप्रधानांचे हर्षामर्षामुळें मुलकी अंमलांत व्याक्षेप होऊन आपण हुजूर आलो. निघोन आल्या दिवसापासून हा काळपावेतों कर्जदार होऊन नित्य चालावयाचे संकट पडिलें आहे. ये विशींची चिंता धणी मायबापास असे. परस्परांचे वडिलोपार्जित तहाचा करार चालत आला होता, त्याजमध्यें रा. राऊ कैलासवासी कुलाबेच्या मुक्कामीं येऊन, प्राचीन तहामध्यें बोलीचाली करून, उभयपक्षींच्या समाधानेंकडून तहनामे होऊन, पुढें न्यूनाधिक ठरूं नये, नाराजी करूं नये, किल्ले कोटांसी, जंजिरे यांसीं कृत्रिम करूं नये, म्हणोन आणा शपथा परस्परांच्या जाहल्या होत्या. त्यांस विपर्यास येणेंप्रमाणें प्रधानपंतांनीं केला आहे. " [ इं. स. पे. द मा. पृ. १५२ ] या तक्रारीवरून आंगऱ्यांचें म्हणणें समजून येतें. पूर्वीचा दाखला चालवावा, नवीन कांहीं करूं नये, या अप्रागतिक तत्त्वावर मराठशाहीची रचना असल्यामुळे, कारभाऱ्यांचे व सरदाराचे तंटे कधींच मिटूं शकले नाहींत. प्रसंग पडेल त्याप्रमाणें राज्यव्यवस्थेंत फेरफार करण्याची सोय प्रत्येक राज्ययंत्रांत असली पाहिजे.

भा. व. पु.१ प.या. ले.३९ चा कागद बहुधा वरील तक्रारीला शाहूचा जबाब आहे. दोहोंमधील तक्रारींचे उल्लेख एकच आहेत. हा कागद शाहूचें सदाशिवरावास खरमरीत आज्ञापत्र असून, पेशवे त्या वेळीं स्वारींत असल्याचा उल्लेख आहे. यावरून तें स. १७४२ तलें असावें. "मानाजी आंगऱ्याकडील किल्ले माणीकगड व प्रांत तुह्मी घेतलात तो सोडून द्यावा, या विषीं पेशजी रा. पंतप्रधान असतां आज्ञा केली, त्याप्रमाणें किल्ला व प्रांत सोडून द्यावयाचा करार केला, त्यावरून स्वामी तुह्मांवर बहुत संतोषी झाले. वजारतमाब स्वामींच्या राज्यांतील पुरातन सेवक. निष्ठेनें सेवा करीत आहेत. त्यांचे सर्व प्रकारें स्वामीस अवश्यक. तदनुरूप तुह्मीं अगत्यवाद धरून साहित्य करावें, हें तुम्हांस विहित आहे. स्वामींनीं तह करून दिला आहे, त्याप्रमाणें तुह्मीं चालावयास अंतर न करणें. दुसऱ्या पत्राचा उजूर न करितां पत्रदर्शनीं किल्ला प्रांत त्याचे हवालीं करून यांची रवानगी सत्वर करणें, हे आमचे पदरचे आहेत. यांचें आगत्य अम्हांस तसें आपणही धरून चालविणे जरूर जरूर."

मानाजी व तुळाजी यांचें बरें नव्हतें. पुढील ब्रह्मेंद्रस्वामीचे पत्र पहा. "सहस्रायु चिरंजीव विजयी भव तुळाजीस आज्ञा ऐसीजे. तुझे सहस्र अन्याय झाले, तुजला पत्र न लिहितों, परंतु मानसिंगांची व तुमची गोडी व्हावी, महत्कार्य सिद्धीस जावें याजकरितां पत्र लिहलें आहे. तरी कबिले बायका जे तुम्हांकडे मानाजीच्या आहेत, तीं रवाना करून द्यावीं, मानसिंगास दोन गोष्टी सांगितल्या त्यापासून सहस्र वांट्यानें काडीइतके अंतर पडणार नाहीं. आह्मी चित्त शोधून पाहिलें, तुम्ही आतां लेकुर बुद्धी न करणें, दोघे भाऊ एक होऊन एखादे आभाळास हात घालणें, हे आज्ञा." [ ब्र. च. ले ३२५ ] या पत्रावरून तुळाजीच्या स्वभावाची कल्पना होते.

'अंजनवेल व गोवळकोट हे जागे हबशाकडे राहिल्यानें कोंकण प्रांतीं उपद्रव लागतो. त्यावरून जिवाजी खंडेराव चिटणीस यास आज्ञा करून बरोबर फौज व सामान घेऊन गोवळकोट घ्यावा, असें सांगितलें. त्यावरून

आंगरे यांस पत्र दिलीं. महाराजांनीं फत्तेसिंग बाबाकडील व आणखी पुष्कळ लोक रवाना केले व खजिना पाठविला, हबशी जोरानें आले. त्यांशीं लढाई देऊन मागें घालविलें. बहुत कजाखी करून निशाण चढवून किल्ला घेतला. वर्तमान ऐकून महाराज संतोष पावले. ' [ शा. म. च. पृ. ७९, ८० ]. अंजनवेलीची ही मसलत स. १७४२ ची आहे. जो अंजनवेल घेईल त्यास (सरखेलीचें ? ) पद देऊं, अशी शाहूनें अट घातली होती. तुळाजीनें यमाजी शिवदेवाच्या वशिल्यानें मानाजी विरुद्ध शाहूकडे कारस्थान चालविले होते. [ खं ६ ले. १५३ ]. ' तुम्ही त्यास ( म्हणजे तुळाजीस ) वडील. परंपरा पहाता वडिलाकडे पद असावें. तुळाजी आगरे यांणीं अरगजले तरी पहिलें हल्लीं प्रमाणें तिकडेस वतन देतील तेव्हां तुह्मी आम्हावरी शब्द आणाल, यास्तव लिहिलें आहे. ' असे पेशवा मानाजीस लिहितो. त्यानंतर स. १७४३ त मानाजी हा नानासाहेबास लिहितो. ' आम्ही कायावाचामनेंकरून आपली जोड केली आहे, दुसरा विचार नाहीं. ' हाच भाव मानाजीनें दुसऱ्या एका पत्रात व्यक्त केला आहे. ' आमचा एक निश्चय कीं आपले ऐसे म्हणवून आहों. त्यास अंतर नाहीं. आम्ही आपले ह्मणवीत असतां, आमचे पाठीं ऐसा विचार उपद्रव असावा, हाच मात्र खेद वाटतो. विस्तारें किती म्हणून लिहावें; न लिहावें तर कोणास लिहावें ! ' मानाजीनें रेवदंड्याचे बंदरांत फिरंग्यांस अडविलें असतां, ' राजश्री रामाजी महादेव विश्वास घातकी निर्माण आहेत, दुसरे नारो त्रिंबक तळेकर रामाजी महादेवाचे साम्यतेस होऊन किल्ले सागरगडीं कार्तिक व. २ गुरुवारीं पहांटेस

---

१ [ का. सं. प. या. १०२ हें पत्र ३ सफरचें आहे.-त्यांत ' कार्तिक व. २ गुरुवारीं ' असा उल्लेख आहे. गुरुवारीं कार्तिक व. २ स. १७४५, स. १७४८ व स. १७५२ या तीन सालांत येते. रामाजी महादेवाचें प्रकरण बहुधा शाहू छत्रपतीच्या निधनानंतरचें असावें. म्हणून या पत्राची तारीख ३ सफर=मार्गशीर्ष शु. ४ शके १६७४=१०-१२-१७५२ असावी ]

बारा पंधराशें लोकांनिशीं शिडया घेऊन, त्यांनीं शिडया लोटिल्या. दगड घालितां अवसान खता होऊन श्यामवदन केलें. मोड जाहला. आचरणा-प्रमाणें पारिपत्य करावे तरी ते करणार, आचरणार लघुकर्म आचरोन गेले. याप्रमाणे मामलेदाराचें आचरण, आणि आपलें तो विश्वासपूर्वक आश्वासन; आणि परिणाम याप्रकारें, तेव्हां काय करावें ' पेशव्याचा कोकणातला विश्वासु मामलेदार आंगऱ्याशीं अशी उघड दगाबाजी करतो, ही गोष्ट पेशव्याच्या संमतीशिवाय घडली, असे म्हणवत नाहीं. एकंदरीत आंगऱ्याशी पेशव्याचें वर्तन विश्वासघाताचें होतें असें म्हणावें लागतें.

२. तुळाजी व पेशवे यांचा वैरभाव:—तुळाजी आंगऱ्याच्या दुर्वर्तनाचे अनेक उल्लेख आहेत. त्यांतील काहीं येणेंप्रमाणे:—

' तुळाजी आंगरे कान्होजीच्या येकी राखीस जाले. संभाजी आंगरे दौलतीवरी असता त्याचे हाताखालीं कारभार करीत होते. त्यांणी श्रीमंत शाहूमहाराजांस विनंती करून आपले नावे वस्त्रें घेतलीं. ब्राह्मणास उपद्रव फार केला. सबब, महाराज कैलासवासी जाल्यावरी, नानासाहेब पेशव्यांनीं बहुत सांगून पाहिलें. वकील पाठविले. तत्रापि न ऐकत. तेव्हा इंग्रज अनुकूल करून घेऊन तुळाजी आंगरे धरिले. बेडी घालून किल्ले वंदन येथें ठेविले. तेथेंच मेले. कैदेत राखी ठेविल्या, त्यांस संतान मुलें जालीं. तुळाजी वारल्यानंतर मुलें कोठें गेलीं त्याचें ठिकाण समजलें नाहीं ' [ खं. ६ ले ४५३ ].

' संभाजी आंगरे मयत झाल्यावर त्याचा सावत्र भाऊ तुळाजी आंगरे बाणकोटपासून सावंतवाडी दरम्यानचे मुलखाची वहिवट करीत होता. सरकारांत नेमणुकीप्रमाणें ऐवज न देतां उद्दामपणा करून समुद्रावरही लोकांस उपद्रव देत होता. त्याचे बंदोबस्ताकरिता पेशव्यानें इंग्रजांची मदत मागितली; आणि तुळाजीस धरून विसापूर किल्ल्यावर कैदेंत ठेविलें. ' [ खं. २ पे. श. पृ. १३३, १३४, १३९, १४० ].

'शाहूनें मृत्यूसमयीं पेशव्यास मुख्याधिकाराची सनद दिली, ती तुळाजी आंगरे मानीनासा होऊन, त्यानें पेशव्याशीं बिघाड केला. आरमाराच्या व किल्लेकोटांच्या भरावर तो पेशव्यास जुमानीत नसे. सबब पेशव्यानें पांच चार वर्षे उद्योग करून अखेरीस मुंबईकर इंग्रजांच्या मदतीनें त्याचें राज्य घेतलें, व त्यास सहकुटुंब कारागृहांत घातलें; पण यांत बहुतेक लोकांना माहीत नाहीं अशी गोष्ट ही आहे कीं, तुळाजी आंगरे हा चित्पावनांचा कट्टा द्वेष्टा असून तो त्याचा फार छळ करूं लागला होता. तुळाजीची हद्द बाण-कोटापासून विजयदुर्गपर्यंत होती; व हा टापू चित्पावनांचे माहेरघर होय. पेठे, फडके, परचुरे, रास्ते, भावे, देशमुख, घोरपडे, जोशी, बारामतीकर जोशी, सोलापुरकर जोशी, बर्वे, पटवर्धन, मेहेंदळे, भानू, लागू, इत्यादि पेशवाईतील दरबारी व सरदारी लोकांची मूळ घराणीं याच टापूंतलीं आहेत. आपल्या अधिकारास न जुमानणाऱ्या प्रतिनिधीला व दमाजी गायकवाडाला पेशव्यानें त्यांचे सरंजाम खालसा न करितां सोडून दिलें; आणि तुळाजीचा मात्र परकीयांची मदत घेऊन, समूळ उच्छेद केला, यावरून पेशव्यांच्या या वर्तनाला जात्यभिमानाची कांहीं तरी प्रेरणा असावी, असें अनुमान करणें अन्यायाचें होणार नाहीं. हा चित्पावनांचा द्वेष तुळाजीच्या मृत्यूबरोबरच शांत झाला. तो पुढें चालविणारा पुढें कोणी उत्पन्न झाला नाहीं.' [ मराठे व इंग्रज प्र. पृ १८ खरे. ]

'तुळाजी आंगरे यांणीं हुजूरचे नेमणुकेचा ऐवज न देतां प्रधानपंत यांशीं उद्दामपणें चालूं लागले. याजवरून फौज व सरदार रामाजी महादेव व विसाजी केशव व माणकर वगैरे रवाना केले, आणि इंग्रजांकडे मुंबईस राजकारण पाठवून त्यांचें आरमार व लोक पाण्यांतून कुमकेस आणविले; आणि तुळाजीचे तालुक्यांत जाऊन किल्ले व जंजिरे यांस मारागिरी करून मोर्चे दिल्हे. बहुत जेर केले. तथापि उद्दामपणा न सोडतां तह व ऐवज कांहीं न बोलत. त्यावरून हल्ला करून विजयदुर्ग व सुवर्णदुर्ग किल्ले घेतले. तुळाजी आंगरे धरिले. कुटुंबसुद्धां कैद करून आणिले. बेडी घालून

किल्ल्यावर टाकिले. त्यांजकडे तालुका व किल्ले सत्तावीस खुष्कीचे व बंजिरे होते ते एक महिन्यांत सर्व घेतले. ' [ धा. रा. म. च. पृ. २१ ].

तुळाजी आंगऱ्याची पेशव्याशीं वागणूक कशी होती, हे या उताऱ्यावरूनच ताडलें पाहिजे. याशिवाय ज्यास्त भरंवसेलायक पुरावा त्यासंबंधानें उपलब्ध नाहीं. सामान्यतः तुळाजीला सर्वच लोक कांपत असत. पेशव्याला आपली हुकमत निर्बाध करावयाची होती. गायकवाड, दाभाडे, प्रतिनिधि इत्यादि सरदारांस पेशव्यानें आपल्या हुकमतींत कसें आणिलें हें मागें दर्शविलेंच आहे; आणि त्याच पद्धतीनें पेशव्यानें तुळाजीस नरम आणिलें असतें, तर त्यास दोष देण्यास विशेष अवसर सांपडला नसता; परंतु आरमाराच्या जोरानें वावरणाऱ्या तुळाजीस नुसत्या फौजेच्या बळावर जिंकणें पेशव्यास शक्य नव्हतें. याच कारणास्तव आरमारास प्रतिआरमार आणून तुळाजीशीं युद्धप्रसंग करण्याचा पेशव्यानें व्यूह रचिला. हें प्रतिआरमार म्हणजे इंग्रजाचें होय. त्यांची मदत घेण्यात पेशव्यानें मुत्सद्देगिरीची चुकी केली, ती तूर्त बाजूस ठेवून इंग्रजांचा व पेशव्याचा संबंध कशाप्रकारचा होता, हें प्रथम पाहिलें पाहिजे.

३ आगऱ्यास बुडविण्याची तयारी:—रिचर्ड बूर्शियेर हा ता. १७ नोव्हेंबर स. १७५० रोजीं मुंबईचा गव्हर्नर होऊन आला; आणि एका आठवड्यानें त्यानें पेशव्यास पत्र पाठवून आपण आल्याची खबर दिली. स. १७४० त मुंबईकर इंग्रजांनीं मानाजीस मदत केल्यापासून पेशव्याच्या दरबारीं त्यांचें वजन बरेंच वाढलें होतें. मद्रासकरांनीं महंमदअलीचा पक्ष घेऊन फ्रेंचाचा नक्षा बराच कमी केला; येणें करूनही इंग्रजांचें महात्म्य वाढलें होतें. महाराष्ट्रांत बुसीनें निजामाचा पक्ष उचलल्यापासून फ्रेंचांचें वाढतें वजन कमी करण्याचा पेशव्याचा घाट असून, त्यासाठीं केव्हां बुसीस फोडून आपणाकडे आणणें, तर केव्हां इंग्रजांची दोस्ती संपादणें, हे डाव पेशव्यास खेळावे लागत होते. उत्तरेकडे सुरत येथें दोन मोगल अधिकाऱ्यांचा झगडा लागला असून, त्यांत जंजिऱ्याचा सीदी मस—ऊद,

दमाजी गायकवाड व इंग्रज इतक्यांचे हितसंबंध जुळले होते. या सुरत प्रकरणांत बाळाजीनें इंग्रजांची मदत मागितली असून, त्यांच्या मदतीनें सुरतेंत आपला अंमल बसविण्याचा पेशव्याचा विचार होता. मुंबईच्या गव्हर्नरानें मदत देण्याचें कबूलही केलें होतें, परंतु स १७५० पासून घरगुती व निजामाकडील प्रकरणांत पेशव्याचा काळ निघून गेल्यामुळें, त्यास हें सुरतेचें कारस्थान पुरें करण्यास सवड झाली नाहीं. शिवाय जंजिऱ्याचे सीदीचा पाडाव करण्याचाही पेशव्याचा उद्देश असून सीदी मसऊद सुरतेस राहून जंजिऱ्यास हरप्रकारची मदत पाठवी. ती बंद करण्यास इंग्रजांचा उपयोग पेशव्यास चांगला झाला असता, पण इंग्रजांचें व सीदीचें सख्य होतें. मराठी राज्यांत गोहत्या अजीबाद बंद असल्यामुळें, इंग्रजांस मुंबईस गोमांस मिळण्यास पंचाईत पडे. ही त्यांची गरज हा सीदी जंजिऱ्यांतून भागवीत असे; म्हणून सीदीचे विरुद्ध पेशव्यास मदत करण्यास इंग्रज तयार नसत. अशा स्थितींत मुंबईकर इंग्रज पेशव्यांस मदत करण्यास तयार असूनही चार पांच वर्षे पावेतों असा योग घडून आला नाहीं. उभयतानीं शस्त्र उचलण्याचा योग अखेर तुळाजी आंगरे त्यांस उपलब्ध झाला.

रामाजी महादेव बिवलकर हा महा दीर्घसूत्री गृहस्थ पेशव्यांचा कोंकणांतील सरसुभेदार असून, नानासाहेबाच्या अत्यंत विश्वासांतला होता. तीस चाळीस वर्षेपर्यंत कोंकणच्या कारभाराचीं एकून एक सूत्रें व छिद्रें त्यास अवगत झालेलीं होतीं. अलीबागेस पुढें आंगऱ्यांचे दिवाण म्हणून जे बिवलकर झाले, त्यांचा व रामाजी महादेवाचा कांहीं संबंध नाहीं. साष्टी, वसई, ठाणें व कुलाबा हे प्रांत रामाजीच्या हद्दींतले असून त्याचें वास्तव्य कल्याणास होतें. अद्यापि या घराण्याचा वाडा व वंशज कल्याणास आहेत. ठाणें येथील कौपीनेश्वराचें देवालय रामजीनें बांधिलें. हल्लींचें ठाण्याचें जज्जकोर्ट हाही रामाजीचाच वाडा होता. तुळाजीच्या विरुद्ध

१ पहा ऐ. ले. सं. भाग १ ला, सुरत शहरांतील धामधूम.—

इंग्रजांचें कारस्थान घडवून आणणारा हा रामाजी महादेव होय. बहुधा याचें व तुळाजीचें प्रत्यक्ष वांकडें असावें, कारण तुळाजीविरुद्ध चाललेला एकंदर व्यूह या रामाजीनें रचिला आहे. रामाजीच्या ठिकाणीं ज्यास्त उदारबुद्धीचा व दूरदृष्टीचा मनुष्य कोंकणचे कारभारावर असता तर कदाचित् या आंगऱ्याचे प्रकरणाचा निकाल अन्यतऱ्हेनें लागला असता. मराठ्याचे कारभारांत आपला हात शिरकण्यास मुंबईकर इंग्रज अत्यंत उत्सुक होते; आणि या रामाजीपंतास त्यांनीं वश करून आंगऱ्याचें आरमार नाहींसे करण्याचा आपला फार दिवसांचा उद्देश अल्पावधींत सिद्धीस नेला.

रत्नागिरि किल्ला बावडेकर अमात्यांचा असून तो तुळाजीनें हस्तगत केला होता, तो व सुवर्णदुर्ग असे दोन किल्ले तुळाजीजवळ पेशव्यानें मागितले. तुळाजीनें उत्तर सांगितलें कीं, सुईचे अग्रा इतकी मृत्तिका देणार नाहीं. " त्यावरून नानासाहेब व सदाशिवराव यांचे चित्तांत बहुत विषाद आला. तुळाजी आंगरे याणीं ब्राह्मणास व रयतेस यास छाडछेड बहुत मांडिली. दुर्वृत्त आपणें करूं लागले तींही पेशव्याचे कानांवर गेलीं. ते समयीं रामाजी महादेव यास सांगून, इंग्रज अनुकूळ करून तुळाजीवर मसलतीचा योग मांडिला. सुवर्णदुर्गांत व विजयदुर्गांत वगैरे फितुराचीं संधानें रामाजी महादेव खेळू लागले. मानाजीचा विकटगड किल्ला रामाजीनें भेदानें घेतला. त्याखालील मुलूख बहुतेक गेला. तेव्हां कुलाबासंस्थानचे खर्चास अडचण पडून मानाजीनें साबाजीबावा चिटणीस यास पुण्यास पाठवून हार्द्र समजाविलें. ते समयीं नानासाहेबानें चाळीस हजार रुपये दरसाल खर्चास द्यावयाची मखलासी करून दिली परंतु रुपये हातास आले नव्हते. ते समयीं कुलाबा दग्ध झाला. किल्ल्याचा सरंजाम भात वगैरे सर्व जळालें. लोकांचे खाण्याचे हाल बहुत. दौलतींत पैका नाहीं. वोढीस बहुत पडले. त्या संधींत हबशाचा सरदार हजार आठशें माणूस घेऊन एक लढाई मातबर दिली. तेव्हां मानाजीचे मांडीस गोळी लागली, ती

मांडींतच अडकली. आनंदराव घाटगे यांणीं थळापासोन वर सोळीपावेतों दुतर्फा बंदी केली. ते समयीं सर्वांनीं विचार करून तुळाजी आंगऱ्यास कुमकेस आणावयाचा ठराव केला. महादाजीराम पारसनीस डबीर याचा मुलगा त्रिंबक महादेव कारभारात होता त्यानें सांगितलें, तुळाजीचे मनांतील वांकडेपणा जात नाहीं. समयोचित बिथर होऊं शकेल. सबब रामाजी महादेव उरणास जंवळ आहेत त्यांस आणावें. यास कोणाचाही रुकार न पडे. तरी मानाजीबावांनीं तुळाजीस पत्रें लिहिलीं. तीं पाहून तुळाजीस मनस्वी राग येऊन मानाजी बावास शिवीगाळ केली. तें ऐकून मानाजीचा संताप जाला. शेवटीं संस्थान पेशव्यांचे घरांत घालीन, परंतु तुम्हांस कुलाब्यांत घेणार नाहीं, असा निरोप तुळाजीस मानाजीनें कळविला; आणि रामाजी महादेवास आणावयाचा निश्चय ठरविला. मानाजीचें पत्र रामाजीपंतास जातांच रामाजीनें मानाजीस मदत करण्याची शपथपूर्वक प्रतिज्ञा केली; आणि लोकांची तयारी करून कान्होजी गजे व संक्राजी बाजे दोन सरदार दोन हजार माणसांसह रामाजीपंत गलबतांत बसून आला. त्याचें पूर्वींच मानाजीनें हबशाचे फौजेचा पराभव करून त्यांचा सरदार आनंदराव घाटगे मारिला. मानाजीचे पायास जखम होऊन रक्त पुष्कळ गेलें. नंतर रामाजीपंताची व मानाजीची भेट रेवदंड्यास रामेश्वराचे देवळांत झाली. इतःपर मानाजीबावाविषयीं माझे चित्तांत वाकडेपणा असेल तरी याच देवाची शपथ, असे म्हणून देवावरचा बेल काढून मानाजीचे हातावर दिला. नंतर त्रिंबकजीबाबाचे मार्फत पुढील सर्व व्यवस्था ठरविण्यांत आली. रामजीपंतानें इंग्रजांशीं कारस्थान रचिलें होतें त्याचे सर्व कागदपत्र त्रिंबक महादेवास दाखविले. त्यांत सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथील भेदाचा व्यूह रचिलेला होता. तुळाजी आंगरे यांचे वाड्यांतील कुळंबिणी पावेतों भेदाचा मजकूर, कोणास बक्षीस काय द्यावयाचें, त्यांचे नांवनिशीवार नानासाहेब व भाऊसाहेब यांच्या हातच्या मखलाशा व इंग्रजांच्या अनुकूलतेचीं पत्रें. तुळाजी आंगऱ्याची जरब इंग्रजांस मोठी असल्यामुळें त्यास बुडविण्यासाठीं इंग्रज अनुकूल

झाला. त्रिंबकजीबावास रामाजीपंतानें सांगितलें, या कामीं मानाजीबावा अनुकूल होतील तर पेशव्यांजवळ सर्फराजी होईल. त्रिंबकजीबावानें मानाजीस हें सर्व कारस्थान कळविलें. परंतु पैसा नसल्यामुळें मानाजी ह्या बेतास एकदम अनुकूल झाला नाहीं. पुढें पेशव्यानें कबूल केलेली चाळीस हजारांची रक्कम मानाजीकडे पाठविली तेव्हां मानाजी अनुकूळ झाला. 'सारा जमाव करून रामाजीपंत निघोन सुवर्ण-दुर्गावर गेले. तों भेदाचे संकेताप्रमाणें दरवाजे उघडे होते. तसेच आंत कान्होजी गजे शिरले. तेथें दहा वीस असामींनीं घायतल केली. कान्होजी गजे यांस चार पांच जखमा लागल्या. परंतु किल्ला काबीज केला. कान्होजी गजांच्या जखमा बाधून बरदास्त चांगली केली. नंतर एक महिन्यानें विजयदुर्गावर मसलत केली. कांहीं लोक खुष्कीनें व कांहीं जलमार्गानें, व इंग्रजानीं आरमारानें किल्ल्यास मार देऊन तटबंदी फोडून किल्ला जेर केला. तेव्हां तुळाजी आंगरे बाहेर पडले. त्यांस बाहेर धरून इंग्रज किल्ल्यांत शिरला; आणि किल्ल्याची लूट करून तुळाजीचें आरमार जाळून टाकिलें. मागाहून रामाजीपंतानें रत्नागिरि वगैरे किल्ले काबीज केले. त्या वेळेस नानासाहेबानें बाणकोट व दासगांव इंग्रजांस दिल्हे. तुळाजीची सारी दौलत काबीज करून त्यास नेऊन कैदेंत ठेविलें.' [ इ. स. आंगऱ्यांची हकीकत ]. इंग्रजाचें कारस्थान व प्रत्यक्ष तुळाजीशीं झालेलें युद्ध हे प्रसंग फॉरेस्टच्या पुस्तकांत ज्यास्त खुलासेवार दिलेले येथें उतरून घेणें अवश्य आहे.

तुळाजीवर स्वारी करण्याचा विचार मुंबईकर इंग्रजांचा फार दिवस होता; परंतु पेशवे त्यांस अनुकूल नसते तर पूर्वीप्रमाणेंच आंगऱ्यावर स्वारीकरून यश मिळण्याचा संभव नव्हता; म्हणून याकामीं पेशव्यास आपणाकडे वळवून घेण्याची इंग्रजाची खटपट बरेच दिवस होती. त्या कामीं रामाजी-पंताचें साह्य त्यानीं मिळविलें. कदाचित् त्यास त्यानीं काहीं आमिषही दिलें असेल. रामाजीपंताविषयीं सामान्य लोकमत चागलें नव्हतें. तो

महा खटपटी व व्रात्य असा समजला जात असे. नानासाहेब पेशव्याचा तो केवळ आत्मलिंगाच होता. रामाजीपंतास राज्यकारभाराचें धोरण किंवा दूरदृष्टि होती असें दिसत नाहीं. इंग्रजांस घरांत घेऊन आंगऱ्यास बुडविल्यानें पुढें हें संकट आपल्याच राज्यावर येईल अशी त्यास कल्पनाही नव्हती. या बाबतींत पेशव्यानेंही स्वतंत्र विचार केला नाहीं. आंधळेपणानें रामाजीपंताचे कारस्थानास मंजुरी दिली. इंग्रज व फ्रेंच या दोघांस थोडेबहुत खेळवून आपण आपला उद्देश सिद्धीस नेऊं अशी पेशव्यास घमेंड होतीशी दिसतें.

तुळाजी आंगऱ्याविरुद्ध पेशव्यानें कोल्हापुरच्या संभाजीसही यावेळीं आपणाकडे वळविले होते ' रा. स्वामी करवीरवासी यांणीं तुळाजी आंगरे यांजकडून अंमल दूर करून सरकारांत दिल्हा असे सरकारतर्फेनें कमावीस खंडोजी माणकर यास सांगितली असे. ' म्हणून ताकीदपत्र ता. १८ फेब्रुवारी स. १७५५ चे आहे. [ ना. सा. रो. भा. १ ले. ८० ].

रामाजीपंताच्या कारस्थानाची हकीकत फॉरेस्टच्या[1] पुस्तकांतील कागदावरून कांहींशीं समजते. स. १७५५ च्या ता. ८ फेब्रुवारी रोजीं खालील पत्र पेशव्यानें मुंबईचा प्रेसिडेंट बूर्शियेर यास लिहिलें.

" पुणें, ता ८ फेब्रुवारी स. १७५५ वि. वि. आपलेकडून शिवाजी रणछोड यानीं येऊन हकीकत कळविली ती समजली. त्यास आमची कबुली आहे. आपणा उभयतांचा इतक्या दिवसांचा स्नेह असल्यामुळें आपली सल्ला आम्हास योग्य वाटते. आमच्यातर्फे बालाचाली करण्यांत रामाजीपंत यांस पूर्णपणे अधिकार देऊन पाठविले आहे ते लवकरच आपल्या जागीं जाऊन दाखल होतील. आपण आपलें आरमार तयारींत ठेवून मद्रासचें आरमारही मदतीस बोलवावें अशीं आपणास माझी विनंती आहे. आज हें पत्र लिहिण्याचा उद्देश इतकाच कीं, गेल्या सालपासून जो मनसुबा आपण ठरविला आहे, त्याच्या तयारीस तुम्ही

1 Forrest's Maratha Series.

मनापासून लागावे. तो लवकरच सिद्धीस जाईल अशी मी आशा बाळगतो. कळावें.'

'पुणें ता. ११ फेब्रुवारी स. १७५५ ( शिवजी रणछोड याजबरोबर आलेलें पत्र ):—वि. वि. आपलें सविस्तर पत्र पोंचलें. रामजीपंतानींही आपणास भेटून घडलेली हकीगत निवेदन केली. तुमच्या सरकारची आमच्याशीं स्नेह राखण्याची इच्छा पाहून संतोष वाटतो. गेल्या साली आह्मास एकायेकी कर्नाटकाच्या स्वारीस जावे लागल्यामुळे हें काम त्यावेळीं उरकून घेतां आलें नाहीं. आतां आमचा सर्व भरवसा आपणावर आहे. त्यास आतां रामचंद्रपंत यास आपणाकडे पाठविलें आहे. ते त्या स्वारीं-संबंधीं आपणाशीं सर्व वाटाघाट करतील, तर पुढील तजवीज अविलंबें करावी. आपली सूचना मला मान्य असून हा व्यवहार विलायतेत आपल्या यजमानासही पसंत पडेल असें आम्हांस वाटतें. कराराची यादी ह्या मोबत मोहोरबंद करून पाठविली आहे. आपल्या मदतीची आम्हास खातरजमा असून आमचा आपणावर पूर्ण भरंवसा आहे. दर्यावरील व्यवस्था सर्वस्वी आपल्याच ताब्यांत राहील. परमेश्वर या प्रयत्नास आपणास यश देऊन आपली व आमची दोस्ती वृद्धिंगत करील अशी आशा बाळगितों. कळावें.'

'पुणे ता. ( दाखल ता. ८ मार्च स. १७५५ ). वि. वि. गुदस्तसालीं रामाजीपंताचें व आपलें बोलणे होऊन मनसुबा ठरविण्यांत आला. परंतु आम्हास कर्नाटकांत जावें लागल्यामुळें तो त्यावेळीं सिद्धीस गेला नाहीं. यंदा तो मनसुबा सिद्धीस नेण्यासंबंधानें आपलीं दोन पत्रें आलीं; आणि शिवजी रणछोड याजबरोबर तोंडीं निरोप आले. त्यावरून हा उद्योग तडीस नेण्याचा निश्चय करून रामाजीपंत यांस आपणाकडे पाठविले आहेत. आपण आरमाराची तजवीज त्वरित करावी. दर्यावरील कामांत आम्हांस मुळींच वाकबगारी नाहीं असा ठपका आपण आम्हांस दिला आहे. पण ही गोष्ट आपण पूर्वीच कळविली असती तर त्याचा विचार करूनच आपणांस उत्तर पाठविलें असतें. आतां

रामाजीपंत यांजबरोबर वाटाघाट करून कळवावें. शिवाजीबरोबर निरोप आला, त्यास उत्तर म्हणून मागचें पत्र आपणास आम्हीं लिहिलें. आतां ह्या कामीं आपण माघार घेऊं नये. ह्यासंबंधानें सर्व भरंवसा आपणावरच आहे, आणि हा बेत सिद्धीस न जाईल तर लोकांत फार वाईट दिसेल. सबब आपण बनत्या त्वरेनें रामाजीपंताच्या विद्यमानें काम शेवटास न्यावें. विशेष हकीकत रामाजीपंतास सांगितली आहे, ते आपणास समक्ष कळवितील.'

ता. १० मार्च १७५५ रोजीं प्रे. बूर्शियर व कौन्सिल यांनीं नानासाहेब पेशव्याच्या पत्रांचा विचार करून रामाजीपंताबरोबर पुढील उद्योगाची वाटाघाट करण्याचा ठराव केला. रामाजीपंतानें निकड लाविली होती, कीं विजयदुर्ग प्रथम हल्ला करून काबीज करावा; परंतु आतां पावसाळा नजिक आल्याने विजयदुर्गाची स्वारी प्रथम हातीं घेऊं नये; प्रथम सुवर्णदुर्ग किल्ल्यास इंग्रजांनीं समुद्रातून वेढा घालावा; आणि मराठ्यांनीं जमिनीवरून त्याजवर हल्ला करावा असें ठरवून त्याप्रमाणें आरमार रवाना करण्यांत आलें. ह्या सुवर्णदुर्ग ( म्ह० हर्णैचा किल्ला ) काबीज करण्यासंबंधानें पेशव्याचा रामाजीपंत सुभेदार व इंग्रजांचा प्रे. रिचर्ड बूर्शियर ( Bourchier ) यांजमध्यें झालेला तह. ( १९ मार्च १७५५ ).

१ सर्व आरमार इंग्रजांच्या ताब्यांत असावें; परंतु सर्व कारभार उभयतांच्या संमतीनें व्हावा.

२ तुळाजी आंगऱ्याकडून जीं जहाजें काबीज करण्यांत येतील तीं इंग्रजमराठ्यांनीं निमेनिम वांटून घ्यावी.

३ बाणकोट व हिंमतगड आणि नदीच्या दक्षिण कांठावरील पांच गांवें मराठ्यांनीं इंग्रजांस कायमचीं द्यावीं.

---

१. [ वरील पत्रावरून आंगऱ्यास बुडविण्याचें कारस्थान आरंभीं इंग्रजांनीं उपस्थित केलें, आणि त्यांत रामाजीपंत हा कारस्थानी असावा असें दिसतें. ]

४ पश्चिम किनाऱ्यावरून आंगऱ्यांनीं कोणत्याही किल्ल्यास समुद्रांतून मदत पोंचवूं नये असा बंदोबस्त इंग्रजांनीं ठेवावा.

५ आंगऱ्यांच्या मुलखांतील किल्ल्यांत जें द्रव्य, सामान, दारूगोळा, तोफा वगैरे सांपडेल तें सर्व मराठ्यांस देण्यांत यावें.

६ मानाजीच्या मुलखावर उभयतांनीं हल्ला केल्यास खांदेरी, बेट व बंदर व कित्येक गांवें इंग्रजांस द्यावीं.

७ जरुरीप्रमाणें जास्त कलमें नानासाहेबांच्या संमतीनें ठरविण्यांत यावीं.

ह्या ठरावान्वयें आरमाराधिपति वुल्यम जेम्स ह्यास इंग्रजांनीं सुवर्णदुर्ग किल्ल्यावर हल्ला करण्याचा हुकूम केला. स्वारीबरोबर रामाजीपंत होता. मराठ्यांच्या आरमाराचा मुख्य नानापंत म्हणून होता. ता. २१ मार्च १७५५. खुष्कीच्या मार्गानें मराठ्यांची फौज समशेर बहाद्दर व दिनकरपंत ह्यांच्या हाताखालीं देवसूख येथें मुक्कामास होती. तेथून ते सुवर्णदुर्गावर येत होते.

४. सुवर्णदुर्ग काबीज:—( २२-४-१७५५ )—ता. ११ एप्रिल रोजीं कमांडर जेम्सचें पत्र मुंबईच्या प्रेसिडेंटास आलें. त्यांत सुवर्णदुर्ग काबीज केल्याचा वृत्तांत खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

'ता. २२ मार्च सन १७५५ रोजीं सायंकाळीं पांच वाजतां आमचें आरमार मुंबईचें बंदर सोडून निघालें. दुसऱ्या दिवशीं राजापुरीच्या बाहेर आंगऱ्यांचीं अठारा जहाजें आम्हांस दिसलीं, त्यांचा आम्हीं पाठलाग केला. तेव्हां तीं पळून गेलीं. नंतर दोन दिवसांनीं पेशव्यांचें आरमार चौल बंदरांतून बाहेर येऊन आम्हांस सामील झालें. त्यांचीं सात गुरावें, एक बातेला आणि साठ गलबतें होतीं. रस्त्यांत कामोराच्या बंदरात त्यांनीं मुक्काम करून तीस तास फुकट घालविले. नंतर आम्ही श्रीवर्धनच्या बंदरांत आलों. तेथेंही पेशव्यांच्या आरमारानें मुक्काम

---

१ या तहानें पश्चिम किनाऱ्याच्या बंदोबस्ताचें काम पेशव्यांनीं स्वखुषीनें इंग्रजांचे हवालीं केलें हें वाचकांचे ध्यानांत येईल.

करून दोन दिवस फुकट घालविले. आंगऱ्यांचीं जहाजें सुवर्णदुर्गास पोचल्याचें कळलें, तेव्हां पेशव्यांचीं कांहीं जहाजें घेऊन आंगऱ्यावर हल्ला करण्याचा मीं बेत केला, तो पेशव्यांस पसंत पडला नाहीं. आमच्या व पेशव्यांच्या आरमारांची फाटाफूट होणें पेशव्यास पसंत नसे. २९ तारखेला आंगऱ्यांचा व आमचा सामना होऊन तोफांची सरबत्ती सुरू झाली. आंगरे पळूं लागले. त्यांचा आम्हीं तीन वाजेपावेतों पाठलाग केला. पाठलाग करीत आम्हीं जयगड पावेतों आलों; परंतु आंगऱ्यांचीं जहाजें आमच्या तावडींतून निसटलीं. पेशव्यांच्या जहाजांनीं काहींएक पराक्रम केला नाहीं. वास्तविक पाहतां आंगऱ्यांचेंच लोक हरएक कामांत मोठे कुशल होते. मागे रामाजीपंत एकटा आहे, असें पाहून मी आंगऱ्यांचा पाठलाग सोडून दुसऱ्या दिवशीं सुवर्णदुर्गास परत आलों. मी येण्यापूर्वीच रामाजीपंतानें कांहीं लोक व एक तोफ किनाऱ्यावर उतरवून लढाईचा पोरखेळ चालविला होता. ता. २ एप्रिल रोजीं मीं सुवर्णदुर्गावर मारा सुरू केला. पेशव्यांचीं जहाजें निलाजेरपणानें आमची मजा पाहत उभीं होतीं. कितीदां सांगितलें तरी तीं पुढें येऊन आम्हांस मदत करीनात. तेव्हां त्यांच्या मदतीची आशा सोडून मी एकट्यानेंच हल्ल्याचें काम चालू केलें. रात्रीं वादळ सुरू झालें. तेव्हां आम्हीं जरा बंदराच्या बाहेर आलों असतां रामाजीपंतानें मजकडे येऊन अशी बातमी सांगितली, कीं किल्ल्याचा किल्लेदार व आठ माणसें ठार झालीं असून, आतां तीनशें पेक्षां जास्त लोक किल्ल्यांत नाहींत. मीं उत्तर दिलें, असें आहे तर एकहजार लोक मजबरोबर द्या; म्हणजे गलबतांवरील तोफांच्या आश्रयानें मी ते लोक घेऊन जमिनीवर उतरतों, आणि एकदम हल्ला करून किल्ला काबीज करतों. हा बेत रामाजीपंतास पसंत पडला नाहीं. हाताखालचे लोक त्याचा हुकूम पाळतात, असें मला वाटत नाहीं. सर्व लोक त्यास हरएक बाबतींत अडवीत असावेत असें दिसतें. एकंदर युद्धांत पेशव्यांच्या आरमारानें पन्नास सुद्धां गोळे टाकले नसतील. एवढ्याच कारणामुळें हें काम अर्धें टाकून यावें, असें मला वाटलें

नाहीं. तेव्हां मी एकट्यानेंच पुढें उद्योग चालवून ३ तारखेला आम्ही आपलीं जहाजें किल्ल्याच्या अगदीं जवळ आणिलीं. किल्ल्यांतील लोकांचाही मारा काहीं कमी नव्हता. सकाळीं नऊपासून तीन तास आमचा मारा चालला. बारा वाजण्याच्या सुमारास किल्ल्यांतील दारूखाना आग लागून उडाला. तेव्हा किल्ल्यांतील लोक सैरावैरां पळूं लागले. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तहाचा बावटा घेऊन किल्ल्यांतील लोक रामाजीपंताकडे आले. तेव्हां आम्हीं तोफा थांबविल्या. पुढें जमिनीवर उतरलों. रामजीपंतांनें कळविलेली हकीकत खरी नव्हती. किल्ल्यात फौज बरीच होती. ती मारली न जाता बरीचशी पळून गेली होती. कालचा दिवस बोलाचालींत गेला. बोलाचालींत अशी वेळ काढून शत्रूचे लोक बाहेरून मदत येण्याची वाट पहात आहेत, असा मला संशय आला. तेव्हां आम्हीं एकदम आज सकाळीं तोफांचा मारा करून किल्ल्यांत शिरलों, त्याबरोबर किल्ला आमच्या हातांत आला. लगेच ही आनंदाची बातमी मी आपणांस लिहून कळवीत आहे. जास्त लिहिण्यास मला आता अवकाश नाहीं. तरी पण इतकें खरें कीं सुवर्णदुर्ग किल्ला आपणास वाटला होता त्यापेक्षां फारच बळकट आहे. बहुतेक किल्ला मजबूद खडकावर असून तटाला चार चार फूट लांबी रुंदीचे मोठाले लाल दगड आहेत. आमच्या तोफांचे गोळे ह्या दगडांवर आपटून ठिकऱ्या होऊन खालीं पडत. पण दगडास भंग होत नसे. एकंदर सवाशेंवर तोफा किल्ल्यात आहेत. सभोवारचा प्रदेश सुपीक व सुंदर आहे. त्या प्रदेशातून दरसाल दोन लाख उत्पन्न आगऱ्यांस मिळतें, असें मला कळतें. लोकवस्ती दाट आहे. ह्या युद्धानें किल्ल्याची खराबी झाली आहे. लोक नागवे उघडे व दीनवाणी होऊन हिंडत आहेत.रामाजीपंत हा दयार्द्र अंत:करणानें सर्वांची विचारपूस करीत आहे. आमचे एकंदर ७९० गोळे व ४० दारूचीं पिपें Barrel खर्च झालीं;'

ह्याचवेळीं रामजीपंताचें पत्र प्रेसिडेंटास आलें तें असें:—' आह्मी चौलहून निघून श्रीवर्धनास पोंचलों, आणि मार्चच्या २७ तारखेस हरणई जवळ आलों असतां आंग्र्यांचें आरमार आमच्या दृष्टीस पडलें; त्याचा आह्मीं जयगडपर्यंत पाठलाग केला. पुढें सुवर्णदुर्गास येऊन मी आपली फौज जमिनीवर उतरविली; आणि किल्ल्यावर मारा सुरू केला. आपल्या आरमारानें समुद्रांतून व आमच्या फौजेनें जमिनीवरून मारा करीतांच किल्ला जेरीस आला; आणि आम्हीं जमिनीवरून हल्ला करितांच तो माझ्या हस्तगत झाला. हा जय सर्वस्वी आपल्या मदतीचें फळ होय; आणि हा प्रकार मी नानासाहेब पेशव्यास कळविला आहे. अद्यापि आम्हांस आपली मदत घेऊन आंग्र्याच्या ताब्यांत असलेले सर्व किल्ले काबीज करावयाचे आहेत. '

त्यानंतर ता. १७ एप्रिल १७५५ चें रामाजीपंताचें दुसरें पत्र प्रेसिडेंटास आलें तें येणेंप्रमाणें:—'आपल्या मदतीनें आम्हीं सुवर्णदुर्ग व दुसरे सहा किल्ले काबीज केले; आणि लगेच रसाळगडावर मोहीम करणार, इतक्यात पेशव्याकडून हुकूम आला, कीं अंजनवेल व दाभोळच्या हद्दींतले किल्ले प्रथम घ्यावे, आणि त्यासाठीं आपली मदत मागवावी. दामोदरपंत व रामशेट बहाद्दर हे आतां आमच्या मदतीस आले आहेत. सबब रामजी शिवजी यांस हें पत्र देऊन आपणाकडे पाठविले आहेत, तरी आपलें आरमार ताबडतोब इकडे पाठविण्याची तजवीज व्हावी. सुवर्णदुर्गचें काम आपल्यामुळेंच फत्ते झालें, तेव्हां पुनः आतां मदत पाठविण्यास आपण अनमान करणार नाहीं, अशी आशा आहे. अखेरचे दिवस आले, ह्या सबबीवर मदत पाठविण्यास हरकत करूं नये. विशेष हकीकत रामजी शिवजी सांगतां कळेल. नाना वासुदेव व शिवजी मोहिते यांस तहाचें बोलणें करण्यासाठीं तुळाजी आंग्र्यानें पाठविलें आहे. हें आपणास कळावें म्हणून लिहिलें आहे '[1]

---

१ पेशव्यांनीं रामाजी महादेव बिवलकर यास पाठवून शके १६७७त आंग्र्या-पासून अंजनवेल घेतली ( भा. इ. सं. मं. वा. इ. शके १८३५ पृ. ३३७ ).

वरील मतलबाचें पत्र ता. १८ एप्रिलचें नानासाहेब पेशव्याकडून प्रेसिडेंटास आलें, त्यांत आणखी असा मजकूर होता की, समशेर बहादरानें रत्नागिरीच्या किल्ल्यास वेढा घातला आहे, तरी त्याच्या मदतीस आपण आपलें आरमार तावडतोब पाठवावें. आमच्या लढाऊ जहाजांनीं सर्वस्वी आपल्या हुकमतींत वागावें अशी सक्त ताकीद आम्हीं त्यांस दिली आहे.

इतक्यावर पावसाळा समीप आला असें सांगून इंग्रजांनीं आपलें आरमार परत बोलाविलें, त्यामुळें रामाजीपंताची पुष्कळ निराशा झाली. एकाच खेपेस रत्नागिरी घेऊन लगेच विजयदुर्ग काबीज करावा अशी पेशव्यांची इच्छा होती. रामाजीपंतानें पुष्कळ आर्जवाचीं पत्रें पाठविलीं, पुण्याहून पेशव्याचेंही पत्र प्रेसिडेंटास आलें, त्यांतही रत्नागिरीस मदत लवकर पाठवा, अशी मागणी होती. त्यावरून ता. २९ एप्रिल रोजीं रत्नागिरी पावेतों जाण्याचा प्रेसिडेंटानें आरमारास हुकूम केला, परंतु १५ मेच्या आंत आरमारानें मुंबईस परत आलें पाहिजे, अशी त्याची ताकीद होती. रामाजीपंतासही त्यानें अशाच मजकुराचें पत्र पाठविलें. परंतु विजयदुर्गची मोहीम पुढील सालावर गेली.

५. विजयदुर्गचा पाडावः–(१३ फेब्रुवारी १७५६) पुढील वर्षाच्या म्हणजे स. १७५६ च्या जानेवारी महिन्यांत विजयदुर्गाची मोहीम सुरू झाली. मद्रासचें आरमार ॲड्मिरल वॅाटसन् व कर्नल क्लाईव्ह ह्यांच्या हाताखालीं मदतीस आलें होते. ॲ. वॅाट्सन् हा राजाच्या आरमाराचा मुख्य असून कर्नल क्लाईव्ह फ्रेंचाशीं लढाण्याकरितां मुद्दाम पाठविलेला होता. मुंबईच्या प्रेसिडेंटाकडून त्यास खालील मतलबाचा हुकूम दिलेला होता. (६ फेब्रुवारी १७५६)

'तुळाजी आंगरे सांपडल्यास त्यास मुंबईस आणावा. विजयदुर्ग घेतल्यावर आंगऱ्यांचे बाकीचे किल्ले घेण्यास आरमारानें पेशव्याच्या फौजेबरोबर जावे, बाणकोट व हिंमतगड पेशव्यानें इंग्रजांस दिले आहेत,

परंतु त्या प्रदेशाची हद्द ते अजून ठरवून देत नाहींत. ती ठरवून देईपर्यंत विजयदुर्ग किल्ला काबीज केल्यावर पेशव्यांच्या स्वाधीन करूं नये. हरेश्वरचें ठिकाण आपणास पाहिजे आहे. सबब कोणत्याना कोणत्या सबबीनें तें घेण्याची तजवीज करावी. दुसरीं जीं ठिकाणें आपल्या व्यापाराच्या व आरमाराच्या सोयीचीं अशीं तुह्मांस आढळतील, तीं तहाच्या वेळीं मिळविण्याचा प्रयत्न अवश्य करावा. तुळाजी आंग्रे हा तुह्मांस लांच देऊं करील, किंवा स्वाधीन होतो म्हणेल, परंतु तुह्मी पक्कें ध्यानांत ठेवा कीं, तो पहिल्या प्रतीचा लबाड आहे. त्याच्यावर बिलकूल विश्वास ठेवूं नये. तो केव्हा काय करील त्याचा नेम नाहीं. दंड देतों म्हणेल तर तो, त्यानें आजपर्यंत आमचीं मोठमोठीं जहाजें नाहींशीं केलीं आहेत, आणि नानाप्रकारें दरसाल तीन चार लाखांवर आज कित्येक वर्षें तो आमचें नुकसान करीत आहे, इतकें सर्व नुकसान आमचें भरून निघेल इतका दंड ठरवावा. एवढा पैसा त्याजपाशीं असणें शक्य नाहीं, सबब तुळाजीचा हा कांटा समंध काढून टाकावा, हेंच सर्वांस श्रेयस्कर असून जिवंत सांपडलाच तर त्यास मुंबईस आणावें. पेशव्यांचे हातीं त्यास देऊं नये; कारण ते कदाचित् त्यास पुनरपि मोकळा सोडतील आणि तो पुनः आपणास पहिल्यासारखा त्रास देऊं लागेल' ( तुळाजी आंग्र्यासंबंधानें इंग्रजांचें हें मत मोठें ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. )

तुळाजी संबंधानें इंग्रजांची जळफळ सारिजच्या (Surridge) खालील उद्गारांवरून चांगली व्यक्त होते. 'मनुष्यास गर्व चढला कीं विनाश समीप आला ह्मणून समजावें. पूर्वींच्या आपल्या उपकारकर्त्यांविरुद्ध तुळाजीनें जें उद्दाम आचरण केलें तेंच त्याच्या नाशाचें मुख्य कारण होय. पूर्वीं केलेल्या मदतीच्या स्मरणार्थ आंग्रे हा पेशव्याला दरसाल कांहीं खंडणी पाठवीत असे. तुळाजीनें ही खंडणी पाठविण्याचें बंद केलें. ती मागण्याकरितां पेशव्यानें त्यांजकडे वकील पाठविले. त्या वकिलांचीं नाकें कापून

त्यांस तुळाजीनें खरमरीत निरोप देऊन परत पाठविलें. हें पाहून पेशव्यांला त्वेष आला, आणि लगेच त्यानें तुळाजीच्या नाशास्तव इंग्रजांची मदत मागितली. याच वेळीं ॲडमिरल वॅाट्सन व क्लाईव्ह यांचे हाताखालीं विलायतेहून भलें मोठें आरमार मुंबईचे बंदरांत दाखल झालें. त्यास कांहीं कामगिरी नव्हती. सबब पेशव्यानें मागितलेली मदत कबूल करून आंगऱ्यावरील फार दिवसाचा सूड उगवण्याचा इंग्रजांनीं यावेळीं बेत ठरविला. फ्रेंचांचें वजन निजामाचे दरबारांतून काढून टाकण्यासाठीं ही फौज मुख्यतः आली होती; आणि महाराष्ट्रांत जाण्यासाठीं ती परभारें मुंबईस उतरली. तेथें आल्यावर मद्रासेस इंग्रज-फ्रेंचांचा तह झाल्याची वार्ता क्लाईव्ह यास कळली. म्हणून कोठें कांहीं तोंडांत टाकण्याची कामगिरी आहे किंवा नाहीं याचा तपास करितां क्लाईव्ह यास विजयदुर्ग संबंधानें मराठ्यांशीं झालेल्या तहाची वार्ता कळली. त्याबरोबर तो व वाट्सन विजयदुर्गावर चालून आले. [ ब्रि. रि. पृ. ५७३ ]

इकडे नोव्हेंबर स. १७५५ पासून म्ह० आरमाराचें युद्ध चालू होण्याचे अगोदर पासूनच पेशव्याची फौज खंडोजी माणकराचे हाताखालीं आंगऱ्याचे मुलखांत शिरून रामाजीपंताच्या सल्ल्यानें त्याचा प्रदेश काबीज करीत चालली होती. डिसेंबर जानेवारी पावेतों या फौजेनें विजयदुर्ग किल्ल्याशिवाय बाकीचा सर्व प्रदेश काबीज केला. असें दुहेरी संकट आलेलें पाहून तुळाजी आंगरे आपल्या बचावासाठीं रामाजीपंताकडे येऊन पेशव्याशीं गोडी करण्याच्या खटपटीस लागला. अशी गोडी झाली असतां विजयदुर्गाचा लाभ हातचा जाईल असें इंग्रजांस वाटलें; आणि आपणास विचारल्याशिवाय मराठ्यांनीं परभारें तुळाजीशीं बोलणें सुरू केलें, येणेंकरून पेशव्यांनीं आपला करार मोडला असें निमित्त करून इंग्रज एकदम विजयदुर्गावर चालून आले. अशारीतीनें एकदम हल्ला करण्यास पेशव्यांची संमति नव्हती. वाट्सननें समुद्रांतून व क्लाईव्हनें जमिनीवरून किल्ल्यास वेढा दिला. ही गोष्ट रामाजीपंतास कळतांच, इंग्रजांनीं वेढा उठविण्या-

विषयीं रामाजीनें पुष्कळ प्रयत्न केले, पण ते सिद्धीस गेले नाहींत. इंग्रजांस किल्ल्यांत दहा लक्षांचा ऐवज मिळाला, तो त्यांनीं एकट्यांनींच घेतला. मराठ्यांच्या व्यवहारांत इंग्रजांचा हा प्रथम प्रवेश होय. [ब्रि. रि. पृ. ५७४]

पुढें लवकरच एक विचित्र गलबत बंदराजवळ येत असल्याचें विजयदुर्गच्या किल्ल्यांतून तुळाजीनें पाहिलें. वाघाच्या दाढेंत हें मेंढरूं अशी उडी कां घालतें यांचें तुळाजीस क्षणभर आश्चर्य वाटलें. परंतु दूरबीण लावून पाहतांच, तो त्वेषानें म्हणाला, ' माझ्या सर्व खलाशांची अक्कल गुंग झाली काय ! तोफा कां नाहीं डागीत ते ह्या चोरावर ! ' या गलबताची वर्तणूक मात्र त्यास मोठी विचित्र वाटली. इकडून तिकडे फिरणें, क्षणांत उभे राहणें, क्षणांत बाजूस वळणें, असें या विक्षिप्त पाहुण्याचें वर्तन पाहून तुळाजीची तब्यत गेली. त्यानें लगेच त्याजला पकडून आणण्यासाठीं आपलीं दोन जहाजें रवाना केलीं. या जहाजांस पाहून त्या विक्षिप्त पाहुण्यानें यःपलाय केलें. आंगऱ्यानें कितीही पाठलाग केला तरी तें हातीं आलें नाहीं. वॉट्सनचा विश्वासु मदतनीस सर वुल्यम ह्यूएट ( Hewett ) विजयदुर्ग बंदराची टेहळणी करून बंदराची रचना व ठाव वगैरेचीं सर्व माहिती घेऊन गेला हें तुळाजीस समजलेंच नाहीं. [ Surridge ]

ता. ७ फेब्रुवारी रोजीं इंग्रजांचें आरमार मुंबईहून निघालें. ता. १३ रोजीं विजयदुर्ग किल्ला त्यांच्या हातांत पडला. ता. १८ रोजीं मुंबईस ती बातमी पोंचली, त्या वेळीं वॉटसन्चें पत्र ता. १४ चें आलें तें येणेंप्रमाणेः—

' ता. ११ रोजीं सायंकाळीं आमचें आरमार विजयदुर्गपुढें येऊन दाखल झालें. त्या वेळीं तुळाजीआंगऱ्याचें व पेशव्यांचें तहाचें बोलणें चाललें असल्याचें मला कळलें. तेव्हां तुळाजीस ह्या बाबतींत अवकाश द्यावयाचा नाहीं, असा निश्चय करून एकदम किल्ला स्वाधीन करून देण्याविषयीं मीं त्यास निरोप पाठविला. उरलेल्या वेळांत जबाब न

आल्यामुळें आणि पेशवेही जरा कां कूं करीत आहेत असें पाहून ता. १२ रोजीं आम्हीं किल्ल्यावर तोफांचा मारा सुरू केला. चार वाजतां आमचा एक गोळा आंगऱ्यांच्या जहाजावर पडून त्यांची सर्व लढाऊ जहाजें जळून खाक झालीं. ता. १३ रोजीं सकाळीं आमचे कांहीं लोक जमिनीवर उतरले. पेशव्यांची फौजही उतरणार होती. तीस उतरू देऊं नये म्हणून आम्हीं पुनः किल्ल्यावर मारा सुरू केला. कॅप्टिन फोर्ड ६० लोक बरोबर घेऊन संध्याकाळीं किल्ल्यांत शिरला आणि त्यानें वर आमचें निशाण लाविलें. आज सकाळीं आमची सर्व फौज किल्ल्यांत गेली. आज रामाजीपंत आमच्या भेटीस येणार आहे. तेव्हां तुळाजीस मी आपल्या ताब्यांत मागणार आहे. लढाईंत म्हणण्यासारखें आमचें नुकसान झालें नाहीं.'

ता. ७ फेब्रुवारी १७५६ रोजीं वाट्सनचीं जहाजें मुंबई बंदर सोडून निघालीं. क्लाईव्हचे हाताखालीं जमिनीवर लढणारी फौजही त्याच जहाजांवर आली. त्यांच्या मदतीस पेशव्यानें आपलीं ४०।५० जहाजे पाठविलीं. पूर्वेकडच्या बाजूस पेशव्याची दहा हजार फौज तंबू ठोकून उतरली होती. एवढा शत्रू एकदम चालून आलेला पाहून तुळाजीचा धीर सुटला. त्यानें बंधूस किल्ल्याचे रखवालीस ठेवून, मराठ्यांचे छावणींत धाव घेतली. पेशव्याची समजूत कशीतरी काढतां आली तरच या प्रसंगांतून निभावणूक आहे असें त्यास वाटलें. परतु आपल्या वकिलांचा तुळाजीनें केलेला अपमान पेशव्याचे मनांत सलत होता, म्हणून पेशव्यानें (किंवा रामाजीपंतानें) तुळाजीचें म्हणणें मान्य केलें नाहीं. नंतर चार दिवसांनीं इंग्रजांचें आरमार बंदरांत दाखल झालें; आणि त्यानें किल्ल्यावर तोफांचा भडिमार चालविला. तुळाजीच्या तोफांनींही चांगलाच पराक्रम इंग्रजांस दाखविला. असा हा तोफांचा मारा चालला असतां, बंदरांतील आंगऱ्यांच्या एका जहाजांतून जोराच्या ज्वाला वर निघूं लागल्या. तोफेच्या गोळ्यानें ही आग लागली असावी. एका गलबतावर आगीचा भडका होतांच एका मागून

एक सर्वच आंगऱ्यांचीं जहाजें आगीच्या तावडींत सांपडलीं. आणि ज्या जहाजांचा शेंकडों वर्षें एवढा मोठा दरारा वाटत होता तीं सर्व घटका अर्ध घटकेंत जळून खाक झालीं. इकडे तोफांच्या माऱ्यानें किल्लाही शांत झाला. तेव्हां क्लाईव्ह आपली फौज घेऊन किल्ल्याच्या व मराठी फौजेच्या दरम्यान जमिनीवर उतरला. हेतु हा कीं, किल्ल्यांत जो अगणित द्रव्यसंचय होता तो मराठ्यांचे हातीं लागूं द्यावयाचा नाहीं. पुढें तुळाजीनें पांढरें निशाण लावून शरण आल्याची खूण करतांच मराठे लोक द्रव्याचे लोभानें किल्ल्याकडे धावून आले. हें पाहून इंग्रजांचा एक अधिकारी कप्तान फोर्बस् हातीं नागवी तलवार घेऊन त्यांजपुढें उभा राहिला; आणि ओरडला, 'खबरदार, एक पाऊल पुढें टाकाल तर या तलवारीनें डोचकींच उडवीन.' हे शब्द ऐकून मराठे खेद पाऊन मागें सरले. किल्ल्यांत इंग्रजांनीं प्रवेश केला, तेव्हां तेथें त्यांस आठ इंग्रज, दोन स्कॉट् आणि तीन डच गृहस्थ अंधार कोठडींत अडकवून ठेवलेले आढळले. लूट मिळाली तिची गणतीच नाहीं. आंगऱ्यानें पुनः कधींही वर डोकें काढूं नये अशी तजवीज इंग्रजांनीं कायमची केली हें सांगणें नकोच. [ Victor Surridge चे पुस्तकांतून उध्दृत ]. तुळाजीकडे तालुका व २७ किल्ले खुष्कीचे व जंजिरे होते ते सर्व एक महिन्यांत घेतले [ भा. रा. च. पृ. २१ ].

कमॅडर होफच्या डायरींतील मजकूर. 'ता. १५ रोजीं रामाजीपंत वॉट्सनच्या भेटीस आला. इंग्रजांच्या निशाणाबरोबर पेशव्यांचेंही निशाण किल्ल्यावर लावावें,आणि आपली फौज आंत घ्यावी अशी मागणी रामाजीपंतानें केली. निशाण लावण्याची गोष्ट आम्हीं कबूल केली. परंतु तुम्ही लढाईंत यत्किंत् मदत केली नाहीं, आणि तुळाजीशीं संधान ठेवून ठरलेला करार मोडला, सबब तुमची फौज आम्हीं किल्ल्यांत घेत नाहीं, असा जबाब आम्हीं रामाजीपंतांस दिला. रामाजीपंतानें हरतऱ्हा केल्या. लांचही देऊं केला. पेशव्यांच्या फौजेवर खंडोजी माणकर हा सरदार मुख्य होता. त्याच्या स्वाधीन तुळाजी आंगरे झाला. इंग्रजांनीं तुळाजीस ताब्यांत घेण्या-

विषयीं हरतऱ्हा केल्या पण त्यांचा तो बेत सिद्धीस गेला नाहीं. इंग्रजांनीं किल्ल्यांत दररोज उकरा उकरी केली, त्यांत पुष्कळ धनसंचय त्यांस सांपडला. हें द्रव्य त्यांनीं अधिकारी लोकांस वाटून दिलें. इकडे मुंबईच्या प्रेसिडेंटानें निराळाच घाट रचिला. विजयदुर्ग आह्मांस द्या, आणि बाणकोट व तेथील किल्ला तुह्मी घ्या, ह्मणजे तुळाजीस तुह्मी आपल्या ताब्यांत ठेविल्यास चालेल अशा नवीन तऱ्हाची उभारणी त्यानें रामाजीपंताशीं वकिलामार्फत केली. परंतु रामाजीपंताच्या वकिलानें मात्र त्यास दाद दिली नाहीं. त्या संबंधानें प्रेसिडेंटाचा व नानासाहेब पेशव्याचा बराच पत्रव्यवहार झालेला दिसतो. त्यातील मतलब असा, इंग्रज विजयदुर्गचा किल्ला सोडून देईनात. कांहींना कांहीं सबबीनें ते किल्ला सोडण्याचें लांबणीवर टाकूं लागले. नानासाहेबांस तें सहन झालें नाहीं. बाणकोटचें बंदर फार वाईट होतें, आणि विजयदुर्गचें बंदर मोठें व आरमारच्या सोयीचें असल्यामुळें पेशव्यांनीं बाणकोट घेऊन विजयदुर्ग आपणास द्यावा, असा इंग्रजांनीं हट्ट धरिला. त्या वेळीं नानासाहेबांच्या पत्रात खालील मजकूर आहे. ‘ आंगऱ्याशीं आह्मीं युद्ध सुरू केलें तें विजयदुर्ग घेण्याकरितां. तोच किल्ला तुह्मांस आह्मीं दिल्यावर लोक आह्मांस काय म्हणतील ! शिवाय ही गोष्ट आमच्या कराराच्या विरुद्ध आहे. तुह्मी म्हणतां पोर्तुगीज लोकांवर दाब ठेवण्यास विजयदुर्ग सोयीचा आहे. त्यास आमची खात्री आहे कीं, तुह्मी आह्मी दोघे पोर्तुगीझांस पुरेसे आहों. त्यासंबंधानें आणखी भानगडी करण्याचें प्रयोजन नाहीं. हें तुमचें म्हणणें गैर आहे. तुमचा आमचा उत्तम स्नेह आहे. असें असतां किल्ला आह्मांस देऊन तुह्मीं खालीं शहरांत राहिल्यास काय हरकत ! तुमच्या लोकांस सुखरूपपणें ठिकाणीं पोंचविण्याची तजवीज मी सर्व लावून देतों. तरी किल्ला आमचे ताब्यांत देण्याचा हुकूम तावडतोब पाठवावा, आणि आमच्या व आपल्या स्नेहांत किंतु येत आहे तो दूर करावा. तुह्मी इंग्रज लोक वचनाचे दृढ आहां असें समजूनच आह्मीं

आपल्याशीं दोस्ती केली आहे. बोलतां त्याप्रमाणें करितां असा तुमचा लौकिक आहे. विजयदुर्ग किल्ला आमच्या राज्यांत आहे. तो घेण्याकरितांच आह्मी तुमचे शत्रु आंग्रे याजबरोबर लढाइ केली. आज पांचसहा महिने झाले, अजून तुह्मी किल्ला सोडीत नाहीं. आपला स्नेह अशा थरास जावा, ह्याचें आश्चर्य वाटतें. तुह्मीं म्हणतां, कांहीं बाबती अझून ठरावयाच्या आहेत. तेवढ्यासांठीं किल्ला ताब्यांत ठेवण्याचें कारण नाहीं. त्या बाबती मागाऊनही ठरवितां येतील. सबब किल्ला ताबडतोब खालीं करून द्यावा; आणि आपला लौकिक कायम राखावा. असें करण्याचे तुमचे मनात न येईल तर पुढें काय प्रकार घडेल तो परमेश्वरास ठाऊक ( ११ जुलई १७५६ )

यावर प्रेसिडेंटाकडून १ ऑगस्ट स. १७५६ चा जबाब पेशव्यास गेला, तो पुष्कळ नरमाईचा असून, नानासाहेबाच्या तिखट पत्राचा परिणाम झालेला त्यांत दिसतो. पावसाळा संपतांच आपले लोक मुंबईस परत बोलावून किल्ला सोडून देण्याचें अभिवचन त्यांत होतें. सप्टेंबर महिन्यांत इंग्रजांनीं टॉमस वायफील्ड व जॉन स्पेन्सर हे आपले दोन वकील पेशव्याकडे पुण्यास पाठविले, त्यांची हकीकत आतां सांगावयाची आहे.

६. विजयदुर्गसंबंधीं पेशवे इंग्रजांचें भांडणः—ता. २० जुलई स. १७५६ रोजीं पेशवा सावनूरचे स्वारींतून पुण्यास परत आला, आणि लगेच त्यानें ता. २१ रोजीं इंग्रजांस पत्र लिहून, अनेक भानगडींच्या निकालासाठीं त्यांचा वकील पुण्यास बोलाविला. सदाशिवरावांच्या मनांत पोर्तुगीझांवर स्वारी करून गोवासुद्धां त्यांचा प्रदेश काबीज करण्याचें फार होतें. त्यावरून पोर्तुगीझांनीं फोंडा येथील ठाण्यावर हल्ला केला. तेथें पोर्तुगीझ फौजेची धांदल उडून त्यांचा व्हाइसरॉय मरण पावला, परंतु दुसऱ्या भानगडी उपस्थित झाल्यामुळें गोव्यावर चालून जाण्यास सदाशिवरावास फावलें नाहीं. या गोष्टीचा नानासाहेबानें इंग्रजांस पाठ-

विलेल्या आपल्या पत्रांत उल्लेख केला आहे. पोर्तुगीझ हल्ला करतील तर बाणकोट तुमचे फार उपयोगाचें होईल असें इंग्रजांचें म्हणणें होतें. त्यावर नानासाहेबानें जबाब दिला कीं "तुम्ही आम्ही मिळून या पोर्तुगीझांस समूळच काढून टाकूं या म्हणजे झालें." त्यावर इंग्रजांनीं आपले दोन वकील जॉन् स्पेन्सर व टॉमस बायफील्स यांस पुण्यास पाठविलें. बोलाचालीचें मुख्य काम स्पेन्सरनेंच केलें. ऑक्टोबरचे आरंभीं पुण्यास या वकिलानीं पेशव्याची भेट घेतली. त्या वेळीं सदाशिवराव व राघोबा हेही हजर होते. निजामाचे राज्यांतून बुसीस हुसकून देण्यासाठी पेशव्यानें इंग्रजांची मदत मागितली. अशीच मागणी निजाम सलाबतजंगानें मद्रासकर इंग्रजाकडे केली आहे असें वकिलानें पेशव्यांस कळवून सांगितलें कीं, या गोष्टीचा निकाली जबाब आताच देतां येत नाहीं. वास्तविक यावेळीं कलकत्याकडे इंग्रजांची फारच धांदल उडाली होती. पुढें ता. १२ ऑक्टोबर रोजीं पेशव्याचा व इंग्रजांचा १८ कलमांचा लेखी ठराव पुण्यास झाला. त्याचा मतलब कीं, स्पेन्सर परत निघाल्यापासून २४ दिवसांनीं विजयदुर्ग इंग्रजांनीं सोडून द्यावा; आणि बाणकोट वगैरे दहा गांव पेशव्यांनीं इंग्रजाचे हवालीं करावे. पेशव्यानें मागील कांहींएक बाबतींबद्दल इंग्रजाकडे मागणी करूं नये. तुळाजी आंगऱ्यास घाटाचे खालीं मुलूख वगैरे देऊं नये; बाणकोटच्या खाडींत सीदी चौथाई जकात घेत असे. त्याची तोड पेशव्यानें परभारें काढावी आणि इंग्रजापासून पूर्वी ठरल्यापेक्षां ज्यास्त जकात इंग्रजी मालावर घेऊं नये. (डफ व खं. २)

दिल्लीवरच्या स्वारीस इंग्रजांनीं आपणास तोफखान्याची मदत द्यावी अशी मागणी पेशवा व रघुनाथराव यांनीं इंग्रज वकिलाकडे केली, त्याला त्यानें टाळाटाळीचें उत्तर दिलें. यावेळीं इंग्रजांची एवढी ताकद नव्हती व ते फ्रेंचांशीं चाललेल्या युद्धांत गुंतलेले होते. सदाशिवराव व नानासाहेब यांचा उद्देश तर पोर्तुगीझ, फ्रेंच व इंग्रज ह्या सर्वांसच देशांतून काढून लावण्याचा होता. पानपतानंतर सर्वत्र मनु बदलला, त्यामुळें हा उद्देश

मागें पडला. विजयदुर्ग ताब्यांत घेण्यासाठीं पेशव्यानें गोविंद शिवराम ह्यास पाठविलें. नानासाहेबाजवळ सदाशिवरावाचेंच वर्चस्व फार होतें असें स्पेन्सर म्हणतो. अशा प्रकारची फॉरेस्टच्या पुस्तकांतील हकीकत आहे.

विजयदुर्ग काबीज होण्यापूर्वी तुळाजीनें पेशव्याकडे नरमाईचें व आपल्या बचावाचे बोलणें चालविलें होतें. पुढें सुवर्णदुर्ग येथील वर्तनावरून इंग्रजाचा पेशव्यास वहीम आला; आणि यांच्या नादास लागून आपण तुळाजीस बुडविणें बरें नाहीं असेंही पेशव्यास वाटूं लागलें असावें. इंग्रजांचा सर्व राग तुळाजीवर होता; आणि पुढे मागें तुळाजी सुटून तो फिरून आपला सूड घेईल अशी भीति इंग्रजांस होती. म्हणून विजयदुर्ग काबीज करून तुळाजीस साफ बुडविण्याची घाई इंग्रजांनींच केली.

प्रदेशाच्या देवघेवीची भानगड संपून इंग्रज पेशव्यांचा ठराव ता. ११–१०–१७५६ चा झाला [ ना. रो. भा. १ ले. ८५ ]. ह्या मोहिमेंत चांगली मदत केल्याबद्दल रेवदंड्याच्या आरमारावरील कारकून नारो बल्लाळ यास पेशव्यांनीं नेमणूक करून दिली ( ता. ४–११–१७५६, सदर ले० ८५ ).

वॉट्सनच्या जहाजावरील सर्जन एड्वर्ड आइव्हज़्[1] विजयदुर्गचे लढाईंत हजर होता, त्यानें ह्या वेळची काहीं थोडी हकीकत लिहिलेली आहे, ती अशी. कॅप्टिन जेम्स विजयदुर्गची टेहेळणी करून गेला, त्याचें पत्र ता. २१ डिसेंबर १७५५ चें दिलेलें आहे. इंग्रजांच्या फौजेंत या प्रसंगीं ७०० युरोपियन, ३०० तोफाजी ( गोलंदाज ) व ३००एतद्देशीय इतके लोक होते. लढाई संपल्यावर गणति करितां, जखमी व मेलेले मिळून विसापेक्षां ज्यास्त भरले नाहींत इंग्रज किल्ल्यांत शिरले तेव्हा तुळाजी आंत नव्हता. पूर्वीच दोन तीन दिवस बायकोच्या भावाला सर्व काम सोंपून तो किल्ला सोडून निघून गेला होता. त्याच्या दोन बायका व दोन मुलें

---

१ Edward Ives' a voyage from England to India, London, Edward Charles Dilly, printed 1773.

हीं मात्र या मेहुण्याच्या ताब्यांत इंग्रजांस आढळलीं. ॲडमिरल वॅाटसननें त्यांची किल्ल्यांत भेट घेतली. त्यास तो देखावा फारच हृदयद्रावक वाटला. वॅाटसन आंत येतांच त्याजपुढें सर्वांनीं जमीनीस डोकें लावून नमस्कार केला; त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांतून अश्रुवर्षाव सारखा चालला होता. वॅाटसननें त्यांस सांगितलें, ' तुह्मी घाबरूं नका, आतां तुह्मांस कोणतीहि इजा पोंचणार नाहीं. आमचा आश्रय तुह्मांस आहे. ' तें ऐकल्यावर त्यांनीं त्यास पुनः वंदन केलें. तुळाजीच्या आईस या शब्दांनीं ज्यास्तच गहिंवर आला. ती ह्मणाली. ' आतां आह्मांस कसचा राजा व कसचीं मुलें आणि या मुलांमुलींस बाप तरी कोण ! ' वॅाटसन बोलला, ' मीच आतां तुह्मा सर्वांचा बाप व संरक्षक आहे. ' त्याबरोबर तुळाजीचा सहा वर्षांचा मुलगा होता तो वॅाटसनचा हात धरून ह्मणाला, तुह्मी तर आतां माझे बाबा.' हे त्या मुलाचे शब्द ऐकून वॅाटसनलाहि गहिंवर आल्याशिवाय राहिला नाहीं. वॅाटसनचे मनांत त्या सर्वांस मुंबईस नेऊन आपल्या ताब्यांत सुरक्षित ठेवावें असें होतें. परंतु त्याचें न ऐकता, तुळाजीचा निरोप आल्यावरून ती सर्व मंडळी किल्ल्यांतच राहिली. पुढें तुळाजीबरोबर त्या सर्वांस कैदेंत ठेवण्यांत आले. तुळाजी नानासाहेबांस शरण गेला आणि आइव्हस लिहितो, ' विजयदुर्गांत जी अपार संपत्ति होती ती त्यानें पेशव्यास दाखवून त्याची कृपा संपादन केली. कारण इंग्रजांस त्या किल्ल्यात एक लाख पौंडाहून ज्यास्त द्रव्य मिळालें नाहीं. तुळाजीस बंडखोर समजून कैदेंत ठेवण्यापलीकडे ज्यास्त कडक शिक्षा पेशव्यानें केली नसती ' व केली नाहीं, हें आइव्हस यास माहीत नाहीं. किल्ल्यांत १० इंग्रज व तीन डच गृहस्थ तुळाजीनें कैद केलेले वॅाटसन यास सांपडले, त्यांचीं नांवें Ives नें दिलीं आहेत. आगऱ्याचे देवघरांत एक मुसलमानी अक्षरांचें कवच किंवा ताईत इंग्रजांस मिळाला, त्याचें चित्र व त्याजवरील लेखाचा अर्थ आइव्हजनें या पुस्तकांत दिलेला आहे.

पेशव्यांनीं तह मोडला, या सबबीवर इंग्रजांनीं विजयदुर्गावर एकदम चाल केली, यासंबंधानें ग्रँट डफनें बरीच चर्चा करून, इंग्रजांचें या बाबतींतलें वर्तन सर्वथैव निर्दोष अगर निःस्वार्थी नव्हतें असा अभिप्राय दिला आहे. इंग्रजांनीं लढाई बंद ठेवावी म्हणून काहीं अधिकाऱ्यांस रामाजीपंताने लांचही देऊं केला, त्यामुळें मराठ्यांची बाजू लंगडी दिसते. तथापि मुंबईहून निघण्यापूर्वीच विजयदुर्गाचा सर्व द्रव्यसंचय आपणच हस्तगत करावयाचा, मराठ्यांचे हातास तो लागूं द्यावयाचा नाहीं, असा विजयदुर्गाच्या इंग्रजी व्यवस्था कामिटीचा आगाऊच निश्चय झालेला होता. या गोष्टीची कुणकूण कदाचित् मराठ्यांस असेल व म्हणूनच इंग्रजांनीं किल्ल्याशीं लढूं नये असा त्यांचा प्रयत्न असेल. तुळाजीनें पांढरा बावटा दाखविल्यावर मराठ्यांस किल्ल्यांत जाऊं देण्यासाठीं रामाजीपंतानें कॅप्टिन बुकॅनन यास ऐशीं हजार रुपये लांच देऊं केला. हा लांच त्यानें घेतला नाहीं आणि या कृत्याची वर्दी त्यानें वरिष्ठांकडे दिली, याबद्दल प्रेसिडेंटानें त्यास पुढें सोन्याचें पदक बक्षीस दिलें. उलटपक्षीं विजयदुर्ग आपणाकडे ठेवण्यास रामाजीपंताने मदत करावी म्हणून रामाजीच्या कारकुनास पांच हजार रुपये मुंबईच्या प्रेसिडेंटानें बक्षीस म्हणून देऊं केले होते. तुळाजीचे हाल करूं नयेत, समुद्रापासून चाळीस मैलाचे आंत त्यास जमीन वगैरे कोठें देऊं नये अशा इंग्रजांच्या अटी होत्या. डफ म्हणतो, तुळाजीस प्रथम वंदन किल्ल्यावर ठेविलें. तेथून पुढें सोलापुरचे किल्ल्यात त्याची रवानगी झाली. तेथेंच तो मृत्यु पावला. नानासाहेब पेशव्याच्या मृत्युसमयीं तुळाजी दंगा करणार होता. (खं. १ ले २८६ ), यावरू त्यापुढें तो केव्हां तरी वारला. त्याचे दोन मुलगे बाराचौदा वर्षांनीं कैदेतून पळून मुंबईस आले, तेथें इंग्रजांनीं त्यांचा प्रतिपाळ चांगला केला. ( डफ )

---

१ राजमाची सं. ३ ले. १५०. 'तुळाजी आंगरे विसापुरास कैदेंत होते त्यास नगरास पाठविलें. नंतर चाकणास पाठविले.' असा उल्लेख भा. व. शकावलींत स० १७६६–६७ सालचा आहे [ पृ. ५२, ५४ ].

७. तुळाजीची योग्यता, पेशव्याची अक्षम्य चुकी:—तुळाजी आंगऱ्याचें नांव मराठी इतिहासांत चिरस्मरणीय झालें आहे. त्याच्या सारखे धाडसी व करारी पुरुष विरळा निपजतात. त्यानें आपले ह्यातींत इंग्रजांना सारखे थरकापांत ठेविलें, परंतु छत्रपति संभाजी अगर टिपुसुलतान यांज-प्रमाणें तुळाजीच्या गुणांचा उपयोग राष्ट्रास घडला नाहीं, हे पाहून खेद वाटतो. विशेषतः नानासाहेबासारख्या मनुष्यस्वभाव जाणणाऱ्या पुरुषानें तुळाजी सारखा मोहरा फुकट घालविला, आणि राष्ट्रकार्यांत त्याचा उपयोग करून घेतला नाहीं, ही गोष्ट त्या पेशव्याच्या कीर्तीस काळिमा लावते. त्यांतून एकवार तरी पेशव्यानें तुळाजीची गांठ घेऊन त्याचें हृद्गत समजून घेतलें पाहिजे होतें. कशीही व्यक्ति असली तरी एकवार नानासाहेबाची प्रत्यक्ष भेट झाल्यावर तिजवर त्या पेशव्याची छाप बसली नाहीं असे सहसा कधीं घडलें नाहीं. नानाप्रकृतींच्या कावेबाज इसमांस हर युक्तीनें ताळ्यावर आणून त्याजकडून राष्ट्रकार्य घेण्यांत हा पेशवा विशेष चतुर म्हणून नावांजलेला आहे. रघूजी भोसले, दमाजी गायकवाड वगैरे किती व्यक्तींस या पेशव्यानें आपल्या कार्यतंत्रांत गोवून घेतलें; परंतु तुळाजीची व त्याची गांठ अशी कधींच पडली नाहीं. तशी गांठ रामाजी महादेवानें बहुधा पडूं दिली नसेल. यामुळें आंगऱ्यांचे वंशांतील हा एक पराक्रमी पुरुष इंग्रजांचे कान्यास बळी पडला.

रा. राजवाडे म्हणतात, 'पेशव्यांची सर्वांत मोठी चुकी म्हणजे जें आरमार शिवाजीनें मोठ्या दूरदृष्टीनें स्थापन करून जोरांत आणून ठेविलें, तें त्यांनीं बुडविलें. कोंकणांतले कोळी व भंडारी ह्यांच्यासारखे उत्कृष्ट खलाशी पृथ्वीवर क्वचित्‌च सांपडतील. त्यांना पाश्चात्यांचें नौकानयन शिकविलें असतें तर राज्यास अतिशय बळकटी आली असती. अनादि-कालापासून नौकानयनांत हिंदुस्थानचें नांव प्रमुख असून याच विद्येच्या जोरावर हिंदूंनीं आर्य सुधारणा पृथ्वीवर पसरिली. तिचा शेवटचा अवशेष शिवाजीनें मोठ्या परिश्रमानें पश्चिमकिनाऱ्यावर राखिला.

अशा प्रकारचें मराठी आरमार बाळाजी बाजीरावानें इंग्रजांची मदत घेऊन बुडविलें. त्यानें तुळाजी आंग्रे नाहींसा केला. आपलें काम करण्यास शत्रूची मदत घेऊं नये हें मोठें तत्त्व बाळाजीनें लक्षांत ठेविलें नाहीं. सत्तावन सालच्या बंडांत हिंदुस्थानांत इंग्रजांची धांदल उडाली असता फ्रान्सचा राजा दुसरा नेपोलियन यानें इंग्रज प्रधान मंडळास असें सुचविलें कीं, मी एक आरमार तयार करून तुमच्या मदतीस पाठवितों. परंतु इंग्रजांनीं ही फ्रान्सची मदत स्वीकारिली नाहीं. ह्यांतील मर्म ध्यानांत ठेवण्या जोगें आहे. एवढा चाणाक्ष नानासाहेब पेशवा, पण तो असा चकला. हल्लीं हिंदुस्थानांत थोडीशी चळवळ सुरू झाल्याबरोबर कितीतरी इंग्रज व इतर प्रवासी येथें येऊन आपआपल्यापरी प्रत्यक्ष माहिती आंतून व बाहेरून मिळवितात. पूर्वेतिहास, कागदपत्र, फोटो इत्यादि मिळवून व स्वानुभव घेऊन त्या गोष्टी ते तिकडे जाऊन प्रसिद्ध करितात. म्हणजे राज्यांत यत्किंचित् कमी ज्यास्त झालें कीं लगेच हजारों उपायांनीं त्याचा छडा लावणें हा पाश्चात्यांचा स्वभावजन्य मोठा गुण आहे, तो आमच्यामध्यें पूर्वी कधीं नव्हता व अद्यापही फार दिसत नाहीं. परदेशांत आपल्या एजन्टी किंवा वकिलाती ठेविल्या नाहींत. मनूच्या एका निर्बंधानें एवढा मोठा परिणाम झाला. पेशव्यांना सर्वस्वी नादान ठरविणें ह्मणजे अन्याय होईल. परंतु त्यांनीं कित्येक अक्षम्य चुका केल्या हें मात्र कबूल केलें पाहिजे.'

इंग्रजाचे सावंतांशीं, सन स. १७३० व १७६६ या सालीं झालेले तह पाहण्या लायक आहेत. [ पिंगुळकर कृत सावंतवाडीचा इ० ] त्यावरून स. १७५६ त आंगऱ्याचा पाडाव झाल्यामुळें पश्चिमकिनारा इंग्रजास कसा मोकळा झाला, आणि त्यांनीं त्या बाजूनें हळू हळू आपलें आवरण घालून हिंदुस्थान देश कसा व्यापीत आणिला हें सहज दिसून येतें. याच वेळेस इंग्रजांनीं पूर्व किनाऱ्यावर फ्रेंचांचा पाडाव करून कर्नाटकपासून बंगाल पर्यंत सर्व किनारा साधला आणि याच वेळेस आपल्या राज्याचा कायमचा पाया येथें घातला ही गोष्ट उघड आहे. स. १७६१ त

पानपतांवर मराठे व मुसलमान या दोन बलिष्ठ शत्रूंचा परभारें एकमेकांशीं लढून झालेला नाश अनायासें इंग्रजाचे पथ्यावर पडला. 'आंगऱ्यांचा पाडाव व पानपतचें अरिष्ट या दोन बनावांनीं रोजारच्या त्रासदायक शत्रूंपासून इंग्रजाची मुक्तता झाली. तेणेंकरून त्यास इतराच्या मानानें पुढें ज्यास्त स्वतंत्रता व स्वास्थ्य मिळून त्याची सार्वभौम सत्ता स्थापन होण्यास फार चांगली मदत झाली.' (Gerson Da Kunha's origin of Bombay.)

विजयदुर्ग पडल्याबरोबर इंग्रजाच्या सत्तेची वाढ कशी झाली, हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. सन १७६५ चे आरंभीं इंग्रजांनीं एकाएकीं हल्ला करून दोन किल्ले यशवंतगड व सिंधुदुर्ग (मालवण) काबीज केले, त्या संबंधानें कोल्हापूरकर जिजाबाईस फार वाईट वाटलें. सिंधुदुर्ग म्हणजे खुद्द शिवाजीनें मोठ्या हौसेनें करून बांधलेला किल्ला, पश्चिम किनाऱ्याचे संरक्षणार्थ योजिलेला होता. विजयदुर्ग स. १७५६ त काबीज केल्यावर इंग्रजांनीं हळू हळू संधि साधून सर्व पश्चिम किनारा व्यापून टाकिला; आणि त्याजवरील मजबुदीचीं ठिकाणें हस्तगत केलीं, हा नानासाहेबाचे कृतीचा परिणाम ओघानेंच प्राप्त झाला. 'जंजिरे सिंधुदुर्ग गेल्याची चिंता वाहत असतां, इंग्रजांनीं यशवंतगडाचर तोफाची मारगिरी अतिशयानसीं करून शनिवारीं जंजिरा हस्तगत केला, हें निवेदन जाहलेवरून बहुतच आयासास कारण जाहलें. गोष्टी परम अनुचित जाहली. शत्रूस बळ पडोन समुद्रकिनारा जागे स्वाधीन होऊन, राहिले जागे जतन होणें, आणि गेलेले घेणें याचा साधन प्रकार कोणे रीतीचा योजिला आहे तो अभिप्राय लेहून पाठवावा. कोवळा मोड आहे तों मोडिल्याने उत्तम, भारी जाहलेनें सर्वांचें वाईट, हें पुरतें चित्तांत आणून समर्पक तें करावें.' [मंगळवार ता. १२ मार्च स. १७६५. पिंगुळकरकृत सावंतवाडीचा इ. ले. ८४-८५] इंग्रजांच्या हातांत पडलेलीं स्थळें पुनरपि सुटणें दुर्घट, हें जिजाबाईस उमजत नसल्यामुळें, या कामीं आपलेच लोक कसूर करतात, असें वाटून जिजाबाई

ले. ८६ त सावंतवाडीकर दिवाण जिवाजी विश्राम याजवर वरप्रमाणें बरफडत आहे. [ १९ जून १७६५ ].

तुळाजी आंगऱ्यानें कैदेंत असतां फंद फितूर करून पेशव्यांस पुढें पुष्कळच उपद्रव दिला, असें दिसतें स. १७६३ पासून ६९ पर्यंत विसापुर, नगर, चाकण, दौलताबाद इत्यादि ठिकाणीं त्यास बेडी घालून ठेवण्यांत आलें. त्याचे लेक व बायका बरोबर असत. लेकांनीं सुद्धां बंडें वगैरे केलीं. त्या सर्वांच्या पोटगीचा बंदोबस्त पेशव्यांनीं ठेविला असून, फितुरांत सामील असलेले ब्राह्मण व इतर गृहस्थांस त्यांनीं सजा केल्या आहेत. तुळाजी बहुधा १७६९ त वारला असावा. (पे. रो. माधवराव १-१२८-१३९).

८. हबशावर मोहीम, उंदेरी काबीज, इंग्रजांची अडवणूक:—(ता. २७ मे स. १७५८ फेब्रुवारी १७६०). विजयदुर्गाच्या प्रकरणावरून इंग्रजाचे हेतूविषयीं नानासाहेब व रामाजीपंत यांचे डोक्यांत लख्ख उजेड पडला; आणि इंग्रजानीं आपणांस बाहुल्याप्रमाणें हातांत नाचविलें, अशी त्यांची खात्री झाली, ही गोष्ट पुढें प्राइसच्या वकिलातीची हकीकत द्यावयाची आहे, त्यावरून व्यक्त होईल. सुरतेस मराठ्यांनीं राजकारण केलें, तेथ इंग्रज त्यास आडवे, हबशास जिंकून जंजिरा मोकळा करण्याचा उद्योग पेशव्यानें आरंभिला, त्यास इंग्रज आडवे, निजामाशीं कारस्थान करून बुसीस आपणाकडे वळविण्याचा नानासाहेबानें उद्योग आरंभिला, त्यासही इंग्रज आडवे, अशा रीतीनें स. १७५६–५८ च्या दरम्यान इंग्रजासंबंधानें पेशव्याची बालंबाल खात्री झाली. हबशी, निजाम व त्याचा मूळ धनी मोगल बादशाह यांस मोडून हिंदुपदपातशाही स्थापणें हें मराठ्याच्या व बाळाजी पेशव्याच्या उद्योगाचें मुख्य कार्य होतें. निजामास तर त्यानें हरतऱ्हेनें आटोक्यात आणिलेंच; परंतु हबशाचें प्रस्थ मोडणें इंग्रजामुळें बिकट झालें. पेशव्याची जन्मभूमि हबशाचे हद्दींत. पेशव्याच्या पूर्वजास हबशाने जन्मभूमीतून हाकून दिलें होते. प्रत्यक्ष शिवाजीचा हबशास जिंकण्याचा संकल्प आज साठ पाऊणशें वर्षे अपूर्ण राहिला होता, तो

सिद्धीस नेण्यासाठीं नानासाहेबाच्या जिवाची धडपड चालली होती. अनेक कारणांनीं हें काम लांबणीवर पडत गेलें, आणि अखेरीस सिद्धीस गेलें नाहींच. हबशावर शस्त्र धरलें असतां,इंग्रज त्यांस उघड मदत करीत,यास्तव इंग्रजांचा पेशव्यास फारच राग आला; परंतु मनचेमनांत चडफडण्यानें पेशव्याचे हातून इंग्रजांचें वांकडें थोडेंच होणार होतें. त्यांनीं किनाऱ्या-किनाऱ्यानें हिंदुस्थानची समुद्रमर्यादा आक्रमीत आणिली. हबशी आमचा शत्रु, त्यास मदत करूं नका, तद्वाप्रमाणें तो तुमचाही शत्रु झाला, असें पेशव्यानें इंग्रजांस बजाविलें असतां, त्यांनीं साफ जबाब दिला कीं, हबशी आमचा मित्र आहे, त्यास आम्ही मदत करणार. अर्थात् हबशी व निजाम हे दोन कांटे मराठशाहीच्या पोटांत कायमचे राहूं द्यावयाचे असा इंग्रजांचा उद्योग होता [ पहा प्राईसची वकिलात. ] विजयदुर्गापासून तर इंग्रजांचा तोरा वाढतच गेला. रामाजी महादेव लिहितो, ' सांप्रत इंग्रजांचे बखेडे, यामुळें उरणपर्यंत जाणें प्राप्त जालें आहे. इंग्रजांनीं नजर फिरविली आहे. यांचें पारिपत्य श्रीनें करावें. आपण प्रार्थना करावी. [ खं. ३ ले. ३४४ ]. ज्या रामाजीने इंग्रजांची मदत मिळविण्यांत शिकस्त केली, त्याचेच हे पुढचे उद्‌गार ध्यानात ठेवण्याजोगे आहेत.

इंग्रज, फ्रेंच व पोर्तुगीझ या तीन युरोपियन सत्ता यावेळीं पश्चिम किनाऱ्यावर वावरत होत्या. पैकीं चिमाजी आपानें शेवटच्यांस वसईवर जिंकल्यापासून त्यांचें माहात्म्य बहुतेक गेलेंच होतें. बाकीच्या दोहोंपैकीं फ्रेंच प्रथम म्हणजे शाहूच्या मृत्युसमयीं वरचढ होते; आणि त्यांचा नकशा उतरविण्याचा इंग्रजांचा प्रयत्न कसा चालला होता, ही गोष्ट ब्रिटिश इतिहासांत नमूद असून तिचाच संबंध नानासाहेबाच्या कारभाराशीं मुख्यत: पोंचतो. स. १७५२त बुसीचें वजन निजामाचे दरबारीं स्थापन झालें, तेव्हां इंग्रजांशीं सख्य ठेवून बुसीचा पाडाव करण्याचा प्रयत्न दोन तीन वर्षें नानासाहेबानें केला; परंतु विजयदुर्गाच्या प्रकरणांत इंग्रजांचा कावा नानासाहेबास चांगलाच कळून आल्यामुळें बुसीला जिंकण्याऐवजीं आपणा-

कडेच वळविण्याचा त्यानें प्रयत्न सुरू केला. स. १७५५-५६ पावेतों इंग्रज व नाना बहुधा एकपक्षांत असत. त्या नंतर मात्र ते विरुद्ध वागूं लागले; आणि पाश्चात्यांच्या संबंधानें नानासाहेबास प्रथम संपूर्ण संशय व पुढें पुढें धास्ती सुद्धा वाटूं लागली. पानपतचें प्रकरण संपविल्यावर आपण या उभयतांस पाहून घेऊं, अशी बहुधा पेशव्याची व सदाशिवरावाची भावना असावी.

स. १७५८ च्या मे महिन्यानंतर नानासाहेबास कोंकणच्या कारस्थानांत लक्ष घालण्यास सवड मिळाली. त्या पूर्वी शिंदखेडच्या मोहिमेंत निजामाची खोड मोडून, श्रीरंगपट्टणच्या स्वारींतही पेशव्यास चांगलें यश मिळालें होतें. स. १७५८-५९-६० चा काळ म्हणजे नानासाहेबाच्या वैभवाचा कळस होय. या काळांत सर्व विरोधकांचा नाश करून मराठशाहीचें उद्देश सिद्धीस नेण्याचा त्रिवर्ग पेशवेबंधूंचा जोराचा प्रयत्न चालला होता. 'हबशी यांणीं बिघाड करून मावळ वगैरे जागां स्वारी करूं लागले. त्यानंतर रामाजी महादेव, शंकराजी नारायण, व माणकर वगैरे रवाना केले. मानाजी आंगरे यांस कुमकेस जावें असें लिहिलें. आरमार पाठवून हबशी जेर केले. उंदेरी किल्ला घेतला.' [ धा. च. रा. पृ. २५ ]. स. १७५८ च्या आरंभींच जंजिऱ्यावर स्वारी करण्याचें ठरून, नोव्हेंबर पासून स. १७५९ च्या फेब्रुवारी पावेतों पेशवा कोंकणांत होता. ( खं १ प्र. पृ. १४ ]. त्या वेळींच त्यानें हबशावर स्वारी करण्याचा निश्चय करून ती कामगिरी रामाजी महादेवास व मानाजी आंगऱ्यास सांगितली. 'मानाजीचा मुजुमदार महादाजी रघुनाथ याणें या कामी चांगला पराक्रम गाजविला. [ का. सं. प. या. ले. ६१ ता. १-६-१७५८ ]. ते उरणास आले. रामाजीपंत खुष्कीनें व मानाजी जलमार्गें जाऊन राजपुरी लुटून जंजिऱ्याजवळ मोर्चा दिला. चार महिने मानाजी तेथेंच होते. नंतर प्रकृति बिघडली म्हणोन कुलाब्यास आले. पांचवे सहावे दिवशीं काळ जाहला. शके १६८० च्या भाद्रपदमासीं मृत्यु पावले.'

( सप्टेंबर स. १७५८ चेऊलची बखर खं. २ ले. ५६८. ) ' मानाजीस पुत्र औरस १० व रखेलींचे चार, त्यांत रघूजी आंगरे यास वजारतमाब व सरखेल किताब, व तालुका करार करून, वस्त्रें दिल्हीं. स. १६८० बहुधान्यनाम संवत्सरे. ' [ धा. रा. च. पृ. २३ ]. शेवटीं शेवटीं विकटगड किल्ल्यावरून मानाजीचें व नानासाहेबचें थोडें वितुष्ट आलें होतें; परंतु त्रिंबक महादेवाच्या सल्ल्याने मानाजीनें पुण्यास जाऊन नम्रभावाने पेशव्याची समजूत काढिली, असा प्रकार उल्लिखित आहे. [ इ. सं. आंगरे यांची हकीकत पृ. १६–१८ ]

हबशावरील या मोहिमेच्या सुरुवातीची थोडी हकीकत इ. सं. त आली आहे [ ऐ. टि. भा. २ ले. २१ ]. ' पूर्वी स. १७३३ त बाजीरावानें जंजिऱ्यास वेढा घालून उत्तमप्रकारें सल्ला निमेनिम सत्ता करून दिल्यानंतर शके १६८० वैशाखमासीं वद्य पंचमीस ( ता. २७ मे स. १७५८ ) नानासाहेबीं सारे कोकणचे मामलेदारांस रामाजी महादेव मुख्य करून देऊन जंजिऱ्यास वेढा घालावया हुकूम केला. ते सारे मामलेदार मिळोन वेढ्यास बसले. जंजिऱ्याचा दाणापाणी बंद केलें. परंतु सीदी इब्राईमसाहेबीं हरहुन्नरें करून आपले लोक रात्रीचे चोरगस्तीनें मुलखांत घालोन सारे रयतीस उपद्रव भारी केला. वेढेकऱ्याचा यत्न चालेना. हबशी अधिकच बळावत चालला. खोत, पाटील, जमेदार वगैरे लोक भयभीत होऊन पळून जाऊं लागले. रयतेचा इलाज चालेना. मराठयांचा हुकूम मानला तर हबशी येऊन घरें दारें जाळी, जिवंत मारून टाकी. हबशाचा हुकूम मानला तर मराठे जाच करीत...' [ ही हकीकत पुढें अपूर्ण आहे. ] मोहीमेचें आधिपत्य आंगऱ्यास न देतां, पेशवे आपल्याच हस्तकास देत, याजबद्दल आंगऱ्यास वैषम्य वाटून मोहीम नेटास लागत नसे.

रघूजी आंगऱ्यानें हबशाशीं मोठ्या निकरानें सामना सुरू केला. इंग्रजांनीं उघडपणें हबशास मदत केली. रघूजी ता. १९–४–१७५९

रोजीं सदाशिवरावास लिहितो, ' सुरतेकडील आरमार नारोपंतसहवर्तमान आठ दहा रोजांत येईल. सर्व एकत्र होऊन उंदेरींत पाणी नाहींसें जालें आहे. या समयांत मारगिरी करून लगट करावा ह्मणोन आज्ञा केली, त्याचे अन्वयांत सविस्तर विनंती पंतप्रधानांचे सेवेशीं लिहिली आहे. आपल्या आशेप्रमाणें वर्तणूक करावी, श्रमसाहसास अंतर न करावें हेच निष्ठा. नारोपंताकडील व वसईचें आरमार येऊन पावल्यास शत्रूवरी निकर्ष होऊन येईल.साबाजी प्रभूंनीं येथील हलाखीचें साद्यंतवर्तमान निवेदन केलें असेलच.' [ का. सं. प. या. ८३ ]' त्यानंतर तीन दिवसांनीं ता. २२ एप्रिलचें पत्र रघूजीनें पेशव्यास पाठविलें, त्यात लढाईची हकीकत विस्तारानें लिहिलेली आहे. [ सदर ले. ७६ ]. वसईकडील व सुरतेकडील आरमारें आंगऱ्याच्या मदतीस आलीं नाहींत. सुरतेहून हबशांस मदत होत होती. आंगऱ्याचा सरदार महादाजी रघूनाथ हाही शिकस्त करीत होता. ' दर्या अफाट, चौगीर्द आरमाराचा परीघ असावा, सारें आरमार एकत्र जडाव जहालियावर, चित्तानुरूप सेवा घडोन येईल हेच उमेद असे.' सुरत जाफराबादेकडून हबशास मदत पोंचे ती बंद करण्याविषयीं पेशव्यानें दमाजी गायकवाडास लिहिलें; आणि दमाजीनें त्याचा बंदोबस्त केला. [ का. सं. प. या. ले. ८४-ता. १०-१०-१७५९ ]. मात्र मोहीम सुरू झाल्यावर सर्वप्रकारची सिद्धता अशी पत्रोपत्रीं उरकत नसल्यामुळें दिवसगत फार लागत. नानाप्रकारच्या भानगडी उपस्थित होऊन अखेरीस उंदेरीचा[1] किल्ला हस्तगत झाला. ' श्यामलाचें असाध्य स्थळ उंदेरी, समुद्रांतील जागा, आरमार व लोकांनीं मेहनत करून चंद्र २९ जमादिलावली [ १९ जानेवारी १७६० ] फत्ते करून काशावर गेले. तिकडील घर सुटला आहे. तेंही कार्य व्हावेंसें आहे. ' [ खं १-ले. १५७ ] पेशव्यानें यासंबंधानें खालील पत्र सदाशिवरावास लिहिलें. ' उंदेरीचें काम रा. रामाजी महादेव व नारो त्रिंबक यांणीं जेमतेम करून केलें. मात्र त्या

---

१ वर चालू प्रकरणांत कलम १ पृष्ठ ४३८ पहा.

दोघांत कलुषता वाढली, ती रामाजी विश्वनाथ बर्वे यांचे मध्यस्थीनें बोलून उभयतांस बरे रीतीनें कडकावून हमवार करावें. काशाचें काम एकमतें करावेंच करावें ' [ २२ फेब्रुवारी १७५९ का. सं. प. या. ले. ३७९ ]. सदाशिवराव यावेळीं उंदेरीच्या कामावर कोंकणांत गेला असावा, असें दिसतें. ' नंतर गलबताची सांगड बांधोन त्यावर मोर्चे रचोन काशावर मारगीर केली. कांसा काबीज जहाला.' पुढें लवकरच मराठ्यांच्या फौजा उदगीरवरून पानपतावर जाऊन तिकडे गारद झाल्या. ही बातमी सत्ताविसावे दिवशीं इंग्रजांस आली, त्याबरोबर ' इंग्रजांनीं हबशाचे कुमकेस येण्याची तयारी करून दाखल होतांच पेशव्याचें आरमार निघोन गेलें. जंजिऱ्याचा साराच महसरा उठोन आला.' [ इ. सं. आं. इ. ]. येणेंप्रमाणें हबशास जिंकण्याचा नानासाहेबाचा मनोरथ अर्धाच राहिला. इंग्रजांच्या वर्तनासंबंधानें पोर्तुगीझानींही ता. १० मार्च स. १७६१ ची नानासाहेबाकडे कागाळी केलेली आहे. [ इ. सं. ऐ. टि. भाग २ ले. ५० ]. ' इंग्रजांनीं आपला शब्द देऊन तफावत केली, काय कारण म्हणोन विचार मनास आणिलिया सहजच कळोन येईल. पठाणास ( अब्दालीस ) यश आलें; म्हणोन चोहींकडेस वर्तमान त्यांहीं उठविलें, आणि आम्हांसही गोमांतकीं तैसेंच वर्तमान घातलें. इंग्रजांनीं आपले सरदार आमच्या जहाजावर पाठवून आपले पादशाहीतर्फेनें सांगोन घेतलें जे आपणाशीं बिघाड न करावा. मराठे सरदारांस नानाप्रकारचा बुद्धिभेद करण्यांत आला, तो सर्व इंग्रज यांचाच उपदेश इ. इ.' नारायण भास्कर नांवाचा पेशव्यांचा वकील गोमंतकास होता, त्यानें लिहिलेलीं कांहीं पत्रें या वेळचीं उपलब्ध आहेत. पोर्तुगीझांनीं हबशावर

१ कांसा किल्ला जवळच उरणचे खाडीवर असावा (?)

२. [ का. सं. प. या. ले. १४६–४८. हीं तीनही पत्रें दंडाराजपुरीच्या मसलतीच्या वेळचीं म्ह. स. १७५९ चीं आहेत. पैा ता. २९ ऑगस्ट आहे, ' गणेशचतुर्थी होतांच सामानसुद्धां राजपुरीजवळ सरकार फौजांस सामील व्हावें. ' असा मजकूर आहे, गणेश चतुर्थी ता. २६ ऑगस्ट १७५९ रोजीं होती, त्यावरून हीं पत्रें ता. २६ ऑगस्टच्या थोडीं आधीं लिहिलेलीं असावींत. ]

स्वारी करण्यास मराठी आरमारास मदत करावी, असें पेशव्यानें लिहिलें, त्याप्रमाणें वकिलानें गोवेकरास जोराची समज दिली. हबशाकडील वकीलही गोव्यास आले होते आणि आपणास मदत करण्याबद्दल अतिशय आर्जवें करीत होते. परंतु पोर्तुगीझ सत्तेत आतां कांहींच राम राहिला नव्हता, आणि दोनही पक्षांस थोड्याबहुत थापा देऊन ते वेळ मारून नेत होते. 'फिरंग्याजवळ जमात अथवा लढाईचा पोक्त सरंजाम नाहीं. दरसाल एक जहाज येतें. यंदां जहाजें आल्यावर आधीं मर्दनगडचे गळां पडावें, हा त्यांचा मनसबा आहे.' गोवेकरांस वाडीच्या सांवतांनींही या वेळीं चांगलेंच चेपीत आणिलें असून, पेशव्याच्या प्रमुखपणानें सर्व मराठे सरदार स्वराज्याचे कामांत झटून प्रयत्न करीत होते. पानपताच्या प्रसंगानें मात्र हा सर्व उद्योग बिघडून गेला.

पोर्तुगीझांसंबंधानें मराठे मुत्सद्यांचा अभिप्राय ठिकठिकाणीं व्यक्त झाला आहे. वाडीकर रामचंद्र सावंतास त्याचा दिवाण विठ्ठल शिवराम सबनीस लिहितो, 'आपणास फिरंगोयांची पाठ आहे म्हणून भरोंसा धराल तर तें मृगजळ आहे. कां कीं येथे राहिलेमुळें मजला सर्व कळत आहे.' [ ता. १८ डिसेंबर स. १७५२. पिंगुळकर कृ. सा. इ. ले. ६७ ].

९. प्राइसची वकिलात व राजकीय परिस्थिति:—[स. १७५९ आगस्ट २४–आक्टोबर २६ ]. स. १७५८–५९ त पेशव्याची सत्ता कळसास पोंचून मराठे आता हिंदुस्थानचे सार्वभौमस्वामी होणार, असा सुमार दिसूं लागला, तेव्हां त्यांच्याशीं गोडी राखण्याचे निमित्तानें, पेशव्याचे आग्रहावरून, मुंबईकर इंग्रजांनीं प्राइस नांवाचा आपला वकील पुण्यास पाठविला, त्याची फॉरेस्टमधील हकीकत तत्कालीन राजकीय परिस्थितीसंबंधानें विशेष बोधप्रद आहे. या हकीकतीवरून मराठेइंग्रजांची सत्ता कोणत्या तोलांत होती, हें स्पष्ट समजतें. पेशव्यानें जंजिऱ्यावर स्वारी केली असतां, इंग्रजांनीं हबशास दारूगोळा वगैरे पुरवून मदत केली, याचा पेशव्यास मोठा राग आला.

पानपतचा संग्राम उद्भवला नसता तर जंजिऱ्याचे हें प्रकरण चांगलेंच रंगलें असतें. जंजिरा जिंकून पश्चिम किनारा सर्वस्वी मोकळा करण्यासाठीं शिवाजीच्या वेळेपासून मराठ्यांचे प्रयत्न अव्याहत चालले होते. शिवाजीची राजधानी ह बशाचे हद्दींत, पेशव्याची जन्मभूमि त्याच्याच ताब्यांत, आंगऱ्याचे हातूनही हबशाचा बंदोबस्त होण्याची आशा राहिली नाहीं. शिवाजी गेला, बाजीराव गेला, नानासाहेबाची कारकीर्द उलटत चालली, तरी हबशाचा कांटा कायम तो कायम. मराठशाहीची वाढ कोंकणकिनाऱ्यावरून पूर्वेकडे झाली, अर्थात् कोंकणकिनारा सोडविणें पेशव्यास अत्यंत जरूर वाटत होतें. तुळाजी आपणास विरोध करतो, असें दिसतांच इंग्रजांची मदत घेऊन त्याचा पेशव्यानें उच्छेद केला. त्यानंतर हबशाचा उच्छेद करण्यास जेव्हां पेशव्यानें इंग्रजांची मदत मागितली, तेव्हां त्यांनीं साफ कानावर हात ठेविले. कारण हबशी नाहींसा झाला कीं, पुढची पाळी आपली, असें ह्या मुंबईकर इंग्रजांस वाटत होतें. युरोपीय परिस्थितीचाही ह्या प्रकरणाशीं संबंध पोंचतो. स. १७५५ त आंगऱ्यावर चाल करतांना इंग्रजांची बाजू फ्रेंचांचे मानाने बरीच खालावलेली होती. परंतु पुढील तीन वर्षांत त्यांनीं फ्रेंचांस बहुतेक नाहींसें केलें असून इंग्रज पुष्कळ सांवरले होते. अर्थात् हबशाचे स्वारीचे प्रसंगीं ते मराठ्यांस थोड्या-बहुत दिमाखाच्या गोष्टी सांगूं लागले. इकडे पेशव्याचें धोरण वेगळें होतें. त्यानें हळू हळू सर्व हिंदुस्थान आक्रमण करीत आणले होतें. पानपतचा प्रसंग उरकल्यावर सीदी व इंग्रज दोघांसही पाहून घेऊं, असा त्याचा मनोदय होता. त्याचे ठिकठिकाणचे कारभारी आपापल्या कामांत दक्ष व अनुरक्त होते. इंग्रजाकडून आपणास मदत होणार नाहीं, उलट विरोधच होईल, हें नानासाहेब ओळखून होता, आणि त्या धोरणानें त्यानें फ्रेंचांशींही संधान चालविलें होतें; परंतु सप्तवार्षिक युद्धांत फ्रेंचांची सत्ता नाहींशी होऊन इंग्रजच वरचढ ठरले; आणि इकडे पानपतावर मराठ्यांचा संहार होऊन पुढील कारस्थानांचें स्वरूप सर्वथैव पालटलें. परंतु स. १७५९ त मराठे व इंग्रज

दोघेही वृद्धि पावत असून, एकमेकांस वचकून होते, आणि उघड युद्धाचा प्रसंग न आणितां जशास तसें कपट लढवून वेळ मारून नेत होते. हा प्रकार खालील हकीकतींत उतरला आहे.

ता. १९ ऑगस्ट सन १७५९ रोजीं मुंबईच्या प्रेसिडेंटानें कौन्सिल भरवून पुण्यास जाऊन काय कामें करावयाचीं त्याची कलमवार यादी प्राइस यास दिली. त्यांतील मजकूरः—' आम्हीं आपला एक वकील पुण्यास पाठवावा म्हणजे त्याजबरोबर आपण मोकळेपणानें अनेक प्रश्नांची वाटाघाट करूं असें नानासाहेब पेशव्यानें आम्हांस वारंवार लिहिलें आहे. हल्लीं आणीबाणीची वेळ आली असून पुष्कळ गोष्टींचा निकाल करणें जरूर आहे. ह्या कामासाठीं आम्हीं तुम्हास पुण्यास पाठवीत आहों. मराठी भाषेची व दरबारांतील मुख्य मुख्य अधिकाऱ्यांची तुम्हांस चांगली वाकब असल्यामुळें ह्या कामीं तुमचा उपयोग करून घेण्यासंबंधानें आम्हांस विलायतेहूनही लिहून आलें आहे. सबब कळविण्याचे कीं:—

१ पुण्यास गेल्यावर तुम्हास असें आढळून येईल, कीं राज्य कारभारांत पुष्कळ गोंधळ उद्भवला असून नानासाहेब व सदाशिवराव यांजमध्यें विरोध उत्पन्न झाल्यानें दोन पक्ष झाले आहेत. आमच्या हितासंबंधानें गोड गोड बोलणारे पुष्कळ लोक तुम्हांस आढळतील; पण पक्की खात्री झाल्याशिवाय तुम्ही कोणावरही विश्वास ठेवूं नका. शंकराजीपंत फडके याचा पेशव्याकडून अपमान झाल्यामुळें तो सदाशिवरावाच्या पक्षास मिळाला आहे. त्याजकडून तुम्हांस बरीचशी उपयुक्त माहिती मिळेल; परंतु तो लबाड व आपला द्वेषी आहे, आणि आमचे मार्फत सुरतेंतून कांहीं पैसा उपटण्याची इच्छा त्यास असल्यामुळें तो आमच्याशीं वर वर स्नेहभाव दाखवितो, ह्याचा तुम्ही जपून उपयोग करीत जावा.

२ जंजिरा व उंदेरी हबशांपासून काबीज करून घेण्याच्या कामीं नानासाहेबानें आमची मदत मागितली ती आम्ही दिली नाहीं, म्हणून नानासाहेबास आमची चीड आलेली दिसते. रामाजीपंतानेंही आमचे विरुद्ध पेशव्याचे

कान भरले असावे. आम्हीं सीदी यांस अन्नसामुग्री व दारूगोळा पुरविला, तो पुरविला नसता तर आपण जंजिरा कधींच काबीज केला असता, असें रामाजीपंतानें पेशव्यास कळविलें आहे. ह्या संबंधानें तुम्हीं नानासाहेबांस असें कळवा कीं, रामाजीपंतानें आपले बेत आम्हांस आगाऊ कळविलेले नव्हते. जेव्हां रामाजीपंताकडून गलबतें व फौज मागण्यास गंगाधरपंत आमच्याकडे आला तेव्हां त्यास नकाराचें उत्तर देणें आम्हांस भाग पडलें. कारण आमचा व हबशांचा फार वर्षांचा स्नेह असून विलायतेतून खास हुकूम आणिल्याशिवाय आम्हांस हबशांवर शस्त्र धरितां येणार नाहीं. फ्रेंचांबरोबर चाललेल्या युद्धात आम्हांस हबशांनीं सर्वप्रकारची मदत केलेली आहे. आणखीं असें कीं, जंजिरा घेणें हें काम रामाजीपंतास वाटतें तितकें सोपें नाहीं. ह्मणून लढाई सुरू करण्यापूर्वी रामाजीपंतानें आम्हांस त्या संबंधानें विचारिलें पाहिजे होतें. पुढें मराठ्यांचें व हबशांचें युद्ध सुरू झालें तेव्हां आम्हीं हबशांकडे दारूगोळा व अन्नसामुग्री पाठवून दिली, याजबद्दल रामाजीपंतास राग आला; आणि हबशांस ही मदत आम्हीं करू नये, असें त्यानें आम्हांस कळविलें. यावर आमचें एवढेंच कळविणें आहे, कीं व्यापार हा आमचा धंदा आहे. युद्धांत पडण्याची आमची इच्छा नाहीं. आमच्या वाटेस कोणी गेलें तर मात्र युद्धांत पडण्यास आम्हीं कमी करीत नाहीं. मुंबईच्या बाजारांत सीदी धान्य खरीद करीत असता त्यास त्याबद्दल मनाई करणें हें अत्यंत अधमपणाचें झालें असतें. दारूगोळ्यासंबंधानें म्हणाल तर तो विकण्याची मनाई आम्हीं पूर्वीच केली आहे. मराठ्यांनाही आमचा बाजार उघडा आहेच. ते मात्र आम्हांस नानातऱ्हेचा उपद्रव देतात, मजूर वगैरे लोकांस मुंबईत येऊं देत नाहींत, आमच्या फत्तेमारी अडकवून ठेवितात. नुकतेंच ठाण्याजवळ आमच्या सेनापतीस त्यांनीं तपासणीसाठीं चौकीवर अडकवून ठेविलें. हा प्रकार नानासाहेबांच्या सल्ल्यानें झाला असेल असें आम्हास वाटत नाहीं. तरी ह्या संबंधानें सक्तीचे हुकूम पेशवे आपल्या अंमलदारांस पाठवितील, अशी तजवीज तुम्हीं पेशव्यांकडून करावी.

३ नानासाहेबानें फ्रेंचांशीं संगनमत चालविलें आहे, असें उघड उघड लोक बोलतात. जंजिरा काबीज करण्यास फ्रेंचांनी पेशव्यांस मदत करावी म्हणजे मुंबई काबीज करण्यास पेशवे फ्रेंचांस मदत करणार, असा घाट दिसतो. ह्या प्रकरणात काय तथ्य आहे त्याचा तुम्ही बारकाईनें तपास करावा; आणि ही वार्ता खरी असेल तर तुम्ही त्यासंबंधानें पेशव्यांची चांगली कानउघाडणी करावी. नानासाहेब कानावर हात ठेवील. म्हणेल कीं हें सर्व कुभांड आहे. तर तुम्ही त्यास असें विचारा, कीं अशा भर पावसाळ्यात तुमचें आरमार घाईघाईनें कां तयार होत आहे. ?

४ आम्हांस असही खात्रीलायक कळतें कीं, पावसाळा संपताच सुरतेवर हल्ला करण्याचा दमाजी गायकवाडास पेशव्यांनीं हुकूम केला आहे. तरी नानास असे कळवा कीं, बादशहाच्याच हुकमानें आम्ही सुरतचे अधिकारी झालो आहो. नानासाहेब ज्याप्रमाणें मोगलाचे हुकूम दाखवून निरनिराळे प्रांत जिंकितो, त्याचप्रमाणें आमच्यापाशींही सुरतेबद्दल बादशहाचा हुकूम मिळाला आहे. सुरतचा नबाब पेशव्यास वेळेवर खंडणी देत नसेल तर ती त्याजकडून देवविण्याची आम्ही खटपट करूं. सबब मराठ्याची फौज सुरतेवर आल्यास आणि तेथील आमच्या फौजेला मराठयाशीं दोन हात करणें भाग पडल्यास जे काय परिणाम घडतील, ते भोगण्यास पेशव्यांनीं तयार असलें पाहिजे, असें त्यास निक्षून कळवा.

५ निजाम, सलाबतजंग व जंजिऱ्याचा सीदी हे आमचे दोस्त आहेत. तेव्हां त्याजवर शस्त्र धरण्याचा प्रसंग पेशव्यांनीं आम्हावर आणूं नये, असें तुम्ही सहजगत्या आपली सूचना म्हणून नानास कळवा.

६ मि. टॉमस मोस्टिन ह्यास तुमचेबरोबर पुण्यास पाठविण्यांत येत आहे. त्यास तुम्ही आमचा वकील म्हणून पुण्यास ठेवून द्या; आणि त्यास कोणीतरी चागला वजनदार दुभाष्या तेथीलच पाहून द्या.

७ आमच्या कडील पुष्कळसे युरोपियन लोक पुण्यास जाऊन पेशव्यांस मिळाले आहेत. त्यांस चार सामोपचाराच्या गोष्टी सांगून व जरूरीप्रमाणें पैसा वगैरे देऊन मुंबईस परत पाठविण्याची खटपट करा.

८ पेशव्यास व इतर कित्येक मंडळीस देण्यासाठीं कांहीं चिजा तुमच्याबरोबर पाठविण्यांत येत आहेत, त्या तुम्ही ज्याच्या त्यास पावत्या करा. सारांश पुण्यास जाऊन जास्त बिघाड न करितां युक्तीनें पेशव्यास वळवून त्याचा आमचा सलोखा करून घ्या. होता होईतों वरदळीवर येऊं नका. परंतु हर प्रयत्नेंकरून पेशव्याच्या मनांत आमच्या विषयीं दहशत उत्पन्न करण्यास कमी करूं नका.'

पुढें प्राइस् पुण्यास जाऊन आला. त्यानें रोजच्यारोज लिहून ठेविलेलीं टिपणें छापलेलीं आहेत त्यांतील कारणापुरता गोषवारा:—

शुक्रवार ता. २४ ऑगस्ट स. १७५९ रोजीं सकाळीं ८॥ वाजतां मुंबई सोडली. एक वाजतां गलबत ठाण्यास आलें. ता. २५ रोजीं ठाणें येथें बाळाजीपंतास भेटून त्याजकडून पुढील प्रवासासाठीं बिगारी व घोडे घेतले. ता. २६ रोजीं १ वाजतां निघून ५ वाजतां कल्याणास आलों. कल्याणचा अधिकारी फौजेसह सीदीवर चालून गेला होता. सीदीनें एका ब्राह्मणाची बायको पळविल्यामुळें हा तंटा उद्भवला. पाऊस अतिशय पडल्यामुळें चार दिवस प्रवास करितां आला नाहीं. ता. २९ रोजीं कल्याण सोडून संध्याकाळीं कोलगावास आलों. ता. ३० रोजीं सकाळीं ७॥ वाजतां कोलगाव सोडून चार वाजतां नेरळ येथें आलों. कोलगांवाहून नेरळ १८ मैल आहे. ता. ३१ रोजीं संध्याकाळीं खोपवलीस पोंचलों. तेथें बोर घाटास सुरुवात होते. ता. १ रोजीं सकाळीं १० वाजतां खोपवली सोडून घाट चढूं लागलों तों दुपारीं २ वाजतां खंडाळयास पोंचलों. संध्याकाळीं मुक्काम कासगाव येथें केला. ता. २ सप्टेंबर रोजीं निघून ३ सप्टेंबर रोजीं चिंचवड येथें पोंचलों. ता. ४ रोजीं संगमावर मुक्काम केला, आणि लगेच पेशव्यास खबर पाठविली. रामाजीपंताचा सेक्रेटरी बाबाजी चिटणीस हा सदाशिवराव भाऊकडून भेटीस आला. पेशव्यास सुतक असल्यामुळें ते बाहेर पडत नव्हते. ता. ६ रोजीं रामाजीपंताचा नातलग हरिपंत भेटीस आला. नदीच्या पलिकडील तीरावर तोफखाना कामदाराचा भाऊ मल्हार

घेण्यासाठीं आला होता. त्यानें मला मुक्कामावर नेलें. सोमवार पेठेंत वणजाराच्या एका विस्तीर्ण घरांत आमचा मुक्काम होता. ता. ७ रोजीं पेशव्यांचा ( खासगी ) कारभारी गोविंद शिवराम आमचे भेटीस आला. कोणकोणास काय काय वस्तु नजर करावयाच्या तें मी गोविंद शिवरामाच्या सल्ल्यानें ठरविलें. नानासाहेब, सदाशिवराव, रघुनाथराव, विश्वासराव व माधवराव इतक्यांसच तूर्त नजराणे ठरविले. ता.१०रोजीं मुलकांतून मोकळे होऊन पेशवे बाहेर पडले. ता. १२ रोजीं मी पेशव्यांच्या भेटीस गेलों. दरवाजापाशीं गोविंद शिवराम व रामाजीपंत सामोरे आले. त्यांनीं मला दरबारांत नेलें. नाना, सदोबा व विश्वासराव इतके आंतून दरबारचे जागीं आले. नानासाहेबानें मला आपल्या उजव्या हातास बसविलें,आणि कळविलें कीं, मला तुमच्याशीं पुष्कळ प्रकरणांवर बोलावयाचें आहे. त्या दिवशीं उशीर झाल्यामुळें रजा घेऊन परत मुक्कामावर आलों. ता. १७ रोजीं पर्वतीवर पुन: माझी व पेशव्याची भेट झाली. परंतु कामकाजासंबंधानें पुन: बोलणें झालें नाहीं. एकंदर तपास करितां असें कळून आलें कीं, आम्हीं हबशास मदत केल्यामुळें पेशव्यांचा आमच्यावर बहुत राग झाला आहे; तसेंच आम्हीं फौज पाठवून सुरत काबीज केली, हाही प्रकार पेशव्यांस आवडलेला नाहीं. पुण्यास मुजफरखानाची व माझी गांठ पडली. ता. १९ रोजीं मी गोविंद शिवरामच्या भेटीस गेलों, आणि कळविलें कीं ' पेशव्यांनीं बोलाविल्यावरून प्रेसिडेंटाच्या हुकमानें मी आलों आहें. काम भागवून मला वाटेस लावा.' गोविंद शिवरामनें सांगितलें, ' तुम्हीं सुरत सोडून द्या आणि जंजिरा काबीज करण्यास मदत करा.' ' ह्या गोष्टी आम्हांस कबूल नाहींत,' असें मीं साफ कळविलें. गोविंद शिवराम बोलला, 'बादशहाच्या फर्मानांत आतां कांहीं अर्थ नाहीं. ' तीं साफ खोटीं आहेत. मी जबाब दिला,' तुमच्या इतकींच आमचीं फर्मानें खरीं आहेत. जंजिऱ्याचा सीदी आमचा दोस्त आहे, त्यास आम्ही धक्का लागूं देणार नाहीं.' गोविंद शिवराम बोलला, ' वरील दोन मुद्दे तुम्हीं कबूल न केल्यास

तुमचा आमचा बेबनाव झाल्याशिवाय राहणार नाहीं.' मी म्हणालों, 'आमची इच्छा तुमच्याशीं सलोख्यानें वागण्याची आहे. इतक्या उपर अन्यायानें तुम्हांस युद्धच करावयाचें असेल, तर त्याबद्दल तुम्हांस पुढें पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाहीं.' त्यावरून गोविंद शिवराम जरा नरम आला. पेशव्यांच्या भेटीसंबंधानें त्यानें मला रामाजीपंतास पत्र लिहिण्यास सांगितलें. ता. २० रोजीं रामाजीपंतास पत्र लिहिलें, त्यांतील मतलब कीं, ''आज आठ दिवस मी पेशव्यांच्या भेटीसाठीं तिष्ठत बसलों आहे. मला परत जाण्याची निकड आहे. तर कामाचा निकाल लागण्याची तजवीज ताबडतोब करावी.' ता. २४ रोजीं पेशव्यानें मला दरबारास बोलाविलें. बराच वेळ इकडल्या तिकडल्या गोष्टी होऊन पेशव्यानें गोविंद शिवराम याजकडे सर्व हवाला दिला. पुढें ह्या दोघांचीं व माझीं बोलणीं झालीं. स्पेन्सर व वायफील्ड ह्यांच्या मार्फत इंग्रजांशीं पूर्वी तह ठरलेला आहे, त्यास अनुसरून मराठे व इंग्रज ह्या दोघांनीं एकमेकांचे शत्रु व मित्र असतील, ते आपलेही शत्रु व मित्र समजावे, असा करार असल्याबद्दल गोविंद शिवरामनें सांगितलें. नंतर पुष्कळ वाटाघाट झाली. सीदीला जिंकण्यास तुम्ही आम्हांस मदत करीत नसाल तर तुम्हांस कोणत्याही बाबतींत मदत करण्याची आमची इच्छा नाहीं. तुम्ही आल्या पायीं माघारे जा, असें, पेशव्यास विचारून गोविंद शिवरामनें मला निक्षून सांगितलें लगेच पेशव्याची रजा घेऊन मी परत आलों. ता. २८ रोजीं गोविंद शिवरामची व माझी पुनः भेट झाली. त्यांत नवीन कांहीं ठरलें नाहीं. जंजिरा जिंकून घ्यावयाचा हाच मुख्य पेशव्याचा कटाक्ष असून तो प्रांत जिंकण्याचा इरादा आपला फार वर्षांचा आहे, पेशव्यांचें मूळचें वतन जंजिऱ्याचे हद्दींत आहे, सबब कसेंही करून जंजिरा घेतलाच पाहिजे, असें त्यांचें बोलणें पडलें. ता. ३० रोजीं हत्तीच्या टकरा पाहण्यास बोलावणें आल्यावरून मी गेलों. ता. १ ऑक्टोबर रोजीं दसऱ्याचा मोठा सण पडला. मला आमंत्रण आल्यावरून मी हत्तीवर बसून स्वारींत गेलों

होतों. ता. ९ ला मी दमाजी गायकवाडास जाऊन भेटलों. तुमचें म्हणणें काय असेल तें लेखी कळवा, असें दमाजीनें सांगितलें. ता. १२ ऑक्टोबर रोजीं सदाशिवरावाची व माझी दरबारांत गांठ पडली. मुख्य मुद्दा जंजिन्यासंबंधाचाच होता. आपण आजपर्यंत इंग्रजांस मदत कसकशी केली, याचें दिग्दर्शन सदाशिवरावानें केलें. मीही त्यास आपली बाजू स्पष्ट सांगितली. ह्या संबंधानें पुष्कळ बोलणीं झालीं. पण जंजिन्या-संबंधानें दोनही पक्ष हट्ट घेऊन बसल्यामुळें ह्या वकिलातीचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. मंगळवार ता. २३ ऑक्टोबर रोजीं दुपारीं १२ वाजतां मि० प्राइस पुण्याहून निघाला तो ता. २६ रोजीं सायंकाळीं ८ वाजतां मुंबईस पोंचला.

पुढें माधवराव पेशव्याचे हातीं मराठ्यांचीं राज्यसूत्रें आल्यावर त्यानें पुनः चहूंकडे पूर्वीचा जम बसविला, याजबद्दल इंग्रजांस किती वैषम्य वाटलें, हें स. १७६७ त त्यांचा वकील टॉमस मॉस्टिन पेशव्याकडे आला, त्यास सांगितलेल्या कानमंत्रात दिसून येतें. ‘ मराठयांची सत्ता पुनः वाढत चालली, ही मोठ्या खेदाची गोष्ट असून ती आमच्या लक्षांतून गेलेली नाहीं. बंगाल व मद्रास येथील इंग्रज अधिकाऱ्यांचेही मनांत हा प्रकार चांगला वागत आहे; आणि ही मराठयांची सत्ता कमी करण्या संबंधानें मद्रास बंगालचे अधिकारी व आम्ही मुंबईकर शक्य तेवढा प्रयत्न करीत राहूं. माधवरावाची व त्याच्या चुलत्याची गोडी झाली म्हणून सांगतात; परंतु ही गोडी फारशी टिकाऊ दिसत नाहीं. त्यासंबंधानें खात्रीलायक बातमी काय असेल ती काढून आम्हांस कळवा. विशेषतः अशा कौटुंबिक कलहानें मराठयांच्या शक्तीस कितीसा विरोध होणारा आहे, हें पाहून ठेवा; आणि राघोबा आमची मदत वगैरे मागण्याची उत्सुकता दाखवील तर त्या बाबतींत शक्य ती भर त्यास देण्यास तुम्हीं कमी करूं नका.’ अशा प्रकारची इंग्रज वकीलास वरिष्ठाची ताकीद होती.

---

# प्रकरण पंचविसावें.

## नागपुरकर भोसले, बंगाल व पेशवे.

१ बंगाल्यावरील स्वाऱ्या व भास्कररामाचा खून [ स. १७४४ ].

२ खुनाचा वचपा, बंगाल्यांत मराठशाहीचा विस्तार. [ स. १७४८–५१ ].

३ रघूजीची अखेर, कोल्हटरकांशीं घरोबा [ १४–२–१७५५ ].

४ जानोजी व मुधोजी यांचा बेबनाव.

१ बंगाल्यावरील स्वाऱ्या, भास्कररामाचा खून. [स. १७४४]:— चौथाई व सरदेशमुखी या हक्काच्या साधनानें मराठशाहीचा फैलाव हिंदुस्थानच्या निरनिराळया भागात करण्याचा उपक्रम मूळ बाळाजी विश्वनाथानें केला, त्याची वृद्धि बाजीरावानें केली, आणि सिद्धि नानासा.नें बहुतेक तडीस नेली. ह्या उद्योगाचेंच एक अंग बंगाल प्रांत जिंकणें हे असून, तें रघूजी भोसल्यानें स्वीकारिलें होतें. स. १७४२ त रघूजी व पेशवा ह्यांचा युद्धप्रसंग होऊन, माळव्याकडील बाजूस संचार करण्याची रघूजीस बंदी झाल्यानें, बंगालकडील क्षेत्रच आपल्या उद्योगासाठीं त्यास मुकर करावें लागलें. रामाजी नारायणाचे दोन मुलगे कोन्हेरराम व भास्कर-राम हे या कामीं उत्कृष्ट साह्यकर्ते रघूजीस मिळाले. पहिला मुत्सद्दी व दुसरा शिपाईगडी होता. एकदां बंगाल्यातील उद्योग हातीं घेतल्यावर त्यांत अनेक संकटें येऊन भोसल्यांचा पाय त्यात दिवसेंदिवस ज्यास्तच रुतत गेला; परंतु कैक वर्षांच्या चिकाटीनें त्यानीं आपला कार्यभाग तडीस नेला. बंगाल प्रातातच बिहार व ओडिया ह्या दोन प्राताचा समावेश समजावयाचा आहे.

ह्या प्रांतात भोसल्यांच्या मुख्य चार स्वाऱ्या[1] झाल्या. त्यांत रघुजी, भास्करपंत व रघूजीचे मुलगे हे खपत होते. मात्र सर्वच प्रत्येक स्वारींत हजर होते असें नाहीं. ह्या स्वाऱ्यांचे काल येणेंप्रमाणें:—

पहिली,—स. १७४२, उन्हाळा—शरदृतु.

दुसरी,—स. १७४४

तिसरी,—स. १७४८

चवथी,—स. १७५१.

बंगालच्या नबाबांची खालील नामावलि ह्या वेळच्या व्यवहारांस उपयोगी पडेल.

मुर्शीद कुलीखान स. १७०१—१७२५.

सुजाखान ( वरच्याचा जांवई ) स. १७२५—१७३९.

सर्फराजखान स. १७३९—१७४१.

आलिवर्दीखान स. १७४१—१७५६.

अलिवर्दीखानानें सर्फराजखानास मारून स. १७४१ च्या सुमारास बंगाल, बहार व ओरिसा ह्या तीन प्रांताचा कारभार मिळविला. त्यावेळीं उरसाचे कारभारावर मीर हबीब नांवाचा गृहस्थ होता. उरसा, ओरिसा अथवा ओढया ह्या प्रांतांचें मुख्य शहर कटक असून नागपुरावरून बंगाल्यांत येण्यास मध्यें हा प्रांत लागतो. मीर हबीब अलिवर्दीस जुमानीना, तेव्हां अलिवर्दीनें त्याजशीं युद्ध करून त्यास घालवून दिलें; आणि उरसा प्रांत कबजांत घेऊन तेथें आपला नातू सिराजुद्दौला यास बंदोबस्तास ठेविलें. मीर हबीबनें पुढें अलिवर्दीचा सूड घेण्याचा निश्चय करून, प्रथम त्याज-

१ या स्वाऱ्यांची संगतवार व विश्वसनीय हकीकत ठरविण्यास लागणारी सामुग्री उपलब्ध नाहीं. डफची माहिती धरसोडीची आहे. ' मराठ्यांचा दरारा ' ह्या पुस्तकांत भरपूर वर्णन केलें आहे; परंतु काळाची व घडामोडींची ऐतिहासिक संगति जुळविलेली नाहीं. तीन शकावल्या, व नागपूरकर भोसल्यांची बखर व कागदपत्र यांजवरून पुढील भाग शक्य तितके स्पष्ट केले आहेत.

पाशींच नोकरी पत्करिली; आणि अंतस्थरीतीनें रघूजी भोसल्याशीं संधान करून त्याजकडून बंगाल प्रांतावर स्वारी करविली. हें या एकंदर भगड्याचें मूळकारण आहे. रघूजी भोसले कर्नाटकच्या स्वारींत असतां ( मार्च १७४१ ) त्याचा सेनापति भास्करराम वऱ्हाडांत होता, त्याच्याशीं मीर हबीबनें कारस्थान करून उरसा परत घेण्यासाठीं त्याची मदत मिळविली. त्या सालच्या पावसाळ्यांत रघूजी सातान्यास छत्रपतीची रजा घेऊन नागपुरास आल्यावर, त्याच्या संमतीनें भास्कररामाने उरसावर स्वारी करण्याची कामगिरी स्वीकारिली.

मध्यंतरीं उरसांत सिराजुद्दौल्यानें क्रूरपणाचें आचरण केल्यामुळें, तेथें बंडें उपस्थित झालीं, तीं चालू असतांच आपण त्या प्रातावर स्वारी केल्यास तो सहज आपल्या हातीं येईल, अशा कल्पनेनें स. १७४२ चे आरंभीं भास्करराम तिकडे चालून गेला; परंतु तो येऊन पोंचण्या पूर्वींच अलिवर्दी-खानानें येऊन बंडें मोडलीं, आणि आतां सर्व निर्भय आहे, असें पाहून तो मुर्शिदाबादेस परत जाऊं लागला. इतक्यांत म्हणजे स. १७४२ च्या एप्रिलांत भास्कररामाची फौज त्या प्रांतावर आल्याची बातमी वाटेंतच खानास समजली. भास्करपंतानें रामगडच्या जंगलांतून एकाएकीं उतरून पंचायत परगणा लुटला. त्याजवळ फक्त दहा हजारच फौज होती; परंतु ती चाळीस पंनास हजार आहे असा भ्रम होता. अलिवर्दीखानाजवळ चार हजार पायदळ व तीन चार हजार स्वार होते, तेवढ्यांनीं भास्करपंताशीं त्यानें सामना केला; परंतु मराठ्यांपुढें त्याचा निभाव लागला नाहीं. त्यांनीं खानाच्या फौजेचा फडशा उडवून त्याचें सर्व सामान हिरावून घेतलें; तथापि राहिलेल्या लोकांनिशीं लढत लढत मागें हटण्याचा त्यानें विचार केला. अशारीतीनें त्यानें खटव्यापर्यंत मजल गांठिली. उभयतांमध्यें बोलाचाली व वाटाघाट चालूच होती. प्रथम पंतानें खानाकडे चौथाईबद्दल दहा लक्षांची मागणी केली. ती नाकारून अलिवर्दीनें पंताशीं सामना केला. त्यांत पराभव झाल्यावर चौथाईची

रक्कम घेऊन पंतानें परत जावें, असें बोलणें बरद्वानच्या राजाच्या मार्फत खानानें लाविलें. पेंचांत सांपडल्याचें हें बोलणें पाहून पंतानें आपली मागणी दहा लाखांवरून एक कोटीवर चढविली. तेव्हां खान अतिशय चिडून गेला. त्याचा हिशेबनीस जानकीराम यानें एक कोटि रक्कम देऊन मराठ्यांस तूर्त वाटेस लावावें अशी खानास सल्ला दिली, पण ती खानास पटली नाहीं. त्याच्या हाताखालचे अफगाण बिथरले असतांही, मराठ्यांस शरण न जातां, त्या अफगाणांसच तो शरण गेला; आणि त्यांच्या आश्रयानें मुर्शिदाबादेस निभावून जाण्याचा विचार त्यानें ठरविला. त्याप्रमाणें चालूं लागतांच मराठ्यांनीं त्याजवर तोफांचा मारा केला, त्यांतून जीव बचावीत तो खटवा येथें पोंचला. तेथें मुर्शिदाबादेहून अन्न व इतर साहित्याची मदत त्यास होऊं लागली. रस्त्यांत बरद्वान येथें भास्करपंतास पुष्कळ लूट मिळाली. पुढें पर्जन्यकाळ समीप आल्यानें आपण परत जावें, असें पंताच्या मनांत होतें; परंतु अर्ध्यावरून पंतानें असें परत जाणें मीर हबीब यास पसंत नव्हतें. त्याचा भाऊ मुर्शिदाबादेस अलिवर्दीच्या कैदेंत होता, त्यास सोडवून अलिवर्दीचा पाडाव केल्या-शिवाय पंतानें परत जाऊं नये, असा मीर हबीबनें आग्रह धरिला; आणि मुर्शिदाबादची लूट केल्यास अपार संपत्ति मिळेल, असेंही सुचविलें; आणि त्याप्रमाणें प्रथम ती कामगिरी स्वतःच अंगीकारिली. सातशे चपळ मराठे-स्वार बरोबर घेऊन मीर हबीबनें मुर्शिदाबादेवर चाल केली, तेथें आपल्या भावास कैदेंतून सोडविलें, आणि जगत्शेट आलमचंद, मुराद अलीखान, राजा दुर्लभराय वगैरे श्रीमंत लोकांच्या पेढ्या लुटून अडीच कोटींची संपत्ति घेऊन तो परत खटवा येथें भास्करपंतास येऊन मिळाला. त्यावरून पंताची खात्री झाली कीं, पावसाळ्यांत इकडे राहण्यांतच फायदा आहे. म्हणून मीर हबीबवर भरंवसा ठेवून त्यानें हुगळी, खटवापासून मिदनापुर-पर्यंतचीं ठिकाणें ताबडतोब हस्तगत केलीं. मध्यंतरीं अलिवर्दीखान त्याचे कचाट्यांतून सुटून मुर्शिदाबादेस येऊन पोचला. हुगळी नदीस पूर आलेला

असल्यामुळें भास्करपंताकडून त्याचा पाठलाग झाला नाहीं. तो खटव्यासच छावणी देऊन राहिला. बसून राहण्यापेक्षां कांहीं तरी उद्योग केलेला बरा, असें मीर हबीबच्या सल्ल्यानें ठरवून भास्करपंतानें हुगळी शहरावर हल्ला करून तें काबीज केलें; बरद्वान व मेदिनीपुर हीं त्यांनीं हस्तगत केलींच होतीं. पुढें ओरिसांतलें बंदर बालेश्वर ( बालासोर ) हेंही त्यांनीं घेतलें. ' मराठ्यांचा दरारा त्या वेळीं बंगाल प्रांतांत इतका बसला कीं, ते जात तिकडे त्यांचें नुसतें नांव ऐकून ठिकठिकाणचे अधिकारी आपला प्रांत मुकाट्यानें सोडून जात. श्रीमंत, मध्यम, व गरीब असे सर्वच डोंगरांतून झाडांच्या आश्रयानें राहून दिवस काढीत. अशाप्रकारें ओरिसा, मेदिनीपुर,बरद्वान,राजशाही वगैरे जिल्ह्यांचा बराचसा भाग व अकबरनगर व राजमहाल हे प्रांत मराठ्यांच्या हातीं आले. नबाबाचा अधिकार फक्त मुर्शिदाबाद व गंगेच्या पूर्वतीरावरील प्रांत यां पुरताच राहिला. मुर्शिदाबादचे लोकही शहर सोडून पद्मानदीच्या पूर्व किनाऱ्यावर जाऊन राहिले. कटवा व बरद्वान यांजवळचा प्रदेश निर्जन अरण्यासारखा भयाण दिसत होता.' [ मरा. दरारा. पृ. ५७ ] या वेळच्या मराठ्यांच्या हल्ल्यापासून आपलें संरक्षण करण्यासाठीं इंग्रजांनीं कलकत्त्याचा किल्ला बांधिला, आणि एक मोठा खंदक सभोंवार बांधण्याची सुरवात केली. त्यास " मराठा डिच " हें नांव आहे. भास्करपंत लुटीच्या आशेस लागला, आणि दिखाऊ विजयाच्या नादांत आपल्या फौजेची त्यानें पांगापांग केली, यामुळें पुढें त्याचा नाश झाला. नबाबानें मुर्शिदाबादेस जाऊन, मराठ्यांना घालवून देण्यासाठीं जंगी तयारी केली, आणि पावसाळा आहे तोंच मराठ्यांना गांठण्याचें हेतूनें, आश्विनमासांत त्यानें कूच केलें. नवरात्रांत दुर्गापूजेचा उत्सव बंगाल्यांत फार मोठा होत असतो, तो समारंभ भास्करपंडितानें मोठ्या थाटाचा आरंभिला होता. त्यासाठीं त्यानें ठिकठिकाणच्या विद्वानांना, जमीनदारांना व शेटसावकारांना, आमंत्रणें पाठवून, मोठा मंडप घालून उत्सवाची तयारी चालविली होती; या उत्सवाच्या

गडबडींत मराठे लोक निमग्न असतां कटव्याचे उत्तरेस गंगानदीच्या परतीरावर नबाबाचें सैन्य येऊन उतरलें. होड्यांचा पूल करून मोठ्या साहसानें नबाबाचे कांहीं लोक नदी उतरून अलीकडे आले. या पुढें येणाऱ्या मंडळींत मुस्ताफाखान अफगाण व मीर जाफर हे अग्रगण्य होते. अकस्मात् उत्तर रात्रीं हल्ला आलेला पाहतांच भास्कर पंडित व त्याचे लोक सैरांवैरां पळून गेले. मीर हबीब त्याचेच बरोबर पळाला आणि मराठ्यांना वाट दाखवून त्यानें थोडें बहुत निभावून आणिलें. स. १७४२ च्या या सालचा दसरा २८ सेप्टेंबरास होता. वरील हल्ला आल्यावर भास्करपंतानें स्वारीचा नाद सोडून घरचा रस्ता सुधारला. त्यानें मुर्शिदाबादेहून निकडीनें रघूजीकडे फौजेची मागणी केली. ही मागणी आल्यावर रघूजीनें हर तऱ्हा करून फौज उभारली; आणि दसऱ्याचे मुहूर्तानें म्हणजे ता. २८ सेप्टेंबर रोजीं बंगाल्यांत भास्कररामाचे मदतीस जाण्याची सिद्धता केली. [ खं. ३ ले. २०८, २२२ व २२० हे अनुक्रमें ता. ३ व १८ व २३ सेप्टेंबर १७४२ चे आहेत. ] 'आम्हांस फौजेसह वर्तमान भास्करपंताकडे जाणें जरूर. नेमणुकी प्रमाणें ऐवज लोकाचे पदरीं घालून सत्वर आम्हांकडे रवाना करावे. नाजूक काम जाणून बाबूराव रघुनाथ यास पाठविलें आहे. तें वर्तमान सांगतां कळूं येईल, भास्करपंतानीं जाऊन कस्त मेहेनत केली आहे, त्याचें सार्थक विना इकडोन फौज गेलिया विरहीत होईल न होईल कळतच आहे. तत्त्वार्थ फौज गेली पाहिजे. कोणीएक असामी मागें न राहे ते गोष्ट करणें. तिळतुल्य दिरंगावर न घालणें. निदानचें हें पत्र आहे, आळस करावयाचें काम नाहीं. बाबूजी-नाईक यांहीं फौज ठेविली आहे; त्यांजकडील गोष्ट बनून आली तरी खामखा पदरीं घ्यावी आणि अनमान न करितां आम्हांकडे पाठवावी. बहुत सत्वर येऊन पोंचणें. बाबूजी नायकाचा विचार मनास आणावयास वरचेवर कोन्हेरपंतास उत्तेजन देऊन आधीं कार्य साधणें.' अशीं निकडीचीं पत्रें रघूजीनें आपल्या हस्तकांस लिहिलेलीं आहेत.

पेशवाई न मिळाल्यामुळें बाबूजी नाईक उघडपणें फौज ठेऊन रघूजीस मिळाला हेंही वर स्पष्ट आहे.

भास्करपंत परत आल्यानें रघूजीला एकदम बंगाल्यांत जाण्याचें प्रयोजन राहिलें नाहीं. इकडे अलिवर्दीखानानें पेशव्याची विनवणी करून त्याजकडून रघूजीला शह बसविला. पेशवा या वेळीं माळवा व बुंदेलखंड या बाजूस फौज घेऊन होता; त्यानें बाबूजी नाईक व रघूजी यांजवर फौज पाठविली असावी; अथवा पेशव्याची फौज आपणावर येण्यापूर्वीच त्याच्या प्रतीकारार्थ रघूजी आयती तयार असलेली फौज घेऊन पेशव्यावर गेला असावा. कारण आक्टोबर स. १७४२ त पेशवा व रघूजी ह्यांच्या जावळ व भडाले येथें दोन लढाया झाल्या, त्यांचा उल्लेख मागें पृ. ४४ वर पेशव्याच्या स्वाऱ्यात आला आहे. पुढें स. १७४३ सालभर पेशवा व रघूजी यांची झटापट चालून उभयतांची गोडी शाहूनें सातान्यास करून दिली. अर्थात् भास्करपंताच्या पराभवाचा वचपा काढण्यास त्या सालीं भोसल्यास बंगालवर जातां आलें नाहीं. पंतानें लूट पुष्कळ आणिली होती, परंतु अपयश घेऊन आल्याबद्दल सर्व मंडळीस दुःख वाटत होतें. सबब स. १७४४ त रघूजीनें बंगाल्यावर मोठ्या फौजेनिशीं भास्करपंडितास रवाना केलें. याप्रसंगीं मराठ्यांशीं टक्कर देण्याचें आपणास सामर्थ्य नाहीं, असें पाहून कपटाविद्येनें आपला हेतु साधण्याचा नबाबानें विचार केला. या कामीं त्याचा सेनापति मुस्ताफाखान अफगाण याची मसलत नबाबानें स्वीकारिली. अलीभाई नांवाचा एक मुसलमान झालेला मराठा भास्करपंताजवळ होता, त्याचेमार्फत मुस्ताफाखानानें भास्करपंताशीं सलुखाचें बोलणें लावून तह करण्याची वाटाघाट चालू केली; आणि नजराणे व फळफळावळ पाठवून भास्करपंताचे मन भाळून टाकिलें. नबाब अलिवर्दीखान खटवा येथें भास्करपंताच्या छावणी-जवळच येऊन उतरला. ह्या दोघांच्या भेटीचा दिवस ठरला. नबाबाचें कपट न समजून भास्करपंतानें त्याच्या छावणींत नबाबाचे भेटीस जाण्याचें ठरविलें. भेटीचा थाट मोठा भव्य केलेला होता. सलामी घेत घेत भास्करपंडित

नेमलेल्या वेळीं अलीभाई व वीस निवडक सरदार यांस बरोबर घेऊन नबाबाच्या डेऱ्यांत गेला. मुस्ताफाखान व जानकीराम प्रवेशद्वारापाशीं स्वागत करण्यास उभे होते. डेऱ्याच्या दारापाशीं स्वत: नबाब त्यांस घेऊन आंत गेला. लगेच त्यानें भास्करपंडित कोणते असा प्रश्न विचारून मंडळींनीं पंडिताकडे बोट दाखवितांच नबाब मोठ्यानें ओरडला, 'काफरकू मारो.' त्याबरोबर सशस्त्र मारेकरी एकदम चालून आले, आणि त्यांनीं भास्करपंत व त्याचे सरदार यांस कापून काढिले. तंबूच्या तणावा कापल्यामुळें कोणासही पळून जातां आलें नाहीं. हें वर्तमान बाहेर पडतांच भास्करपंताची फौज पळून गेली. राघो गायकवाड नांवाच्या सरदारानें सर्वां आधीं पळ काढिला, त्याबरोबर सर्व लोक पळून आले. या विजयाबद्दल अलीवर्दीखानानें मुर्शिदाबादेस आनंदोत्सव करून मुस्ताफाखान, जानकीराम वगैरे मंडळीस मोठमोठीं बक्षिसें वाटलीं आणि बादशहासही पत्र पाठवून खूष केलें. बादशहानेंही नबाबाचा मोठा गौरव केला. हा प्रकार स. १७४४ च्या बरसातीनंतर म्हणजे ऑक्टोबर नोव्हेंबर महिन्यांत झाला असावा. [ खं. २ पृ. १०१ ]. खून होऊन पडलेल्या सरदारांची नांवनिशी ना. भो. व. पृ. ४१ वर आहे.

२ खुनाचा वचपा, बंगाल्यांत मराठशाहीचा विस्तार. [ स. १७४८—५१ ].:—भास्कररामाच्या खुनाचा सूड तावडतोब घेण्यासंबंधानें रघूजीस अत्यंत हुर हुर लागली होती. परंतु अनेक अडचणींमुळें त्यास हें काम पुढें तीन चार वर्षें हातीं घेतां आलें नाहीं. नागपुर वऱ्हाडांत दंगेधोपे चालू असून साताऱ्यास शाहूछत्रपतीच्या वृद्धावस्थेंत मराठशाहीच्या कारभारांत पुढें काय प्रकार घडतो इकडे सर्वांचीं अंत:करणें वेधलीं होतीं. स. १७४८ त पुत्र जानोजी व मीर हबीब यांसह रघूजी ओरिसा प्रांतांत कटक येथें आला. आणि लगेच त्यानें मुंडकटाई व दंड मिळून तीन कोटींची मागणी अलिवर्दीकडे केली. त्याजवर घरसोडीची वाटाघाट चालवून नबाबानें दोन महिने काढिले. आणि तेवढ्या अवधींत

मुस्ताफाखान अफगाणांचा सरदार बिथरून मराठयांस मिळणार होता, त्याच्याशीं लढून अलिवर्दीनें त्यास ठार मारिलें. आणि लगेच रघूजीशीं उद्दामपणाचें वर्तन आरंभिलें. त्याबरोबर रघुजीनें एकंदर मुलखांत धुमाकूळ मांडिला; आणि संबंध ओरिसा प्रांत हस्तगत केला. पावसाळयांत मराठे बंकीपुर पाटणापर्यंत पुढें गेले, तेव्हां पावसाळयानंतर त्यांजवर अलीवर्दीनें चांगली तयारी करून चाल केली. आपल्या आगमनाची कांहींएक वार्ता कळूं न देतां एकाएकीं अंधाऱ्यारात्रीं खान रघूजीवर चालून आला. निकराची लढाई होऊन मराठयांस शेवटीं पळ काढावा लागला बंकीपुराहून मराठे पळत पळत मुर्शिदाबादेस आले. मागोमाग नबाबही त्यांचा पाठलाग करीत आला. इतक्यांत नागपुराकडे गोंडवणांत बंडावा झाल्याचें ऐकून रघूजीला स्वारीचें काम अर्धवट टाकून फौजेसह तसेंच परत यावें लागलें. सारांश या स्वारीपासून विशेष कांहीं निष्पन्न झालें नाहीं, आणि त्याबद्दल विश्वसनीय हकीकतही उपलब्ध कागदपत्रांत आढळत नाहीं. ' मराठयांचा दरारा ' या पुस्तकांतून वरची हकीकत घेतली आहे. ही स्वारी आटोपल्यावर रघूजीनें साताऱ्यास जाऊन शाहूमहाराजांची भेट घेतली, असा उल्लेख वरील पुस्तकांत आहे. ही भेट स. १७४८ व ४९ यांचे संधीस झाली असावी.

या प्रसंगीं मात्र रघूजीनें मुलगा जानोजी व सरदार तुळजाराम यांस, मीर हबीबचे मदतीस लगेच, म्हणजे स. १७४८ वर्ष संपण्या पूर्वीच बंगाल्यावर रवाना केलें. जानोजीनें अल्पायासानें कटक प्रांत हस्तगत करून तो मीर हबीबचें स्वाधीन केला. पुढें ' जानोजी व मीर हबीब यांचें दरम्यान तंटा उपस्थित होऊन शेवटीं मीर हबीब यास जानोजीनें प्रतिबंधांत ठेविलें. त्यास प्रतिबंध असह्य होऊन चौकीदाराशीं झगडण्यांत मीर हबीब मारला गेला. ( स. १७५१ ). ही हकीकत पुढें येईल. तूर्त अलिवर्दीनें

---

१. का. सं. प. या. ले ३९७ चें २७ रजबचें पत्र या पळास अनुलक्षून असलें पाहिजे असें संभवतें. २७ रजब म्हणजे १३ जुलै १७४८.

कटक प्रांत आणि बंगाल व बहारच्या चौथाईबद्दल बत्तीस लक्ष रुपये भोसल्यास दिले. त्यानंतर जानोजीनें गाविलगड, नरनाळा व माणिकदुर्ग हे तीन किल्ले हस्तगत केले.' [ रा. ग्र. खं. २ पृ. १२३–१२४ ]. याप्रमाणें जानोजीनें सतत दोन वर्षे मेहनत करून अलीवर्दीखानास इतकें सतावून सोडिलें कीं, तह करून मराठ्यांच्या सर्व मागण्या कबूल केल्याशिवाय त्यास गत्यंतर राहिलें नाहीं. त्यानें नागपुरास रघुजीकडे वकील पाठविले आणि त्यांच्या मार्फत खालील तह ठरविला. तहाची वाटाघाट वर्ष सहामहिने चालू असतां जानोजी बंगाल्यांत स्वस्थ पण सावध होता.

१ बंगाल, बहार व ओरिसा या तीनही प्रांताची चौथाई नबाबानें भोसल्यांस नियमानें देत जावी.

२ मीर हबीबनें परत नबाबाकडे जाऊन त्यास नबाबानें ओरिसा प्रांताचा सुभेदार नेमावें. त्या प्रांताचें समग्र उत्पन्न मीर हबीबनें भोसल्यास द्यावे.

३ मराठ्यांनीं बंगाल प्रांतावर पुनः स्वाऱ्या करूं नयेत. मात्र त्याबद्दल त्यानें दरसाल बारा लक्ष रुपये भोसल्यांस द्यावे.

४ कटक प्रांत म्ह. सुवर्णरेखानदीपर्यंतचा प्रदेश मराठ्यांचा समजावा. त्या पलीकडे मराठ्यांनीं पाऊल ठेवूं नये.

५ दोन वर्षांच्या खंडणीबद्दल २५ लक्ष रु. नगद द्यावे. [ ना. भो. ब. पृ. ४५।४६ ]. हा तह जानोजीनें घडवून आणिला, आणि एकंदरींत आपला फायदा करून बंगालचें प्रकरण त्यानें कायमचें मिटविलें, ह्यावरून जानोजीची कर्तबगारी व्यक्त होते. तह ठरल्यावर रघुजीनें आपलें सैन्य बंगाल्यांतून काढून घेतलें; आणि पुढें त्यानें आपला करार तंतोतंत पाळिला. त्यानें शिवरामभट साठे यास कटकप्रांताचा सुभेदार नेमिलें, आणि त्यानेही तो कारभार कैक वर्षे दक्षतेनें केला. तहानंतरचीं पांच वर्षे अलिवर्दीखानास शांततेची गेल्यानें प्रांताची पुष्कळ आबादानी झाली. मीर हबीब-

१ तिसऱ्या खंडांत शिवरामभट साठ्याचीं पत्रें आहेत, ले. ४३३–४५०.

विषयीं नबाबाचे मनांत वैरभाव डांचत असल्यामुळें, युक्तीनें हा कांटा परभारें काढण्याचा विचार ठरवून मीर हबीबचें नांवचे एक बनावट पत्र जानोजीच्या हातांत पडेसें केलें, तें वांचून जानोजीनें एकदम त्याचा शिरच्छेद केला, अशीही हकीकत सांपडते. [ स. १७५१ ].

३, रघूजीची अखेर, कोल्हटकरांशीं घरोबा. [१४-२-१७५५]-' भास्करपंतास अलीवर्दीनें दगा देऊन ठार मारिलें, तेव्हां त्याची स्त्री गर्भिणी होती. तिजला धरावें तो ईश्वरकृपेनें एका पठाणाचे बायकोनें बाईला डोली देऊन कोणास न समजतां काशीस रवाना केलें. तेथें पोंचल्यावर तीस पुत्र झाला, म्हणुन नांव काशीराव भास्कर ठेविलें. भास्करपंताचे मृत्यूचे वर्तमान रघूजी बाबांस कळतांच बंधु कोन्हेरपंत यांस जाऊन मजकूर निवेदन केला. रोज दर्शनास जात. बंधूचे दुःखांत कोन्हेरपंत मग्न, हें मुधोजी बाबांनीं जाणून दरसाल पंचवीस हजार रुपयांची सनद वंशपरंपरेची, शिवाय स्वारी शिकारी लग्नकार्य वगैरेचे खर्चास सरकारांतून मदत देणेची, शपथपूर्वक करून दिली. याशिवाय कर्नाटकांतील भोसल्यांच्या सुभ्याबद्दल कोन्हेरपंतास दहा लक्षांचे उत्पन्न अर्काटचे नबाबानें सेप्टेंबर ता. ३ स. १७४८ त करार करून दिलें होतें. [ खं. ३ ले. ५५५ ] यावरून कोन्हेरपंताची प्रतिष्ठा दिसून येते. रघूजीला बोलण्यांत लोक बाबासाहेब असें म्हणत. भास्करपंताची स्त्री ताईबाई रांवाची होती, तिचे नांवें वऱ्हाडांतील बंदोबस्त सुभा बाईचे नांवानें बाबासाहेबांनीं करून वहिवाटीस कोन्हेररामाचे विद्यमानें कृष्णाजी गोविंद मुक्रर करून बंदोबस्त ठेविला. ( तो १७५१ पर्यंत चालला. ) कोन्हेरराम शोकाक्रांत फार होऊन देशीं जाण्याची आज्ञा मागितली. बाबासाहेबीं बहुतांप्रकारें समाधान करून पाहिलें. परंतु उदासीनता दूर होईना, हें पाहून त्यांचे विनंतीवरून देशीं जाण्याची आज्ञा देऊन रवाना केलें. नंतर बाबासाहेबांनीं कोन्हेरपंताचे सहा पुत्र, त्यांत चवथांचे नांवें पत्र पाठवून बोलावून घेऊन बहुतप्रकारें खात्री करून चवथांचे नांवें सनद करून दिली; आणि बाबूराव कोन्हेर

याजला कुळदौलतीचा कारभार सोंपून संनिध ठेविलें, [ स. १७५२ ] व तिघे बंधूंची रवानगी देशीं पंतांनीं करून देऊन बाबासाहेबांचे आज्ञे-प्रमाणें दिवाणगिरी व मुज्मूचा दरख वगैरे शिलशिल्याप्रमाणें घेऊन कारभार केला. बाबासाहेबांची मर्जी पंतावर बहुत संतोषभरित असे.' खालील रघूजीच्या स्वदस्तुरचे पत्रावरून ही गोष्ट व्यक्त होते. हे पत्र ता. ३० सप्टेंबर स. १७५२ चें आहे. 'आमचाही वृद्धापकाळ व तुमचाही वृद्धापकाळ, ऐशा प्रसंगामधीं तुम्ही व आम्ही विभक्त असावें, हें विश्वरास मानत नाहीं. याउपर कित्येक गोष्टी तुह्मांस व आह्मांस सांगितल्या त्या उभयतांनीं चित्तांत आणाव्या. पूर्ववत्प्रमाणें एकचित्त असलियाणें सर्व उत्तम आहे. ऐसें चित्तांत असून, हें पत्र लक्ष पत्रांचे जागा म्हणून तुह्मीं चिरंजीव बाबूरायांस घेऊन यावें. इकडील सर्वार्थ विसोबा सांगतां कळूं येईल. तुह्मी यावयास अनमान कराल तर तुह्माला आमच्या गळयाची आन असे' [ खं. ३ ले. १८४ ] या पत्रावरून भोसले व कोल्हटकर या दोन कुटुंबांचा किती एकजीव होता, आणि हिंदुस्थानच्या ईशान्य बाजूकडील मराठशाहीची ही प्रचंड दौलत उभारण्यात या दोन कुटुंबाचें श्रम कसे कारण झाले, ह्याची कल्पना करितां येते. राजकारणें व युद्धप्रसंग अंगावर घेतल्यानें प्रसंगीं पराक्रमी पुरुषांस जिवानिशीं जावें लागतें, याचा प्रत्यय व दौलतीचा वीट भास्करपंताच्या मृत्यूनें त्याचा तितकाच पराक्रमी बंधु कोन्हेरराव यास येऊन, त्यानें नागपुर सोडून देशींची वाट धरिली. त्यामुळें वृद्धपणीं रघूजीसही कोन्हेररामाचा वियोग दुःसह झाला. कौटुंबिक व राज्याचा विस्तार व अडचणी वाढत चाललेल्या, पसारा मोठा, व आपली शक्ति क्षीण होत चाललेली, अशी रघूजीची अवस्था शेवटीं होऊन त्यास कोन्हेरराम जवळ असावा असें वाटून वरील पत्र लिहून त्यास आणण्यास मुद्दाम माणसें पाठविलीं. त्यावर कोन्हेरराम येऊन त्याची व रघूजीची भेट झाली कीं नाहीं याचा उल्लेख सांपडत

नाहीं. रघूजी पुढें दोन तीन वर्षे जिवंत होता. त्या अवधींत राज्याच्या किंवा इतर व्यवहारांत त्यानें भाग घेतल्याचें दिसून येत नाहीं. मात्र हुजूरचा ऐवज न दिल्याबद्दल पेशव्याचा त्याजकडे तगादा असे. [ शा. म. रो. १६७ ता. १७।६।१७५१ ] त्यावरून सामान्यतः स. १७५२ पासून स. १७५५ त त्याच्या मृत्यूपर्यंत शेवटचीं तीन वर्षे तो बहुधा आसन्नमरण स्थितींत असावा असा तर्क होतो. या तीन वर्षांत पेशव्याच्या निजामाच्या वगैरे अनेक भानगडी व तक्रारी उपस्थित झाल्या असतां त्यांत रघूजीचे मुलगे जानोजी व मुधोजी यांचें नांव येतें. रघूजीचें येत नाहीं. ' त्यांस पोटदुखीचा आजार उभा राहिला. ' असा उल्लेख आहे. अशा कारणामुळेंच रघूजीचा मृत्यु स. १७५३ त झाला असे पुष्कळ उल्लेख मिळतात. परंतु रघूजीच्या मृत्यूची तिथि पुरंदरे रोजनिशींत आलेली निःसंशय खरी होय. ' फाल्गुन व॥ ६ मंगळवार ( शके १६७६ ) खबर आली कीं रघूजी भोसले यांस फाल्गुन शुद्ध तृतीयेस देवआज्ञा जाली.' ता. १४ फेब्रुवारी स. १७५५. स. १७५४ सालचे रघूजीच्या नांवचे अनेक कागद उपलब्ध आहेत. ( खं. ३-४३९-४४३ ) ' बाबासाहेबांची प्रकृति बिघडली तेव्हां राज्यकारभाराचे कितीएक प्रकार बाबूराव याजला एकांत घेऊन करावें. आज्ञा झाली कीं, तुम्हीं आम्हांस पुत्रवत् आहां. तेव्हां आम्हाजवळ रात्रंदिवस राहत जाणें. श्रीमंत जानोजी भोसले यांनीही जवळ राहवें. या उभयतांस दौलतीचे सर्व कारभार ते समजावून देऊन स. ११६३ फसली सालीं देवाज्ञा झाली. तेरा स्त्रियांनीं सहगमन केलें.' जानोजीस ' सेनासा० सुभा ' पद देऊन सर्व मुलास राज्यांत काहीं वांटणी रघूजीनें ठरवून दिली; आणि आपल्या पश्चात् ही व्यवस्था पेशव्यांनी चालवावी, असें कळवून ठेविलें. सर्व सरदारांचे बरोबरीनें राज्याचा उद्योग करावा असें, मरण्यापूर्वी रघूजीनें आपल्या मुलांस मुद्दाम बजाविलें. ( डफ भा. २ पृ. ७४ ).

'नंतर कांहीं दिवस सेनासाहेबाचा अधिकार जानोजीबावांनीं घेतला, कारभार बाबुराव कोन्हेर यांनीं करावा. तों पंत मजकुरची प्रकृति फारच बिघडली याजकरितां आज्ञा घेऊन देशीं गेले. पंतांचे पाठीमागें जानोजीबावा व मुधोजीआपा या उभयतांत फिसाद वाढून खिस्सा होत गेला. हें वर्तमान पुण्यास समजल्यावरून पेशव्यांनीं जानोजीबावाचे नांवें सेनासाहेबाचीं वस्त्रें व मुधोजीआपाचे नांवें 'सेनाधुरंधरी'चीं वस्त्रें पाठविलीं व राजकारण कांहीं दिवस सुरळीत चाललें. बाबुराव कोन्हेरला पत्रे येण्याविषयीं गेलीं, परंतु प्रकृतीमुळें येण्याचा योग न झाला. यास्तव जानोजीबावानीं बळवंतराव कोन्हेर यास बोलावून चौघांचे नांवें पंनास हजारांची सालीना नेमणूक करून दिली. बळवंतरावांहीं दिवाणीचा कारभार व मुज्मीचा दरख कांहीं दिवस चालविला. पुढें दिवाकर पुरुषोत्तम ऊ. देवाजीपंत चोरघोडे कामकाजांत पुढें येऊन त्यांजवर श्रीमंतांची कृपा होऊन ते कारभार पाहूं लागले, तेव्हां बळवंतराव कोन्हेर देशीं परत आले.' [ ना. भो. का. पृ. ११-१२ ]. रघूजीचे मरणसमयीं साबाजी व जानोजी असे दोघे जवळ होते. मुधोजी गाविलगड घेण्यास गेला होता. त्यानें तो गड काबीज केला, तों त्यास रघूजी निवर्तल्याची बातमी समजली. त्यावरून सुरजी अंजनगांवचे मुक्कामीं येऊन क्रिया केली.

मराठशाहींत केवळ अकलेच्या व अंगांतील पराक्रमाच्या जोरावर जीं माणसें पुढे आलीं त्यापैकीं रघूजी भोसले प्रमुख होय. त्याचें वय मरण-समयीं साठीच्या वर असावें. पिलाजी जाधव व रघूजी भोसले हे आरंभीं शाहू छत्रपतीजवळ वागून उदयास आले. पैकीं पिलाजीनें पेशव्याशीं गोडी राखून उद्योग केला, व रघूजीनें पेशव्याशीं बहुतेक विरोध ठेविला. तथापि स. १७४३ त पेशव्याचा व त्याचा तह शाहूने घडवून दिल्यापासून त्यानें ठरलेली मर्यादा बरोबर पाळून पेशव्याशीं वर्तन चोख व बाणेदार असेंच ठेविलें. शिंदे, होळकर, गायकवाड यांजप्रमाणेंच किंबहुना त्यांच्याहून

ज्यास्त रघूजीचा पराक्रम मराठशाहीच्या उपयोगी पडला. मात्र काळ-चक्राच्या तडाख्यांतून पाहिल्या तिघांचीं राज्यें अद्यापि वांचलीं आहेत, तसा प्रकार नागपुरकर भोसल्यांचा झाला नाहीं. त्यांचें राज्य रघूजीच्या मरणानंतर १०० वर्षांनीं खालसा झालें.

४, जानोजी व मुधोजी यांचा बेबनाव (स. १७५५-६०):— 'रघूजीस मुलगे चार[1]. जानोजी व साबाजी हे एकोदर धाकट्या स्त्रीचे, आणि मुधोजी व बिंबाजी हे एकोदर वडील स्त्रीचे.' जानोजी धाकट्या स्त्रीचा परंतु वयानें मुधोजीपेक्षां मोठा होता. मुधोजीवर बाबांची मर्जी कांहीं अंशीं कमी होती, याचा उल्लेख मागें पृ. १३५ वर आला आहे. जानोजी व मुधोजी दोघेही कर्तृत्ववान् व हुशार होते; परंतु गृहकलहानें त्यांचें बरेंच नुकसान झालें. आपल्या पश्चात् जानोजीनें कारभार करावा असें रघूजीनें बहुतेक ठरविलें होतें; आणि जानोजी पेशव्याचे तंत्रानें चालणारा होता. रघूजीच्या मरणानंतर पेशव्यानें त्यांचे दौलतींत आरंभीं कांहींएक ढवळाढवळ केली नाहीं. परभारें सर्व व्यवस्था सुरळीत लागती तर त्या कामांत पडण्याचा पेशव्यास प्रसंगच आला नसता. परंतु भोसल्याचे दौलतींत दुफळी उत्पन्न झाली, आणि त्यांचा तंटा पुण्यास पेशव्याकडे आला. दोघां भावांचा विशेष तंटा असा कांहीं नव्हता; परंतु उभयतांस एकमेकांविरुद्ध चढविणारी मंडळी दरबारांत पाहिजे तितकी होती. वास्तविक अशा कारभारी मंडळीच्या पायींच राज्याचें उत्पन्न खर्च होऊन जात होतें. मराठे सरदारांनीं बाह्य प्रदेशीं आपापल्या राजधान्या स्थापन केल्या, तेव्हां त्यांची सर्व रचना मूळ छत्रपतींच्या नमुन्यावर करण्याचा प्रघात पडला. चिटणीस, पोतनीस, फडणीस वगैरे छत्रपतींच्या दर-

१ जानोजी मृ. २९. ४. १७७१ ना. मो. ब. पृ. ७९
साबाजी मृ. २६. १. १७७५ ,, ११७
बिंबाजी मृ. जून १७८७ ,, १३५ स्त्री उमाबाई
मुधोजी मृ. १९. ५. १७८८ ,, १२५

राज्यांतील सर्व दरकदारांनी आपापल्या तर्फेचे इसम प्रत्येक राजधानीस पुरवावे, या प्रघातानें शिंदेशाहींत व होळकरशाहींत वगैरे बाहेरची माणसें जरी पुष्कळशी आलीं, तरी नागपुरच्या दरबारांतील बाहेरच्या इसमांचा सुळसुळाट वाचला, म्हणजे मन थक्क होतें. ना. भो. व. पृ. ३३–३४ व ना. भो. कां. प. लेखांक ५५ यांतील याद्या उदाहरणार्थ अवश्य पाहाव्या. महिपतराव दिनकर हा प्रभु इसम मुधोजीच्या विश्वासांत होता. त्याच्या सल्ल्यानें मुधोजीनें जानोबास चिरंजीव संबोधनानें पत्र लिहिलें. 'आह्मी वडील मातुश्रीचे तेव्हां वडीलपणा आह्मांकडेस; व तुह्मी कनिष्ठ मातुश्रीचे तेव्हां कनिष्ठ तुह्मी, दौलतीची मालकी आह्मांकडेस, तुह्मी आमचे आज्ञेत वागावें. अशीं पत्रें लिहून फौजेचा विचार घेऊन नवीन इतबारी लोक ठेवण्यास आरंभ केला. इतर कुल सरदार, मुत्सद्दी वगैरे मंडळी जानोजीबोवांकडे.' तेव्हां त्याच्यांनीं विचार करून बाबूराव कोन्हेर मुजुमदार व त्रिंबकजी राजे या दोघांस पुण्यास पेशव्याकडे रवाना केले. बोलणीं झालीं. पेशव्यांचे मनांत एवढ्या मोठ्या दौलतींतून कांहीं तरी नजराणा हाबकल्याशिवाय या बाबतीचा निकाल करावयाचें नव्हतेंच, तेव्हां अनायासें चालून आलेला डाव त्यांनीं युक्तीनें फायदेशीर करून घेतला. त्रिंबकजी राजाच्या कारकुनाजवळ देवाजीपंत चोरघोडे नांवाचा शागीर्द पुण्यास होता. हा देशस्थ यजुर्वेदी ब्राह्मण, नागपुराजवळच्या चिमूर गांवचा राहणार. त्रिंबकजीबरोबर तो नानासाहेबाच्या दरबारास गेला. तेथें भोसल्यांच्या ठरावाची बोलणीं चालली असतां नानासाहेबास नजराणा मिळवून देण्याचे कामीं देवाजीपंताची मदत फार झाली. तेव्हांपासून त्याजवर नानासाहेबाची मर्जी बसली. पुण्याहून परत येतांना त्यास आज्ञा झाली कीं, 'स्वारी कर्नाटकप्रांतीं जाणार, तेथें चाकरीत हजर असावें.' ही कर्नाटकची स्वारी १७६१ च्या आरंभीं झाली. त्या स्वारींत होवेही भोसले वंगु पेशव्यांच्या आज्ञाप्रमाणे गेले होते. परत आल्यावर भोसल्यांच्या दौलतीची वांटाघाट

पुण्यास जून १७५७ च्या पावसाळ्यांत आली. पेशवे ७ लक्ष नजराणा मागतात, असा निरोप जानोजीस कळला होता. तो देवाजीपंताचे मध्यस्थीनें २॥ लक्ष ठरला. इकडे पेशव्यांची पहिली मागणी १॥ लक्षांची होती. त्यांत देवाजीपंतानें १ लक्षाची भर घालून पेशव्याची मर्जी संपादन केली; आणि तिकडे ४॥ लक्ष कमी झाल्यामुळें जानोजीचीही मर्जी त्याजवर बसली. [ ना. भो. ब. पृष्ठ. ५३ ]. हा देवाजीपंत पुढें, भोसल्याचे कारस्थानांत माधवराव पेशव्याचे कारकीर्दीत विशेष प्रसिद्धीस आला. निजामाचा विठ्ठल सुंदर, पेशव्याचा सखाराम बापु, व भोसल्याचा हा देवाजीपंत असे तीन शहाणे, व नाना फडणीस अर्धा शहाणा मिळून पेशवाईतील साडे तीन शहाण्यांची मालिका आहे. पुढें मुधोजी व जानोजी यांजमध्यें कलह उत्पन्न झाला, आणि त्याच्या दोन तीन लढाया वऱ्हाड-प्रांतीं झाल्या. [ ना. भो. ब. पृष्ठ ५४ ]. महादाजी रघुनाथ पटवर्धन व त्याचा बाप रघुनाथभट पटवर्धन, हा रघूजीच्या वेळेपासून भोसल्याच्या दौलतींत शिकेनवीस म्हणून होता.[1] तारीख २० नोव्हेंबर १७५५ च्या पत्रात महादाजी रघुनाथ पुण्याहून लिहितो ' मल्हारजी होळकराचे चित्तांत आहे कीं, उभयतां बंधूचें सख्य करून द्यावें. जानोजीबावाचें वर्तमान तरी आजपावेतों प्रथम दिवसच आहे. बोलीचाली कांहीं नाहीं. दोघे बंधू निराळे. पहावें, पुढें कसें होईल. जानोजी भोसले व फत्तेसिंग भोसले याजकडील कामकाजाचा बंदोबस्त होणें आहे. ' [ खंड. ३ ले. ४६४ ]. या वेळीं दोघेही भोसले बंधु पुण्यास होते असें दिसतें. त्याच महिन्यांत शिवभट साठे यानें बंगाल्यातून जवाहिर व रकम १२ लक्षांची आणिली. तें सर्व द्रव्य आपणांस मिळावें म्हणून दोघे भोसले बंधू आपसांत भांडूं लागले [ खंड. ३ ले. ४६५, ४६७, ४६८ ]. कापगांवकर वासुदेव दीक्षित याचा ओढा मुधोजीकडे विशेष होता. ता. ७ फेब्रुवारी स. १७५६ चे पत्रीं मुधोजी दीक्षितास लिहितो, " साहेबांचा काळ जाहल्या नंतर दौलतीस

---

[1] याचें नांव भोसल्यांचे व्यवहारांत वारंवार येतें.

प्रकार जाहला, तो परस्परें आपणांस श्रवण जाहलाच असेल. मास पक्षानंतर कूचदरकूच पंत प्रधानांच्या भेटीच्या उद्देशें पुण्यास आलों. इष्टलाभाचे बोलण्यांत घरकृत्यांत द्वैतार्थ पाहोन, उभयपक्षीं समजाविशी समान दौलतेचे वांटे करून उभयतांस द्यावे, आणि समाधान करावें, हा निश्चय ठरविला. इतक्यांत कर्नाटक प्रांतांत मसलत उपस्थित होऊन पेशवे निघाले त्यांज-बरोबर चालून जाणें जरूर जाहलें. दिवसगत जाहली. यामुळें आम्हां उभयतांसही फौजेसहित राहावें लागलें. अशा प्रसंगांत शिवभट साठे बंगाल्याहून ऐवजाच्या हुंड्या १२ लक्षांच्या घेऊन नागपुरास आले. हा सर्व ऐवज ते जानोजीकडे देणार, त्यास दौलतेचे विभाग होतील, तदनुसार ऐवजाची समान वांटणी द्यावी. एकासच प्राप्त व्हावी असें नाहीं. आपण वडील आहेत, तरी रुपये सर्व साहुकाऱ्यांत अनामत ठेवावे. शिवभट दुराग्रहच धरतील तर, निम्मे जानोजीकडे द्यावे. आमच्या वांटणीचे आपणांसन्निध ठेवावे. शिवभट यांसही पत्र लिहिलें आहे. आमचे नांवचीं लटकीं पत्रें दाखवितील तरी न मानतां रुपये अडकवून ठेवावे. आपण आम्हांस तीर्थरूपाचे जागां वडील आहेत. सकळविशीं भरंवसा मानून विनंती लिहिली आहे.' [ खं. ३ ले. ५६९ ]. दीक्षित हे स्वतः सावकारी करीत, व सर्व देशभर त्यांचा देवघेवीचा व्यापार असे. तेव्हां त्या निमित्तानें सर्व सरदारांशीं त्यांचे व्यवहार चालत. जानोजीनेंही वरील बाबतींत दीक्षितास पत्र लिहिलेलें आहे. [ खं. ३ ले ४७० ]. २८ मार्च स. १७५७ रोजीं दीक्षितास पत्र लिहून जानोजीनें वऱ्हाडांत जातांना बापुदेव दीक्षितास आपल्या भेटीस बोलाविलें [ ३–५१४ ]. २६ मार्चला शिवभट साठे लिहितो. " उदईक मुक्काम प्रतिष्ठानीं प्रविष्ट जाहल्यावर वर्तणूक, वर्तमान, अवलोकन करून तुम्हांस लेखन करिजेल. प्रस्तुत सैन्य, अधिकारीसहवर्तमान बुभुक्षित दिसतात. तपोनिधि हंसपुरी महंत यात्रान्यास गेले असत. बाबूराव कोन्हेर चिरंजीवाचे व्रतबंधास घरास गेले असत. उभयतां मध्यारानिवृत्त आलिया व्यतिरिक्त कांहीं काम विशेष

आवावयाचें श्रीमंतांचे मनोदयीं नाहीं. कित्येक गोष्टींस महंत मध्यवर्ती आहेत, यास्तव आम्हीहीं कांहीं उपक्रम करीत नाहीं." का. सं. प. या ले. ३६१ वरून दिसतें कीं, हिशेब व्यवस्थित न ठेविल्याबद्दल पेशव भोसल्यास स. १७५६ त तंबी देत होता. ले. ५६५ वरून दिसतें कीं स. १७५७चे मार्चांत पेशवा भोसले बंधूंस घेऊन दीक्षितांचे जवळ पैठणचे बाजूस आला होता. 'आम्ही आपण बोलवाल तिकडे येऊं,' असें पत्र जानोजीनें ७ फेब्रुवारी १७५७ रोजीं लिहिलें, [ का. सं. प. या. ३७४].

याच प्रसंगांत खालील पत्र जानोजीनें ३० मार्च १७५७ रोजीं दीक्षितास लिहिलेलें आहे. 'पैठणावरि मुक्काम करण्यास अडचणी आहेत; म्हणोन, गंगातीरीं मुक्काम नेमले. मागाहून महंत हंसपुरीबावा व बाबूराव कोन्हेर येतील त्यांस स्वामींच्या भेटीची अपेक्षा व आम्हांसही आहे. कै. तीर्थरूपांमागें स्वामी वडील आहेत. तीर्थरूपांपेक्षां आमचे ठायीं ममता विशेषात्कारें धरिली पाहिजे. वर्षासनाविषयीं तिळतुल्य अंतर होणार नाहीं. स्वामींनीं कृपा करून भेटीचा लाभ दिला पाहिजे. येते समयीं शामराव विश्वनाथ यांसही घेऊन यावें' [ का. सं. प. या. ३५ ]. दीक्षितांचें संधान सर्व पक्षांशीं होतें; आणि त्यांच्या मार्फत सर्वांनीं समक्ष भेटून तंटा तोडावा, असा विचार ठरलेला होता. तदनुसार पेशवा सुद्धां सर्वांच्या भेटी होऊनच पुढें तह ठरला, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं. हंसपुरी हा कोणी मदतनीस आणलेला असून पुढें त्याचें भोसल्यांशीं व पेशव्याशीं वांकडें आलें, [ खं. ३ ले. ५५७ ].

ता. २८ फेब्रुवारी स. १७५८ च्या पत्रांत खालील मजकूर आहे. 'भोसल्यांचा कारभार विल्हेस लाविला. वीस लक्ष रुपयांचा करार यांजवळून करून घेतला. कांहीं सावकारी निघा, कांहीं किरकोळ त्यांजकडील सरदारांनीं द्यावे, असा तह ठरला आहे. त्यांस वस्त्रें परवां दिलीं. आतां मजल दर मजल पेशवे वेरूळाहून नाशकास जाणार.' ( प्रे. के. सं. पु. २

ले. ११ ). रामराजाचे खर्चास दरसाल दहा लक्ष रुपये द्यावे; व दहा हजार फौजेनिशीं मराठी राज्याचे नोकरीस यावें, अशी रघूजीच्या वेळची कबुलायत जानोजीनेंही लिहून दिल्ही. तसेंच अलिवर्दीशीं १७५१ त केलेले तहास पेशव्यानें मान्यता दिली. ( डफ २ पृ. ७५–७६ ). भोसल्याच्या या कौटुंबिक तंट्यांत नानासाहेबाचें व बाबूराव कोन्हेरचें बरेंच वाकडें आलें असावें, असें दिसतें. किंबहुना भोसल्यांच्या पदरीं असणाऱ्या कोल्हटकरांची व पेशव्याची आरंभापासूनच पुष्कळशी चुरस व तेढ असावी, असा बळकट संशय येतो. इतर सर्व सरदारांस, त्यांच्या पराक्रमाबद्दल पेशव्यांकडून प्रोत्साहन व शाबासकी देण्यांत येत असतां, भोसल्यांच्या पदरीं कोल्हटकर घराण्यांतील पुरुष अलौकिक पराक्रम करीत असतां, व भास्करपंतासारखा मोहरा, खून होऊन गमावला असतां त्यासंबंधाने पेशव्यांनीं शब्दानें किंवा कृतीनें यत्किंचित्ही बरावाईट अभिप्राय दाखविला नाहीं. जणूं काय, भोसल्यांचे राज्य व त्यांचा उद्योग हा मराठशाहीचा अंशच नव्हे. कदाचित् तो अभिप्राय हल्लीं उपलब्ध नसेल, तर निराळी गोष्ट. रघूजीस पेशव्यांचे पाठबळ असतें, तर भास्कररामाच्या खुनाबद्दल सूड तेव्हांच घेतां आला असता. याचा दोष उभयपक्षीं आहे. भोसल्यांना पेशव्यांची मध्यस्थी अगदीं नको होती; आणि बऱ्या उद्देशानें जरी पेशव्यांनीं भोसल्यांच्या कामांत लक्ष घातलें असतें, तरी तो प्रकार त्यांस रुचला नसता. कसाबसा एकवार मिटलेला तंटा पुन्हां उपस्थित होण्यास आपणाकडून कारण होऊं नये, अशी पेशव्याची भावना भोसल्यासंबंधानें असल्यामुळें, इच्छा असूनही योग्य प्रसंग येईपर्यंत नानासाहेबानें एकदम त्यांच्या कामांत कधींही लक्ष घातलें नाहीं. शिवाय बिंबाजी भोसल्याचा ताराबाईशीं आप्तसंबंध असल्यामुळें पेशव्यास पूर्वी बिंबाजीची धास्ती नेहमींच वाटत असे, तिच्या निरसनार्थही भोसल्यांस बांधून घेणें पेशव्यास अगत्याचें वाटलें; पण रघूजीच्या मृत्यूनंतर दोघां बंधूंच्या भांडणानें नानासाहेबास मध्यें पडण्याची संधि प्राप्त झाली, आणि त्यानें त्या संधीचा

उपयोग करून घेतला. पराक्रमाच्या दृष्टीनें पाहतां पेशव्यांच्या तोडीचेंच कोल्हटकरांचें घराणें जोमदार होतें. या तोडीचें तिसरें विस्तृत घराणें पटवर्धनांचें होय.

कोन्हेररामाच्या घराण्यास दूर सारून, नानासाहेबानें प्रथम मोठ्या युक्तीनें देवाजीपंत चोरघोड्यास भोसल्यांच्या कारभारांत मुद्दाम पुढें आणिलें. कोल्हटकरांच्या घराण्यांतील लहानमोठे अनेक पुरुष, पेशव्यांच्या कुटुंबाप्रमाणें होतकरू व पराक्रमी होते. त्यांची भोसल्यांच्या दौलतीविषयीं अत्यंत निष्ठा असून त्या दौलतीच्या रक्षणार्थ सर्वस्वावरही पाणी सोडण्यास ते तयार असत. असें दिसतें कीं रघूजीच्या पश्चात् कोल्हटकरांनीं दौलतींतून आपलें लक्ष काढलें, त्यास कारण देवाजीपंत चोरघोडे हा पेशव्यांचे विश्वासांतील इसम होय. कोल्हटकरांस मागें सारण्यास हा कारण झाला, यावरून पेशव्यांचें त्याला पाठबळ असले पाहिजे असें वाटतें. भोसल्यांच्या भांडणासंबंधानें पेशव्याचा आशय, त्यानें बाबूराव कोन्हेर यास खालील पत्रांत लिहून कळविला आहे. हें पत्र १३ जुलई १७५७ चें आहे. [ खंड. ३ ले. १९३ ]. ' आमच्या नजरेचे रुपये व चिरंजीव भाऊचे नजरेचे रुपये करार केले, ते अद्याप दिले नाहींत. आमचे कारकून समागमें नेले, त्यांस हा काळवरी ठेविलें. रुपये देत नाहीं, असो. नजरेच्या रुपयांची चिंता काय ? तुम्हीं कबूल केल्याप्रमाणें द्यालच. राजश्री मुधोजी भोसले येथें असतां ११ लक्षांचे महाल द्यावयाचा करार ठरला. त्यांचे कमाविसदार समागमें नेले, त्यांस महालीं दखलकार केलें नाहीं. महालाचा पैका मन माने तो वसूल घेतला; महाल खराबींत आणिला. मल्हारनिल्हे आमच्या वचनावरून मोहिमेस हिंदुस्थानांत गेले. सावकारापासून कर्ज रुपये सरकाराचे मध्यस्थीनें मल्हारनिल्हेस दिल्हे. त्यांचा रुपाया त्यास न पावला तर हे गोष्ट कशी ठीक पडेल ? मल्हारनिल्हेचे कमाविसदार समागमें नेले, त्यांस महालीं दखलकार केले असते, तरी कांहीं वसूल त्यांजकडे पडता, कांहीं

तुम्हांकडे सनदपैवस्तीपासून पडता. ते गोष्ट न करतां, बिलकुल वसूल तुम्हीं घेतला. हाल सालचाही घेतां म्हणोन कळों आलें. ऐशास आम्ही बोलाचालावयाची गोष्ट बाकीस ठेवली असें नाहीं. मशारनिल्हेनीं सावनूरच्या मुक्कामीं चाकरी केली ते सालचे चार लक्ष रुपये तुम्हीं वाजवी त्यांस द्यावे, ते न देतां आम्हांवरी पाडिले. आम्हीं त्यांस दिले. साल गुदस्तांचे तों तुम्हीं त्यांस ११ लक्ष द्यावे त्यास घालमेल करून वसूल झाडे यानिशीं घेतला. त्यांचे कमाविसदार बैसवून ठेविलेत. हे कोण गोष्ट ? ११ लक्ष रुपये तुम्हांस सुटतात ऐसा अर्थ नाहीं. पत्रदर्शनीं ११ लक्ष रुपये पाठवून देणें. ये विषयीं राजश्री जानोजी भोसले, सेनासाहेब सुभा यांस लिहिलें आहे. तुम्ही त्यांचे यख्तियारही आहां. दीर्घदर्शित्वें सर्व आपण समजावून व तुम्हींही उचित रीतीनें ध्यानास आणून रुपये पाठवून देणें. वरकड गोष्टी आणिक एखादे जागां चालतील. आम्हांजवळ बोलोन चालोन करार जाहला असतां, त्यास नवदिगर करावें म्हणावें हें कसें ठीक पडेल ? अशा गोष्टी सहसा तुम्हीं सरकारीं करूंच नयेत. अशा गोष्टीनें परिणाम लागेल, न लागे, तो तुम्हांस न कळेसा काय ? या उपरी ११ लक्ष रुपये सत्वर पाठवून देणें. करार केल्या गोष्टी सरकडाप्रमाणें येथील ढकलीत न्याव्या, गोड ल्याहावें, असें सहसा न करावें, हेंच उत्तम. सत्वर यथार्थ काय तें उत्तर पाठवणें.' या पत्रांतील खोंचदार भाषा ध्यानांत ठेवण्याजोगी असून तिजवरून पेशव्याचा भाव चांगला व्यक्त होतो. या पत्रांत जानोजीच्या विरुद्ध पेशव्यानें मुधोजीचा पक्ष घेतला आहे. दोघां भावांमध्यें दौलतीची सारखी वांटणी करावयाची, हा प्रकार जानोजीस कबूल नव्हता, आणि पेशव्यांनाही तो मंजूर करतां येत नव्हता. राज्य किंवा जहागीर एकाच इसमाकडे चालावयाची असते. उद्योग किंवा निर्वाहाचें साधन मिळण्यापलीकडे इतरांचा त्याजवर हक्क नसतो, म्हणून वास्तविक वारस ठरविण्यापलीकडे पेशव्यांस कांहीं एक करतां येत नव्हतें. यावरून मुधोजीस वारस म्हणून उभा

करण्यांत पेशव्याचें अंग असलें पाहिजे. अर्थात् यापुढें कोल्हटकर मुजुमदारांचें व पेशव्यांचें सख्य राहिलें नाहीं. जातभाईच्या विरुद्ध पेशवे वागले अशी याच्या सारखीं आणखी पुष्कळ उदाहरणें आहेत.

भोसले बंधूंच्या भांडणाचा निकाल लवकरच लागला असावा असें अनुमान होतें. तिसऱ्या खंडांतील लेखांक १८८ व ५५६ हे दोन्ही लेख भोसल्यांच्या संबंधाचें करार आहेत. दोन्ही सन १७५७ चे आहेत, आणि बहुधा ते जुलई महिन्यांतील वरील पत्रानंतरचे असावेत. ले.१८८ चा १४ कलमी करार जानोजीनें पेशव्यास लिहून दिला, आणि त्यांत मुधोजी व बिंबाजी भोसले यांस १५ लक्षांचा सरंजाम देण्याचें ठरविलेलें आहे. ले. ५५६ च्या करारनाम्यांतही पेशवे व भोसले यांमधील तंट्यांचे जाबसाल दाखल आहेत. ना. भो. का. प. ले. ४४ पृष्ठ १२४ वर कलम ६ खालीं खालील मजकूर आहे. 'जानोजी भोसले राज्यावर बसले, तेव्हां मुधोजी भोसले यांनी कंबर फिसादाची बांधली जे, आम्हीं उभयतां मिळून राज्य करूं. याकरितां रहाटगांवचे मैदानांत लढाई झाली. या कर्कशांत दिवाकरपंत चोरघोडे मुधोजीस बोलले जे, कैलासवासी बाबासाहेबानीं तुमचे वांटणीस चंद्रपूर दिलें, तेंच घेऊन असा. वृथा खटपट करावी हें ठीक नाहीं. न ऐकतां लढाई केली. शेवटीं याच गोष्टीवर समजूत झाली ! ' वांटणीत जानोजीस 'सेनासाहेब सुभा ' व मुधोजीस ' सेनाधुरंधर ' असे किताब देऊन, मुधोजीनें जानोजीचा कारभार करावा असें ठरलें. तसेंच साबाजीनें दारव्हें येथें व बिंबाजीनें छत्तिसतगडास रहावें असें ठरलें.

मुधोजीबद्दल नानासाहेबानें जानोबास सन १७५८–५९–६०या सालांत केव्हां तरी पत्र लिहिलेलें आहे. ' राजश्री मुधोजी भोसले सेनाधुरंधर यानीं सर्वांशीं बदअमलीचा प्रकार केला. सावकार व मुलूख बुडाविला. भाऊपणांतही सुधे नाहींत. चाकरींतही तोच प्रकार आहे. आपलें स्वरूप तरी जतन करावें, ते गोष्ट न केली. सरंजाम चोरावती खाऊन सर्व खराबा केला. वर्ष सवा वर्ष रूबरू सांगावयाचे प्रकारें सांगत असतां

कोणतीही गोष्ट घडून न आली. ऐशास मशारनिल्हेस ठिकाणीं ठेवावें, बहकूं देऊं नये, व मुलखाचा बंदोबस्त करावा, व लोकांचें देणें वारावें, सरकारचे चाकरीस फौज पाठवावी याप्रमाणें बंदोबस्त करावा.' [१३ सवाल ना. भो. का. प. ले. ४७ ] ज्या मुधोजीचा पक्ष घेऊन नानासाहेब भांडत होता, त्यास बंदोबस्तानें ठेवावा, असें सांगणें शेवटीं नानासाहेबासच प्राप्त झालें.

वऱ्हाडच्या सुभ्याचें काम भास्कररामाच्या स्त्रीच्या तर्फेनें कृष्णाजी गोविंदकडे वहिवाटीस होतें. जानोजीस कृष्णाजीचें काम पसंत न पडून त्याजला काढून सुभ्याचे जागीं मानसिंगराव मोहिते यास नेमून, त्रिंबकराव कोन्हेर प्रभू याजकडे त्याची वहिवाट दिल्ही. म्हणजे भास्कररामाचे स्त्रीचा हक्क गेला. कदाचित् ती या वेळीं हयातही नसेल. कटक सुभ्यावर शिवभट साठे होताच. छत्तिसगडचा सुभा मोहनसिंग भोसले ( रघूजीचा लेकवळा ) याजकडेस दिल्हा; आणि नागपूरचा सुभा जानोजीनें स्वतः आपणाकडे घेतला. मागाहून मुधोजीचा बंदोबस्त करून पेशव्यांनीं त्यास रवाना केलें, तेव्हां त्याचा दिवाण सदाशिव हरि, व चिटणीस शंकराजीराम व महिपतराव दिनकर असे कारभारी पेशव्यांनीं नेमून दिले. मुधोजीचा भाऊ बिंबाजी देशीं जेउरास होता, तो स. १७५७ त मुधोजीजवळ चंद्रपुरास येऊन राहिला.

वऱ्हाडांत निजामाची व भोसल्यांची हद्द एकठिकाणीं आल्यामुळें उभयतांत नेहमीं कटकटी होत. वास्तविक त्यांचा उल्लेख स्वतंत्रच आला पाहिजे. [ ना. भो. का. प. ४३-४४ पाहावें.] उभय बंधूंच्या वांटणीच्या मुलखांत निजामाकडून दखल होत होती ती, जानोजीनें स्वारी करून मिटविली; आणि वांटणीप्रमाणें निश्चयांत आणून, पंत प्रधानांचा निरोप घेऊन परत वऱ्हाडांत आले. बरोबर दिवाकरपंत चोरघोडे व रखमाजी गणेश चिटणीस हे मुख्य कारभारी होते.

समाप्त.

# सूचि.

# श्रीसयाजीसाहित्यमाला.

—:o:—

| | | |
|---|---|---|
| १ संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. | २-८-० | ... |
| २ भूपृष्ठविचार ( सचित्र ) | ०-१० ० | ... |
| ३ आपणा लघुबंधु अंग्रेज. | १-०-० | ... |
| ४ अलक्कानो अद्भुत प्रवास ( सचित्र ) | १-६-० | ... |
| ५ माबापने बे बोल. | ०-६-० | ०-४-० |
| ६ हिंदुस्थानना देवो ( सचित्र ) | ४-०-० | ... |
| ७ नीतिशास्त्र. | ०-१४-० | ०-१०-० |
| ८ प्रेमानंद ( सचित्र ). | १-०-० | ०-१२-० |
| ९ जगतनो वार्तारूप इतिहास ( ग्रंथ १ लो ) | ३-८-० | ... |
| १० बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण ( सचित्र ) | ०-१०-० | ०-९-० |
| ११ देहधर्मविद्यानां तत्त्वो. | १-०-० | ०-१४-० |
| १२ विज्ञानप्रवेशिका | ०-११-० | ... |
| १३ जिंदगीनो विमो. | ०-११-० | ... |
| १४ तुकाराम | ०-११-० | ... |
| १५ सुधारणा व प्रगति. | ३-०-० | ... |
| १६ वीरपुरुषो. | ०-१२-० | ०-११-० |
| १७ उद्भिज्जविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ) | १-०-० | ०-१५-० |
| १८ करोळीआ. ( सचित्र ) | ०-१४-० | ०-१३-० |
| १९ ब्रिटिश राष्ट्रीय संस्थाओ. | ०-१३-० | ०-१२-० |
| २० मिराबाई | ०-११-० | ०-१०-० |
| २१ शिस्त | १-०-० | ... |
| २२ प्राणीविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र. ) | १-०-० | ०-१४-० |
| २३ दीघनिकाय [ भाग १ लो ] | १-८-० | ... |
| २४ पॅलेस्टाईननी संस्कृति. | ०-१२-० | ०-११-० |
| २५ मनुष्यविद्यानां तत्त्वो. | १-०-० | ०-१५-० |
| २६ जगतनो वार्तारूप इतिहास [ ग्रंथ २ जो ] | ३-०-० | ... |
| २७ नीतिविवेचन | १-२-० | १-०-० |
| २८ बालोद्यानपद्धतिनं गृहशिक्षण ( सचित्र ). | ०-१४-० | ०-१२-० |

| | | | |
|---|---|---|---|
| २९ | कॉबेटनो उपदेश. | ०-१५-० | ०-१४-० |
| ३० | गिरधर. | ०-१४-० | ०-१३-० |
| ३१ | पार्लमेन्ट ( गुजराती ). | १-४-० | १-२-० |
| ३२ | तुलनात्मक धर्मविचार. | ०-१३-० | ०-१२-० |
| ३३ | मालण. | १-०-० | ०-१५-० |
| ३४ | इतिहासनुं प्रभात. | १-४-० | १-२-० |
| ३५ | जीवविद्या. | १-०-० | ०-१४-० |
| ३६ | धर्मनां मूळतत्वो. | ०-१०-० | ०-९-० |
| ३७ | नैतिक जीवन तथा नैतिक उत्कर्ष. | ०-१५-० | ०-१४-० |
| ३८ | तुलनात्मक भाषाशास्त्र. | १-४-० | १-२-० |
| ३९ | हिंदुस्थानाचा लष्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा. | | |
| ४१ | महाराजा शिवाजी. [ सचित्र ]. | १-६-० | १-०-० |
| ४२ | विविध धर्मोनुं रेखादर्शन. | | ०-१२-० |
| ४३ | नवीन जापाननी उत्क्रांति. | | १-०-० |
| ४४ | उत्तर युरोपनी पुराणकथा. | | ०-१४-० |
| ४५ | विष्णुदास. | | १-०-० |
| ४६ | राजनीतिनो संक्षिप्त इतिहास. | | १-४-० |
| ४७ | समाजशास्त्रप्रवेशिका. | | ०-१४-० |
| ४८ | बाळउछेर. ( सचित्र ) | | १-८-० |
| ४९ | वीर शिवाजी. ( सचित्र ) | | १-०-० |
| ५० | बाळस्वभाव अने बाळउछेर. | | १-६-० |
| ५१ | शरीर यंत्रनुं रेखादर्शन | | १-४-० |
| ५२ | शाळा अने शिक्षणपद्धति | | ०-१५-० |
| ५३ | मणिशंकर कीकाणी | | १-६-० |
| ५४ | संस्कृति अने प्रगति. | | २-८-० |
| ५५ | चीननी संस्कृति. | | १-६-० |
| ६२ | दलपतराम. | | १-[illegible] |
| ६५ | हिंदुस्थानना अर्वाचीन इतिहास-मराठी रियासत-मध्यविभाग, | | २-१२-० |
| ६६ | सदर—मध्यविभाग २ | | ३-०-० |

# श्रीसयाजी–बालज्ञानमाला.

—— :०: ——

| | | |
|---|---|---|
| १ | गिरनारनु गौरव ( सचित्र ) | ०–६–० |
| २ | ऋतुना रंग. | ०–६–० |
| ३ | शरीरनो संचो. ( सचित्र ) | ०–६–० |
| ४ | महाराणा प्रताप. ( सचित्र | ०–६–० |
| ५ | कोषनी कथा ( सचित्र ) | ०–६–० |
| ६ | पाटण-सिद्धपुरनो प्रवास. | ०–६–० |
| ७ | पावागढ. | ०–६–० |
| ८ | औरंगझेब [ सचित्र ] | ०–६–० |
| ९ | मधपुडो. [ सचित्र ] | ०–६–० |
| १० | रणजीतसिंह. | ०–[illegible]–० |
| ११ | सुखी शरीर. | ० [illegible] ६–० |
| १२ | श्री हर्ष. | ०–६–० |
| १३ | सूर्यकिरण ( सचित्र ) | ०–६–० |
| १४ | वातावरण. | ०–६–० |
| १५ | ग्रहण ( सचित्र ) | ०–६–० |
| १६ | बालनेपोर्लीअन. | ०–६ [illegible] |